लंडन लायब्ररी करितां सरकारनें मंजूर केलेला; क्षत्रिय-मराठा ग्रंथपरिक्षक-मंडळ मुंबई, यांनीं बक्षिस देऊन गौरविलेला आणि विद्वानांनीं व वृत्तपत्रांनीं शेंकडों अभिप्राय देऊन वाखाणलेला

प्राचीन

# क्षत्रियांचा सचित्र इतिहास.

अर्वाचीन

## भाग पहिला

### धार्मिक, सामाजिक व राजकीय स्वरूपाचा इतिहास.


ले०—के. बी. देशमुख

'क्षत्रिय कुलवंश प्रदीप', 'क्षत्रियांची श्रावणी', 'क्षत्रियांचा सामना', 'क्षत्रियांचा जातवार इतिहास', 'मराठा क्षत्रियांचा इतिहास', 'कीर्तनरत्नमाला', 'व्याख्यान-रत्नमाला', 'सुबोध-सत्यनारायण' इ० इ० ग्रंथांचे कर्ते

उपलेखक संपादक 'सुबोध-ग्रंथमाला', उमरावती

आणि

प्र० लेखक—प्रोफेसर कृष्णमूर्ति डी. पोटफोडे.

L. M S, F C. H I.

गोल्ड् मेडॅलिस्ट्, कविरत्न ( कलकत्ता ), पूना सर्टिफाइड् ॲस्ट्रॉलॉजर, आयुर्वेद मार्तंड, भिषग्शिरोमणि,

संपादक—इंद्रधनुष्य.



सुधारून वाढविलेली द्वितीयावृत्ति

शके १८५१ ] किंमत ३॥ रुपये [ इ० सन १९२९

॥ श्रीपितृमूर्तिभ्याम् नमः ॥



कै० श्रीमंत **बापूसाहेब देशमुख,** शिरसगांवबंडकर.

॥ श्रीमातृमूर्तिभ्याम् नमः ॥



कै० श्री० **सारजाबाईसाहेब देशमुख,** शिरसगांवबंड.

# अर्पण पत्रिका



क्षात्रकमलोद्भव विष्णुस्वरूप परमपूज्य तीर्थरूप
कै० श्रीमंत बापूसाहेब देशमुख शिरसगावबंडकर
आणि
क्षात्रकमलोद्भव लक्ष्मीस्वरूप परमपूज्य मातृदेवि
कै० श्रीमती सारजाबाईसाहेब देशमुख
यास
त्यांच्या पदतलीच्या क्षुद्र परागाकडून, अत्यंत दिव्य
अशा क्षात्रकुलसुशोभनाप्रीत्यर्थ, अपरिमित तेजस्वि
अशा क्षात्रवंशोद्धरणाप्रीत्यर्थ, अवर्णनीय अशा
पवित्रतम क्षात्रतेजाच्या प्रस्तृतीकरणाप्रीत्यर्थ
आणि जगदांतरी क्षात्रप्रभाप्रदर्शनाप्रीत्यर्थ ही
क्षात्रसुगंधमंडित वायुलहर, ही क्षात्र-
मौक्तिक ग्रथित मुक्तामाला ही क्षात्रतारां-
कित आकाशगंगा, ही क्षात्रपुष्प प्रब-
धित कुसुममाला ही क्षात्रवीरप्रिय
सुरुचिर वार्तालहरि आणि ही
क्षात्रशक्तिप्रिय इतिहास-
मंजिरी, अत्यंत प्रेम-
भावानें सादर सम
र्पित होवो —ग्रंथकर्ता

[ हा ग्रंथ सरकारने पसंत करून लंडन लायब्ररीकरिता मंजूर केल्याबद्दल अलीशान गव्हर्नरसाहेबाचे पत्र ]

# इंग्रजी पत्राचें भाषांतर

नं. १७/१५२ पा. ओ.

नागपूर, ता. २३।१।१९२८

अलीशान मध्यप्रांत सरकारचे पब्लिसिटी ऑफिसर-साहेब यांजकडून

जनाब डेप्युटी कमिशनरसाहेब जिल्हा उमरावती यांजकडे

बाब — इंडिया ऑफिस लायब्ररी लंडनकरिता पुस्तकांची मंजुरी

१ अलीशान गव्हर्नरसाहेब यांचे हुकुमावरून आपणांस विनंति करण्यांत येते की, खाली लिहिलेल्या ग्रंथांची एक एक प्रत ते ग्रंथ छापणारांकडून घेऊन आमचेकडे लवकर पाठविण्याची कृपा करावी.

२ मध्यप्रांत सरकारचे गॅझेट भाग ८, ता. २७-८-१९२७ याचे ३० जून १९२७ साली संपलेल्या दुसऱ्या तिमाहीचे कॅटलॉगमध्ये रजिस्टर झालेल्या ग्रंथांमधून हे ग्रंथ पसंत केले असून ते लंडनच्या इंडिया ऑफिस लायब्ररीकरितां तिकडे पाठवावयाचे आहेत.

नं. ३९४, पा. उमरावती, ता. १८-१-१९२८

उमरावती येथील सुबोध छापखान्याचे मॅनेजर यांस—

१ क्षत्रियांचा इतिहास, भाग १ ला

२ क्षत्रिय कुलवंशप्रदीप

हे ग्रंथ तुमचे छापखान्यांत छापले आहेत. त्या प्रत्येक ग्रंथाची एक एक प्रत आमचेकडे पाठवावी.

(सही) ३० डेप्युटी कमिशनर
जिल्हा उमरावती

[ मूळ इंग्रजी पत्राची नक्कल मागे पाहा ]

Copy of letter No 17/172-P O, dated the 23rd January 1928, from the Publicity Officer to Government, C P Nagpur, to the Deputy Commissioner, Amraoti

Subject—Supply of Books to the Librarian, India office Library, London

I am directed by the Governor in Council to request you to be good enough to obtain, free of cost from the printer concerned, a copy of each of the books named in the margin, and forward them to this office at an early date

1 Kshatriyancha Itihas Bhag 1 and 2
2 Kshatriya Kul Vansha Pradeep

2 The books are required for transmission to the Libriraian, India office Library, as they have been selected from the catalogue of books registered in the second quarter 1927, published in part VIII of the Central Provinces Gazette, dated the 27th August 1927

No 394 A

Dated Amraoti the 3rd February 1928

Copy is forwarded to Manager, Subodha Printing Press, Amraoti, for sending a copy of (1) Kshatriyancha Itihas Bhag 1 and 2, (2) Kshatriya Kul Vansha Pradeep to this office early

*Signature,*
E A. C
for Deputy Commissioner, Amraoti.

# अभिप्राय

# *⁂ क्षत्रियांचा इतिहास ⁂*

## या ग्रंथाच्या पहिल्या आवृत्तीसंबंधानें व्यक्त करण्यांत आलेल्या अनेक अभिप्रायांपैकीं कांहीं अभिप्रायांतील संक्षिप्त अवतरणें खालीं दिलेलीं आहेत.

**विजयी मराठा, पुणें** [ ता ४ जुलै, सन १९२७ ]—या इतिहासांत वैदिक काळापासून तों आतांपर्यंतच्या क्षत्रियांची संपूर्ण माहिती दिली आहे पुस्तक अत्यंत उपयुक्त झाले असून संग्रहणीय आहे परिश्रमाच्या मानानें तीन रुपये किंमत विशेष नाहीं.

**किर्लोस्कर खबर, किर्लोस्करवाडी** [ जुलै, सन १९२७ ]—सदर पुस्तकांतील विपर्यस्त भाग वगळल्यास इतर ऐतिहासिक माहितीच्या दृष्टीनें पुस्तक उत्तम व सग्राह्य आहे इतक्या वृद्ध अवस्थेत श्री० देशमुख यांनीं असा ग्रथ लिहिला हा त्यांचा उत्साह अभिनंदनीय आहे

**नवयुग, मुंबई** [ ता १९ जून, सन १९२७ ]—हे पुस्तक पुष्कळ माहिती गोळा करून परिश्रमपूर्वक लिहिलेलें आहे याच्या वाचनापासून क्षत्रियांस आपली पूर्व-पीठिका कळून येऊन त्याच्यात स्वाभिमान जागृत होईल, व अधश्रद्धेने ब्राह्मणांच्या कच्छपीं लागण्याचा कित्येकांच्या वृत्तींत खास फरक पडेल, आणि आपल्या खऱ्या धर्माची जाणीव होईल हल्लींच्या काळीं असल्या पुस्तकाची फार उणीव होती, ती भरून काढल्या-बद्दल आम्ही श्री० देशमुख यांचें मन:पूर्वक अभिनंदन करितों

**हंटर, कोल्हापूर** [ता २५ मार्च, सन १९२७]—'क्षत्रियांचा इतिहास', हा ग्रथ फार महत्त्वाचा आहे श्री० काशीराव देशमुख यांचे पचवीस वर्षांचे वाचन, विचार व अनुभव यांचें हें एक उत्तम फळ आहे .एकदरीत हा ग्रंथ इतका मौल्यवान् झाला आहे कीं, प्रत्येक ब्राह्मणेतराचे घरीं तो आधारभूत म्हणून बाळगण्यास इष्ट आहे या ग्रंथानें देशमुखसाहेबांनीं वाङ्मयांत फारच उत्तम भर घातली आहे याबद्दल आम्ही त्यांचें मन:पूर्वक अभिनंदन करितों ग्रथाचे मानानें तीन रुपये किंमत जास्त नाहीं

**राष्ट्रवीर, बेळगांव** [ता १४ जून, सन १९२७]—हा 'क्षत्रियांचा इति-हास' सर्व ब्राह्मणेतरांना स्वाभिमानोत्तेजक असून अत्यत परिश्रमपूर्वक व उपपत्तीसह

लिहिण्यात आला आहे हा एकच ग्रंथ संग्रहीं ठेवल्यापासून अनेक गोष्टींची ओळख होणार आहे थोडक्यांत सांगावयाचें झाल्यास हा क्षत्रियांचा 'सर्वसंग्रह' होय मोठ्या आयासानें लिहिलेल्या या ग्रंथाचीं सुमारें ७०० पृष्ठें असतांही केवळ तीन रुपये किंमत ठेवण्यांत आलेली आहे यास्तव श्री० देशमुख यांचें आम्ही मनःपूर्वक अभिनंदन करितों, आणि त्यांच्या 'क्षत्रियांच्या इतिहासा'चें सुस्वागत करितों

**परीक्षक, बेळगांव** [ता १५ सप्टेंबर, सन १९२७]—**'क्षत्रियांचा इतिहास'** हा ग्रंथ उमरावतीचे वयोवृद्ध नागरिक महाशय काशीराव बापूजी देशमुख या गृहस्थांनीं अत्यंत परिश्रमानें लिहिलेला आहे त्यांत ग्रंथकाराचाही एक फोटो आहे त्यांची भव्य मुद्रा पाहूनच त्यांजबद्दल आमच्या मनात आदरभाव जागृत झाला या ग्रंथांची एक प्रत सामर्थ्य असणाऱ्या प्रत्येक गृहस्थानें आपल्या संग्रहीं ठेवावी

**ज्ञानसिंह, पुणें** [सप्टेंबर, सन १९२७]—सदर पुस्तक अत्यंत परिश्रमपूर्वक तयार केलेले आहे पुस्तकांतील भाषा प्रौढ आहे मांडणी व ब्राह्मणी मताचें खंडण उत्तम तऱ्हेनें करून क्षत्रियाचें अस्तित्व साधार सिद्ध केले आहे श्रमाच्या मानानें पुस्तकाची किंमत तीन रुपये योग्य आहे ग्रंथकर्त्यांच्या वयमानाकडे पाहिलें म्हणजे या परिश्रमाचें फारच कौतुक वाटते इतका मोठा व माहितीनें परिपूर्ण असा क्षत्रियाविषयी ग्रंथ आजपर्यंत उपलब्ध नव्हता, ही उणीव त्यांनीं भरून काढली आहे एकूण, पुस्तक संग्रहणीय आहे ब्राह्मणेतरांनीं व ब्राह्मणानीही सदर पुस्तक वाचावे, अशी आमची शिफारस आहे

**जागृति, बडोदें** [ता ५ नोव्हेंबर, सन १९२७]—**'क्षत्रियांचा इतिहास'** हें पुस्तक वाचून तर श्री० देशमुखाच्या अगाध विद्वत्तेबद्दल आम्हीं अगदीं विस्मयचकितच झालो. या पुस्तकास **'क्षत्रियांचा इतिहास'** असे लहानसेंच नाव जरी दिलेले असले, तरी हा एकंदर ग्रंथ म्हणजे एक ज्ञानकोशच आहे असें म्हणावें लागतें श्री० देशमुखाच्या मुखकमलावर झळकणारे क्षात्रतेज त्यांच्या लेखांत पदोपदी स्पष्ट दृग्गोचर होतें अगदी बारीक टाइपांत छापलेला सुमारें ७०० पृष्ठांचा ग्रंथ श्री० देशमुखांच्या दीर्घोद्योगाची साक्ष पटवितो वेदकालीन क्षत्रियांपासून आजपर्यंतच्या क्षत्रियाची इत्थंभूत माहिती या पुस्तकात आढळते शेकडों ग्रंथ वाचून, त्यांची टिपणे, टाचणें करून त्यांचा पुस्तकांत यथायोग्य रीतीनें पुरस्कार करण्याचें अत्यंत बिकट कार्य प्रसिद्ध इतिहासकार गीबन यानें जितक्या कुशलतेनें केलेले आहे, तितक्याच कुशलतेनें हें कार्य या महाराष्ट्र-गीबनें—श्री० देशमुख यांनीं—केलेलें आहे हे सर्वच महाराष्ट्रीयांस भूषणास्पद आहे तरी प्रत्येक इतिहासज्ञानें या पुस्तकाचा अवश्य संग्रह करावा, अशी आमची शिफारस आहे

**भगवा झेंडा, कोल्हापूर**—[ता १३ आक्टोबर सन १९२७] श्री० काशीराव बापूजीराव देशमुख, उमरावती, यांनीं धार्मिक, सामाजिक व राजकीय माहितीनें

परिपूर्ण असा, ऐतिहासिक सत्याधार 'क्षत्रियांचा इतिहास' हा ग्रंथ लिहून महाराष्ट्रीय बहुजन समाजाची अत्यंत अमोल अशी कामगिरी बजाविली आहे, याबद्दल अखिल बहुजन-समाजानें या त्यांच्या अमूल्य कृतीकडे सहृदयतेनें पाहणें अत्यंत जरूर आहे त्यांनीं हा ६२७ पानांचा प्रचंड ग्रंथ लिहून महाराष्ट्र साहित्य-सम्प्रदांत एका नवीन प्रकारचें तेज उत्पन्न केलें आहे. क्षत्रिय परंपरेचा साग्र इतिहास लिहिण्याचें कार्य करणें अत्यंत जरूर होतें, तें कार्य श्री० काशीरावजी यांनीं आपल्या शिरावर घेऊन यथासांगपणें पार पाडलेलें आहे सर्व दृष्टींनीं जर विचार केला तर ऐतिहासिक सत्य माहितीने परिश्रमपूर्वक लिहिलेल्या या ग्रंथाइतका दुसरा ग्रंथ आजतागायत झाला नाहीं, हें सर्वांना कबूल केलेंच पाहिजे हा ग्रंथ प्रसिद्ध करून श्री० काशीराव देशमुख यांनीं अमूल्य कामगिरी बजाविली असून तिचें चीज करणें हे प्रत्येक महाराष्ट्रीयाचें आद्यकर्तव्य आहे

**महाराष्ट्र**—'**क्षत्रियांचा इतिहास**' **भाग १-२**—लेखक-श्री० के बी. देशमुख उमरावती-किं ३ रु ब्राह्मणेतर सर्व जातींनीं आपापल्या हल्लींच्या विविक्षित जातीचें नांव सोडून सर्वांनीं क्षत्रिय ही एकच जात सांगावी व मानावी, आणि एक जातीयत्वाची भावना अंत:करणांत बिंबवून मर्दपणाची क्षात्रवृत्ति अंगीं बाणवावी असें विस्तृत धोरण ग्रंथकर्त्यांनीं स्वीकारिलें आहे एकराष्ट्रीयत्वास आणि देशोद्धारास यांतील पुष्कळ तत्त्वें चांगलीं उपयुक्त ठरण्यासारखीं आहेत

**महाराष्ट्र केसरी**—श्री० के बी देशमुख, उमरावती, याचा '**क्षत्रियांचा इतिहास**' हा ग्रंथ आम्ही वाचून पाहिला पाच सहा हजार वर्षांपूर्वीपासूनची क्षत्रियांची उत्पत्ति, स्थिति आणि क्रान्ति यासबंधानें अत्यंत उपयुक्त अशी जनरल माहिती पहिल्या भागांत दिलेली असून, दुसऱ्या भागांत क्षत्रियात मोडणाऱ्या ९५ जातींची सप्रमाण माहिती दिलेली आहे **क्षत्रियांचा एनसायक्लोपीडिया** म्हणजे क्षत्रियांचा सर्वसारसंग्रह हें नांव या ग्रंथाला जास्त शोभले असतें तीन रुपये किंमत माफक आहे

**केसरी**—'**क्षत्रियांचा इतिहास**' **भाग १-२**—लेखक-श्री० के बी. देशमुख,उमरावती, किंमत रुपये ३, या ग्रंथाच्या नांवाप्रमाणेंच त्यांत वैदिककाळापासून आज-पर्यंतचीं क्षत्रियांचीं धार्मिक, सामाजिक व राजकीय स्थित्यंतरें व स्थानांतरें यांसबंधींची माहिती, शिलालेख, ताम्रपट, कोरीव लेणीं आणि प्राचीन ग्रंथ यांच्या आधारें चांगली सुसंगतवार दिलेली आहे क्षत्रियांच्या एकत्रित व सुसंगत माहितीचा यासारखा दुसरा ग्रंथ अद्याप पाहाण्यांत आला नाहीं ग्रंथ संग्राह्य आहे लेखकाचा भव्य फोटोही त्यांत आहे.



# प्राचीन क्षत्रियांचा सचित्र इतिहास.
## अर्वाचीन

### भाग पहिला—धार्मिक, सामाजिक व राजकीय स्वरूपाचा इतिहास

## ग्रंथनानुक्रम

| प्रश्नानुक्रम | पृष्ठांक |
|---|---|



प्रकरण अकरावें

## दक्षिणेंतील द्रवीड देशांत क्षत्रियांचा विस्तार, आणि शककर्ते क्षत्रिय १९०-१९८



| प्रश्नानुक्रम | पृष्ठांक |
|---|---|



प्रकरण बारावें

## पौराणिक काल आणि क्षत्रिय १९९-२०८

| ग्रंथनानुक्रम | पृष्ठांक |
|---|---|

प्रकरण सोळावें

चार वर्णात क्षत्रियांचें श्रेष्ठत्व २४३–२५२



प्रकरण सतरावें

जातिभेद २५३–२६०





प्रकरण अठरावें

क्षत्रियांचे धार्मिक व सामाजिक अधिकार २६१–२६६



प्रकरण एकोणिसावें

क्षत्रिय घराण्यांतील शरीर संबंध २६७-२८०

प्रथनानुक्रम — पृष्ठांक



सुप्रसिद्ध मराठी-हिंदी लेखक व कवि
प्रोफेसर कृष्णमूर्ति डॉ. पोटफोडे, L. M. S., F. C. H. I.
गोल्ड मेडॅलिस्ट्: कविरत्न (कलकत्ता); आयुर्वेद मार्तंड: भिषग्शिरोमणि:
संपादक—'इंद्रधनुष्य'.

# प्रस्तावना

**लेखक—प्रोफेसर कृष्णमूर्ति डी. पोटफोडे; कविरत्न (कलकत्ता),**
**संपादक—'इंद्रधनुष्य'.**

**इतिहासपुराणाभ्यां वेदं समुपबृंहयेत् ।**

—याज्ञवल्क्य स्मृति

**इतिहास प्रदीपन मोहावरण घातिना ।**
**लोकगर्भगृहकृत्स्नं यथावत्संप्रकाशितम् ।**

—महाभारत

" Those who do not look backward to antiquity, wil not looke forward to posterity " —*E. Burke*

**'क्षत्रियांचा इतिहास' या ग्रथाचें दिव्य वैशिष्टय**

उपरिनिर्दिष्ट अधिकारयुक्त अवतरणावरून ऐतिहासिक महात्म्याचें दिग्दर्शन अगदीं स्पष्ट पणे झाल्यावाचून राहात नाही पतित राष्ट्राच्या सुप्तावस्थेतील राष्ट्रघटकाना आपल्या तेजस्वी किरणाच्या प्रभावानें जागृत करणारा असा जर कोणता दिव्य प्रभाकर असेल, तर तो इतिहास हाच होय, आणि ही गोष्ट नव्यानें सागण्याचीही कांहीं आवश्यकता या इतिहास प्रभाकरानें आपल्या प्रत्यक्ष कर्तबगारीनें—आजपर्यंतच्या आपल्या असामान्य क्रांतिकर्तृत्वानें—ठेविली नाहीं इतिहास हा चलच्चित्र पटाप्रमाणे आपल्या पूर्वकालीन ऐश्वर्याची, पराक्रमाचीं, राजकारणांचीं, धर्मकारणांचीं, सस्कृतीची, उन्नत्यावनतीची, थोर थोर महात्म्याची, शूर वीरांचीं आणि अखिल लक्ष्य, मननीय, स्मरणीय, स्पृहणीय, इत्यादि महत्त्वाच्या घटनांचीं मनोवेधक चित्रें आपणासमोर माडीत असतो ही महत्त्वाची कार्यें करणारा इतिहास, ज्या राष्ट्रास, ज्या समाजास, ज्या एकाद्या महत्त्वाच्या घटकास—महत्त्वदर्शक घटनांतर्गत् घटकास—उपलब्ध होत नाहीं, तें राष्ट्र, तो समाज अगर तो एखादा विशिष्ट घटक, उन्नतीच्या शिखरावर आरूढ होऊन आपल्या जगतीतलावरील अस्तित्वाचे सार्थक्य केव्हांही करू शकत नाहींच नाहीं इतिहासाचा प्रदीप ज्या क्षेत्रात तेवत राहात नाही, त्या क्षेत्राच्या दुर्दैवाची बरोबरी करणारें दुसरें कोणतेंही क्षेत्र असणे सभवत नाहीं आणि म्हणूनच ज्या राष्ट्राचा इतिहासरूपीं हा आत्मा उत्फुल्लावस्थेप्रत पोंचलेला असेल तेंच राष्ट्र आदर्श राष्ट्रांत गणण्याची सर्वमान्य रीत पडलेली आहे सकटांनीं गांगरून गेलेल्या, विपत्ती आपत्तींनीं गांजून गेलेल्या आणि महान् दुर्धर परिस्थितींत काळ कंठित असलेल्या, अशा राष्ट्रघटकास जरी गत इतिहासाची उत्ते-

जक हेमगर्भरूपी मात्रा मिळाली, तरी ते राष्ट्र आपले पूर्वस्वरूप लक्षांत घेण्यास पूर्ण समर्थ झाल्यावाचून राहात नाहीं, असें हें स्वोद्धाराचें व स्वोन्नतीचें अमोघ अस्त्र आहे

या ऐतिहासिक महात्म्यास आपल्या आर्यसस्कृतीने फार प्राचीन कालापासून शिरोधार्य मानलेलें आहे, व त्याच्या उद्धारास सतत अविरतपणे शक्य तों हातभार लावण्याचेंही पवित्रतमकार्य तिने केलेले आहे प्राचीन आर्यघटकांनी इतिहासाची व्याप्ति ही संकुचित न ठेवतां अत्यत विस्तृत अशी ठेवलेली आहे आपणास आपल्या धर्माचे चित्र—आपल्या उदात्त आर्यधर्माचें गभीर चित्र—आपल्या प्राचीन इतिहासांत पाहतां येण्यास जितका वाव आहे, तितकाच त्यांत आपल्या राजकीय घडामोडीचा अगावर रोमाच उभे करणारा शौर्यरसपरिपूर्ण चित्रपट पाहतां येण्यासही त्याचा दरवाजा सताड मोकळा आहे आपला प्राचीन इतिहास असा सर्वांगसपूर्ण असल्यामुळेच आर्यसस्कृति ही जगद्वद्य होऊन बसलेली आहे आपणामधील इतिहासलेखकही तसेंच अधिकारी व विद्वन्मुकुटमणि होऊन गेल्याबद्दल त्याची ख्याति आहे ऐतिहासिक लेखनात जो निर्भिडपणा, जी सत्यप्रियता, जी नि पक्षपातीबुद्धि आणि जा सत्याविष्करणीय दृष्टि असावी लागते, त्या सर्व गोष्टीचा पवित्र सयोग आमच्या प्राचीन ऐतिहासिक लेखकाच्या परम निर्मल व उदार अत.करणात एकत्रितपणे सलग्न झालेला असल्याने ऐतिहासिक लेखनाच्या यशाचें उच्चतम श्रेय इतरापेक्षा त्याना अनेकपटींने प्राप्त करून घेता आले राजतरगिणीत म्हटलें आहे कीं—

**श्लाघ्यः स एव गुणवान् रागद्वेष विवर्जितः ।**
**भूतार्थ कथने यस्यस्ते यस्येव सरस्वति ॥**

म्हणजे, "ऐतिहासिक लेखनाची सफलता तेव्हाच सिद्धीस जाईल कीं, जे ऐतिहासिक लेखन रागद्वेषविवर्जित व सत्याविष्करणदृष्ट्या प्रयुक्त असे असून स्पष्टोक्तीपूर्ण असेल" असे आदर्श ऐतिहासिक लेखन आपल्या प्राचीन वेदविद् महाशयाचे प्रामुख्यानें होतें आपल्या प्राचीन श्रुति व सूत्रादि ग्रथात इतिहासाचा स्पष्ट उल्लेख केलेला असून तद्दर्शक जीं अनेक वचनें श्रुतिग्रथ सूत्रग्रथ, शतपथ ब्राह्मण, उपनिषदे इत्यादि प्राचीन ग्रथात आढळतात, त्यापैकीच एक सूत्र असे आहे की,—

"अथर्वांगिरसो ब्राह्मणानितिहासान्पुराणानि कल्पान्
गाथा नाराशसी प्रीणानि" —आ० गृ० सू० ३

यावरून पूर्वकालींच आपली ऐतिहासिक लेखनात श्रेष्ठ दर्जाची प्रगति झालेली होती, व इतिहासाच्याच गाथा, पुराणे, नाराशसि इत्यादि अगोपागाची चित्रेंही आपले पूर्वज रेखाटून चुकले होते हे सिद्ध होते इतिहास या शब्दाचें पृथक्करण केले असतां, "इति–ह–आस" म्हणजे "ह्याप्रमाणे घडल", असा त्याचा स्पष्टार्थ ध्वनित होतो म्हणजेच, इतिहास म्हणजे गतकालीन गोष्टीची जत्रि असा त्याचा सरळ अर्थ होतो. पूर्वेतिहासाची ही व्याख्या व आताच्या इतिहासाची व्याख्या, या दोहोंन महदतर

पडलेले आहे, आणि कालमानाप्रमाणें तसें होणें आश्चर्यजनकही नाहीं हल्लीं इतिहासाची व्याख्या करावयाची म्हणजे, बखर किंवा तवारिख अशा अर्थाची ती करावी लागते या दोन व्याख्यांतील फरक पाहूं गेलों असतां, आपणांस असें आढळून येते कीं, पहिल्या व्याख्येस केवळ प्राचीन ऋषींची वचनें आणि पुराणातरींचे लेख याचाच काय तो आधार मानलेला आहे, आणि दुसऱ्या म्हणजे अलीकडच्या व्याख्येस त्याहून सबळ पुरावे म्हणजे शिलालेख, जयस्तंभ, कोरीवलेणीं, ताम्रपटावरील लेख, स्थलकालादि सूक्ष्म निर्णय याचे भरभक्कम आधार आहेत याप्रमाणे प्राचीन व आर्वाचीन ऐतिहासिक परंपरेचें दिग्दर्शन आहे

गाथा म्हणून जो उपरिनिर्दिष्ट सूत्रांत इतिहासाचा एक पोटभेद वर्णिलेला आहे, त्याची व्याख्या अशी आहे की, एखाद्या विवक्षित व विशिष्ट अशा मननीय व आचरणीय अद्भुत प्रसंगाचे आकुंचित दृष्टीनें ज्यांत विवरण केलेले असतें, त्यास गाथा असे म्हणतात पूर्वकाली त्यास इतिहासाचें एक उपांग मानीत इतिहास व गाथा या दोहोंत भेद एवढाच की, इतिहासाचें क्षेत्र जेवढें अफाट व विस्तृत, तितकेंच गाथ्याचे क्षेत्र निर्बंधयुक्त व आकुंचित असतें

नाराशंसि म्हणून आणखी जे एक इतिहासाचेंच उपांग मानलेले आहे, त्याची व्याख्या अशी आहे कीं, एखाद्या ऐतिहासिक वीरपुरुषाचें उदात्त चरित्र ज्यांत वैयक्तिक महात्म्य कायम ठेवून वर्णिलेले असते, त्या चरित्रग्रथनास नाराशंसि असे म्हणतात. यामध्यें कधी कधी एखाद्या आदर्श अशा ऐतिहासिक वंशाबद्दल प्रकथनही केलेलें असतें अर्थातच, इतिहास हा जर समुद्र मानला, तर गाथा हें तळे मानावे लागेल व नाराशंसि ही विहीर मानावी लागेल प्रत्येकाचे क्षेत्र एकापेक्षा एक आकुंचित स्वरूपाचे असते मात्र त्याबरोबरच हीं सर्व अंगेउपांगे इतिहासाच्याच कक्षेमधील आहेत एवढी एक गोष्ट लक्षात घेतली, म्हणजे या बारीकसारीक गोष्टीबद्दल विशेष कीस पाडीत बसण्याची आवश्यकताच उरत नाहीं

उपरिनिर्दिष्ट सूत्रात इतिहासाची जी हीं गाथा, नाराशंसि, पुराणे आदि उपांगे वर्णिली आहेत, त्यांपकी पुराणासंबधीं मात्र विशेष अवधान ठेवण्यासारखे आहे, एवढेंच नव्हे तर प्राचीन अशीं जी **अस्सल पुराणें** अस्तित्वात असतील, त्याना ऐतिहासिक क्षेत्रात बरेच महत्त्वाचें स्थान मिळाल्याशिवाय रहात नाहीं

अलीकडे **मूळचीं अस्सल पुराणें** बव्हंशानी लुप्तप्राय झालेलीं दिसत असल्यामुळे, आणि त्याचा मूळची सत्यस्वरूपे धकाधकीच्या सामन्यात अगदींच पालटून गेल्यामुळे, आजचा बहुजनसमाज पुराणाविषयीं नाके मुरडीत असलेला दृष्टोत्पत्तीस येतो, व तसा तो दृग्गोचर न झाला तरच परमाश्चर्य होय ही ही गोष्ट आम्ही तितकीच ग्राह्य धरून चालतो कारण या पुराणातरींच्या घालघुसडीला विटून प्रत्यक्ष श्रीसमर्थांनीही असे उद्गार काढलेले आहेत कीं,—

**जयासि जैसें भासलें । तैसें त्यानें कवित्व केलें ।**
**शास्त्रामाजी घुसडुनी दिलें । उदर भराया कारणें ॥**

जेथे एक विरागी मनुष्य पुराणादिकातील वस्तुस्थितीचा विपर्यास झालेला पाहून वरील-प्रमाणे तीव्र शब्दांत त्यांची हेटाळणी करितो, तेथे आपणा विकारविलसित गृहस्थांची काय कथा !

वस्तुत. आम्ही वर म्हटल्याप्रमाणे पुराणे ही प्राचीन इतिहासाची आदर्श चित्रें असावयाची, परतु त्यातील रामरगाडा इतका गचाळ रीतीने बोकाळलेला आज दृष्टोत्पत्तीस येतो का, अशा तऱ्हेचे प्रशसापत्र पुराणाना देण्याचे धाडसही करविता करवत नाही ! मूळची इतिहासरूपा पुराणे फार प्राचीन काळची होतीं, परतु आतां जी बहुतेक पुराणे उपलब्ध आहेत, ती फारच अलीकडील काळी व अनुकूल परिस्थितीस लक्षांत घेऊन बनविलेली आहेत अशी अनेक सुप्रसिद्ध विद्वानाचीही मते आहेत हा अलीकडील पुराण-रचनेचा काल सामान्यत. इ० सनापूर्वी ३०० पासून तों इ० सन १३०० पर्यंतच्या दरम्यानचा असल्याबद्दल स्पष्ट सिद्ध झाले आहे वामन, कूर्म, मत्स्य, गरुड आदि कांही काहीं पुराणे तर अगदीच अलीकडे तयार झालेली म्हणजे सतराव्या शतकातील आहेत असली ही पुराणे केवळ **नाममात्र पुराणें** म्हणून उरलेली आहेत ही गोष्ट अगदी खरी आहे परतु हा दूषित प्रश्न सोडून आता आपण मूळच्या अस्सल व इतिहासमय पुराणां चा प्रश्नही थोडक्यात सोडवून पाहू कारण, वरीलप्रमाणे पुराणाची एक काळीकुट्ट बाजू जनतेच्या समोर माडल्यावर त्या पुराणाना दुसरी एखादी शुद्ध बाजू आहे किवा नाही, व असली तर ती कोणती आहे याचाही खुलासा होणे अगत्याचे आहे पुराणाना जर कोणतीच शुभ्र व निर्मल बाजू कोणत्याही काळी लाभली नसेल तर स्वाध्यायसत्रात इति-हासाच्या पक्तीत पुराणाना बसविणाऱ्या आपल्या विद्वद्रत्न पूर्वाचार्यांना आपण वेड्याच्या हॉस्पिटलमध्ये नेऊन बसविण्याचे धाडस करू शकू

अस्सल पुराणाची व्याख्या अशी आहे की,—

**सर्गश्च प्रतिसर्गश्च वशो मन्वतराणि च ।**
**वंशानुचरित चैवं पुराणं पंचलक्षणम् ॥**

—विष्णुपुराण

म्हणजे, “ सृष्टि, प्रतिसृष्टि (प्रतिसर्ग याचा अर्थ कोणी सर्गाच्या उलट म्हणजे लय असाही करितात), वश, मन्वतरे आणि इतिहास ह्या पाच लक्षणानी जें युक्त असेल तेच पुराण होय ”

या व्याख्येवरून पुराणाना इतिहासाच्या क्षेत्रात महत्त्वाचे स्थान देणारे आपले पूर्वाचार्य वेडगळ नव्हते असे स्पष्ट सिद्ध होते इतिहासाची सर्व अगे-उपागे पुराणाच्या कक्षेत येतात असा स्पष्ट अभिप्राय, पुराणाच्या या व्याख्येवरून सुप्रसिद्ध इतिहासकार हिरोडोट्स अगर गीबन् हेही खात्रीने देतीलच देतील, इतकी ही पुराणांची व्याख्या

ऐतिहासिक क्षितिजाशी सलग्न झालेली आहे ही व्याख्या लक्षांत घेतां, इतिहासाच्या दिक्पटलावर–ऐतिहासिक भव्य व अफाट क्षितिजावर–**प्राचीन पुराण** शुक्र ऱ्याच अंशानें लकाकत असल्याचेंच सिद्ध होते मग दुष्ट वृत्तींच्या राहू-केतूनीं **उपद्रवामुळें कारणें** त्याला सपूर्ण युति लावण्याचें महापातक आचरिले असल्यानें त्यास उपहासास्पद कृष्णदशा प्राप्त झाली असल्यास ती गोष्ट निराळी ! स्वाध्यायसूत्रात ऐतिहासिक कक्षेत पुराणांना प्रामुख्याने का आणून बसविले, याचाच आपल्याला शोध करावयाचा होता व तो उपरिनिर्दिष्ट आधाराने आपणास पूर्णपणे लागलेला आहे येनकेनप्रकारेण **अस्सल पुराणांना** ऐतिहासिक क्षेत्रांत बागडू देणारे आपले पूर्वाचार्य मूर्ख नव्हते एवढी गोष्ट मात्र खरी !

अस्सल पुराणासबधी उल्लेख आहे की,—

"*The Puranas contain the history of remote times,* when The conditions of existence were quite different from those which prevail in our days, they also describe regioas of the Universe not visible to the ordinary physical eye. Hence it is unfair to regard the conceptions of the puranas as being of the same nature as those of modern science. When yogasiddhis are developed the Puranic picture of the Universe and its past history are seen to be infinitely more correct than those arrived at by the modern scientific use of our physical organs of perception, however much these may be aided by delicate scientifics apparatus."

*—Sanatan dharma—an advanced Text book of Hindu religion and ethics Page 16.*

वरील विधानात स्पष्टपणे प्रतिपादन केलेले आहे की, " या पुराणात (अस्सल अशा मूळच्या पुराणात) फार प्राचीनकाळचा इतिहास दिलेला असून, त्या काळी विश्वाची घटना आताच्याहून फार भिन्न होती स्थूल दृष्टीला अदृश्य अशा प्रदेशाचें त्यात वर्णन असल्यामुळे, आधुनिक शास्त्रीय ज्ञानातील कल्पनाच्या स्वरूपाच्याच कल्पना त्यात असतील असे मानणे अयोग्य होईल योगसिद्धींचा विकास झाला म्हणजे पुराणात विश्वाचें जे चित्र काढलेले आहे, तेच आधुनिक भौतिकशास्त्रानी काढलेल्या चित्रापेक्षा पुष्कळ बरोबर आहे असे आढळून येतें "

यावरून इतिहासाची–प्राचीन इतिहासाची–अगभूत अशी जीं **अस्सल पुराणें** होती, ती मुळीच टाकाऊ नसून विद्वन्मान्य व ज्ञानदायी अशीच होती याबद्दल शका राहात नाहीं ऐतिहासिक क्षेत्रांत ज्या अस्सल पुराणाना पूर्वाचार्यांनीं आणून सोडलेलें आहे, ती पुराणे उपरिनिर्दिष्ट **पंचलक्षणयुक्त** अशींच होती आतांच्या अनेक नकली पुराणाप्रमाणें त्यामध्यें **विकृत चमत्कारांचे पाश** पसरलेले नव्हते, आणि म्हणूनच म्हटलेलें आहे कीं,—

**" इतिहासपुराणाभ्यां वेदं समुपबृंहयेत् "**

अस्तु याप्रमाणें इतिहास व त्याची बारीक सारीक अंगे-उपांगें यांच्यातही आपल्या प्राचीन आर्यविद्वद्रत्नाची प्रगति प्राचीनकालीच अत्यत श्रेष्ठतम रीतीने झालेली असून या शिवाय इतिहासास-काही अशानी का होईना-परिपोषक अशा श्रुति, स्मृति, सूत्र, ब्राह्मणा दिक ग्रथनातही त्याची मजल सर्वांच्या पुढेंच होती ही गोष्ट भारताच्या इतिहासांत प्रामुख्यानें झळकणारी आहे इतिहासाचा व्यापकपणा आपल्या पूर्वाचार्यानी उत्तम रीतीनें स्पष्ट करुन ठेवलेला आहे प्राचीन इतिहासाचें जर कोणीही सूक्ष्म तऱ्हेने निरीक्षण व परीक्षण करील तर त्याच्या लक्षात ही गोष्ट आल्यावाचून राहाणार नाही की, इतिहासाचें स्वरूप आपल्या सामान्य कल्पनेपेक्षा अत्यत विस्तृत व व्यापक असे आहे इतिहासाचा व्यापकपणा एवढा अफाट आहे की, त्यात जगातील यच्चावत् जडाजड घटनाचा समावेश होऊ शकतो इतिहासात फक्त राजकीय उलाढाली, राजपुरुषाची चरित्रे, लढायाची वर्णने आणि राजघराण्यातील घडामोडी, असलेंच सकुचित विषय समाविष्ट होतात, अशा तऱ्हेचा कुणाचा समज असेल तर तो अस्थानी आहे सुप्रसिद्ध पाश्चात्य इतिहासकार ग्रीन, मेकाले, गीबन इत्यादिकानाही ही इतिहासाची व्याप्ति अगदी मान्य आहे एवढेंच नव्हे तर जो इतिहास, व्यापक स्वरूपांत अवतरला असेल त्यासच ते 'इतिहास' म्हणण्यास तयार आहेत युरोपमध्ये इ० सनापूर्वी ४२० वष या काला, हिरोडोटस नामक एक सुप्रसिद्ध इतिहासकार होऊन गेला, आणि त्याचे नतर लवकरच थुसीडायडीज नामक एका सुप्रसिद्ध इतिहासज्ञाचे नाव लोक घेऊ लागले हे दोन्ही इतिहासकार बऱ्याच जुन्या काळात झाले असूनही इतिहासाच्या व्यापकतेची कल्पना त्यानाही पूर्णपणे होतीच असें त्यांच्या ऐतिहासिक लेखनावर नजर फिरविली असता स्पष्टपणे दृष्टोत्पत्तीस येते इतिहासासारख्या रुक्ष विषय मनोरजक करण्याकरिता, त्यांनी तर ऐतिहासिक लेखनास कादबरीवजा कल्पनेचीही भरपूर जोड दिलेली आहे ऐतिहासिक ज्ञानस्वरूपाची ही व्यापक स्वरूपाची घटना, आपल्या प्राचीन इतिहासकारापासूनच इतरांनी घेतली असावी असे वाटते कारण आपल्या प्राचीन ऐतिहासिक लेखनाविषयींही असा उल्लेख आढळतो की,—

**प्राक्वृत्तकथन चैकराजकृत्यमिषादितः ।**
**यस्मिन् स इतिहासः स्यात् पुरावृत्तः स एव हि ॥**

—शुक्रनीति

म्हणजे, एखाद्या सुप्रसिद्ध राजाचा इतिहास सागण्याच्या निमित्ताने तत्कालीन व पूर्वीच्या अनेक क्षेत्रातील घटनाचा इतिहास ओघाओघाने प्रतिपादन करण्याची जी योजना, तिचें नांव इतिहास अशी इतिहासाची व्यापक व्याख्या आपल्या पूर्वजानी निर्दिष्ट केलेली आहे तिचीच प्रत्यतरें आज आपणास श्रीमन्महाभारतादि, इतिहास या सदरांत मोडणाऱ्या ग्रथांत पाहावयास मिळतात कालचक्राच्या घटनेमुळे अशा ग्रथातील ऐतिहासिक सत्यें दैनदिन ओसरत चाललेली आहेत, हा आम्हां आर्यांचा दैवदुर्विलास आहे ही एक गोष्ट निराळी आमच्या पूर्वजांनीं अगदीं प्राचीन काळापासून ऐतिहासिक ज्ञानाच्या बाबतीत

आघाडीच मारली आहे, हेंच आमच्या सांगण्यांतील रहस्य आहे, आणि याबद्दल आम्हींच नव्हे तर पाश्चात्य पंडितही त्यांची मुक्तकंठानें स्तुति करितात

इ० सनाच्या बाराव्या शतकांत सुप्रसिद्ध राजतरंगिणिकार **कल्हण** म्हणून जो आर्य इतिहासकार होऊन गेला, त्याच्यासंबंधी डॉ० स्टिन् या पाश्चात्य विद्वानानें काढलेले उद्गार आमच्या वरील म्हणण्याची यथातथ्य सत्यता पटविण्यास पुरे आहेत तो म्हणतो —

"Kalhan, by a touch of force or by what must be called a Miracle of genius, managed to attain to a real Historic Sence that noble-minded Poet is alone worthy of praise, Whose word like that of a Judge, keeps free from love or hatred in relating the facts of the Past"

—*1 Praface—Rajatarangini, 2 H Bruse in 'East and West' for November 1906*

यावरून प्राचीन कालापासून तों अगदा अलीकडील कालापर्यंतही ऐतिहासिक ज्ञानासबंधींचा आर्यांचा अधिकार अत्यत श्रेष्ठ प्रतीचा होता हे अगदी स्पष्ट होतें इतिहासाच्या सुरम्य चित्रपटावर कोणकोणत्या रंगी बेरंगी चित्रांचें केंद्रीकरण आपल्या पूर्वाचार्यांनी खुलवून दिले आहे याचा याप्रमाणे निर्णय लागल्यावर चालू ऐतिहासिक लेखनाचा तौलनिक दृष्ट्या आपणास विचार करता येणे दुस्तर नाहीं प्राचीन इतिहासाचें जर कोणीही सहृदयपणाला जागून सूक्ष्म अवलोकन करील तर त्याला हेच दिसून येईल की, गाथा जितका क्षात्रगुणमंडित क्षत्रियवीराच्या शौर्यकहाण्यानीं ओतप्रोत नटलेला आहे, तितका तो अन्य विषयानें डबडबलेला नाहीं, नाराशंसि मध्ये क्षत्रियविभूतींच्या अगर क्षात्रवंशाच्या श्रेष्ठत्वाला जेवढें स्थान दिलें आहे, तेवढें इतर कोणत्याही घटणेस देण्यांत आलें नाहीं, पुराणांमधून क्षात्रतेजाच्या तकतकीत समशेरी जेवढ्या चमकतांना आढळनात, तेवढ्या अन्य कोणत्याही तेजास त्यात प्राधान्य दिलेलें दिसत नाहीं, वेदाच्या कडेकोट किल्ल्यांत तर क्षात्रतेजानें रसरसलेल्या क्षत्रिय नारसिंहाच्याच गंभीर गर्जना घुमत असलेल्या कर्णपटलावर आदळतात, आणि आर्यावर्ताचा सारा इतिहास क्षात्रतेजाची रणदुदुभि आपल्या मर्द पंजानी वाजविण्याच्या स्वानंदसाम्राज्यातच मग्न झालेला आहे या आमच्या लिहिण्यात किंचितही अतिशयोक्ति नाहीं वस्तुस्थितीचें स्पष्ट चित्र निर्भिडपणें व स्पष्ट रीतीनें रेखाटण्याचा प्रयत्न केलेला आहे एवढेच

प्राचीन इतिहासांत क्षात्रवृक्ष आपल्या सुरुचिर फलां पुष्पानीं एवढा लोकमान्य झाला असता, आणि प्राचीन इतिहासाची सर्व अंगे-उपांगे क्षात्रगुणवर्णनानें पावन झालेली असूनही, आजच्या जगांत क्षात्रतेजमंडित स्मृतिशास्त्राचा अभाव दृष्टोत्पत्तीस यावा, हें स्वोन्नतिविघातक दृश्य होय, ही गोष्ट प्रत्येक भारतपुत्राला कबूल करावीच लागेल असलें हें दृश्य—भयानक व भेसूर दृश्य—अगदींच गाडून टाकून त्याच्या समाधीवर क्षात्रगुण विवेचक गुलाबपुष्पांचा नयनाल्हादकारक ताटवा निर्माण करणे हें भारतपुत्रांच्या आयुष्क्रमांतील

पहिलें महत्त्वाचें काम होय हें काम शिरावर घेऊन तें यथायोग्य रीतीनें पार पाडणारी व्यक्ति अथवा व्यक्तिसमुच्चय खरोखरच अखिल भारताकडून अभिनदनाचे उदार उद्गार मिळविण्यास पूर्णपणें समर्थ झाल्यावाचून राहाणार नाही अशी आमची खात्री आहे

अशा तऱ्हेचा स्तुत्य व आवश्यक उपक्रम आरभून तो इत्थंभूत पार पाडणाऱ्या ज्या कांहीं व्यक्ति आज तुरळक तुरळक आढळून येत आहेत, त्यांत **क्षत्रियांचा इतिहास** या प्रस्तुत ग्रथाचे ब्रम्हदेव श्री० **के. बी. देशमुख** हे खरोखरच शुक्राच्या ताऱ्याप्रमाणें क्षात्रतेजयुक्त ऐतिहासिक नभ प्रांगणात आपल्या दिव्य तेजानें लकाकत आहेत असें म्हटल्याशिवाय राहवतच नाही 'क्षत्रियाचा इतिहास' या अमोल ग्रथास जन्म देऊन, मेलेल्या भारतास नवजीवन देणारा धन्वतरीच श्री० देशमुखसाहेबांनी या भूतलावर आणून सोडला आहे असें आम्हींच काय, पण सर्व भारत श्री० देशमुखांना ललकारून सांगितल्याशिवाय राहाणार नाही त्यातूनही 'क्षत्रियाचा इतिहास' हा ग्रथ प्राचीन ऐतिहासिक लेखनाशीं ताडून पाहिला असता, त्याबद्दल आणखी आणखीच आदर वाटावयाला लागतो आम्हीं जे वर प्राचीन ऐतिहासिक लेखनासबधी विस्तृत विवेचन केलेले आहे, तेंही एवढ्याचकरितां कीं, श्री० देशमुखसाहेबांचा हा ऐतिहासिक ग्रथ प्राचीन ऐतिहासिक वाङ्मयाच्या कसोटीवर लावून पाहिला असता, तो बावनकशी ठरतो की, बावनवीराचा अवतारच ठरतो हें पाहांता यावें या दृष्टीनें विचार करता, श्री० देशमुखसाहेबानी ऐतिहासिक क्षेत्रांत बरेंच उच्च दर्जाचे श्रेय मिळविले आहे, असें म्हणावें लागतें श्री० देशमुखसाहेबांच्या या ग्रंथाचा विशेष तो हाच आहे का, पूर्वपरपरेस–ऐतिहासिक लेखनाच्या पूर्वपरपरेस –तो अगदीं संलग्न झालेला आहे ऐतिहासिक लेखनाची पूर्वपरपरा व प्राचीन ऐतिहासिक वाङ्मय जर आपण डोळ्यासमोर ठेविले तर आपणास त्या क्षेत्रात मोडणारी जीं गाथा, नाराशसी, पुराणे, श्रुति, स्मृति, सूत्रे ब्राह्मणादि अगे उपागे आढळून येतात, ती सर्व या क्षात्ररत्नाकररूपीं इतिहासात श्री० देशमुखसाहेबांनी अतर्भूत केली असल्यामुळें हा ग्रथ प्राचीन इतिहासाचा एक अस्सल नमुनाच झालेला आहे प्राचीन व अर्वाचीन ऐतिहासिक लेखनाचें भरभक्कम चित्र एकत्रितपणे जर कोठें पाहावयास मिळत असेल तर ते श्री० देशमुखाच्या या **क्षत्रियांच्या इतिहासांत**च पाहावयास मिळते श्री० देशमुखसाहेबाचा हा इतिहास **तवारिख** किंवा **बखर** या नावानें सबोधिला असतां जितका प्रयुक्त रीतीनें शोभू लागतो, तितकाच तो **प्राचीन मुनिवर्यप्रणित ऐतिहासिक सूत्र-ग्रथन** या सज्ञेलाही पात्र वाटतो स्पष्ट सागावयाचे म्हणजे 'क्षत्रियाचा इतिहास' हा श्री० देशमुखसाहेबांचा ऐतिहासिक ग्रथ अष्टपैलु कोहिनूर म्हणून सबोधिताना मोठा आनद वाटतो. या ग्रथास श्री० देशमुखसाहेबानी 'क्षत्रियांचा इतिहास असे छोटेसें नाव दिलें आहे खरें, परतु त्यांतील मननीय सूत्रें लक्षांत घेता, वेद, शास्त्रें, पुराणें, श्रुति, स्मृति, सूत्रें, उपनिषदें, ब्राह्मण ग्रथ आणि प्राचीन अर्वाचीन इतिहास अशा **नानाविध रत्नांची** ही **एक खाणच** ग्रंथकर्त्यांनीं बहुजनसमाजाच्या उन्नतिप्रित्यर्थ व पर्यायाने देशोद्धारार्थ शोधून काढली आहे असें **निःपक्षपातीबुद्धी**ला वाटल्याशिवाय राहात नाही

एखाद्या दिव्य इतिहासाचे चित्र त्या चित्राच्या अभिमानी वर्गासमोर ठेवतांना तें सर्वांगीण सजवून कसें ठेवावें लागतें, व इतिहासरूपी सवित्याचा उदय कोणत्या क्षितिजावरून होऊ दिला असतां तो तत्काल स्फूर्तिदायक होऊ शकेल, ही योजना प्रस्तुत ग्रंथाच्या लेखकांना उत्तम रीतीनें कळून चुकली आहे ही या ग्रंथातील आणखी एक महत्त्वाची गोष्ट होय क्षत्रियांच्या राजकारणाचें दिग्दर्शन करणारे अनेक मोठमोठे इतिहास उपलब्ध आहेत, परंतु त्याबरोबर **क्षत्रियांच्या धर्मकर्माचा** सविस्तर व **वाहत्या काळास अनुसरून** यथायोग्य विचार प्रतिपादन करणारा **'क्षत्रियांचा धार्मिक व सामाजिक इतिहास'** फारच दुर्मिळ झालेला होता ही तीव्र अडचण प्रस्तुत ग्रंथाच्या प्रसिद्धीकरणानें संपूर्ण नाहींशी झालेली आहे, ही एक विशेष आनंदाची गोष्ट आहे प्राचीन मुनिवर्यांनीं आपल्या पुढील पिढ्यांच्या उद्धारार्थ जसे राजकीय, धार्मिक, सामाजिक इत्यादि क्षेत्रांत प्रकाश पाडणारे तेजस्वी ग्रंथ निर्माण करून ठेवलेले आहेत, तशीच या क्षत्रियांच्या इतिहासाचीही कृति अगदींच साम्यत्वानें साधलेली आहे फरक एवढाच कीं, त्या मुनिवर्यांनी निरनिराळे ज्ञानदीप निरनिराळ्या क्षेत्रांत प्रज्वलित करून ठेविले आहेत व **या श्री० देशमुख मुनिवर्यांनी ज्ञानदीपांचा महोत्सवच** पुढील पिढ्यांकरितां एकदम उभारून ठेवलेला आहे या ज्ञानदीपाच्या महोत्सवांत उन्नतीच्या मार्गावर पडलेले अज्ञानाचे खडेकंटक पुढील पिढीस स्पष्टपणे पाहातां येऊन आपला सरळमार्ग बिनदिक्कतपणें आक्रमितां येईल ही गोष्ट निर्विवाद आहे

श्री० देशमुखसाहेबांनी अनेक वर्षें अविश्रांत परिश्रम करून आपल्या अनुभवी बुद्धिमत्तेच्या जोरावर, तडफदार लेखनशैलीच्या बळावर आणि ऐतिहासिक परिशीलनाच्या चिरेबंदी पायावर प्राचीन इतिहासाच्या पंक्तीत बसणाऱ्या आपल्या क्षत्रियांच्या इतिहासाची भव्य इमारत उभारलेली असल्यामुळे त्या इमारतींत नाना तऱ्हेची सुंदर स्थळें असणें साहजिकच आहे आणि तीं ह्या इमारतीचा दरवाजा उघडून तींत प्रवेश करणाऱ्याच्या दृष्टोत्पत्तीस आल्याशिवाय राहावयाचींही नाहींत ही गोष्ट लक्षांत घेऊनच इतर प्रस्तावनालेखकांप्रमाणें ग्रंथांतील बारीकसारीक वर्ण्य विषयाकडे बोट दाखविण्याची चालू इगामी तऱ्हा आम्ही या ठिकाणीं शक्य तोंवर टाळण्याचाच प्रयत्न करीत आहोंत याबद्दल वाचकवृंदानी रुष्ट होऊं नये

'क्षत्रियांचा इतिहास' या प्रस्तुत ग्रंथासंबंधानें जिज्ञासु विद्वज्जनास आम्हीं एवढेंच सविनय विनवितों कीं, आपण प्रस्तुत ग्रंथाच्या प्रत्येक पानांतून अमूल्य अशी बोधप्रद माहिती मिळवून अत्यंत हर्षभरित अंतःकरणानें या इतिहासाच्या प्रत्येक पानाकडे पाहात राहाल अशाच अद्वितीय बुद्धिचातुर्यानें हा ग्रंथ ग्रंथकर्त्यांनीं नटविलेला आहे प्रस्तावनेच्या रूपानें आम्हाला येथे पुन्हा त्या विषयांचें चर्वितचर्वण करावयाचें नसून ग्रंथांतील मुख्य विषयासंबंधीं करतां येईल तसा निःपक्षपातीबुद्धीनें ऊहापोह करावयाचा आहे. आतांपर्यंत इतिहासाचें महात्म्य, आपल्या आर्यसंस्कृतीनें ऐतिहासिक क्षेत्रांत केलेली कामगिरी, इतिहासाच्या भेदाभेदासंबंधीं विस्तृत विवेचन, प्राचीन ऐतिहासिक ग्रंथांतील क्षात्र-

प्रधान घटणांचे महत्त्व, 'क्षत्रियांचा इतिहास' या प्रस्तुत ग्रंथाची प्राचीन ऐतिहासिक क्षेत्रांशीं तुलना आणि प्रस्तुत ग्रंथाचे महत्त्व इतक्या गोष्टींची साधकबाधक चर्चा झालेली असून प्रस्तुत ग्रंथांतील मुख्य विषय जे **क्षात्रमहात्म्य, धर्मविचार, वर्णविचार** त्यांसंबधींही शक्त्यनुसार विवेचन करणें क्रमप्राप्त वाटल्यावरून आता तिकडे वळूं या परतु तत्पूर्वी ग्रंथकर्त्यांच्या या अभिनदनीय **कृतीचें बीज** कोणत्या कार्यकारणभावाशीं निगडित झालेले आहे, याचाही ओझरता उल्लेख करणे क्रमप्राप्त असल्यानें प्रथम तें पाहू

कारणाशिवाय कार्य हे केव्हाही घडतच नाहीं असा सिद्धान्त सर्वसम्मत असून तो या ऐतिहासिक ग्रंथाच्या मुळाशीही निगडित असणे संभवनीय आहेच श्री० देशमुख-साहेबाना 'क्षत्रियाचा इतिहास' जगापुढें मांडण्यास जी स्फूर्ति प्राप्त झालेली आहे, तिचीं मुळेंही बरींच खोल रुजली गेलीं असणारच ही गोष्ट स्पष्ट आहे ज्या काळीं क्षत्रियाचा इतिहास भारताच्या उन्नतीवर प्रकाश पाडीत होता, ज्या वैदिककाळीं क्षात्रतेजपरिपूर्ण अशी वेद, शास्त्र, पुराण, इतिहासादि ग्रथनें भारतास **'उत्तिष्ठत, जाग्रत, प्राप्य-वरान्निबोधत'** असा सदेश कथन करीत होती आणि ज्या प्राचीनकाळी क्षात्रतेजाचा कीर्तिडिंडिम् सर्वत्र गाजला जात होता, तो काळच **आदर्शकाळ** म्हणून आजही प्रामुख्याने गणला जात आहे हा काळ आदर्श म्हणून गणला जाण्यास जे कारण प्रामुख्या-ने त्याच्या मुळाशी निगडित झालेले आहे, ते कारण म्हटले म्हणजे तत्कालीन वाङ्मयां-तून क्षात्रतेजाचा विकास, विलास, विकार आणि विचार याची अगदी रेलचेल झाली होती हे होय स्वकार्याची जाणीव करून देऊन अतःकरणात नवजीवनाचा सचार करून देणारें जर कोणते वाङ्मय असेल तर ते **क्षात्रप्रबोधक वाङ्मयच** होय ही गोष्ट कोणीही कबूल करीलच करील या वाङ्मयाच्या परिशीलनाने, त्याच्या अभ्यासानें, मननाने आणि निदिध्यासाने मेलेलीं राष्ट्रें, मेलेला समाज आणि मेलेला धर्म पुन्हा जिवत होत्साता आपल्या पूर्वतेजाने स्वैरपणे झळाळू लागतो, ही एक त्या वाङ्मयांतील अद्भुत सजीवनी होय जेव्हा जेव्हां राष्ट्र मृत्युपथास लागतें, जेव्हा जेव्हा समाजघटना विस्कळित होते ज्या ज्या काळी धर्मसकर होण्याची पाळी येते, ज्या ज्या प्रसगी राष्ट्राचे आधार-स्तभ ढासळू पाहातात, जेव्हा जेव्हा धर्माच्या नावाखालीं भलभलतें विपरीत आचार रूढ होऊ लागतात, ज्या ज्या वेळीं एखादा उन्मत्त समाजघटक इतरेजनावर कुरघोडी करून आपला वरचढपणा प्रस्थापित करू पाहातो, ज्या ज्या समयीं देशाची अवस्था हीनदीन आणि कर्तव्यविहीन अशी होते आणि जेव्हा जेव्हा मातृभूमीचा कठनाळ चरचरा चिरून निघ-ण्याचा भयकर प्रसग उद्भवतो, तेव्हां तेव्हा अशा अनेक आपत्प्रसगातून शीरसलामत बाहेर निघण्यास **क्षात्रतेजपरिपूरित** असें **अस्सल प्राचीन वाङ्मयच** आपणास भरपूर सहाय्य करीत असतें, ही गोष्ट भारताच्या इतिहासानें अनेक वेळा स्वयसिद्ध सिद्धान्ताप्रमाणें ठांसून प्रतिपादन केलेली आहे

प्रस्तुत ग्रंथ लिहितांना श्री० देशमुखसाहेबांनींही हेंच उद्दिष्ट आपल्या डोळ्यासमोर ठेविलें असलें पाहिजे असें आम्हांस स्पष्टपणें कळून चुकलें आहे; आणि त्यांनीं आपल्या

हृद्गतामधूनही हाच मुख्य उद्देश निनादित केलेला आहे याबद्दल आनंद वाटतो. आज देशाची, समाजाची, धर्माची, व्यवहार्य कर्मांची आणि शास्त्रीय ज्ञानाची होत असलेली अवनतदशा पाहून वेळींच श्री० देशमुखसाहेबांनीं 'क्षत्रियांचा इतिहास' रूपीं सविता वाङ्मयाच्या नभःप्रांगणांत उदित होऊं दिला ही गोष्ट त्यांच्या ऐतिहासिक ज्ञानास उजळा वढविणारी तर आहेच आहे, पण 'योजकस्तत्र दुर्लभः' या न्यायानुसार त्यांच्या **समयसूचकतेचीही** क्षणभर प्रशंसाच करावी लागते सन्निपातानें व्यग्र झालेल्या कर्महीन रोग्यास एखादा धन्वंतरी ज्याप्रमाणे सन्निपातभैरव मात्रा देऊन आपला समयोचितपणा प्रकट करितो, तसेच श्री० देशमुखसाहेबानीही **सन्निपात झालेल्या भारतास क्षत्रियाच्या इतिहासाची सन्निपातभैरव मात्रा** देऊन त्यास कार्यप्रवण करण्याचें अद्भुत चातुर्य व **प्रशंसनीय औचित्य** दाखविलें आहे यांत शंका नाहीं श्री० देशमुखसाहेबाना **धर्माचे** होत असलेले **धिंडवडे** पाहावले नाहींत, राष्ट्र-सूर्यास लागलेले खग्रास ग्रहण त्यांच्या राशीस तापदायक होऊं लागले, कालचक्रनेमिक्रमानुसार **भारताच्या रहाटाचीं उलटीं फिरणारी भांडीं** त्यांच्या हृदयास पाझर फोडू लागलीं आणि देशाचे आधारस्तंभ—भावी तरुण पिढी—पाहातां पाहातां ढासळताना बघून त्यांच्या अंगावर रोमांच उभे राहिले म्हणूनच ही प्रस्तुतची अलभ्य, अगम्य, अमूल्य आणि अवर्णनीय दिव्य कृति त्यानीं जगाच्या वातावरणात आणून सोडण्याचें महत्कार्य आचरिले श्री० देशमुखसाहेबाना क्षात्रतेजाची पेरणी कोणत्या हंगामात केली पाहिजे याचे यथार्थ ज्ञान असल्यामुळेच त्यांच्या ह्या इतिहास वृक्षास आजच्या जगातील उन्नतेच्छु सज्जन पंचप्रदक्षिणा-संस्कार केल्याशिवाय राहाणार नाहीत आम्ही म्हणतों ह्या गोष्टीला अपवादही जर क्वचितशः आढळून येईलच तर,—

**कवयः परितुष्यंति नेतरे कविसूक्तिभिः ।**
**नह्यकूपारवत् कूपा वर्धंते विधुकांतिभिः ॥**

या न्यायास अनुसरून आम्हास निरुपायानें असेंच म्हणण्याचा कटुप्रसंग येईल की, विहीरही पाथोधि व समुद्रही पाथोधि, परंतु पौर्णिमेच्या चंद्रकांतीने समुद्र जसे उचंबळून येतात तशा विहिरी कधीही उचंबळून येतांना कोणीही पाहिलेल्या नाहींत !

हे जें 'क्षत्रियाचा इतिहास' या ग्रंथाचे आम्ही स्तवन केलेले आहे तें लक्षात घेतां सज्जनवृंदाचा असा प्रश्न आड येणे साहजिकच आहे की, इतर इतिहासापेक्षा या क्षत्रियांच्या इतिहासातच असे कोणतें तेज साठविलेलें आहे की, त्याच्या योगानेंच भारताच्या भावी आधारस्तंभाना आपला पाया बळकट करून घेता येईल ?

प्रश्न जितका वास्तव व उचित आहे तितकेच त्याचे उत्तरही सरळ आणि साधें आहे. या क्षत्रियांच्या इतिहासांत वेदवचनांचा गुलाबी बगीचा जसा फुलविलेला आहे, तसाच त्यास श्रुति—स्मृति—सूत्र—उपनिषदादिकांचा बहरही ग्रंथकर्त्यांनीं आणून दाखविलेला आहे या क्षत्रियांच्या इतिहासांत बखर अगर तवारिख यांचे गगनचुंबी वृक्ष जसे ग्रंथकर्त्यांनीं जोपासना करून वाढविलेले आहेत, तसेंच गाथा, नाराशंसि, पुराणकल्पादि

लताकुंजही त्यानीं आपल्या इतिहासांत ठिकठिकाणीं सुशोभित रीतीनें नियोजित केलेले आहेत या क्षत्रियांच्या इतिहासात क्षात्रतेजाच्या भडक वर्णनाचे ब्रश जसे जागजागीं श्री॰ देशमुखसाहेबानी मारलेले आहेत, तशीच क्षात्रधर्माचीं मनोहर चित्रेंही त्यांनीं आपल्या या इतिहासात रंगवून ठेवलेलीं आहेत, आणि या सर्वात विशेष लक्षांत ठेवण्या-सारखी गोष्ट म्हटली म्हणजे या ऐतिहासिक लेखनांतही श्री॰ देशमुखसाहेबानीं 'बाबा वाक्य प्रमाणम्' हा न्याय झुगारून देऊन **क्रांतिकारक तत्त्वांची पेरणी** करण्यांतच आपल्या कृतीचे सार्थक्य मानून घेतलेले आहे याच गुणसमुच्चयामुळे श्री॰ देशमुख साहेबाच्या हा 'क्षत्रियाचा इतिहास' तेजोमय झालेला आहे, क्रातिकारक झालेला आहे, उत्फुल्ल झालेला आहे प्रबोधक झालेला आहे, उदबोधक झालेला आहे, मननीय झालेला आहे, आदरणीय झालेला आहे, आचरणीय झालेला आहे आणि सच्चिदानदमयीही झालेला आहे श्री॰ देशमुखसाहेबाच्या या इतिहासाच्या मुळाशीं **क्रांतीच्या वटवृक्षाचें बीज** दडून बसलेले आहे हा या क्षत्रियाच्या इतिहासाचा श्रेष्ठ विशेष आहे निर्जीव घटकांस सजीव करण्याकरिता ज्या क्रातिकारक तत्त्वाचा अवलंब करावा लागतो, तो श्री॰ देशमुख साहेबानी यथेच्छ रीतीने केलेला आहे, आणि ह्या विशेषत्वामुळेंच 'क्षत्रियाचा इतिहास' हा क्षत्रियाचाच इतिहास राहिलेला नसून तो **भारताच्या क्रांतीचा इतिहास** झालेला आहे इतर ऐतिहासिक लेखनात व श्री॰ देशमुखसाहेबाच्या या ऐतिहासिक लेखनात जो जमीनअस्मानचा फरक आहे, तो हाच होय श्री॰ देशमुखसाहेबाचा हा इतिहास आजच्या भारतास स्पष्टपणे बजावीत आहे की,

"Go ahead or go down. You cannot stand still"

म्हणजे, 'पुढील मार्ग आक्रमण करा अगर मागे जा, पण मध्येंच लोंबकळत राहू नका' श्री॰ देशमुखसाहेबाच्या या इतिहासाचा महत्त्वाचा विशेष म्हटला म्हणजे क्रातीच्या क्षेत्रातीलच होय क्रातीच्या क्षेत्रात शिरताना क्रातिकारक व्यक्तीस अनेक टक्केटोणपे खावे लागतात, परतु त्याचीही पर्वा ग्रथकर्त्यांनी केलेली दिसत नाही आम्ही तर श्री॰ देशमुखसाहेबाच्या ह्या क्रातिकारक महत्त्वाच्या कृतीचा विचार करून त्याना—

A terrible revolutionary

या उचित सज्ञेने सबोधितों श्री॰ देशमुखसाहेबानी आपल्या या ग्रथात कोठें कोठें तर एवढी **क्रांतिकारक विधानें** रणविलेलीं आहेत कीं, त्याचें मनन केले असता भार-ताची क्राति—धर्मक्राति, राष्ट्रक्राति, विचारक्राति—करण्याकरितांच हा 'क्षत्रियाचा इतिहास' निर्माण झालेला आहे कीं काय असे वाटू लागतें हीं क्रातिकारक तत्त्वे प्रतिपादन करि-तांना श्री॰ देशमुखसाहेबानी जगाच्या **लटक्या अपवादांचीही** बिलकुल पर्वा केलेली नाहीं उलट एका विद्वानानें म्हटल्याप्रमाणें—

"One who swims against the tide"

याप्रमाणे **चालू प्रवाहाच्या विरुद्ध दिशेनें पोहत जाण्याचें** जबाबदारीचें क्रांतिकारक कार्य त्यानीं आचरिलें आहे हा इतिहास असा क्रातिकारक असल्यामुळेंच,

या इतिहासाच्या मुळाशीं क्रांतीची कल्पना संलग्न झालेली असल्यामुळेंच आधुनिक **मानसिक गुलामगिरीचीं बंधनें** तोडण्यास तो कंबर कसून पुढें सरसावलेला आहे

श्री० देशमुखसाहेबांच्या या ग्रंथांत क्षत्रियांच्या इतिहासांत–अष्टपैलुपणा, आकर्षकपणा, आस्था, आत्मविश्वास, ऋजुता, औदार्य, कर्तव्यनिष्ठा, करारीपणा, तत्त्वज्ञान, दूरदर्शीत्व, देशसेवा, धडाडी, धैर्य, निरपेक्षता, निस्पृहपणा, मार्गदर्शकत्व, राजकारण, वाक्चातुर्य, वीरवृत्ति, व्यवहारदक्षता, समयोचितपणा, स्पष्टवक्तव्य, स्फूर्तिमत्चार, स्वकीयाभिमान, ऐक्य, सद्धर्मप्रस्थापन, अनुचित अंधश्रद्धाभंजन, प्रेमसवर्धन, प्राचीनवाङ्मयदिग्दर्शन, दुर्जनदर्पहरण आणि जनताजनार्दनसेवाकर्तव्य इत्यादि अनेक सुगधि पुष्पें ठिकठिकाणीं आपल्या तेजस्वि घटनेनें विखुरलेली दृष्टोत्पत्तीस येतात आणि मनाला अत्यत आनंद वाटतो हे सर्व गुण क्षत्रियाच्या इतिहासात केंद्रीभूत झाल्यामुळेंच 'क्षत्रियाचा इतिहास' **तेजस्वि वाङ्मयांत कायमचा झळकत राहाणार आहे**, या गुणाचीं बीजे श्री० देशमुखसाहेबानी आपल्या ऐतिहासिक मनोभूमिकेत रुजविल्यामुळेंच त्याचा हा ग्रथ **लोकमान्य** होणार आहे आणि क्षात्रभूमीवर त्याचे शाश्वत वास्तव्य टिकणार आहे

येथपर्यंत हे विवेचन झाल्यावर आता आपणास प्रस्तुत ग्रथातील केंद्रीभूत तत्त्वाकडे नजर फिरविणे अत्यावश्यक आहे आजच्या जगास कदाचित् अशीही शका येणे साहजिकच आहे की, प्रस्तुत ग्रथास 'क्षत्रियांचा इतिहास' असे आकुंचित स्वरूपाचे नाव देण्याचे काय कारण? ज्या ग्रथात एवढी उदात्त क्रांतिकारक तत्त्वे विखुरलेला आहेत, ज्या ग्रथात महत्वदर्शक असे अनेक गुण ओतप्रोत भरलेले आहेत आणि जो ग्रथ एवढा तेजोमय झालेला आहे, त्यास तसेंच विस्तृत स्वरूपाचे नाव देऊन ग्रथकर्त्यानी आपली कृति जगाच्या अफाट पसाऱ्यात का विलीन केली नाही? जिज्ञासूच्या ह्या प्रश्नाचें उत्तर विस्ताराने ग्रथकर्त्यांनीच आपल्या **हृद्गतामधून** प्रतिपादन केले असल्यानें त्याबद्दल येथें जास्त लिहिण्याचे आम्हास काहीही कारण नाहीं परतु आम्हास या बाबतींत सागावयाचें ते एवढेंच आहे की, **उन्नतीस परिपोषक** अशी जीं चित्रें ग्रथकर्त्यांच्या अनुभवी बुद्धीस प्रयुक्त वाटलीं ती त्यांनी आपल्या इतिहासात रगविलेली आहेत भारताचा **प्राचीन कालापासून** तों तहत **आजपर्यंत**चा विशिष्ट घटनात्मक इतिहास लिहावयाचा म्हणजे त्यात **क्षात्रमहात्म्यासच प्राधान्य** देणे भाग पडते, कारण क्षात्रसस्कृति, क्षात्रतेज आणि क्षात्रवृत्तींचा परिपोष ऐतिहासिक कक्षेशी फार प्राचीनकालापासून सलग्न झालेला आहे तो कसा तेंही आपण आतां पाहू या म्हणजे ग्रथकर्त्यास क्षात्रघटनेचेच एवढें महत्त्व का वाटले असावें याचा स्पष्ट खुलासा होईल

**'क्षत्रियांचा इतिहास' आणि क्षात्रमहात्म्याचे अलौकिकत्व**

श्री० देशमुखसाहेबांनी हा जो **'क्षत्रियांचा इतिहास'** लिहिला तो **क्षत्रियांचाच कां लिहिला** इकडे आतां आपण वळू इकडे वळताच आपण प्रथम हा विचार केला पाहिजे कीं, आजपर्यंतच्या सर्व महत्त्वदर्शक ऐतिहासिक घटणा क्षत्रियाशींच निगडित झालेल्या आहेत,

प्राचीन इतिहासपुराणादि ग्रथनें क्षत्रियांसाठींच अवतरलेलीं आहेत आणि आर्यभूमीच्या उद्धारकात क्षत्रियाचाच श्रेष्ठ दर्जाचा अधिकार आहे तेव्हां अर्थातच अशा **क्षत्रियांचा उज्ज्वल इतिहास** भारताच्या कानीं कपाळीं नेहमीं सदेश स्फुरवीत असलाच पाहिजे ही गोष्ट नि सदेह आहे असें असताही क्षत्रियावर दुष्टवृत्तीच्या काही अधम लोकानीं आपल्या जहरी मुखातून गरळ ओकण्याचा मूर्खपणाचा अव्यवहार्य प्रयत्न करण्याचें जेव्हां धाडस केले, तेव्हा त्याना शुद्धीवर आणण्याकरितां 'क्षत्रियाचा इतिहास अवतरावाच लागला वास्तविक पहाता क्षात्रप्रभाकरावर थुंकण्याचा जरी कोणी प्रयत्न केलेला असला तरी त्याची ती थुंकी त्याच्याच तोंडावर पडून जगांत त्याचे हसें झाल्याशिवाय रहावयाचें नाही ही गोष्ट स्पष्ट आहे, परतु क्षात्रतेजाची जाणीव त्याना करून देणे हेही त्याबरोबरच इतिहासाचें आद्य कर्तव्य आहे क्षात्रप्रभाकरावर थुकी फेंकण्याचे असे जे काहीं अव्यवहार्य प्रयत्न झालेले आहेत, त्यात कलियुगामध्यें क्षत्रियाचें अस्तित्वच उरले नाहीं, असें सिद्ध करण्याचा एक बाष्फळ प्रयत्नही आपलें विकृत स्वरूप घेऊन जगापुढें आलेला बहुतेक सज्जनांच्या स्मरणात असेलच असे सिद्ध करण्याचा अवास्तव व हास्यास्पद प्रयत्न रिकामटेकडया कडू भोपळ्यानीं का म्हणून करावा असा चिकित्सक बुद्धीला पडलेला प्रश्न जर बाजूला ठेवला, तर विरोधकांच्या या म्हणण्यास कशाचा आधार आहे याचा विचार जरूर करावा लागतो

कलियुगामध्यें क्षत्रिय उरलेच नाहीत असे विधान जर कशाचे आधारावर क्षात्रविरोधी विदूषक करीत असतील तर तें, " इक्ष्वाकूणामयवश सुमित्रातो भविष्यति। यतस्त प्राप्य राजान सस्थां प्राप्स्यति वै कलौ ॥ " या भागवत स्क० ९ अ० १२ मधील श्लोकावरून करतात या श्लोकाचा अर्थ ते विदूषक **ओढूनताणून** अशा प्रकारचा करतात की, " सूर्यवश सुमित्राच्या पुढे कलियुगात नाही तसाच चंद्रवशही कलियुगात नाहीं असेच दुसरे एक वचन ते आपल्या मताच्या पुष्ट्यर्थ माडतात की, " सोमवशे कलौनष्टे कृतादौ स्थापयिष्यति। " म्हणजे, " चद्रवश कलियुगात नष्ट झालेला आहे " शूद्रकमलाकर ग्रथातील तिसरा एक आधार म्हणून हे लोक हा श्लोक पुढें माडतात की,

" ब्राह्मणा क्षत्रिया वैश्या शूद्रा वर्णास्त्रयो द्विजा । युगे युगे स्थिता सर्वे कलावायतयो स्थिति· " या श्लोकाचाही असाच **लटका अर्थ** करण्यात आलेला आहे की, चार वर्णापैकी कलियुगात पहिला ( ब्राह्मण ) व शेवटचा ( शूद्र ) हे दोन वर्णच शिल्लक राहतील

उपरिउध्दृत वचनाचा **निपःक्षपाति न्यायानें** आपण आता विचार करू म्हणजे कलियुगामध्यें क्षत्रिय उरलेच नाहीत अशा अर्थाचेच वरील श्लोक आहेत कीं गरळ ओकण्याच्या स्वभावधर्माप्रमाणें दुष्ट वृत्तीच्या लोकानीं आपला नादानपणा वरील श्लोकांचे अर्थ लाविताना प्रकट केला आहे हे स्पष्ट होईल आतां प्रथम " इक्ष्वाकूणामयं वश· सुमित्रान्तो भविष्यति।" अथवा " सोमवशे कलौनष्टे कृतादौ स्थापयिष्यति।" याचे अर्थ करतांना काय **घोटाळा** झालेला आहे ते पाहूं उपरिनिर्दिष्ट या श्लोकाचे जे अर्थ दिलेले आहेत त्यांत

असें प्रतिपादन केलेले आहे की, सूर्यचंद्रवंश अगदींच खुटून गेले आहेत. परंतु तसा या वचनांचा गर्भितार्थ नसून त्या वंशातील राज्यपद नष्ट झाले व **राजांची मालिका संपली** असा त्याचा अर्थ आहे. विष्णुपुराणांत " अतश्च इक्ष्वाकवो भविष्या: पार्थिवाः कथ्यन्ते " म्हणजे आता " इक्ष्वाकु कुलामध्ये भविष्यकालीं होणारे राजे तुला सांगतों," असा उपक्रम करून व बृहद्बलापासून सुमित्रापर्यंत पंचवीस राजाचीं नावें सांगून शेवटीं, " इक्ष्वाकूणामयं वंशः सुमित्रान्तो भविष्यति " हें वचन दिलेले आहे. यावरून त्याचा स्पष्ट अर्थ असाच होतो की, सुमित्रानंतर त्याच्या गादीचा वारसा इक्ष्वाकुकुलातील पुरुषाकडे न राहातां दुसऱ्या कुलातील पुरुषाकडे जाईल असा त्या वचनाचा वास्तव अर्थ असून, एखादें **तुटकेंच चरण** मध्ये दडपून देऊन त्याचा **विपरीत अर्थ** भासविताना या काकवृत्तीच्या लोकाना कोणता परमानंद होत असेल हे त्याचा निर्मिताच जाणे ! कलियुगामध्यें क्षत्रिय उरले नाहींत, असा या वचनाचा अर्थ केव्हाही होत नसताही तो तसाच **दडपून देण्यांत** या लोकाची क्षात्रविरोधि नीच वृत्तीच कारणीभूत झालेली आहे हीच गोष्ट खरी.

शूद्रकमलाकरांतील ज्या एका विधानाने हे विदूषक क्षत्रियाचे कलियुगातील अस्तित्व नाहींसें करू पाहातात, त्या विधानाच्याही मुळाशी जाऊन तेथेंही काय **जादूगिरी** या गारुड्यानीं केलेली आहे याचा आपण सूक्ष्मदृष्टीनें तपास करू. हें विधान—

" ब्राह्मणा क्षत्रिया वैश्या क्षुद्रा वर्णास्त्रयो द्विजा: ।
युगे युगे स्थिता सर्वे कालावाद्यतयो स्थिति ॥ "

असे आहे. हे विधान ज्या शूद्रकमलाकर ग्रंथातून या लोकानीं अवतारित केले आहे; त्या शूद्रकमलाकर ग्रंथात असें **बिनबुडाचें बेछुट विधान** मुळींच दृष्टोत्पत्तीस येत नाही. या लोकाना आपल्या पाशवी मताच्या प्रतिपादनार्थ संपूर्ण विधानातील जो एक **तुटका भाग** प्रयुक्त भासला तेवढेच **लांडे वचन** हे जेथे तेथे मिरवितात, परंतु हें संपूर्ण विधान असें आहे की,—

**" ननु कलौ क्षत्रियावैश्याभाव उक्तः विष्णु पुराणेऽपि ।**
**देवापिः पौरवो राजा मरुश्चेक्ष्वाकुवंशजः ।**
**कृते युगे इहागत्य क्षत्रप्रावर्तकौ हि तौ ॥ "**
**पुराणांतरेऽपि । " ब्राह्मणाः क्षत्रियाः वैश्या. शूद्रावर्णास्त्रयो द्विजाः ।**
**युगे युगे स्थिताः सर्वे कलावाद्यंतयो स्थितिः ॥ "**
**मैवं । कलौ तु बीजभूतास्तु केचिन्तिष्ठन्ति भूतले । तथैव देवाप्पि गुरु सांप्रत समवस्थितौ ॥ इति विष्णुपुराणात् । ब्रह्मक्षत्रविशः शूद्रा बीजार्थे च इह स्थिताः । कृते युगे हि ते सार्धं निर्विशेषास्तदाऽभवन् ॥ इति मात्स्योक्तेश्च प्रच्छन्नपाः स्वकर्मभ्रष्टाः क्षत्रिया वैश्याश्च संत्येव क्वचिदिति अस्मत्पितृचरणाः ॥ "**

वरीलप्रमाणें शूद्रकमलाकरांतील समग्र विधान असून **स्वमतप्रतिपादनपुष्टयर्थ** त्यांतील मधलाच एक चरण विदूषकांनीं जगापुढें मांडून आपल्या मत्सरी भावनेचें प्रदर्शन जगाच्या बाजारांत सताड मोकळेपणानें मांडण्याचा **हास्यास्पद उपक्रम** केला आहे कोणतेंही विधान पूर्वपक्ष व उत्तरपक्षमय असतें त्या दोन्ही पक्षांचा निर्णय करून मग तद्विषयक छाननी करावयाची असते, परंतु विदूषकांनीं येथें पूर्वपक्षाचा लांडा मतवादच ग्राह्य मानून क्षात्रप्रभाकरावर आपल्या अपवित्र मुखातील थुंकी फेंकण्याचा मूर्खपणा केलेला आहे

शूद्रकमलाकरातील उपरिउध्दृत विधानाचे जर याप्रमाणे दोन्ही पक्षांची छाननी करून तात्पर्य काढलें, तर कलियुगामध्यें क्षत्रियाचे अस्तित्व नाही असे कदापि सिद्ध होत नाहीं मुळातच ज्याअर्थी तें विधान त्या उद्देशाने केलेलें नाहीं, त्याअर्थी त्याचा तसा स्पष्टार्थ न झाल्यास त्यात आश्चर्य ते कोणतें ? त्या विधानाचा स्पष्टार्थ असा आहे कीं, "भागवत, विष्णुपुराण व अन्य पुराणे यात जरी कलियुगात क्षत्रियवैश्याच्या अभाव-सूचक वचनें असली तरी ती खरी नव्हेत बीजभूत क्षत्रिय कलियुगातही राहातील असें **खुद्द** विष्णुपुराणात व मत्स्यपुराणातच स्पष्ट म्हटले आहे कमलाकर म्हणतो –प्रच्छन्नरूप व स्वकर्मभ्रष्ट असे बीजरूप क्षत्रियवैश्य कलियुगातही आहेतच असें माझ्या पूज्य वडिलांचें-ही मत आहे तेव्हा यावरून कलियुगात क्षत्रियाचे अस्तित्व आहेच असें स्पष्ट सिद्ध होते विदूषकाना सत्याचा कोंबडा कोणत्याही गुहेत दडपून दिला तरी सूर्योदय काहीं क्षितिजा-च्या आडच लपून राहात नाहीं, तो आपल्या प्रखर तेजस्वितेनें जगाच्या वातावरणांत लक्लक्लकलक् तळपू लागतोच

आता वरील विधानात 'बीजभूत क्षत्रिय राहातील', 'प्रच्छन्नरूप स्वकर्मभ्रष्ट क्षत्रिय राहातील' अशा प्रकारचे जें कथन केलेले आहे याचा विचार करता असे विधान कर-ण्याचा त्या विधानकर्त्याचा काय मूळोद्देश असावा हे स्पष्ट होते ते स्पष्टीकरण असे कीं **परिस्थित्यनुरूप** क्षत्रियाना तसे राहावे लागेल कलीयुगाच्या धकाधकीच्या मामल्या-तही आर्यभूमींत बीजरूपाने व **बीजहक्कानें** निवास करणारे क्षत्रिय, स्वकर्मभ्रष्ट असूच शकत नाहात प्रथम बीजरूपाने क्षत्रिय कलियुगात राहातील असे विधान स्पष्ट झाल्यावर 'स्वकर्मभ्रष्ट क्षत्रिय राहातील' या म्हणण्याला विशेष किंमतच प्राप्त होत नाहीं शिवाय **श्रीशिवरायासारखे अवतारी क्षत्रिय नरकेसरी** कलियुगातच या भूतलावर जन्म घेऊन आपल्या **प्रत्यक्ष दिव्य क्षात्रकृतींनें** वरील म्हणण्यास **कोळून प्यालेले आहेत** हीही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे या सर्व दृष्टींनीं जर विचार केला तर कलियुगात क्षत्रिय नाहीत असा वृथा आरोप करणाऱ्या वेडगळांना वेड्यांच्या हॉस्पिटल्-मध्येंच नेऊन बसविण्याचा प्रसग येतो

ज्या लोकांनीं अविचारानें असली विधानें क्षात्रप्रभाकरासबधीं केलेलीं आहेत, त्यांना क्षात्रमहात्म्याचा इतिहास तिळमात्रही माहीत नसावा असे मोठ्या खेदानें म्हणावें लागतें, आणि म्हणूनच तें ऐतिहासिक महात्म्य त्याच्यासमोर प्रदीपाप्रमाणें अवतरीत

करून त्यांचा अज्ञानतम नाहींसा करणे क्रमप्राप्त वाटतें श्री० देशमुखसाहेबांनीं हा 'क्षत्रियांचा इतिहास' जगापुढें आणल्याने या अज्ञानतमाचा अगदींच नाश होणार आहे. ही गोष्ट या इतिहासासबंधाने लक्षांत घेण्यासारखी आहे

" **ब्राह्मणाः संश्रिताः क्षत्रं न क्षत्रं ब्राह्मणाश्रितम् ।**
**श्रिता ब्रह्मोपधा विप्रा खादन्ति क्षत्रियान् भुवि ॥**
**क्षत्रियेष्वाश्रितो धर्मः प्रजानां परिपालनम् ।**
**क्षत्रात्वृत्तिर्ब्राह्मणानां तैः कथं ब्राह्मणो वरः ॥ "**

—छांदोग्योपनिषद, १५३–१७।१८.

म्हणजे, " ब्राह्मण क्षत्रियांचे आश्रित असून क्षत्रिय हे ब्राह्मणांचे आश्रयदाते आहेत क्षत्रियांच्या आश्रयानेंच ब्राह्मणांचा उदरनिर्वाह चालतो धर्माचें परिपालन व सरक्षणप्रजेचें क्षत्रियांमुळेंच होते असें असतां ब्राह्मण क्षत्रियांपेक्षां श्रेष्ठ कसे होतील. अर्थात् **क्षत्रिय हेच ब्राह्मणांपेक्षांही श्रेष्ठ** आहेत "

अशा प्रकारचे ज्या क्षत्रियांचे श्रेष्ठत्व प्रतिपादिलेलें आहे, भारतभूमीस '**भारत-भूमि**' असें अभिधान ज्या क्षत्रियांनीं आपल्या **विशिष्ट कृतीनें** दिलेले आहे, **आर्य-भूमीची घटना** मुख्यत. ज्या क्षत्रियांनींच केलेली आहे, व भारताचे आद्य असे जे **मूल-ग्रंथ वेद** त्याची रचनाही सर्वांशानीं ज्या कक्षिवान्, गृत्समद, भृगु, विश्वामित्र, वामदेव अत्रि, भारद्वाज, वसिष्ठ, कण्व, अंगिरस, कवषएलूष इत्यादि विद्वान् क्षत्रियांनींच केली ( ह्यांमध्यें बहुतेक सर्व क्षत्रिय राजर्षीच आहेत ) त्या क्षत्रियाना परमश्रेष्ठ न मानण्याची कुण्या दुष्टाची प्रवृत्ति होईल बरें ? सुमारें सहा हजार वर्षापूर्वी भारतवर्षांत येऊन ज्यांनीं **आर्यधर्म** प्रस्थापित केला ते सर्व **क्षत्रिय**च होते, त्यानतर ज्या **वैदिक धर्माचा** बोलबाला अखिल जगतांत निनादित होत होता तो वैदिक धर्म प्रस्थापन करणारे धर्म-प्रस्थापक **वेदविद् क्षत्रिय**च होते, त्यानतर भारतकाली अखिल भूप्रदेशावर फडकत राहिलेला श्रेष्ठ **गीताधर्म** प्रत्यक्ष भगवान् श्रीकृष्ण या **क्षत्रिय** प्रभाकरानेंच प्रस्थापित केला, तदनंतर कांहीं काल गाजलेला **बौद्धधर्म क्षत्रिय** राजपुत्र गौतमबुद्ध यानेंच प्रस्थापित केला; बौद्धधर्माच्या वेळींच ज्या **जैनधर्माचें** प्रवर्तन झाले, त्याचा सस्थापकही **क्षत्रिय** राजपुत्र ऋषभदेव आणि प्रवर्तक क्षत्रिय राजपुत्र महावीर हेच होत आणि नाना कुलंगड्यांनीं बुजबुजलेला असा **हिंदुधर्म–आर्यधर्माचें विच्छिन्न स्वरूप** प्रस्थापित करणारेही पवार, प्रतिहार, चालुक्य, चव्हाणादि **क्षत्रिय**च होते या ठिकाणीं धर्मासंबंधीं विस्तृत विवेचन करण्यास वाव नसल्यामुळें येथें आम्ही त्या प्रांतांत न शिरतां एवढेंच सांगतों कीं, धर्मप्रस्थापनेचें कार्य जेव्हां जेव्हां उद्भूत होत गेलें तेव्हां तेव्हां प्रामुख्यानेंच नव्हे तर सर्वांशानें तें **धर्मप्रस्थापनकार्य क्षत्रियांनीच केलें** आहे

**राज्याधिकारासंबंधानें क्षत्रियांचा लौकिक** तर भारत-विश्रुतच आहे. तत्संबंधीं विशेष विवेचनही करण्याची कांही आवश्यकता नाही क्षत्रिय राजासबंधीं असा आदरणीय उल्लेख आहे कीः—

" प्रजानांविनयाधानाद्रक्षणात् भरणादपि ।
सविता पितरस्तासां केवलं जन्महेतवः ॥ "

म्हणजे, " प्रजेला योग्य न्याय देणारा, प्रजेला सुशिक्षण देऊन सद्‌गुणाचे वर्धन करण्यास झटणारा व प्रजेच्या पोषणाभरणाची काळजी वाहाणारा असा राजा असल्यामुळें, तोच प्रजेचा खरा पिता होय त्यांचा जन्मदाता पिता केवळ जन्म देण्याच्याच अधिकाराचा होय "

पाहा बरें, क्षत्रिय राजासबंधीं केवढे आदरणीय असे हे वचन आहे ! आणि आणखीही असलीं शेंकडों वचने उदधृत करतां येतील कीं, ज्यांच्या आधारावर **क्षत्रियांचें सुराज्यवाहकत्व** अगदीं स्पष्ट होईल उपरिनिर्दिष्ट वचनाप्रमाणेच क्षत्रियांनीं आपलें सुराज्यवाहकत्व प्रत्यक्ष कृतीने सिद्ध करून दाखविलेलें आहे प्रभु रामचद्र, राजा भरत, युधिष्ठिर, नळ, श्रीकृष्ण, हरिश्चद्र, जनकादि क्षत्रियकुलोत्पन्न राजे हे सद्‌गुणांच्या मूर्तिमत खाणीच होऊन गेलेले आहेत

" पुण्यश्लोकोनलोराजा पुण्यश्लोको युधिष्ठिर ।
पुण्यश्लोकश्च वैदेह पुण्यश्लोको जनार्दन ॥

अथवा

" धर्मो विवर्धति युधिष्ठिरकीर्तनेन । पाप प्रणश्यति वृकोदरकीर्तनेन ।
शत्रुर्विनश्यति धनजयकीर्तनेन । माद्रीसुतोप्रकथतां न भवति रोगाः ॥

अगर

कर्कोटकस्य नागस्य दमयत्यानलस्य च ।
ऋतुपर्णस्य राजर्षे कीर्तन कलिनाशन ॥

हीं क्षात्रकुलावतस राजांविषयींचीं आदरणीय वचने अत्यत कर्मठ ब्राह्मणाच्याही नित्यपाठात आहेत भारतमातेच्या प्रत्येक सुपुत्राने आपल्या **नित्यपाठांत ठेवण्यालायक** अशीं हीं **पुण्यवचनें** आहेत त्यांचा भावार्थ हाच आहे कीं, पुण्यश्लोक नल, युधिष्ठिर, जनक, श्रीकृष्ण, श्रीराम हे सर्व क्षत्रिय राजे प्रातःस्मरणीय असे होऊन गेलेले आहेत ते पुण्यश्लोक म्हणून या भूतलावर गाजलेले आहेत, तद्वतच क्षत्रियकुलेंद्रनील धर्मात्मा राजा युधिष्ठिर याच्या नामस्मरणाने धर्माची वृद्धि होते, क्षत्रियकेसरि भीम राजाच्या नामगुणसकीर्तनानें पापाचे पर्वत विरून जातात, क्षत्रियकुलसविता सव्यसाचि अर्जुनाच्या स्मरणचिंतनाने शत्रु विनाश पावतात आणि क्षत्रियकुलमुक्तामणि नकुल-सहदेव यांच्या कीर्तनाने रोगनिवारण होऊन आरोग्यसवर्धन होते तसेंच, कर्कोटक नाग, दमयंतिपति नलराजा आणि ऋतुपर्ण राजर्षि या क्षत्रिय राजांच्या नामस्मरणाने कलीचा नाश होतो

याप्रमाणे क्षत्रियराजानी राज्याधिकाराचे आपले मुख्य कार्य सांभाळलें असून **जगद्वंद्यत्वाचा बहुमान**ही या क्षत्रिय राजांनींच मिळविलेला आहे आजपर्यंत अगणित क्षत्रियराजे भारतावरच नव्हे तर भारताच्या बाहेरील अफाट प्रदेशावरही आपली साम्राज्यसत्ता स्थापन करून सम्राटपदाचा अग्रगण्य मान प्राप्त करते झाले

आहेत ककुत्स्थ, युवनाश्व, धुंधुमार, त्रिशंकु, भगीरथ, दिलीप, रघु, सगरादि महान् प्रतापि राजे ज्या इक्ष्वाकु वंशांतून उदयास आलेले आहेत, तो परमपवित्र वंश, क्षात्रभूमीच्या पायांवरच उभा असलेला एक वंदनीय वंश आहे दैत्यांचा संहार करण्यांत ज्यानें अजिंक्यत्व मिळविलें होते, तो ककुत्स्थराजा क्षत्रियच होता, धुंधु महादैत्याच्या नरडीचा घोट घेऊन त्याला त्याच्या दानवी दुनियेंतून मुक्त करण्यावें महत्पुण्य आचरणारा शूरवीर धुंधुमार राजा क्षत्रियच होता, आर्यांची प्रपूजनीय गंगा महानदी भूतलीं अवतरित करणारा भगीरथ प्रयत्नकर्ता राजा भगीरथ हा क्षत्रियच होता, सुप्रसिद्ध महायोगी जो खट्वांगराजा कीं,—

**खट्वांगेन समोनान्य कश्चिदुर्व्यां भविष्यति ।**
**येन स्वर्गादिदागत्य मुहूर्तं प्राप्य जीवितं ॥**

अशी ज्याची अद्वितीय कीर्ति योगपारंगततेबद्दल योगाध्यापक ग्रंथांत अजूनही गाजत आहे तोही क्षत्रियच होता, उपनिषद्भाषी, अध्यात्मज्ञानमहासागर मिथिलापति राजा जनक हा क्षत्रियच होता, महाभारतसमरप्रसंगी प्रखरशौर्यप्रवाहक सुप्रसिद्ध राजा बृहद्बल हा क्षत्रियच होता, इंद्ररक्षक प्रतापी राजा पुरूरवा हा क्षत्रियच होता, चंद्रवंशीय सुप्रसिद्ध गाधीराजपुत्र प्रतिसृष्टि निर्माणकर्ता शस्त्रास्त्रविद्याविशारद राजा विश्वामित्र ऋषि हा क्षत्रियच होता, स्वर्गसत्ताधारि विख्यात राजा नहुष हाही क्षत्रियच होता, आयुर्वेदप्रवर्तक आणि सुप्रसिद्ध वैद्यकग्रंथ सुश्रुत याच्या लेखकाचा आश्रयदाता काशीस्थ राजा काशीराज हा क्षत्रियच होता, महेश्वरनगर संस्थापक वीरश्रेष्ठ राजा महिष्मान् हाही क्षत्रियच होता, अलौकिक शक्तिसंपन्न आणि अतुलबलशालि अशा मदांध दुष्ट रावणास चीत करून त्यासही दीन करून सोडणारा क्षात्रकुलकेसरी राजा सहस्रार्जुन कीं, ज्याच्या पुण्यप्रभावाची व महात्म्याची—

**कार्तवीर्यार्जुनोनाम राजाबाहुसहस्रवान् ।**
**तस्य स्मरणमात्रेण गतं नष्टं च लभ्यते ॥**

अशी दिगंत कीर्ति आजही साऱ्या आर्यस्थानांत दुमदुमत आहे,तोही क्षत्रियच होता,सत्यप्रतिज्ञ राजा भीष्म हा क्षत्रियच होता, पाटणानगर संस्थापक सुप्रसिद्ध वीरमणि राजा उदायी हा क्षत्रियच होता, जगद्विख्यात् सम्राट् भूपति राजराजेंद्र सार्वभौम अशोक राजा हाही क्षत्रियच होता, विक्रमसंवत् प्रस्थापक सुविख्यात् राजा विक्रमादित्य हाही क्षत्रियच होता, सुप्रसिद्ध विद्वान्, प्रतिभासंपन्न ग्रंथकार आणि अद्वितीय पराक्रमी नरेंद्र राजा हर्ष हाही क्षत्रियच होता, आणि हा प्राचीनकाल कालाच्या बाराहाती उदरांत गडप झालेला असला तरी, अगदीं अर्वाचीन कालींही एकादशावतार श्रीशिवरायप्रभु याच्यासारख्या क्षत्रियकुलस्यमंतकाच्या अवतारोत्पत्तीवरून क्षात्रनभःप्रांगणांत चमकणाऱ्या व चमकून गेलेल्या तेजस्वी सवितृकलाभिधानि राजकारणी नररत्नाच्या राज्याधिकारवाहकत्वासंदर्भी कोण्याही सहृदय सज्जनाच्या अंतःकरणांत आदराचा अफाट दर्या उचंबळून आल्याखेरी न राहाणारच नाहीं, ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट आहे

क्षत्रियांचा क्षात्रधर्म, क्षत्रियांचें व्यक्तिमाहात्म्य आणि क्षत्रियांची कर्तव्यपरायणता इत्यादि गोष्टी जर ध्यानांत घ्यावयाच्या असल्या तर आपणांस प्राचीन कालापासून अलीकडील अर्वाचीन कालाकडे येत येत गेलें पाहिजे त्याप्रमाणे जर आपण आपली दृष्टि क्षात्रससारावर फेंकली तर आपणांस मोठे नयनमनोहर, कर्णमधुर आणि हृद्धारणीय असे ऐतिहासिक क्षात्रप्रभायुक्त प्रसंग अनुभविण्यास मिळतात क्षत्रिय हे **क्षात्रकर्मांत** जेवढे अग्रगण्य, तेवढेच **ब्रह्मज्ञान व अध्यात्मविद्येत**ही निष्णात आहेत, तेवढेच **धर्म** व **राज्यक्रांतिकर्तृत्वाच्या** क्षेत्रांतही शिरोभागी आहेत, तेवढेच **शस्त्रास्त्र-पटुत्वांत**ही शिरोमणि आहेत आणि तेवढेच **जगद्वद्य** म्हणून त्रिखडपूज्यही आहेत. **प्रभु रामचंद्र व प्रभु गोपाळकृष्ण** या दोन्हीही अवतारी विभूति क्षात्रमहासागरांतूनच वर आलेल्या आहेत साऱ्या जगात या दोन विभूतींचीं हजारों मदिरें क्षात्र-माहात्म्याची साक्ष देत असताना प्रत्येक व्यक्तिमात्राच्या दृष्टोत्पत्तीस आलेली आहेत, येत आहेत आणि येत राहातील सर्व दर्जाचे नरनारीगण, मोठमोठे महात्मे, उदात्त चरित्रधारि सतजन आणि दुर्दांत दुष्ट असे पापपकांत पिचत पडणारे पाऱ्याचे पितर, या सर्वांना प्रभु रामचद्र व प्रभु श्रीकृष्ण या क्षत्रियकुलस्यमतकाच्या चरणयुग्मावर लोटांगण घालतांना, व 'घालीन लोटांगण वदीन चरण डोळ्यांनी पाहीन रूप तुझें' अशी नम्र प्रार्थना रात्रदिन करताना, हजारों वर्षांपासून प्रत्येक व्यक्तिमात्राने आपल्या उघड्या डोळ्यांनी पाहिले आहे **नाममात्र** दशावताराची वर्णने कोठें कोठें आढळतात, परतु सर्व जगातील **आबालवृद्धांच्या** तोंडी निशिदिनीं **स्वाभाविकरीत्या** जर कोण्या **मुख्य दोन अवतारांची** पुण्यस्मरणीय नामाभिधाने येत असतील, तर ती फक्त **प्रभु श्रीरामचंद्र व प्रभु गोपालकृष्ण** या दोन **क्षत्रिय अवतारांची**च. आर्यलोक ज्या ग्रथाना पवित्र व **भक्तिमान्यग्रंथ** म्हणून ज्याची पूजा करतात, व अहोरात्र श्रवणलाभ प्राप्त झाला तरी ज्यांच्या श्रवणाने आर्यजनांची तृप्ति कधींही होत नाही, असे परमपूज्य ग्रथ तरी कोणाच्या अस्तित्वामुळे जन्मास आले म्हणाल तर तेही **क्षत्रिय नररत्नांच्याच** प्रभु रामचद्रासाठीच वाल्मीकिरामायण जन्मास आले प्रभु रामचंद्रासाठीच अध्यात्मरामायण जन्मास आले, प्रभु रामचंद्रासाठीच कालिदासानें रघुवशाला जन्म दिला, प्रभु रामचंद्रासाठीच भवभूतीनें महावीर चरित्र व उत्तरराम चरित्रास जगापुढे आणलें, प्रभु रामचद्रासाठीच एकनाथाने भावार्थ रामायण जन्मास आणले, प्रभु रामचंद्रासाठीच श्रीधराने रामविजय कथन केला, प्रभु रामचद्रासाठीच मोरोपतांची एकशे-आठ रामायणे अवतरित झाली, प्रभु रामचंद्रासाठीच तुलसी रामायण तुलसीदासानें अवतीर्ण केले, प्रभु रामचंद्रासाठींच रामगीता गीत गाऊं लागली आणि प्रभु रामचंद्रासाठीच आनदरामायण, रामाश्वमेध, निवृत्तिरामादि ग्रथ भूतलीं अवतरले तद्वतच क्षत्रियकुल-स्यमंतक पूज्यअवतार प्रभु गोपालकृष्णाच्या अस्तित्वामुळेच त्रिखंडवद्य भगवद्गीता आपले अबाधित संदेश मानवाच्या दुनियेपासून तों दानवांच्या दुनियेपर्यंत पोंचविती झाली प्रभु गोपालकृष्णासाठींच हरिवश जन्मास आला; प्रभु श्रीकृष्णासाठीच हरिविजय उदयास

आला, प्रभुगोपालकृष्णासाठींच श्रीमद्भागवतास जन्म मिळाला, प्रभुगोपालकृष्णामुळेंच श्रीमहाभारत भारताच्या कानी पडले, आणि प्रभुगोपालकृष्णासाठींच भावार्थबोधिनी किंवा ज्ञानेश्वरी, हरिलीला, मुक्ताफलादि ग्रंथ, शेंकडों स्तोत्रें, अनेक कथासंग्रह व पुराण-कीर्तनें जगाच्या बाजारांत मनस्वी भारी किंमतीनें उधळलीं जाऊं लागली

क्षत्रियावतार परमपूज्य प्रभु श्रीरामचंद्र याचा अलौकिक लौकिक **चेतनवस्तू-पासून तों जडवस्तूपावेतों**, व प्रत्यक्ष चरित्रापासून तो चंचलभावनेपावेतों जाऊन भिडलेला आहे कृषिदेवतेला सीता हे अभिधान देण्यास उत्सुक झालेला प्राचीनकालीन जनसमाज या आमच्या विधानाची साक्ष देत आहे इंद्राला राम बनविणे, वृत्रासुराला रावण बनविणे, मरुताला हनुमान बनविणें आणि या पायावर वृत्रासुराने अवर्षण पाडून शेत पिकेनासे केले म्हणजे त्याचें रूपक रावणानें सीतेचें हरण केले असें रामचरित्राच्या अस्सल वर्णनाबरहुकूम करणे, इंद्रानें वृत्रासुराला ठार मारल्याचे रूपक रामाने रावणास ठार मारले असें करणे आणि इंद्रानें कृषिकर्मास उत्तेजन दिले याचें रूपक रामानें सीतेस मुक्त केले असें करणे, ह्या सर्व कल्पना **रामचरित्रांतील विशेष** दाखवीत आहेत. प्रत्येक सचेतन अचेतन वर्णनाशी रामचरित्राचा संबंध जोडण्यास उत्सुक झालेला प्राचीन अर्वाचीन बहुजनसमाज रामचरित्राकडे केवढ्या शब्दातीत आदरणीय बुद्धीने पाहात असला पाहिजे याची कल्पना करणेही अकल्पनीय वाटते कोठें कोठे तर सूर्यास राम बनवून व रात्रीस अहिल्या बनवून, सूर्याने रात्र मुक्त केली याचें रूपक रामानें अहिल्या मुक्त केली या कथानकाशी जुळवून दिलेले आहे अध्यात्मशास्त्रविशारद तर जीवात्म्याचा दहा इंद्रियें जोडलेला विराट देहरूपी रथ हा दशरथ मानतात, जीवात्मा हा राम मानतात, सत्बुद्धि ही सीता मानतात, अविद्या ही कैकेयी मानतात, वैराग्य हें वन मानतात, विवेक हा लक्ष्मण मानतात, पंचक्रोशी ही योगातील ध्यानास्थिति मानतात, देहाभिमान हा रावण मानतात, सद्भाव हा बिभीषण मानतात, भावार्थ हा जटायु मानतात, भक्ति ही जटापुपख मानतात, योगशास्त्रोक्त मनश्चक्र, अष्टदळ ही लंका मानतात, अंजन हा अंजनीतनय हनुमान मानतात, निष्काम हा सुग्रीव मानतात, सकाम हा वाली मानतात आणि कपि म्हणजे समाधिप्राप्तीचा मार्ग मानतात याप्रमाणें रामचरित्रातील व्यक्तीच्या गुणाशीं व प्रसंगाशी आपले अध्यात्मशास्त्र भक्तिमान् लोकानी संलग्न केलेले असून, त्यावरून राम-चरित्र केवढे उदात्त असले पाहिजे याचीही कल्पना बऱ्याच प्रमाणाने करिता येते ह्या कल्पनेच्या भराऱ्या असल्या तरी प्रत्यक्ष कृतीच्या मुळाशीच कल्पना निगडित झालेल्या असतात, हा मानसशास्त्राचा सिद्धान्त लक्षांत घेतल्यावर ह्या कल्पनातही विशेष स्वारस्य सांठविलेले आहे असें कोणासही कबूल करावे लागेल आपल्या कल्पना ज्याला त्याला प्रभु रामचंद्राच्याच चरित्राशी जोडून टाकण्याची स्फूर्ति झाली, व पंचमहाभूतात्मक कोणती-ही घटना प्रभु रामचरित्राच्या अभिप्रायावरच खपविण्याची उत्कट इच्छा प्रगट करितांना ज्याला त्याला कृतकृत्यता वाटूं लागली, यांतच प्रभुरामचंद्राच्या **जगद्वंद्यतेचें सर्टि-फिकेट** दडून बसले आहे

क्षत्रियकुलस्यमंतक प्रभु रामचंद्र हे सातवा अवतार म्हणून जगन्मान्य आहेत. अवतारी विभूतींच्या कार्यकर्तृत्वाची जीः—

परित्राणाय साधूनां विनाशायच्च दुष्कृताम् ।
धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥

अशा तऱ्हेची एक **कसोटी** भगवान् श्रीकृष्णानें कथन केलेली आहे, तिला अनुसरूनच प्रभु रामचंद्राचे जीवनचरित्र व्यतित झालेले आहे अवतारी विभूतीस अनुरूप अशा तऱ्हेची प्रभु रामचंद्राची स्पष्ट कीर्ति गाइलेली अनेक ठिकाणीं आढळून येते

**स हि देवैरुदीर्णस्य रावणस्य वधार्थिभिः ।**
**अर्थितो मानुषे लोके जज्ञे विष्णु सनातनः ॥**

—रामायण, अयोध्याकांड

म्हणजे, "रावणाचा वध करण्याकरितां हा विष्णूच मनुष्यलोकांत अवतरला आहे" अशा तऱ्हेची प्रभु रामचंद्राची प्रशंसा अनेक ठिकाणीं केलेली आहे महाभारताच्या शांति-पर्वांत अवतारकथन करतांना म्हटलेलें आहे कीं,—

हंसः कूर्मश्च मत्स्यश्च प्रादुर्भावा द्विजोत्तमम् ॥
वराहो नारसिंहश्च वामनो राम एव च ॥
रामो दाशरथिश्चैव सात्वतः कल्किरेवच ॥

यांमध्ये श्रीरामचंद्राचें नाव आहे पण बुद्धाचें नाही विष्णूचे जे सध्यां दशावतार मानतात त्यात हंस हे नांव आढळत नाही, मात्र रामावतार सर्वत्र शिरसामान्य झालेला आहे वायुपुराणांत प्रभु रामचंद्रास विष्णूचा अवतारच मानलेला आहे अमितगति पंडितानें तर रामचंद्राबद्दल **'सर्वज्ञ, सर्वव्यापि व विश्वपालक'** असे उद्गार काढलेले आहेत महात्मा तुलसीदासजींनेही 'एकछत्र एक मुकुटमणि' असे उच्चतम उद्गार प्रभु रामचंद्रा-विषयीं काढून प्रभु रामचंद्राचे अलौकिकत्व सिद्ध केले आहे, आणि आनंदतीर्थ, नरहरतीर्थ, हेमाद्रि, रामानंद, कबीर आणि रामदास यानी तीव्रतम रीतीने रामोपासना करून आपणांस जगाच्या अंतापर्यंत कायम टिकवून घेतले आहे याप्रमाणे क्षत्रियकुलस्यमंतक प्रभु राम-चंद्राची महती असून प्रभु रामचंद्राच्या दिव्यत्वाची, अलौकिकत्वाची, माहात्म्याची, श्रेष्ठत्वाची, त्रिखंडनायकत्वाची आणि जगद्वंद्यत्वाची साधी भोळी साक्ष पटवून घ्यावयाची असली, तर ती दररोजच्या व्यवहारांत कोणाही प्राकृत मनुष्यासही पटण्यासारखी सुलभ व सहजसाध्य आहे. व्यवहारांत सामान्यत. असा नियम आहे कीं, कोणत्याही श्रेष्ठ विभूतीचे नाम-स्मरण **मुद्दाम** केल्याविना तें मुखातून उच्चारिले जात नाही, परंतु 'रामा'च्या बाबतींत मात्र हा सर्वसामान्य नियम व मानसशास्त्राचा सिद्धान्तही लंगडा ठरतो ! 'रामा'चें नाव दिवसातून अनेकवेळा अगदी सहजासहजीं मुखावाटें उच्चारिले जात असते हा रामनामोच्चाराचा साहजिकपणा एवढा उच्चतम प्रतीचा असतो कीं, 'राम' नामोच्चारण झाल्यावरही त्या नामाचा उच्चार करणारास या गोष्टीचा पत्ता राहात नाहीं ! एवढा साहजिकपणा त्रिखंडांतील कोणत्याही पवित्र शब्दोच्चारणासंबंधी स्पष्ट रीतीनें आढळून

येणार नाहीं हा रामनामोच्चाराचा **साहजिकपणा** खरोखरच अगम्य व अलौकिक आहे आणि तसा तो न राहिल्यासच आश्चर्य ! कारण, ज्या जगन्नायक प्रभु रामचंद्राची सगळीच कृति अगम्य व अलौकिक, त्याचा अलौकिकपणा याही बाबतींत सिद्ध झाल्याशिवाय कसा राहील ? श्रीमत्प्रभु रामचंद्राचा–रामाचा–नाममहिमा, आणि त्याचे वैचित्र्य, कसकशा रीतीनें दररोजच्या व्यवहारांत स्पष्टपणें प्रकट होतात हें पाहाण्याकरितां आपण सामान्य व्यवहारांतील कांहीं प्रसग घेऊं

प्रातःकाळीं झोंपेतून जाग येतांच शय्येवर असतांनाच, 'राम राम' असा उद्गार न कळत मुखावाटें बाहेर पडतो परस्परांच्या भेटीच्या प्रसंगीं, एकमेक एकमेकांस 'राम राम' करितात एखाद्याचें भयंकर नुकसान वगैरे झाल्याची बातमी अकस्मात् कळतांच ऐकणाऱ्याचे मुखावाटें 'अरे राम' असें उच्चारण घडतें लोडाशी टेकतांना, टेकतां टेकतां मनुष्य 'राम राम' म्हणत असतो एखादी गोष्ट कोणास माहित नसली, व तिच्यासंबधानें जर आपण त्याला विचारले, तर तो म्हणतो, 'राम जाणे बुवा !' भविष्यत् गोष्टींविषयीं बोलणे चाललें असता मुखावाटे अनायासें उद्गार बाहेर पडतात 'राम काय करील तें खरें !' राज्यसौख्याविषयीं प्रश्न निघाला की, 'रामराज्य' आठवतें कोणाला पत्र वगैरे लिहावयाचें असल्यास 'श्रीरामसमर्थ' असें प्रथम लिहितात आळस आला असतांना, अग मोडतांना 'राम राम राम' म्हणतात जांभई देतांना 'राम राम' म्हणतात शरिरास एकाएकीं भयकर दुखापत वगैरे झाली की, अनायासें मुखावाटें उद्गार बाहेर पडतात, 'अरे राम !' एखाद्याविषयीं तुच्छतेनें बोलावयाचे असले म्हणजे म्हणतात, 'त्याच्यांत काय राम आहे !' एखाद्यानें एखादे दुष्कर्म केले असून तो जर कबूल करीत नसेल, तर इतर जन म्हणतात, 'बरें, बरें, राम पाहून घेईल !' एखाद्या भीषण प्रसगासंबधीं विचार करतां करता विचाराची पराकाष्ठा झाली, म्हणजे मुखावाटे दीर्घ उद्गार निघतात कीं, 'राम तू समर्थ !' मृत्युशय्येवर भावी मृत खिळून गेला असून ज्याचे पचप्राण आतां निघून जाण्याच्या तयारींत आहेत अशास त्याचे शुभेच्छु जन म्हणतात, 'राम राम म्हणा !' पोपटास पढवितांना म्हणतात, 'पढो तो मिठ्ठू सीताराम !' उत्तर हिंदुस्थानांत आरति झाल्यानंतर म्हणतात, 'सच्चा आरति कीजै जै सीताराम !' उत्तर हिंदुस्थानात शपथ घालतांना मुख्य शब्द वापरतात तो 'राम दोहाई !' अपमान प्रकट करावयाचा असला म्हणजे उद्गारतात, 'राम जी का !' तटाभांडणाच्या बाबतींत उद्गारतात, 'क्या रामायण छेड दी !' अज्ञातगोष्टींविषयीं अखेरचा, निर्वाणीचा विचार मुखावाटें उद्गारतात, 'होइ है सोइ जो राम रचि राखा !' एखाद्या मुलाच्या आईबापांचा पत्ता लागत नसल्यास त्याला सबोधितात, 'राम जनी !' प्रेतयात्रा चालली असतांना घोष चालत असतो, 'राम नाम सत् है, राम नाम सत् है, राम नाम सत् हैं !'

असेच आणखीही अनेक प्रसग दाखवितां येतील की, ज्यांत 'राम' नामोच्चारण अगदीं सहजासहजीं होत असतें खरोखरच, अशा या पवित्र नामाचा महिमा अपार व अगम्य नाहीं काय ? या क्षत्रियकुलस्यमतक प्रभु रामचंद्राच्या शब्दातीत नाममहिम्या-

ची बरोबरी करणारे नाम, जगांत अन्यत्र कोठें तरी पाहावयास मिळेल काय? 'राम'-नाममहिमा खरोखरच असा अतुलनीय आहे, आणि म्हणूनच म्हटलेलेंही आहे की,—

सूर्यवंश में राम का, हुआ सूर्य सा काम।
अब भी घर घर रम रहा, दो अक्षर का नाम॥

प्रभु रामचंद्राचा नाममहिमा असा अतुलनीय वाढण्याकरितां त्याच्या अगम्य कृतींनींच वाव दिला प्रभु रामचंद्राचा हा जो नाममहिमा आतापर्यंत वर्णिलेला आहे, व सर्व जग ज्याला अहोरात्र जपत आहे, त्याच्या मुळाशी प्रभु रामचंद्राच्या दिव्यकृतीच दडून बसलेल्या आहेत, आणि अर्थातच हा महिमा त्या नामाचा नसून प्रभु रामचंद्राच्या कृतींचा—दिव्य—अपौरुषेय—अगम्य—अशा सत्कृतीचा आहे क्षत्रियकुलध्रुव प्रभु रामचंद्र याच्या सत्कृतींचा ओझरता पण उद्‌बोधक उल्लेख करावयाचा म्हणजे तो,—

सोते हुए जगत् को जगाया था राम ने।
जागे हुए को ज्ञान सिखाया था राम ने॥
जब मर रही थी जाति जिलाया था राम ने।
पृथ्वी को स्वर्ग धाम बनाया था राम ने।
वह तेज था उनका कि असुर ध्वस्त हो गये॥
सूरज उगा तो तारे सभी अस्त हो गये॥

—अभिमन्यु नाटक

अशा प्रकारचा करावा लागतो यावरून प्रभु रामचंद्राचा अवतार, हा एक केवढा दिव्य अवतार होऊन गेला याची अल्पशी, पण वास्तव कल्पना करता येते क्षत्रियकुलस्यमंतक प्रभु रामचंद्राची महती अशी अपार असून शब्दातीत असल्यामुळे, आम्ही **पामर** तिचा पार लावण्यास कसे बरें समर्थ होवूं!

प्रभु रामचंद्राची महती जशी अवर्णनीय व अपार आहे तशीच, ती प्रभु गोपालकृष्णाचीही आहे प्रभु गोपालकृष्ण हेही अवतारी विभूतींत **प्रामुख्यानें** गणले जातात प्रभु गोपालकृष्ण हे एक श्रेष्ठ दर्जाचे **वीरेंद्र** अत्युच्च दर्जाचे **ज्ञानेंद्र**, **अध्यात्मज्ञान-प्रभाकर** आणि **दीनजनवत्सल प्रभु** म्हणून अखिल भारतखंडांतच नव्हे तर साऱ्या जगात **वंद्य** म्हणून गाजले गेले आहेत, गाजले जात आहेत व गाजत राहातील प्रभु गोपालकृष्णाचें नांव,—

**" तद्धैतद्धोर आङ्गिरसः कृष्णाय देवकीपुत्रायोक्त्वोवाच "**

इत्यादि मंत्रांनी छांदोग्योपनिषदांत ( ३-१७-६ ) वर्णिलेलें आहे महाभारतकाली श्रीकृष्णाचा अत्यंत श्रेष्ठ दर्जाचा प्रभाव होता याचें प्रत्यंतर संजयाने धृतराष्ट्रास आपला जो अभिप्राय कथन केलेला आहे त्यावरून दिसून येणारें आहे तो अभिप्राय असा आहे कीं:—

**यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः।**
**तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम॥** —श्रीमद्भगवद्गीता.

म्हणजे, " माझे मत असें आहे कीं, ज्या ठिकाणीं योगेश्वर श्रीकृष्ण व **धनुर्धर अर्जुन** आहेत, त्या ठिकाणीं लक्ष्मी, विजय, शाश्वत ऐश्वर्य आणि नीति आहे " यावरून भगवान् श्रीकृष्ण व सव्यसाची अर्जुन याचा प्रभाव किती स्पष्ट रीतीनें सिद्ध होतो हें वेगळें सांगणें नकोच अनेक मूर्खशिरोमणी प्रभु श्रीकृष्णाच्या जीवनचरित्रास **गोपीजनविषयक अनीतीचें गालबोट** लावू पहाण्याचा **परंपरागत गाळीव गाढवपणा** करण्याचा अट्टाहास तसल्याच काहीं **बारभाई गचाळ चोपड्यांना** डोक्यावर नाचवून करिता ना नेहमीं दृष्टीस पडतात **परंपरेचे बंदे गुलाम** असल्या अल्लड दंतकथानाही मानवी दुनियेंतील बुगुबुगु करणाऱ्या स्वरोदयाच्या **नंद्याप्रमाणें** आपल्या माना खलाखल डोलवून रुकार देताना आढळून येतात ! चित्रातही प्रभु श्रीकृष्णाच्या तशाच अल्लड लीला रंगविण्याचा खटाटोप अल्लड व दुनियेच्या विचाराच्या ओघाबरोबर वाहात जाणारे चित्रकार करीत असतात आम्हीं **गुलामी गुलमे** अशी चित्रे मोठ्या आनंदानें आणि तोंडावर कमानदार हास्य चढवीत आपल्या अजबखान्यांत दाखल करून घेतों ! अरेरे ! परंपरादेवि, तुला नमस्कार असो ! भारतीय सुपुत्रानों ! एक त्रिखंडवंद्य महात्मा, जगज्जयी वीररत्न, उदार धर्मात्मा, अध्यात्मज्ञानसविता आणि प्रत्यक्ष नीतिसागर असा विष्ण्ववतार प्रभु गोपालकृष्ण, अशा नीचकर्मांत रत होणारा असेल अशाबद्दल तुमची मनोदेवता तुम्हाला कधी तरी अस्तिपक्षी साक्ष देईल काय ? केव्हाही नाही. श्रीकृष्णाबद्दलचा प्रमाण असा जो मूल महाभारत ग्रंथ, त्यात असल्या **बाष्कळ गोष्टीस** स्थानही देण्यात आलेले नाही, मग लांब लांब वर्णनें तर दूरच राहिलीं ! यावरून हें सिद्ध होते कीं, श्रीकृष्णाच्या चरित्राशी असले शृंगारिक व बीभत्स संबंध जे जोडण्यांत आलेले आहेत, ते खास **ह्या वर्गातील** लोकाचीं **दुष्ट** अंत:करणें अशा विचारांनीं उत्फुल्ल करून सोडून आपली **तुंबडी भरण्याच्या भावनेनेंच** मागाहून घुसडण्यात आलेले आहेत याशिवाय त्यात दुसरे कोणतेंही रहस्य नाहीं शिवाय त्याबरोबरच व्यावहारिक दृष्ट्या ह्याही गोष्टी लक्षात घेतल्या पाहिजेत कीं, श्रीकृष्ण जर असे अनीतिमान् असते, तर अर्जुनाच्या मनावर अशा अनीतिमानाच्या **गीतोपदेशाचा शाश्वत छाप** केव्हा तरी बसूं शकला असता काय ? राजसूय यज्ञप्रसंगीं सर्वांनीं जेव्हा प्रभु श्रीकृष्णासच अग्रमानार्ह मानलें, तेव्हा शिशुपाल हा श्रीकृष्णाविरुद्ध एकदम इतका बेफाम भडकला आणि त्वेषाचे फुत्कार सोडीत म्हणू लागला कीं, " पूतनानाश श्रीकृष्णानें केला तर त्यात असें काय मोठें त्याने केलें ? गोवर्धन उचलला, अश्वाला ठार केले म्हणून तरी त्याला अग्रमानार्ह मानण्यासारखें त्याचे काय महत्त्व ! " असें बोलतांना त्याचे नेत्र अग्निस्फुलिंगाप्रमाणें प्रखरतेजाने सळाळत होते यावेळीं ज्याअर्थीं श्रीकृष्णाची निंदा करण्याचाच शिशुपालाचा उद्देश होता, त्याअर्थीं त्यानें श्रीकृष्णाचें निंद्यवर्तन उघडकीस न आणावयास काय झाले होतें ? परंतु मुळांतच श्रीकृष्ण हे **नीतिमत्तेचे मूर्तिमंत महासागर** असल्यामुळेंच ही गोष्ट होऊ शकली नाहीं, हे लक्षांत ठेवण्यासारखें नव्हे काय ? स्यमंतकासारखा म्हणजे आजच्या कोहिनूरपेक्षांही अनंतपटीनें

मौल्यवान् हिरा चोरीस गेला असतां, कसून प्रयत्न करून चोराचा तपास लावून तो ज्याचा त्यास आदरानें परत करणारा श्रीकृष्ण, दहीं, दूध चोरण्यांत मोठा पटाईत होता असें म्हणणे व ऐकणें **मूर्खपणाचें** नव्हे काय? जरासंधवधप्रसंगीं युधिष्ठिरानें श्रीकृष्णास सांगितलें की,—

"अध बल जड प्राहु: प्रणेतव्य विचक्षणै:"

—सभापर्व, २० १६.

म्हणजे, "बल हें आधळें व जड आहे त्याला मार्ग दाखविण्याकरिता बुद्धीची आवश्यकता आहे" यावर श्रीकृष्ण बोलले:—

**"मयि नीतिर्बलं भीमे"**

—सभापर्व, २०–३

म्हणजे, "माझ्याजवळ नीति आहे व भीमसेनाजवळ बळ आहे" जर श्रीकृष्ण हा अनीतिमान् असता, तर युधिष्ठिरास असें **छातीठोकपणें** उत्तर देण्यास तो धजला असता काय?

अशीं शेंकडों विधाने व श्रीकृष्णचरितातील शेंकडों **उदात्त प्रसंग** यांना चिकित्सकबुद्धीनें डोळ्यांसमोर ठेवू गेलों असता, श्रीकृष्णाबद्दलचीं असली गलिच्छ वर्णने–मग तीं कुण्याही **महाग्रंथांतील** अगर **महापुरुषाच्या** (?) नोंदून ठेविली गेलीं असेनात–अगदींच **तुच्छ** वाटल्यास त्यांत आश्चर्य असे कांहींच नाही

प्रभु श्रीकृष्णाच्या अपार महतीसबधाने वर्णन करण्यास या दोन बोटात नाचणारी आमची **दुबळी लेखणी** पूर्ण समर्थ केव्हांही होणार नाहीं, हे आम्ही पूर्णपणे जाणून आहों, आणि म्हणूनच हृदय उचंबळून येत असल्यामुळेंच,—

एक समस्त यदिहास्ति किंचित् । तदच्युतो नास्ति परम् ततोऽन्यत् ॥
सोऽहं स च त्वं स च सर्वमेतत् । आत्मस्वरूप त्यज भेदमोहम् ॥

म्हणजे, "जे सर्व कांही येथें आहे तें अच्युत (कृष्ण) आहे दुसरे कांहीं नाही तो मी आहे तो तू आहेस तो हें सर्व आहे तो आत्मा आहे भेदाभेदाचा मोह सोडून दे" असें जाणून क्षत्रियकुलरत्न प्रभु गोपाळकृष्णास आम्ही विनम्रभावाने वदन करीत आहोत

वर आम्हीं क्षत्रियकुलस्यमतक अशा दोन अवतारी पूज्य विभूति प्रभु रामचद्र व प्रभु श्रीकृष्ण, यांच्यासबधीं अक्षरमात्र लिहिलेले असून त्यावरून क्षात्रससाराच्या अद्वितीय माहात्म्याची बरीच कल्पना येणार आहे, परतु त्याबरोबरच क्षात्रससारांतील आणखीही कांहीं उदात्त प्रसग हृदय गद्गद करून सोडणारे असल्यामुळें तेही आपण येथें अवतीर्ण करू या

ज्याप्रमाणें क्षात्रकुलोत्पन्न प्रभु रामचद्र व प्रभु श्रीकृष्ण ह्या **जगद्वंद्य विभूति** साऱ्या दिग्मडलीं निनादित झालेल्या आहेत, त्याचप्रमाणें सीता, तारा, अहिल्या, द्रौपदी, सावित्री ह्या **प्रातःस्मरणीय पंचमहादेवताही क्षात्रकुलोत्पन्न**च आहेत, ही गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे ह्या पचमहादेवताचे स्मरण, मनन आणि निदिध्यास

दररोज नियमानें न करणारी भारतीय गृहिणी विरळा सर्व ब्राह्मणांनीं शिरसावंद्य मानलेला परमपूज्य **गायत्रि मंत्र** सुप्रसिद्ध **क्षत्रिय** राजर्षि विश्वामित्र यानेंच निर्माण केलेला आहे यावरून अत्यंत पवित्र असा **मंत्रोपदेशाही क्षत्रियांकडूनच ब्राह्मणांना** मिळालेला आहे याबद्दल वादच राहात नाहीं शीलाचें मोल, सत्याचें मोल, प्राणापेक्षांही अमोल आहे, असें आपल्या स्वत:च्या उदात्तकृतीनें साऱ्या जगास सिद्ध करून दाखविणारा, व सत्यासाठीं, नीतीसाठीं, स्वत्वासाठीं, सत्त्वासाठीं आणि एकवचनी व्रताच्या संरक्षणासाठीं, आपले पचप्राण तळहातावर घेऊन उघडया बाजारांत विकणारा **सत्याग्रही** वीरेंद्र राजा हरिश्चंद्र, हाही **क्षत्रियकुलांत** उदय पावलेलाच नरेंद्र होय प्रभु रामचंद्राचे श्वशुर **क्षत्रियकुलोत्तम** जनक, हे तर अगदीं **विदेही** म्हणून प्रसिद्ध होऊन गेले आहेत या जनकाजवळ अनेक ब्राह्मण अध्यात्मज्ञानाचा अभ्यास करीत असत याज्ञवल्क्यासारखे अनेक मुनि, राजा जनकास आपल्या पूज्य गुरुस्थानीं मानीत व्यासऋषीस एकदा आपला पुत्र शुक याची समजूत वेदांतासबधानें घालता येईना, तेव्हां तें काम जनकानें केलें जनकास शरण जाऊन अनेक ब्राह्मण त्याचेकडून ब्रह्मविद्येचा लाभ करून घेत असत त्याचप्रमाणे **क्षत्रियकुलोत्पन्न** प्रावाहण, जैबालि आणि चित्रगगायनि ह्या **ब्रह्मविद्यापारगत** नररत्नाकडून श्वेतकेतु, आरुणेय आणि गौतम ह्या **ब्राह्मणांनीं ब्रह्मविद्येचा लाभ** करून घेतला असल्याचे विख्यातच आहे अनेक ब्राह्मणांनीं अश्वपति कैकेय या **ब्रह्मविद्याविशारद क्षत्रियाकडून** ब्रह्मविद्या मिळविली. **क्षत्रियकुलोत्पन्न** काशीवशाच्या अजातशत्रु राजापासून गार्ग्यबलाकि मुनीनें **ब्रह्मज्ञानाचे** धडे घेतल्याबद्दल उपनिषदांतरीं स्पष्ट उल्लेख आहे छांदोग्य, कौषीतकी इत्यादि उपनिषदावरून निरनिराळ्या **क्षत्रियांपुढें ब्राह्मण हात** वगैरे **जोडून** कसे नम्रतेनें बसत व ब्रह्मज्ञान त्यांच्याकडून कसें प्राप्त करून घेत हें उत्तम रीतीनें कळून येते जेव्हा प्रावाहण, जैबालि या ब्रह्मविद्यापारगत क्षत्रियाजवळ 'गौतम ब्राह्मणमुनि ब्रह्मविद्या शिकण्याकरितां आला, व त्यांची प्रार्थना करू लागला तेव्हां त्यास प्रावाहण म्हणाला:—

**न प्राक्त्वत्तः पुरा विद्या ब्राह्मणान्गच्छति ।**
**तस्माद् सर्वेषु लोकेषु क्षत्रस्यैव प्रशासनमभूत् ॥**

—छांदोग्योपनिषद

म्हणजे, "हे गौतमा ! तुझ्यापूर्वी इतर ब्राह्मणांना ब्रह्मविद्येचा संस्कार झालेला नाहीं अर्थात् ती त्याना अवगत नाही **केवळ क्षत्रियांसच** ती अवगत आहे, कारण ती **त्यांच्यामुळेंच अस्तित्वांत** आली" यावरून **क्षत्रियांचा ब्रह्मविद्येसंबंधींचा अधिकार** स्पष्टपणें व्यक्त होतो क्षत्रिय हे याप्रमाणे धर्म व त्यास आधारभूत ब्रह्मज्ञान शिकविणारे, परमेश्वरी गूढांचे दिव्य इतरेजनांस म्हणजे ब्राह्मणादिकांस कथन करणारे, आणि परमेश्वरस्वरूपीं तादात्म्य पावणारे म्हणून जगद्विख्यात आहेत

कुरुपांचालांचा महाभारतांतील इतिहास जर मननपूर्वक डोळ्यांपुढें ठेवला तर **क्षत्रियांचे जगद्गुरुही क्षत्रियच** होते हें स्पष्ट होतें श्रीकृष्ण, भीष्म, धर्म आदि विभूति

त्या अशांत्वपैकीं होत **दानशूरत्वाच्या** बाबतींत तर **क्षत्रियांचा** लौकिक त्रिखंडमान्य आहे क्षत्रियकुलोत्पन्न सुप्रसिद्ध भगीरथ राजानें एकलक्ष हत्ती,दहाकोटी अश्व, प्रत्येक अश्वामागें एकेक हजार धेनु आणि प्रत्येक धेनूमागें एकेक हजार शेळ्या, याप्रमाणे दान दिल्याच्या अर्थाचें विधान महाभारताच्या शांतिपर्वांत आढळतें सुप्रसिद्ध मांधाता यानें शंभर अश्वमेध यज्ञ व शंभर राजसूय यज्ञ करून आठ मैल उंच व ऐंशी मैल लांब असे अनेक सुवर्णमत्स्य दान केल्याचेंही तेथेंच लिहिलेलें आहे सुप्रसिद्ध ययाति राजाने गाई, सुवर्ण, वाहने यांसह परिपूर्ण पृथ्वी व शतार्बुद गोप्रदानें दान केल्याचें महाभारताच्या आदिपर्वात लिहिलेले आहे मूळ ग्रंथकाराच्या या प्रकथनांत अतिशयोक्ति दोष जरी असणे संभाव्य असलें, तरी क्षत्रियांच्या दानशूरपणास त्या योगानें बाधा येण्यासारखें मात्र कांहींच कारण नाहीं याशिवाय मरुत, शिबि, अंबरीष, गय, सगी, पृथु, युषिताश्व इत्यादि अनेक क्षत्रियराजे दानशूर म्हणून चमकून गेलेले आहेत

**आदौ सत्ययुगे बलिस्तदनु च त्रेतायुगे राघवो ।**
**रामः सत्यपराक्रमोथ भगवान् धर्मस्तथा द्वापरे ॥**

म्हणजे, " आरंभी सत्ययुगांत बलि हा क्षत्रियराजा दानशूर होता, त्याच्यामागे त्रेतायुगांत रघुवंशोद्भव सत्यपराक्रम भगवान् रामराजा हा दाता होऊन गेला आणि द्वापार युगांत क्षत्रियकुलोत्पन्न धर्मराजा हा श्रेष्ठ दाता झाला" ही दानशूर क्षत्रियांची प्रणालि उदार क्षत्रियांचे परंपरागत दानशूरत्व स्पष्ट करण्यास पुरेशी आहे **शास्त्रें** धारण करण्याचा मुख्य हक्क तर **क्षत्रियांचाच** लोकविश्रुत आहे सध्यां जसे 'खादी' हा शब्द तोंडाबाहेर निघाला कीं महात्मा गांधीचें नांव आपोआपच डोळ्यापुढें उभें राहातें, शुद्धि' हा शब्द उच्चारिला गेला की स्वामी श्रद्धानंदजींचे नाव डोळ्यापुढें उभें राहाते, 'बालामृत' म्हटले कीं, 'डोंगरे' हा शब्द अनायासेच आठवतो 'चहा' आठवला कीं लिप्टनची साहजिकच आठवण होते आणि 'जालीयनवाला बाग' म्हटले की जनरल डायर साहजिकच डोळ्यांसमोर उभा राहतो, तद्वतच शस्त्रधारणाच्या बाबतींत क्षत्रियांचा ही युग्मयुक्त संबंध आहे **'चक्र'** म्हटले की **भगवान् श्रीकृष्ण** डोळ्यासमोरच उभे राहातात, **'गदा'** हा शब्द आठवला की, **भीमदादांची** स्वारी पटकन् ध्यानात येते, **'धनुष्य'** म्हटलें की **अर्जुनाची** मूर्ति डोळ्यापुढें उभी राहाते, **'भवानी तरवार'** म्हटले की **श्रीशिवराय** आठवतात आणि **'भाला'** हा शब्द उच्चारला की **मावळे क्षत्रिय** पटकन् नजरेसमोर फिरकू लागतात, आणि म्हणूनच क्षत्रियांच्या शस्त्रधारकत्वा विषयीं मानवी मनात अत्यादर उत्पन्न होतो

याप्रमाणे सकलगुणैश्वर्यमंडित अशीं अनेक नररत्नें आजपर्यंत क्षात्रमहासागरांत दृग्गोचर होत आल्यामुळे, क्षात्रनभःप्रांगणांतच भूम्योद्धारक, वेदोद्धारक, धर्मोद्धारक, राष्ट्रोद्धारक, भूमिपालक, समरकेसरी, ब्रह्मज्ञानी अध्यात्मनिपुण, शास्त्रकोविद्, अस्त्रविद्या पटु, ईश्वरावतार, दानशूर, शस्त्रधारी, सत्त्वधारी, योगविद् आणि महान् तत्त्ववेत्ते आदि दिव्य प्रभाकर सतत तळपून गेल्यामुळें, क्षात्रहिमनगावरच सकल ऐतिहासिक दृश्यांचे घट

बर्फ निर्माण होऊन गेल्यामुळें, आणि सर्व चराचरांच्या चिरंतन चित्कलेंत क्षात्रप्रभावानेंच आजपर्यंत दिव्य घटना घडवून आणल्यामुळें, सध्यांच्या जगात अशा आदर्श **क्षात्र-माहात्म्याचाच दिव्य व प्रभावशाली इतिहास** प्रेरित करण्याची सुबुद्धि प्रस्तुत ग्रंथकारास ज्या **सुप्रभातीं** झाली असेल; तो सुप्रभातसमयच आम्ही आपल्या भावी पिढीचा **पुण्यकाल** समजतों

भावी राष्ट्रसंचालकांपुढें, राष्ट्राच्या भावी आधारस्तंभांपुढें, क्रान्तीचा भगवा झेंडा फडकविण्यास ज्यांच्या हृदयांत नवयुगाचा दिव्य समीर भयंकर सोसाट्यानें वाहवयास पाहिजे अशा आमच्या भावी क्रान्तिकारकांपुढें, आर्यभूमीचा उद्धार करण्याचा चंग बांधणाऱ्या प्रत्येक भारतीय वीरापुढें, वेदादिग्रंथाची चिकित्सक बुद्धीनें समालोचना करणाऱ्या आमच्या प्रत्येक उत्साही वेदज्ञापुढे, धर्माचें सध्यांचें विकृत स्वरूप नेस्तनाबूद करून त्याच्या जागीं वैदिक धर्माचे आणि गीताधर्माचे उन्नत व क्रान्तिकारक तारे चमकविण्याची सदिच्छा धारण करणाऱ्या प्रत्येक धर्मवीरापुढें, समरांगणात शत्रूच्या नरडीचा घोट घेऊन मातृभूमीसाठी आपल्या भगव्या रक्ताचा अभिषेक आर्यदेवीस घालण्याची मर्द व क्षत्रियोचित आकांक्षा बाळगणाऱ्या प्रत्येक भारतीय मृगेंद्रापुढे, शस्त्रास्त्र आणि ज्ञानविज्ञान यांच्या उच्चतम शिखरावर आरूढ होण्याची तीव्र इच्छा धारण करणाऱ्या प्रत्येक नरपुंगवापुढें, आणि पर्यायाने दिव्य अशा ह्या मानवजन्माचे पूर्ण सार्थक्य करूं इच्छिणाऱ्या प्रत्येक मानव म्हणविणाऱ्यापुढें, आज जर कोणता इतिहास प्रदीप्त करण्याची तीव्र आवश्यकता असेल तर ती **'क्षत्रियांचा इतिहास'** या प्रदीपाचीच होय, आणि हें **औचित्य** आपल्या तेजस्वी बुद्धीच्या टप्प्यांत आणूनच श्री० देशमुखसाहेबांनीं ह्रा दिव्य उपक्रम आरंभिला असल्यामुळे त्यांच्या बुद्धिचातुर्याची खरोखरच तारीफ करावीसें वाटत असल्यास त्यात आश्चर्यजनक असें कांहींच नाहीं

ह्रा 'क्षत्रियांचा इतिहास' आपल्या उच्च बुद्धिचातुर्यानें रंगवून काढतांना श्री० देशमुखसाहेबांनीं आणखीही एका **दिव्यक्रान्तीचें मूळ** त्यात रुजवून ठेवलेले आहे हें चाणाक्ष वाचकाच्या ध्यानीं आल्यावाचून राहात नाही

**'क्षत्रियांचा इतिहास' आणि सद्धर्म**

हें क्रान्तिमूल म्हटलें म्हणजे सध्याच्या 'हिंदुधर्मा'च्या **विकृत स्वरूपाविष्करणप्रदर्शनाचें** होय 'हिंदुधर्मा'बद्दल—**आजच्या हिंदुधर्माबद्दल**—श्री० देशमुखसाहेबांनीं आपले अनुभवी विचार तीव्रतम शब्दांत जगापुढें मांडल्यानें कदाचित् कोणी 'हिंदुधर्माभिमानि (?) सज्जन श्री० देशमुखसाहेबांवर रुष्टही होतील असें आम्हास वाटतें, आणि म्हणूनच श्री० देशमुखसाहेबांच्या त्या म्हणण्यात काय रहस्य सांठविलेले आहे हे आम्हांस येथें दिग्दर्शित करावेंसें वाटतें. असें करण्यांत विषयांतर होण्याचेंही कांहीं कारण दिसत नाहीं किंबहुना प्रस्तुत ग्रंथांतील विषयविभाजन करून तत्संबंधी प्रस्तावना करण्याचेंच काम आमच्या शिरावर असल्यामुळे, आम्हांस तें बजावणे भागच आहे कारण कोणताही **प्रस्तावनालेखक** ह्रा केवळ भाट या सदराखाली मोडत नसून, ग्रंथांतरीच्या रम्य व

अवघड प्रदेशांची वाट, त्यांतून प्रवास करणाऱ्या प्रवाशांस अचुक रीतीनें दाखवून देण्याचें भयंकर जबाबदारीचें **मार्गदर्शकत्वाचें काम** त्याच्या शिरावर शिक्कामोर्तब केलेलें असतें या दृष्टीनेंच आमचें काम आम्हांस पूर्णपणें बजाविण्याचें असल्यामुळें प्रस्तुत ग्रंथांत प्रामुख्यानें दृग्गोचर होणाऱ्या धर्माच्या अफाट प्रदेशातही आतां आम्हीं शिरतों

श्री० देशमुखसाहेबानीं धर्मासंबधीं जें वास्तवकथन प्रस्तुत ग्रथांत प्रतिपादन केलेलें आहे, तें **निःपक्षपाती**बुद्धीने विचार करणाऱ्या कोणत्याही **चिकित्सक** बुद्धीच्या सुज्ञास पटल्याशिवाय राहाणारच नाहीं असें आमचें प्रामाणिक मत आम्हीं प्रथम येथे प्रदर्शित करून टाकतों सत्य व क्रान्ति याच्या मुळांवर प्रथम प्रथम कुठाराघात व्हावयाचेच हा अबाधित सिद्धान्त लक्षांत घेतां, श्री० देशमुखसाहेबाच्या ह्या प्रतिपादनातही तसे कांहीं प्रसग अनुभविण्यास मिळाल्यास त्यांत नवल वाटण्यासारखें कांहींच नाहीं श्री० देशमुख साहेबांच्या प्रस्तुत ग्रथातील धर्मविषयक प्रकथनाचा निष्कर्ष हाच निघतो कीं, धर्माच्या नांवाखालीं जगात ज्यावेळी धांगडधिंगा सुरू होतो, त्यावेळी त्या धागडधिंग्याच्या मुळाशीं धर्मविषयक अज्ञानाची मद्यसेवनक्रियाच निगडित झालेली असते विकृत धर्मावर श्रद्धा ठेवणारे जे बिचारे गरीब लोक असतात, ते केव्हाही अज्ञानाचेच बदे गुलाम असतात, आणि अशा विकृत धर्माचे शिक्के त्या लोकाच्या कपाळी निर्दयपणे हाणणारे जे धर्मप्रेरक (?) म्हणविणारे लोक असतात, ते केव्हाही असत्याचे, अत्याचाराचे आणि निर्दयतेचेच बदे गुलाम असतात पुष्कळ वेळां अशीही गमत या धर्मक्षेत्रांत आढळून येते की, धर्मप्रवर्तक लोकानाही धर्माच्या नांवाखालीं आम्ही कोणतीं कृत्यें आचरीत आहोत याचेंच भान नसते ! कदाचित् असेंही या ठिकाणीं म्हणता येईल की, अशा **धर्मप्रवर्तक लोकांत** बहुतेक लोक 'धर्मप्रेमी' असतात परतु '**तज्ज्ञ**' नसतात धर्म प्रवर्तनाचे कार्यात जें **औचित्य** आणि जी **चिकित्सक** बुद्धिसरिता अत करणात जागृत असावयास पाहिजे, ती या धर्मोपदेशी लोकाच्या ठायी बहुश. असत नाही, आणि म्हणूनच अखेर जगात धर्माचा धांगडधिंगा माजून त्याला लवकरच विकृत स्वरूप प्राप्त होतें युरोपांतील Inquisitions च्या बाबतींत धर्मोपदेशी लोकांकडून जे अमानुष अत्याचार घडून आले ते अशा ह्या मूलत. अप्रयोजकपणामुळेच मुस्लीम इतिहासांत धर्मोपदेशी लोकाकडून जे अमानुष अत्याचार इतरे जनावर करण्यात आले असल्याचे स्पष्ट प्रतिपादन केलें आहे, त्याच्याही मुळाशीं हा मूलत· अप्रयोजकपणाच आहे हिंदुधर्माच्या नांवाखालीही अशींच अमानुषपणाचीं आणि ज्याचे स्मरण होताच अगावर रोमाच उभे राहून डोळे ताठरून जातात अशीं जी साहसकर्मे धर्मोपदेशी लोकांनीं इतरेजनावर आचरिली असल्याचा पुरावा स्मृति, श्रुति, पुराणादि ग्रथातून मिळतो आणि प्रत्यक्षपणे आजही उघड्या डोळ्यांनीं दिसतो, त्याच्याही मुळाशीं हीच मूलत अप्रयोजकपणाची कीड लागलेली आहे आणि इतरही ज्या ज्या धर्मात धर्माचा धागडधिंगा बोकाळलेला असेल त्या त्या धर्मोपदेशकांच्या अगीं हीच उणीव प्रामुख्यानें आढळून आल्याखेरीज राहाणार नाहीं काय, **खिस्ती** धर्माचा सस्थापक महात्मा **जीझस्**

**ख्राइस्ट** हा 'मनुष्याशिवाय इतर जीवाची हत्या करणे हें पाप नाहीं' असें सांगत असूनही व '**बायबल**'मध्यें तसें प्रतिपादिले असूनही पुन्हा वेड्याप्रमाणें Inquisitions च्या अमलाखाली हजारों लोकांना जिवतपणीं जाळण्यास सागत होता ! परंतु **धर्मोप**-देशकांनीं ते साहसकृत्य आचरिलेंच कीं नाही ! काय, **इस्लाम** धर्माचा **संस्थापक** **हजरत महमद**साहेब हा 'सत्य बोलावें, चोरी करू नये, खून, व्यभिचार, अन्याय करू नये' असें सागत असूनही व '**कुराण**'मध्ये तशी आज्ञा असूनही पुन्हा वेड्याप्रमाणे जाळपोळ, लुटालुटी, खुनाखुनी करून मनुष्यांच्या मुडक्यांचे कोट रचण्यास व धडें गिधाडास टाकण्यास सांगत होता ? परतु धर्मोपदेशकांनी तें केलेंच कीं नाहीं ! त्याच प्रमाणें **बौद्ध**धर्माचा सस्थापक **गौतमबुद्ध** याने जी आज्ञा दिली नसेल व **त्रि-पिटिकां**'तही उल्लेखित नसेल ती त्या धर्मोपदेशकांनीं आचरावी, **जैन**धर्माचा सस्थापक **ऋषभदेव** व प्रवर्तक **महावीर** यानी जी आज्ञा दिली नसेल व '**श्वेतांबर, दिगंबर-शास्त्र**'ही जी प्रतिपादन करीत नसेल ती त्या धर्मोपदेशकानीं आचरावी, **शीख**धर्माचा सस्थापक **महात्मा नानक** यानें जी आज्ञा दिली नसेल व '**ग्रंथसाहेब**'मध्येंही दाखल नसेल ती त्या धर्मोपदेशकानी आचरावी, **यहुदी**धर्माचा सस्थापक **महात्मा मूसा** याने जी आज्ञा दिली नसेल व '**केबाला**'मध्येंही जिचा उल्लेख नसेल ती त्या धर्मोपदेशकांनीं आचरावी, **पारशी**धर्माचा सस्थापक **महात्मा जर-तुष्ट** यानें जी आज्ञा दिली नसेल व '**गाथावाणी**', '**वंदीदाद**', '**झेंदावेस्ता**' यातही जिचा उल्लेख नसेल ती त्या धर्मोपदेशकानी आचरावी आणि अत्यंत प्राचीन व सर्वांस पूज्य अशा **आर्यधर्माच्या** वदनीय **वेदग्रंथांत** जी आज्ञा दिली नसेल ती त्या धर्माच्या उपदेशकानी आचरावी व धर्माचें उज्ज्वल स्वरूप पालटून टाकावें, या सर्वांच्या मुळाशी **धर्मोपदेशकांचा मूलतः अप्रयोजकपणाच** निगडित झालेला आहे त्यातूनही आपल्या आर्यधर्माच्या मुळाशी तर **ही** अप्रयोजकपणाच्या दारूनें गच्च भरलेल्या धर्मोपदेशी फटाक्याची जंगीच सरबती लागलेली असल्यानें आपला आर्यधर्म छिन्नविच्छिन्न झालेला आहे, होत आहे व पुढें तर अगदींच नेस्तनाबूदही होऊन जाईल कीं काय अशी वास्तव भीति वाटत आहे हीच गोष्ट प्रस्तुत ग्रथातून धर्माचें स्वरूप जगापुढे माडतांना श्री० देशमुखसाहेबाच्या डोळ्यांसमोर प्रामुख्यानें दत्त म्हणून उभी राहिली असली पाहिजे असे आम्हांस वाटतें, व तद्विषयक त्यांचे विचारही प्रस्तुत ग्रथातून ठिकठिकाणच्या उल्लेखावरून आमच्या ह्या म्हणण्याचीच साक्ष देत आहेत

इतरेजनास जरी **अज्ञानपटलाच्या** आवरणामुळे व परंपरागत चालत आलेल्या **मानसिक गुलामगिरीच्या** सवयीमुळें, श्री० देशमुखसाहेबाचीं धर्मविषयक मतें 'बागुलबुवा'प्रमाणे भेडसावू पाहतील, व ज्याचा **हिताहितसबध** त्याच्या ह्या विवेचना-मुळे खाक होऊन जाणारा असेल त्या विवक्षित समाजघटकास जरी हे धर्माच्या मले-रियावरील श्री० देशमुखसाहेबांचें 'स्पेशल क्विनाइन्' कडू वाटेल, तरी पण धर्मोद्धाराच्या **उत्कट सदिच्छेनेंच** श्री० देशमुखसाहेबानी हे **क्रान्तीचे चाबूक**, भेदाभेदाच्या

जहरी किड्यांच्या बुजबुजाटानें आमूलाग्र गजबजलेल्या अशा धर्माच्या सडक्या ढुंगणा-वर हाणले असल्यानें त्याबद्दल विचारवतांना वाईट वाटण्याचे कांहीच कारण नाहीं अशा **क्रान्तिकारक धर्मवीराचें** कोणीही **सहृदय** व्यक्ति वा व्यक्तिसमुच्चय अनेकवार अभिनदनच करील असा आम्हास आत्मविश्वास वाटतो

प्रस्तुत ग्रथाच्या वाचकांना आम्ही प्रेमानें असें विचारतों कीं, आपल्या धर्माची स्थिति सध्या कशी विकृत व विचित्र झालेली आहे हें तुम्हांसही माहित आहे ना ? मग त्याचे जे अग पगु झालेले असेल त्याच्यावर–**अंधश्रद्धेस** बाजूस ठेवून–क्रांतीचा रामबाण उपाय योजून ते समर्थ नको कां करायला ? अशीच जर आपल्या धर्माची दैनादिन भयाण अवस्था होत गेली तर 'स्वधर्मे निधन श्रेयम्' हा भगवान् श्रीकृष्णाच्या गीताधर्माचा सिद्धान्त व आर्यधर्माची आज्ञा आपणांस कशी बरें पाळता येईल ? आम्हांला पूर्ण आशा–नव्हे पक्की खात्री वाटते कीं, आमचे धर्माभिमानी बाधव, सद्धर्मरत देशबधू, आमच्या या पृच्छाची उत्तरे शोधूं जातील तर त्यांना श्री० देशमुखांची प्रस्तुत ग्रथांत प्रतिपादन केलेली धर्मविषयक मते किंचितही कटु वाटणार नाहीत येनकेनप्रकारेण, आमचें प्रामाणिक म्हणणे नव्हे आग्रह हाच आहे कीः—

**" यतोऽभ्युदयनिश्रेयससिद्धि स धर्मः "**

—वैशेषिकदर्शन, १–२

अशा लक्षणांनी युक्त म्हणजे, " ज्याच्या योगाने अभ्युदय व निश्रेयससिद्धि प्राप्त होते त्याचे नाव धर्म होय " असा धर्म आपण आचरिला पाहिजे मग तो श्री० देशमुखांनीं आपणामध्यें प्रेरित केलेला असो अगर ब्रह्मदेवाच्या प्रपितामहानें प्रतिपादन केलेला असो आपणास 'कोणी सागितलें' हे पाहावयाचे नसून **काय सांगितलें** हेंच प्रत्यहीं पाहावयाचे असते याच्या उलट जे आचरण ठेवितात ते सत्यतत्त्वाप्रत कधीही पोचू शकत नाहीत, आणि स्वोद्धारासही पूर्णपणे मुकतातच मुकतात 'धर्म एव हतो हन्ति धर्मो रक्षति रक्षित ' हे मनुस्मृतीचें वचन ध्यानात घेतलें म्हणजे पुरे मात्र ज्या धर्माचे रक्षण करा-वयाचें तो धर्म उपरिनिर्दिष्ट **अभ्युदय** व **निःश्रेयससिद्धि** प्राप्त करून देणारा मात्र पाहिजे, आणि त्याला तसें अनुभविण्यास धर्माचें मूळच शोधून काढावयास पाहिजे हे धर्माचे मूळ जर कोणते असे तुम्ही म्हणाल, तर ज्याला '**ऋत्**' आणि '**सत्**' या दोनच तत्त्वांचा भरपूर आधार आहे असें ते होय, याप्रमाणे आद्यवेदग्रथप्रतिपादन आहे सद्धर्माची मूलतत्त्वें ही दोनच आहेत सद्धर्माला अवडबराची बिलकुल जरुरी नाही 'ऋत्' म्हणजे चागले, बरें, हितकर, चागले व्हावें, दुसऱ्याचें चागलें करावे, चांगले आचरावें ही या 'ऋत्' तत्त्वाची भूमिका आहे तसेच 'सत्' म्हणजे सत्य, सत्यभाषण, सत्याचरण आणि सत्याविष्करण ही या 'सत्' तत्त्वाची भूमिका आहे या दोनच तत्त्वानी **पूर्ण युक्त** असा धर्म जो आचरितो तोच खरा धर्मवीर होय, तोच खरा धर्मज्ञानी होय आणि तोच खरा धर्मात्मा होय धर्माच्या क्षेत्रांत जर हीं तत्त्वें आढळत नसतील, तर धर्माच्या बाबतींत **क्रान्ति** अवश्य झालीच पाहिजे असे आम्हीच नव्हे तर मनुस्मृतीही आपल्या

"**धर्मे**वाप्य सुकोदर्क लोकविकुष्टमेवच" या तीव्र वचनात प्रतिपादन करीत आहे. **सद्धर्माच्या** स्वरूपास आपला 'हिंदु' म्हणविणारा समाज अगदींच पारखा झाल्यामुळेंच आपल्या धर्माची भयंकर कुत्तरओढ चाललेली आहे आपली संख्या दैनंदिन घटत चालली असून इतर धर्मीयांच्या पिशव्या तट्ट फुगत चाललेल्या आहेत ख्रिस्ती मिशनऱ्यांना तर 'हिंदुधर्मा'चें खाद्य पोट फुगून फुटून जाईपर्यंत भरपूर मिळत आहे यांचें एकच उदाहरण आपण वस्तुस्थितीच्या प्रदर्शनाकरितां येथें घेऊ. **सेंट् फ्रांसिस् झेविअर** हा जेसुएट् पथीय एक मिशनरी इ० सन १५४१ मध्ये पोर्तुगीज स्टेट्मध्यें ख्रिस्तीधर्मप्रसाराकरितां येऊन गेला अवघ्या तीन वर्षांच्या कालातच त्यानें आपल्या उद्दिष्टपूर्तीचें सोळा आणे दृश्य गोव्यापासून तों थेट कॅरोमांडेल किनाऱ्यापर्यंतच्या प्रदेशावर धडकून दिलें. ह्या ख्रिस्तीमिशनऱ्याच्या मागें '**हिंदुधर्मीय लेंढार**' इतकी कांहीं बेसुमार वाढली होती कीं, त्या बिचाऱ्याला बाप्तिस्मा देता देतां अनेकवेळा चक्कर येत असे ! पुढें पुढें तर नुकतीच जन्मलेली **हिंदुधर्मीय बालकें**सुद्धां त्याच्या पदरांत पडून बाप्तिस्म्यानें पावन होऊं लागलीं ! त्यानें म्हटलेलें आहे कीं, "I want no interpreter to baptize infants just born." ( नुकत्याच जन्मलेल्या बालकांना बाप्तिस्मा देण्याकरिता मला आतां मध्यस्थांचीही कांही आवश्यकता नाहीं ) आणखी तो म्हणतो कीं, 'अवघ्या **एक महिन्यांतच** मीं **दहा हजार** हिंदु लोक बाटविले" 'हिंदुधर्मा'च्या-'सनातन हिंदुधर्मा'च्या-नांवानें तनातन उड्या मारणाऱ्या **नकली** अभिमान्यांनों ! केवढें भयकर दृश्य तुम्ही पाहात आहांत, याची थोडी तरी जाणीव तुम्हांला उरली आहे की नाहीं ? कीं अजूनही **परंपरेचें मढें** तोंडापुढें खडें करून विकृत हिंदुधर्माचें रडें रडण्यानेंच तुम्हाला खऱ्या हिंदुधर्माचा गाळीव मासला लाभण्याची लटकी आशा उरलेली आहे !

हा सेंट् फ्रांसिस् झेविअर जेव्हां हिंदुस्थानांतून निघून गेला, तेव्हा एकदर आढावा असा निघाला की, त्याने **१५००००० हिंदु** आपल्या स्वरूपात मिळवून घेतले होते ! असाच एक ख्रिस्ती मिशनरी रॉबर्टड नोबिलि हा इ० सन १६०६ मध्यें आपला प्रताप दाखविण्यासाठीं हिंदुस्थानात येऊन गेला त्यानेही **हजारों 'हिंदुजन'** आपल्या राम-रगाड्यात रेट्न टाकून त्याना ख्रिस्ती धर्माची दीक्षा देण्याचे स्वीकृत कार्य या हिंदुस्तानांत बजाविलें याप्रमाणें मिशनऱ्यांसबंधीं सपूर्ण माहिती 'Home university of modern knowledge' या मालेचें Louise creighton यांनीं लिहिलेलें 'Missions their rise and development' या पुस्तकांत असल्याबद्दलची शिफारस आमचे विद्वान् मित्र श्री० ठाकरे यांनीं जिज्ञासू जनाकरितां केलेली आहे

दिव्य अशा **वैदिक धर्माचें भ्रष्ट स्वरूप**; अशा आजच्या 'हिंदुधर्माच्या, सडक्या ढुंगणाला **अंधश्रद्धेच्या** व परंपरागत **मानसिक गुलामगिरीच्या** भरपूर जखमा झालेल्या असल्यामुळेंच व अजूनही त्या पसरतच चालल्या असल्यानें, 'हिंदुधर्म' घाणेरडा झालेला आहे, असें श्री० देशमुखसाहेबांनीं प्रस्तुत ग्रंथांत प्रतिपादन केलेलें असून तें उत्क्रान्तितत्त्वास परिपोषक असेंच आहे. त्याबरोबरच श्री० देशमुखसाहेबांनीं वैदिक

धर्माचा अत्यंत अभिमान धरून त्या धर्मव्यवस्थेप्रत पोंचण्याविषयी जो आपला अभिप्राय कथन केला आहे व सध्यांच्या धर्माच्या विकृत स्वरूपाबद्दल जें तीव्र मत प्रतिपादन केलेलें आहे, तेंही मुळांत धर्मोद्धाराच्या उत्कट भावनेनेंच आणि म्हणूनच श्री० देशमुखसाहेबां-च्या या विवेचनाबद्दलही आम्ही त्यांचें अभिनंदन करितों

'क्षत्रियांचा इतिहास' हा ग्रंथ आणखीही एका औचित्यानें श्री० देशमुखसाहेबांनीं क्रान्तिकारक पायावर नटविला आहे तो विषय म्हटला म्हणजे सध्यांची **वर्णव्यवस्था** हा होय या विषयासंबधानें आम्हांस येथें विशेष कांहीं लिहिण्याची आवश्यकता वाटत नाहीं, परंतु एवढें मात्र आम्ही स्पष्ट म्हणू कीं, वर्णप्रतिष्ठेचें व जातिभेदाचें बंड केवळ **रजिस्टर्ड जन्मजात** हक्कावर अवलंबून ठेवण्याची

**'क्षत्रियांचा इतिहास' आणि वर्णव्यवस्था**

प्रवृत्ति सुरू झाल्यामुळेच आर्यांच्या गुणसंवर्धनक्रियेचा दरवाजा अजिबात बंद झाला ज्या काळीं आपापल्या अंगच्या विशिष्ट गुणप्रदर्शनानें योग्यवर्णाचे सर्टिफिकेट् मिळवितां येण्याचा वास्तव प्रघात सर्रास चालू होता, त्या काळीं सर्वांना आपापल्या पवित्र गुणांचें संवर्धन करण्यास एक प्रकारचें उत्तेजन दिल्याप्रमाणें होत होतें, व राष्ट्रही त्या योगानें ज्ञानविज्ञानमय होण्यास बराच वाव असे ही वास्तव व्यवस्था–**गुणकर्मावरून वर्णाचें सर्टिफिकेट्** देण्याची श्रीकृष्णानें प्रतिपादन केलेली सर्वांगसुंदर वर्णव्यवस्था–जेव्हां नष्ट झाली, आणि श्रेष्ठपणाचा ठेका जेव्हा 'बिचमें मेरा चादभाई' या न्यायाप्रमाणें एका विशिष्ट वर्णाकडेच गेला, तेव्हा अर्थातच **अहमन्यतेचा रजिस्टर्ड बडगा** इतरे जनावर फिरू लागला, आणि समाजाची व्यवस्था खरजेनें पीडलेल्या लुळ्यापांगळ्या कुत्र्याप्रमाणें कावरीबावरी झाली आपापल्या अंगच्या गुणाचें संवर्धन करण्याविषयीं लोक उदासीन होऊं लागले धाव धाव धावलें तरी आपली आतां या जन्मजात वर्ण-व्यवस्थेच्या रामरगाड्यांत वर्दी लागणें शक्य नाहीं, ही भावना समाजघटकाच्या मनांत उद्दीपित होऊन ते सद्गुणच्युत होण्याची स्वतःला सवय लावून घेऊं लागले, नव्हे नव्हे, त्याना या श्रेष्ठवर्णाची मिरास मिरविणारानी सद्गुणच्युत केलें 'दुःशिलोऽपि द्विजाः पूज्यो न शूद्रो जितेंद्रियः', 'शक्तेनापि हि शूद्रेण न कार्यो धनसंचयः', अशीं अनेक स्मृत्योक्त वचनें–कुवचनें या आमच्या म्हणण्याची साक्ष पटवून देण्यास समर्थ आहेत

प्राचीन काळीं जन्मजात वर्णव्यवस्थेस तर बिलकूलच वाव नव्हता वेदकालीं आर्य व अनार्य हेच भेद मानीत असत सध्याच्याप्रमाणें जातिभेदाची व वर्णभिन्नत्वाची पिसाळलेलीं कुत्री आर्यजनाचे लचालच लचके तोडण्याचें दुष्ट कार्य तेव्हा आचरीत नव्हतीं **चातुर्वर्ण्यप्रतिष्ठेचें** विवेचन ऋग्वेदात अगदीं शेवटीं शेवटीं म्हणजे अखेरच्या दहावे मंडलात पुरुषसूक्तांत केलेलें आहे, असें अनेक ठिकाणी आम्हीं वाचलें व ऐकलें आहे, परंतु जेव्हां आम्हीं ही गोष्ट प्रत्यक्ष अवलोकन करण्याचा प्रयत्न केला, तेव्हा आम्हांला चातुर्वर्ण्यप्रतिष्ठेचे उपलकटक ऋग्वेदांत कोठेंही आढळून आलें नाहीत! आम्हांला त्या-वेळीं प्रथम असें वाटलें कीं, कदाचित् ऋग्वेदाची ही 'सुधारून वाढविलेली नवी आवृत्ति'

असावी ! परतु तसाही कांहीं प्रकार आम्हांला तपासाअंतीं आढळून आला नाहीं. आम्ही पुन्हा एक वेळ प्रस्तुत मडळ डोळ्यांत तेल घालून–डोळे फाडफाडून **मननपूर्वक** वाचून पाहिलें, परतु 'पहिले पाढे पढपचावन !' चातुर्वर्ण्यप्रतिष्ठेचें थोताड **सबंध मडलांत** पुन्हांही आढळले नाहीं ! नाहीं म्हणायला एक **वचन** पुरुषसूक्तांत तशा छायेचें मात्र दृग्गोचर झाले. नतर, वर्णभेदाच्या जादूनें भारून गेलेल्या कांहीं वर्ण–मार्तंडाकडूनही समजले कीं, हेंच तें चातुर्वर्ण्यप्रतिष्ठेचें (?) ऋग्वेदांतर्गतवचन होय ! मनानें मनास सल्ला दिली कीं, **आंधळी कोशिंबीर** म्हणतात ती ही अशीच ! वडाची साल पिंपळाला लावूं पाहण्याचा हा **बादरायणी** उपक्रम ध्यानांत घेतला म्हणजे खरोखरच आम्हां हिंदूंच्या मानसिक गुलामगिरीची कींवच करावीशी वाटते. ऋग्वेदातील हें सूत्र प्रतिपादन करतें काय, नि आमचे वर्णभेदप्रेमी सज्जन (!) त्याचा अर्थ करतात कसा **उलटा !** साराच 'टकाशेर भाजी टकाशेर खाजा' असा हास्यास्पद प्रकार ! वाचकाच्या जिज्ञासे-करिता तें वचन आपण येथें उद्धृत करूं या

**ब्राह्मणोऽस्य मुखमासिद्बाहू राजन्यःकृतः ।**
**उरू तदस्य यद्वैश्यः पद्भ्यां शूद्रो अजायत ॥**

—ऋग्वेद, **मं** १०

असें हें वचन असून याचा **लटका अर्थ** असा करण्यांत येतों कीं, "ब्राह्मण हे परमे-श्वराच्या (कुणी ब्रह्मदेवाच्याही म्हणतात) **मुखांतून** झाले (अगर **मुखापासून** झाले)! क्षत्रिय हे **बाहूपासून** झाले, वैश्य हे **मांड्यांपासून** झाले ! आणि शूद्र हे **पाया-पासून** झाले ! अशा तऱ्हेचा **मतलबी अर्थ** करून सामान्य जनतेचीच नव्हे तर मोठ-मोठ्या नामधारी धेंडाचीही दिशाभूल करण्याचा उपक्रम अबाधित चालू असलेला दृष्टीस येतो, आणि म्हणूनच चातुर्वर्ण्यप्रतिष्ठेचे ढोलकें वाजवून 'वर्णव्यवसायी' नदीवाल्याने हुकूम फर्माविला की, असले हे हुकमीनदी आनदानें माना डोलवितात, या नदीच्या गळ्यातील घुगराचा आवाज सामान्य जनतेला ऐकू गेला म्हणजे ती ही बिचारी त्या बैलाचें कौतुक करू लागते ! अशा रीतीनें हें वर्णप्रतिष्ठेचे लोण साऱ्या जगात पोंचून त्याला खारें खारें करून टाकीत आहे अशी वस्तुस्थिति असल्यामुळेंच आपण या ढोलक्यावरच सत्याचा एक बडगा हाणन त्यातील 'अस्सल चीज' आता बाहेर काढू या

वर जें ऋग्वेदांतील सूत्र व त्याचा **लटका अर्थ** दिलेला आहे, त्या सूत्राचा वास्तव **अर्थ** कसा होतो ते आतां आपण पाहू म्हणजे अनायासेंच ऋग्वेदावरील पक्षपाती-पणाचाही एक आळ साफ नाहींसा होईल व चातुवर्ण्यप्रतिष्ठादर्शकवचन ऋग्वेदात आहे असें म्हणणाऱ्या शहाण्यांच्या तोंडांनाही कुलपी कडीबदी होईल

ऋग्वेदातील या **पुरुषसूक्तांत** विश्वाला **विराटपुरूष** कल्पून त्याच्या अनुरोधानें विश्वाचें चित्र त्यांत रेखाटले आहे हें प्रथम ध्यानात ठेविलें पाहिजे प्रतिपादनाच्या सोयी-करितां ही **विराटपुरुषाची** कल्पना आपल्या प्राचीन ऋषिवर्यांनीं घेतली असावी हें कोणाच्याही लक्षात आल्यावांचून राहात नाहींच. **विराटपुरुषाची** उपमा विश्वास

देऊन या **पुरुषसूक्तांत** कालव्यवस्था, सृष्टीच्या अंगोपांगांची व्यवस्था इत्यादि वर्णन केलेले आहे शिष्यानें जेव्हां मुनिवर्यांस प्रश्न केला कीं,—

यत्पुरुष व्यदधुः कतिधा व्यकल्पयन् ।
मुखं किमस्य कौ बाहू कावूरू पादा उच्येते ? ॥

म्हणजे, "हा जो विराटपुरुष कल्पिला तो किती प्रकारानें कल्पिला? याचें मुख कोणतें? बाहू कोणते? मांड्या कोणत्या? पाय कोणते?" तेव्हां मुनिवर्य 'ब्राह्मणोस्य मुखमासीद्' हें वरील वचन शिष्याच्या पृच्छेचे उत्तर म्हणून उद्गारले ते म्हणाले—"ब्राह्मणः **अस्य** मुखम् आसीत् ( ब्राह्मण **याचें** मुख होय ) बाहू राजन्यःकृत ( बाहू क्षत्रिय केले गेले ) ऊरू तद् **अस्य** यद्वैश्यः ( वैश्य **याच्या** मांड्या ) पद्भ्यां शूद्रो अजायत ( पायाकारणें शूद्र झाला )" म्हणजेच वरील ऋग्वेदांतर्गत सूक्तातील वचनाचा असा सरळ अर्थ आहे कीं, "या विराटपुरुषाचे ब्राह्मण हें मुख होय, बाहू क्षत्रिय, मांड्या वैश्य आणि पाय हे शूद्र" असा हा व्याकरणशास्त्रदृष्ट्या प्रयुक्त अर्थ असून त्यावरून पाहिलें असतां **चातुर्वर्ण्यप्रतिष्ठा** अगर **जन्मजातवर्णव्यवस्था** बिलकूलच सिद्ध होत नाहीं, आणि म्हणूनच आम्हाला चातुर्वर्ण्यप्रतिष्ठेचे प्रतिपादन करणारें वचन ऋग्वेदाच्या पुरुष-सूक्तांत आढळून आले नाही असे आम्हीं म्हणतों! कोणतें कार्य करणारास कोणत्या पदवीने सबोधावें एवढेचें या वचनांत सांगितलेले आहे मुखाचे काम जे ज्ञानदान, ज्ञान कथन, तें ब्राह्मण म्हणविणाराने करावें हाच हेतु ब्राह्मणांना मुख मानण्याचा, तद्वतच बाहूंचें काम जें बाहुबलवर्धन, बाहुबलप्रदर्शन ते क्षत्रिय म्हणविणाराने करावे हा हेतु क्षत्रियाना बाहु मानण्याचा, मांड्याचें काम जे बाहुबलसवर्धन आणि ज्ञानप्रसरणकार्यास आपल्या मजबूत धारणेनें समर्थ करून सोडणे, म्हणजेच या दोन्ही गुणांस पूर्ण वाव मिळण्यास जें आर्थिक उत्तेजन व धारणा आवश्यक आहे, त्याच्या सपादनाचे कार्य वैश्यानी करावें, हाच वैश्याना मांड्या मानण्याचा हेतु आणि पायाचें काम जे सर्व शरीरावयवांचा भार वाहाणे, म्हणजेच वरील त्रैवर्णिकांना सतोष देणें हे काम शूद्रानीं करावें, हाच त्यांना पाय मानण्याचा हेतु त्या सूत्रकाराचा आहे अर्थातच समाजव्यवस्थेची यथायोग्य घटना चालण्याकरितां **श्रमविभागाच्या** तत्त्वानुसार एकेका समाजसघाने एकेक कार्य स्वत.च्या शिरावर घ्यावें हाच व्यावहारिक प्रश्न या सूत्रानें सोडविलेला आहे भगवद्गीतेमधूनही याच तत्त्वावर चातुर्वर्ण्य प्रतिपादिलेले आहे या सर्व प्रकारांवरून हेच स्पष्ट होतें कीं, मुखाचें काम करण्यास म्हणजे ज्ञानदान देण्यास जो समर्थ असेल तोच ब्राह्मण, बाहूचें काम कर-ण्यास म्हणजे बलाचा उपयोग करून देण्यास जो समर्थ असेल तोच क्षत्रिय, धनोत्पादन करून त्याचा आधार ज्ञान व बल देणारांस देणारा तोच वैश्य आणि त्रैवर्णिकांना सेव्य समजून त्यांना वाहून (सांभाळून) नेण्यास जो समर्थ असेल तोच शूद्र होय जो जें कार्य आचरील, तो त्या पदवीस पोचेल यालाच भगवान् श्रीकृष्ण म्हणतात, "चातुर्वर्ण्यं मया सृष्टं **गुणकर्मविभागशः** ।"

पुरुषसूक्तांतील उपरिउध्दृत वर्णकर्मप्रदर्शक असा जो श्लोक आहे त्याचा अर्थ

ब्राह्मण मुखा**पासून** झाले, क्षत्रिय बाहू**पासून** झाले, वैश्य मांड्या**पासून** झाले आणि शूद्र पाया**पासून** झाले असा करण्यांत **गाळीव मूर्खपणा** पदरांत घ्यावा लागतो कारण त्या सूत्रात 'पासून' ह्या अर्थाचा शब्दच कोठें आढळत नाहीं 'ब्राह्मणः **अस्य** मुखम् आसित्' यांतील '**अस्य**' याचा अर्थ पासून असा नसून '**ह्याचें**' म्हणजे गृहित **विराट पुरुषाचें** असा आहे अशीच स्थिति पहिल्या तीन अर्धचरणांची असून 'पद्भ्यां' हा शब्द पचमी, तृतीया अगर चतुर्थी विभक्ति धरूनही चालविता येण्यासारखा आहे, परतु वरील तीन अर्धचरणांचा अर्थप्रकार लक्षांत घेता, त्या चरणाचा अर्थही 'शूद्र पाया कारणे झाला, असाच करणे वास्तव व सत्यपक्षास धरून आहे या वचनांत चातुर्वर्ण्यप्रतिष्ठा तर बिलकूलच नाहीं, पण वर्णभेदाची उच्चनीच दृष्टिही सूक्तकर्त्याने ठेविली नाहीं फक्त पात्रापात्र विचार त्यातून प्रदर्शित केला आहे याचप्रमाणे जे जे प्रमाणग्रथ आपण पाहूं, त्या सर्वांतून आपणांला वर्णव्यवस्थेचे हेच उदात्त स्वरूप दिसून येईल अमुक वर्णच सर्वांत श्रेष्ठ आणि अमुक वर्णच सर्वांत कनिष्ठ असा श्रेष्ठकनिष्ठत्वाचा स्वार्थी प्रकार **अस्सल** प्रमाणग्रथातून आपणास कोठेही आढळून येणार नाही, आणि तो तसा आढळून आल्यासच नवल ! कारण, एकाच पुरुषाची निरनिराळी अगे श्रेष्ठ कनिष्ठ आणि उच्चनीच मानणारा मानव, मानवी विश्वात क्वचित्च आढळावयाचा ! ज्या ग्रथात असलीं अमानुष वचनें आढळतील तो ग्रथ **कधी** निर्माण झाला ? **कोणी** निर्माण केला ! **कां** निर्माण केला ? आणि त्या कालची **परिस्थिति** कशी होती ? इतक्या गोष्टींचा निर्णय करून मग तीं वचनें डोळे उघडून पाहावी अगर कान टवकारून ऐकावींत म्हणजे सर्व रहस्य ध्यानी आल्यावाचून राहात नाहीं

जन्मावरून वर्णव्यवस्था लावणे हे ज्ञात्यास अनुचित आहे असे ठरल्यावर वर्णावरून तरी वर्णव्यवस्था ठरविली जावी असा काही अनुदार लोकाचा विचार झाला, आणि त्यानी असें वचन तत्प्रतिपादनार्थ पुढें आणले की,—

ब्राह्मणानां सितो वर्णः क्षत्रियाणा तु लोहितः ।
वैश्यानां पीतको वर्ण॰ शूद्राणामसितस्तथा ॥

—महा०, शातिपर्व

म्हणजे, " ब्राह्मणांचा शुभ्र, क्षत्रियाचा लाल, वैश्यांचा पिंवळा आणि शूद्रांचा काळा वर्ण असतो ! " या प्रकारावरूनही वर्णव्यवस्था ठरविणे कसें अनुचित आहे ते सुज्ञांच्या लक्षात आल्याशिवाय राहाणार नाही थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे अशाप्रकारें वर्णव्यवस्था नियत करणे म्हणजे 'झेंडामुडीचा' खेळ खेळून आपल्या कर्माची परीक्षा पाहाण्यासारखें हास्यास्पद आहे येनकेन प्रकारेण प्रयुक्त आणि सर्वसम्मत असा न्यायाचा मार्ग एकच आहे कीं, व्यक्तिमात्राच्या **गुणकर्मावरून** त्याला योग्य वर्ण दिला गेला पाहिजे जन्मजातवर्णाचें महत्त्व मानण्यांत आर्यसस्कृतीचा व आर्यनिर्मित सद्गुणांचा नायनाट मात्र सपाटून होईल याशिवाय कोणताही लाभ त्यापासून होणार नाहीं आणि म्हणूनच म्हटलेलेंही आहे की,—

**शूद्रो ब्राह्मणतामेति ब्राह्मणश्चैति शूद्रताम् ।**
**क्षत्रियाज्जातमेवं तु विद्याद्वैश्यात्तथैव च ॥**

—मनु०, अध्याय० १०–६५.

श्री० देशमुखसाहेबांनींही प्रस्तुत ग्रंथांत चातुर्वर्ण्याचें विवेचन अशाच उदात्त तत्त्वास अनुसरून केलें असल्यामुळें हाही या ग्रंथाचा एक विशेषच आम्ही समजतों

**'क्षत्रियांचा इतिहास'** या ग्रंथांतील महत्त्वाच्या प्रतिपाद्य विषयांचा आणि **ग्रंथकर्त्यांच्या सत्कृतीचा** याप्रमाणें अल्प परिचय करून दिल्यानंतर आतां सांगण्या-
सारखी एकच महत्त्वाची गोष्ट राहून गेली आहे ती
**'क्षत्रियांचा इतिहास' आणि** महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे हीच कीं, ह्या ग्रंथांतून
**ब्राह्मणद्वेषाचा बागलबुवा** **ब्राह्मणद्वेषाचा बागुलबुवा** बाहेर तोंड काढून
डोकावून पाहातांना कांहीं साळसूद भेदडवृत्तीच्या लोकांच्या बावळट व **स्वार्थांध** नजरेंत भरण्याचा बराच संभव आहे, आणि या विकारी व विषारी दृष्टिदोषामुळें अंध होत्साते ते ह्या ग्रंथास एकांगी व अंधकारमय म्हणण्याचें अवास्तव धाडस अगर राक्षसी महत्त्वाकांक्षाही कदाचित् प्रकट करतील कारण—

**'अंधस्य किं हस्ततलस्थितोऽपि प्रकाशमित्यर्थमयप्रदीपः?'**

असा न्यायच आहे वास्तविक रीतीनें विचार करतां प्रस्तुत ग्रंथास अशा तऱ्हेचें गालबोट लावूं पाहाण्याचें काहींच कारण नाहीं सत्य मत प्रतिपादन करताना अशात तरी कुणाचीं मनें—दूषित मनें—दुखविली जाणारच हा एक अबाधित सिद्धान्त आहे आणि प्रस्तुत ग्रंथांतून तशाच तऱ्हेचे **क्रान्तिकारक बॉंब गोळे** ग्रंथकर्त्यांनीं सद्बुद्धीनें फेकले असल्या-मुळें त्यांचें काम ते केव्हांही करणारच आहेत ते कांहींही असले तरी प्रदर्शित केलेला रस्ता उद्धारपथाच्या राजमार्गास जाऊन भिडणारा असला म्हणजे झालें, एवढेंच सहृदय माणूस यासंबंधीं आपलें स्पष्ट मत देईल, आणि तशाच तऱ्हेचा हा अत्यंत स्तुत्य व आदर्श असा महत्त्वाचा उपक्रम श्री० देशमुखसाहेबानी प्रदर्शित करण्याचें थोर पुण्य संपादन केलें असल्यामुळें उद्धाराच्या या राजमार्गांतील लटक्या ब्राह्मणद्वेषाच्या इवल्याशा कंटकास किंमत देण्याचेंही सुज्ञ वाचक धाडस करूं शकणार नाहींत असा आम्ही आत्मविश्वास बाळगतों. त्यांतल्यात्यांत तशाच आकुंचित दृष्टीनें जर विचार केला, तर असाच निष्कर्ष **नाइलाजानें** प्रतिपादन करावा लागतो की, प्रस्तुत ग्रंथांत ब्राह्मणांच्या हृदयांस सलग्न होणारे हलाहल विषकुंभ तरी कोठें आढळून येणार नाहींत, परंतु इतर शेकडों **जगन्मान्य ग्रंथांतून** व **लोकमान्य नरपुंगवांच्या** पुण्यवाचेतून **ब्राह्मणांसंबंधीं** यापेक्षां कितीतरी पटीनें तीव्र व **मर्मभेदी वाग्बाण** सुटलेले आहेत त्यांची व 'क्षत्रियांचा इतिहास' या ग्रंथांतील तद्विषयक प्रतिपादनाची **तुलना** नि:पक्षपाती दृष्टीनें वाचकांना करतां यावी म्हणून येथें तशीं कांहीं मर्मभेदक शरसंधानें उध्दृत करतों—

* " The brahmins should be drowned in the Indian ocean in a Tight bag." ( सर्व ब्राह्मणांना पोत्यांत भरून हिंदीसमुद्रांत बुडविले पाहिजे. )

† " The first work of my self-government would be to non-co-operate with the brahmins. Brahmin's caste prejudice would be destroyed by inforcing them to take the cold dinner of a chandal. Their daughters are to be given to washermen or chandal " ( माझ्या स्वराज्यातील अगदीं आरंभींचें माझें कार्य ब्राह्मणजातीवर बहिष्कार घालणें, ब्राह्मणांना महारांमांगांबरोबर सक्तीनें जेवावयास लावून त्यांच्या जातिवर्चस्वाच्या घमेंडीचें नाक ठेंचणें आणि त्यांच्या मुलीचीं लग्नें धोब्यांच्या व महार-मांगांच्या मुलांशीं लावून देणें हे होय )

‡ " ब्राह्मणलोक राष्ट्रघातकी आहेत, त्यांना स्वार्थापलीकडे दुसरें कांहींच दिसत नाहीं " ..

§ " आजपर्यंत ब्राह्मणांवर विश्वासून ब्राह्मणेतर वागले त्यामुळें ते फसले . . "

१ " जरी जाहला ब्राह्मणवर्ण । तरी तो न म्हणावा ब्राह्मण ।
स्फटिक कुंकुम दिसे रक्तवर्ण । मी लोहितपूर्ण स्फटिक न म्हणे" ॥

२ " चतुर्वेदीच यो विप्रो वासुदेव न विंदति । वेदभार भयाक्रांतः स वै ब्राह्मण गर्दभः" ॥

३ " हें ब्राह्मणांस कळेना । त्याची वृत्तीच वळेना ।
मिथ्याभिमान गळेना । मूर्खपणाचा ॥ "

४ " स्वतःस ब्राह्मण म्हणविणाऱ्या या हजारों मंडळींपैकी ज्यांची छाती असेल त्यांनीं आता श्रुति, स्मृति हातांत घेऊन या सिंहासनावर यावें, आणि मी ब्राह्मण आहें असें छातीला हात लावून सांगावें, म्हणजे तू ब्राह्मण नाहींस, शूद्र आहेस असें मी त्याला येथेंच सशास्त्र ठरवून देतो "

५ " माझ्या मताने म्हणाल तर हल्लीं कोणीही ब्राह्मण नाहींत "

---

* सुप्रसिद्ध विद्वान् सर **पी. सी राय** म्हणतात

† देशबंधु **सी. आर. दास** म्हणतात

‡ **महात्मा गांधीजी** म्हणतात

§ **देवी सरोजिनी नायडू** म्हणतात

१ **एकनाथी भागवत.**

२ **वसिष्ठस्मृति**

३ **रामदास.**

४ इ० सन १९२१ मध्यें नागपूरच्या हिंदुधर्म परिषदेंत श्री० **न. चिं. केळकर** म्हणतात.

५ रा० ब० **गोपाळराव हरि देशमुख.**

१ " प्रिय बांधवानों ! तुम्ही मनुष्य आहांत हें सुद्धां विसरलां काय ? जागे व्हा, आणि तुम्हांला जेथें तेथें नडणाऱ्या भटांभिक्षुकांनीं निर्माण केलेल्या रूढि झुगारून द्या त्या रूढीचा आणि त्या निर्माण करणाऱ्या वर्गांचा नाशच करावयास पाहिजे "

२ " ब्राह्मणाचीं बोलणी नको ऐकूं तू त्यांचा स्वभाव तुला ठाऊक आहेच, जो त्याना यथेच्छ देतो तो चांगला, बाकी सगळे वाईट "

३ " पहिल्या प्रथम या भिक्षुकशाहीच्या ब्राह्मणाला हिंदूच्या गुरुपदावरून खाली खेंचून पदच्युत केला पाहिजे "

४ " साडिला आचार । द्विज झाले चह्राडखोर ॥ "

५ " ब्राह्मण बुद्धीपासून चेवले । आचारापासून भ्रष्टले ॥
गुरुत्व साडून झाले । शिष्य शिष्याचे ॥ "

याप्रमाणें अधिकारी महात्म्यांचे मर्मभेदी वाग्बाण ब्राह्मणांच्या विरुद्ध आजपर्यंत इतके सुटलेले आहेत कीं, त्याचें सपूर्ण प्रदर्शन करणे झाल्यास एक स्वतत्र ग्रथच तयार होईल, आणि स्वार्थी दृष्टीनेंच जर विचार केला, तर या महात्म्याना ब्राह्मण घटकाकडून गालिप्रदानसहस्रनामावलीच समर्पित होईल ! अशी वस्तुस्थिति असता प्रस्तुत ग्रथासच एकांगी म्हणण्याचे धाडस करणे वास्तव आहे काय ? जेथें सामाजिक अगर धार्मिक प्रश्न सोडविण्याची **क्रान्तिकारक रीतीनें** आवश्यकता ग्रथकर्त्यास तीव्रतेने भासली, अशा क्वचित् प्रसगींच स्वोद्धाराचे चित्र डोळ्यासमोर ठेवून तें सर्वांगसुदर चितारताना त्यांनीं लालभडक रगाचे बेमुर्वती ब्रश झराझर फटकारून दिले आहेत मग तसें करण्यांत इतर बारीकसारीक गोष्टीकडे लक्ष देऊन आपल्या श्रेष्ठ सौख्यप्रदानकार्याची सुरम्यलता मध्येंच खुडून टाकण्याची दुर्बुद्धि त्यांना तरी का व्हावी ! आणि प्रथम किंचित् कटु भासणारें पण उद्धार-दुर्गांची वाट दाखविणारें असे हे श्री० देशमुखसाहेबाचे पवित्र व स्तुत्यकार्य, 'गंगा आली आळशावरी, आळशी देखोनि पळे दुरी' या न्यायाप्रमाणें तिरस्कृत करण्याचा उपक्रम तरी बोटांवर मोजता येण्यासारख्या अल्पसख्याक सज्जनब्रुवांनी का करावा ? भगवान् श्रीकृष्णानें म्हटलेले आहे ना कीं,—

'यतदग्रे विषमिव परिणामेऽमृतोपमम् । तत्सुख सात्त्विक प्रोक्त आत्मबुद्धिप्रसादजम्' म्हणजे, " प्रथम विषाप्रमाणें भासणारें परतु परिणामी अमृताप्रमाणें फलदायी होणारें असें सौख्यच सात्त्विक सौख्य ( सर्वांत श्रेष्ठ दर्जाचें सौख्य ) होय असें श्रेष्ठ दर्जाचें सात्त्विक सौख्य जगदांतरीच्या जनताजनार्दनाच्या पुण्यपदकमलीं कुसुम म्हणून समर्पण

---

१ **स्वामी विवेकानंदजी**
२ **स्वामी रामकृष्ण परमहंस.**
३ **बॅरि० मुकर्जी.**
४ **श्रीतुकोबा**
५ **श्रीरामदास.**

करण्याचेंच **क्रान्तिकारक कार्य** श्री० देशमुखसाहेबांनीं प्रस्तुत ग्रथाद्वारें केलें असल्यानें त्यांना जनता–जनार्दन केव्हाही धन्यवादच देईल यांत शंका नाहीं. अस्तु.

प्रस्तावनेचा घोडा अफाट क्षात्रमैदान पाहून बराच भरधाव भडकलेला असून त्याला आतां विद्वज्जनातरींच्या हृदयखुटासच मजबूत बाधून टाकण्याचा आमचा विचार आहे, परतु तत्पूर्वी प्रियवाचकवृदास आम्हास एवढेंच

**समारोप आणि प्रणति** सविनय विनविणें आहे कीं, प्रियवाचकहो ! **'क्षत्रियांचा इतिहास'** हा ग्रंथ तुमच्या हृदयस्थ दिव्य विवेकजागृतीचे सत्यसदेश शिकविणारा एक पूज्य ग्रथ असल्यामुळें त्यांतील प्रतिपाद्य विषयांचें योग्य मनन करा, योग्य चिंतन करा आणि तद्रूप होऊन जा 'क्षत्रियाचा इतिहास' हा ग्रंथ क्षात्रमहात्म्य, धर्मविवेचन आणि वर्णाश्रम व्यवस्था या त्रिवेणी-सगमानें युक्त असल्यामुळें पूज्य मनोभावनेने आणि निर्विकार मनानें पवित्र होत्साते या पुण्यमय त्रिवेणी-सगमांत यथेच्छ स्नान करून अतर्बाह्यागी शुद्ध व्हा 'क्षत्रियाचा इतिहास' या ग्रथा-च्या रूपानें सामाजिक क्रान्ति, धार्मिक क्रान्ति, राजकीय क्रान्ति, मानासिक क्रान्ति, आणि बौद्धिक क्रान्ति ह्याप्रमाणे क्रान्तीच्या पचरसी घटनेने तयार करण्यांत आलेला क्षात्रस्मारकाचा हा सजीव पुतळा आर्यभूमीच्या पवित्र मनोऱ्यावर **श्री० देशमुख-साहेबांनी** उभारून ठेवला असल्यामुळे, त्या सजीव पुतळ्याच्या चरणीं अविरतपणें नत होत चला, व त्याचें प्राणापलीकडेही जतन करा 'क्षत्रियाचा इतिहास' हा ग्रथ-प्रभाकर, विश्वामित्री सृष्टीप्रमाणे आजचे विश्वामित्र श्री० देशमुखसाहेब यानी निर्माण केला असल्यामुळे, त्या ग्रथरूपी सवित्यास दररोज नियमानें मननार्घ्यप्रदानें देण्यास विसरू नका आणि अशीच **क्रान्तिकारक दिव्यसृष्टि** निर्माण करण्यास लागणारे दीर्घा-युष्य, बुद्धि बल आणि अर्थवृद्धि ह्या सर्व साधनांनीं श्री० **देशमुखसाहेब** समृद्ध होऊन यापुढेंही क्रान्तिकारक वाङ्मयाचा विजयी झेंडा अविरतपणे जगाच्या कोनाकोपऱ्यात फडकविण्यास पूर्ण समर्थ होतील असा दिव्य आशीर्वाद त्याच्याकरिता एकाच स्वरात प्रार्थना करून परमेश्वरास मागून घ्या

शेवटी, वेड्यावाकड्या प्रस्तावनेच्या रूपानें **जनता–जनार्दना**च्या चरण-सरोजयुग्मीं फूल नाही फुलाची एक **छोटीशी पाकळी** वाहून त्याच्या पवित्र सेवेचें थोर पुण्य संपादन करण्याची अकल्पनीय व अमूल्य सधी आम्हास श्री० देशमुखसाहेबांनीं आणून दिल्याबद्दल त्याच्या औदार्याचे मनःपूर्वक अभिनदन करून, आमच्या **जनता-जनार्दना**स आम्ही अखेरचें हेंच मागणे मागतों कीं,—

**प्रमादाद्रक्ष देव माम्।**

।। ॐ ।। क्रान्तिः ।। क्रान्तिः ।। क्रान्तिः ।।

आज मुक्काम पुणें
ता १५-६-२९

# ग्रंथकर्त्यांचें हृद्गत आणि इष्ट हेतु*

**न मे विदुः सुरगणाः प्रभवं न महर्षयः।**
**अहमादिर्हि देवानां महर्षीणां च सर्वशः॥१॥**

—श्रीमद्भगवद्गीता, अ० ७.



क्षात्रकुलकोहिनूर त्रिखंडवद्य महात्मा भगवान् गोपालकृष्ण आपल्या परमप्रिय भक्तास—क्षात्रकुलकेसरी सव्यसाचि अर्जुनास—उपरिनिर्दिष्ट श्लोकाचे द्वारे उपदेशीत आहेत कीं, "हे अर्जुना! माझी उत्पत्त्यादि प्रकारची जाणीव देवतांनाही जाणतां येणे शक्य नाहीं व महान् महर्षीनाही मजविषयीची जाणीव असणें असंभाव्य आहे कारण सर्व देवता व सर्व महर्षि यांचा आदि उत्पादक मीच आहें सर्वस्वी त्याचे मूलस्थानी मीच आहें"

भगवान् गोपालकृष्णाचे हें मननीय विचारप्रथनसूत्र अत्यत हृदयंगम असून तेंच आमच्याकडून प्रस्तुत भोळीभाबडी अल्पकृति जनता-जनार्दनाच्या सेवेस सादर करण्याच्या मुळाशी सल्लग्न झालेले आहे भगवान् गोपालकृष्णानें प्रतिपादलेले हें मननीय पूज्य वचन पुन्हा जनतेस विस्तारानें प्रतिपादन करून परमेशकार्यास, परमेशमनोदयास आणि आर्यपुत्रांस स्वानद-साम्राज्यांत नेऊन सोडण्याचा अल्पस्वल्प प्रयत्न करून पाहावा हाच या सामान्य कृतीचा मूळ उदय होय

सध्या गंमत अशी झालेली आहे कीं, मोठमोठ्या ग्रथांचीं पारायणे आम्हांला करतां येतात, मोठमोठी उदात्त व सार्वजनिक तत्त्वें आम्हांला प्रतिपादन करितां येतात, गीतेवर प्रवचनें हकालता येतात, महाभारताचे मथन लाखों लोकांत करून त्यांतील अमूल्य विचार लोकनिदर्शनास आणता येतात, चार वेद, सहा शास्त्रे, अठरा पुराणे आणि इतर 'धार्मिक बाड' गठ्ठयाच्या स्वरूपात लोकासमोर मांडून धार्मिक दृष्टीचीं प्रदर्शनें भरवितां येतात, नानाविध वेदान्तसूत्रें जनसमूहाच्या कानांत ओतून त्याचीं मनें प्रमुदित करितां येतात आणि धार्मिक ज्ञानविज्ञानांत अद्वितीय मर्मज्ञ म्हणून स्वत चे देव्हारे माजविता येतात; परतु आमच्या या करण्यापासून कांहीं अस्सल धर्मकार्य झालें असें आमच्या ऐकिवांत येत नाहीं, आमच्या या धर्मशृंगीच्या फुकण्यानें धार्मिक क्षेत्रांत कांहीं क्रान्ति घडून आलेली दिसत नाहीं, आमच्या या धार्मिक धिंगाण्यास धर्माचा धर्मोबा पावला असें

---

* प्रस्तुत पुस्तक हें '**क्षत्रियांचा इतिहास**' या आमच्या मोठ्या ग्रंथाचाच एक पोटभाग असल्यामुळें, '**क्षत्रियांचा इतिहास**' या ग्रथाचेंच 'हृद्गत आणि इष्ट हेतु' हें प्रकरण यास जोडलें आहे तें स्वतत्र लिहिलें नाहीं



☞ **सूचना**—पृष्ठांक ४२ खालील टीप अगदींच निरुपयोगी आहे. ती चुकून छापली गेली असल्यानें लक्षांत घेऊं नये.

प्रस्तुत ग्रंथाच्या २७१ पानांत 'शरीरसंबंध' या प्रकरणीं ३८ क्रमांकाच्या सदरांत 'शिंदे' याऐवजीं 'कदम' असें वाचावें.

आम्हाला आढळून येत नाहीं आणि आमच्या भारतीय धर्माला आलेली–येणार असलेली–ग्लानि आमच्या या धार्मिक मंत्रोपचारांनीं नाहींशी झाली, नाहींशी होत आहे आणि नाहींशी होईल असेंही म्हणण्याचें धाडस आमच्यानें करवत नाहीं. ५

असा परस्पर विरोधाभासी न्याय या बाबतींत कां व्हावा, आमचें चाललेलें धार्मिक गाडें सुरळितपणें कां चालत नाहीं आणि आमच्या कोणत्याही कृत्यास धार्मिक बाजारांत कवडीचीही किंमत कां येत नाहीं या प्रश्नांचा थोडा शांतपणानें व निःपक्षपातीबुद्धीनें विचार केला म्हणजे कोणाही सुविचारी मनुष्याच्या लक्षांत एक महत्त्वाची गोष्ट आल्याशिवाय राहात नाहीं ही महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे आमची आपापसांतील मत्सरीबुद्धि, आमचा परस्परांतील उच्चनीच भाव आणि परमपूज्य भगवद्गीतेच्या–हिंदुधर्माच्या प्रमुख ग्रंथांतील तत्त्वांच्या–विरुद्ध आमची विचारसरणी, या क्षेत्रांशीं संलग्न झालेली होय. याच कारणामुळे हिंदुधर्माला उज्ज्वल स्वरूप प्राप्त होणें दुर्गम झालें आहे व पुढें तर तें अगदीच अप्राप्य असें होईल

शिरोभागी उद्धृत केलेलें भगवद्गीतच लक्षांत घ्या त्यांत भगवतांनीं प्रतिपादन केले आहे की, मी सर्वांचा आद्यजनक आहे, मी सर्वांचा उत्पादक आहे, मी सर्वांचा निर्माणकर्ता आहे आणि मी सर्वांच्या मूलस्थानीं आहे एवढें स्पष्ट खास भगवतानें सांगूनही आम्हीं आपलें मूळ कोणतें हे न जाणतां अज्ञानांधकारात खुशाल घरघरा घोरत पडलों आहोंत सर्वांचे आद्यमूलस्थानीं क्षत्रियकुलकोहिनूर भगवान् श्रीकृष्ण परमात्मा असतांना, निरनिराळे जातिवाचक वर्ग आपापल्या स्वतंत्र तोऱ्यातच बालंबाल खुष आहेत व आपल्या आद्यजनकास–भगवान् श्रीकृष्णास–अगदींच पारखे झालेले आहेत आपण क्षात्रकुलोत्पन्न आहोंत, आपण क्षात्रकुलोत्पन्न प्रभु श्रीकृष्णाचे वंशज आहोंत, आपण क्षत्रियवीर आहोंत, आपला धर्म क्षात्रधर्म आहे, आपली वृत्ति क्षात्रवृत्ति आहे आणि आपले मूळ क्षात्रकुलभूमींत अत्यत खोल शिरलेले आहे, हे त्या बिचाऱ्यांना अद्याप माहित नाहीं त्यांना ही गोष्ट समजून देऊन त्यांच्या अज्ञानांधकारमयी अंत.करणांत विज्ञानाची प्रज्वलित ज्योति तेवत ठेवण्याचें धाडस कोणी करील असें म्हणावें तर 'पीछेसे चलती आयी' अशी ही अज्ञानकाजळी आतां तरी कोणी झाडण्याचा नसता, घरबुडवा व स्वार्थविघातक उपद्व्याप कां म्हणून करील हा वास्तव प्रश्न उद्भवतो ! जगांतील उच्चनीचपणाच्या क्षेत्रांत ज्याच्या कपाळावर ब्रह्मदेवाने 'उच्च', 'High class', 'Best quality', असे शिक्के मारलेले आहेत त्या वर्गास इतर 'नीच' वर्गांत यथेच्छ चरतां येऊन आपले ऐषआराम बिनबोभाटपणें चालवितां येतात, मग सत्यतत्त्वाची जाणीव इतरेजनांना करून देऊन आपल्या अधाशी पोटावर घाला पाडून घेण्याची दुर्बुद्धि त्याचा ब्रह्मदेव त्यांना सुचवील तरी काय म्हणून ! सत्यतत्त्वाची जाणीव इतरेजनांना करून देतांना जो एक मुख्य गुण–निस्वार्थपणा–अंगीं असावयास पाहिजे, त्याचीच जर या 'उच्च' लोकांना कवडी इतकीही जाणीव नाहीं, आणि त्यांचीं अंत.करणें जर अंतर्बाह्य स्वार्थाच्या घाणीनें बरबटलेलीं आहेत तर आज, उद्यां, परवां, तेरवां केव्हांतरी त्यांच्याकडून इतरेजनांस सत्यतत्त्वाची जाणीव करून

देण्याचा उपक्रम आरंभिला जाणें शक्य आहे काय ? कदापि नाहीं या बाबतींत या लोकांवर विश्वास ठेवणें म्हणजे स्वत चें अध:पतन करणें होय दुसरें यापासून कोणतेंही स्वारस्य निघणे शक्य नाहीं या लोकाकडून आम्ही भगवद्गीता श्रवण करू, पण त्यांत–श्रीकृष्णाच्या विचारप्रथनसूत्रांत कोणते सत्यतत्त्व प्रतिपादन केलेले आहे याची जाणीव आम्हांला कल्पांती होणें शक्य नाहीं या लोकाकडून आम्ही भारत, भागवत वगैरे सारें नवें जुनें बाड श्रवण करू, पण आम्ही काय ऐकिले याचाच थांगपत्ता आम्हाला लागणें शक्य नाहीं आणि जी मख्खी आहे ती येथेंच आहे या लोकाच्या अत.करणाचा काळा पडदा येथेंच आडवा आलेला आहे या पडद्याच्या मध्योपस्थितिकरणानेच आम्ही–बहुजनसमाज–अजून अज्ञानाच्या घट्ट चिखलात समूळ पिचत पडलो आहोत, नामशेष झालों आहोंत आणि पशुसमान जिणें कठीत आहोत आम्हीं आमच्या श्रीकृष्णपरमात्म्याची भगवद्गीता या लोकाकडून श्रवण केली, परतु श्रीकृष्ण हा 'आमचा', असा सुगावा या आमच्या 'उच्च' शिक्षयानें मडित झालेल्या स्वार्थी पडितांनीं आम्हास तिळमात्रही लागू दिला नाही उलट या श्रवणाने आम्ही आपणाविषयी फारच हीन कल्पना आपल्या अंत'करणात उद्दीपित करण्यास शिकलों आम्ही स्वत.स विसरलों, आमच्या–खास आमच्या–श्रीकृष्ण परमात्म्याच्या स्वरूपास आम्ही विसरलों, आम्ही आपल्या क्षात्रकुलाचा अभिमान झुगारून देण्यास आमच्या 'गुरु'कडून शिकलों आणि येनकेनप्रकारेण आज अशा विस्कळित स्थितीस आम्ही कवटाळून बसलों आहोत

याप्रमाणें धार्मिक बाबतीत आमच्या धुरधरानीं आमच्या धर्मरूपी जहाजाचे सुकाणू भलत्याच मारक दिशेनें फिरविल्यामुळें आम्हांस अजूनही स्वस्थ बसणें माणुसकीस शोभेसें दिसत नाहीं आमचीं धर्मतत्वें आता आम्हालाच समजून घेतलीं पाहिजेत, आमच्या भगवद्गीतेचें मथन आता आम्हालास अगदी सूक्ष्म दृष्टीनें केलें पाहिजे आणि आतापर्यंत चुकत आलेला आडमार्ग आता एकदम सोडून देऊन आम्हास आमच्या भगवान् श्रीकृष्णानें कोणता राजमार्ग व कोणता उद्धारपथ दाखवून दिलेला आहे त्याचें सशोधन करून तिकडे आम्हीं वळलों पाहिजे व आमच्या जगासही वळविलें पाहिजे असें करणें हेंच आमच्या स्वोद्धाराच्या दृष्टीनें, आमच्या स्वोन्नतीच्या दृष्टीनें आणि आमच्या स्वत्वाच्या दृष्टीनें आज प्रयुक्त होणार आहे आणि अशा तऱ्हेचा विचार उद्भूत झाल्यावरच 'उद्धरेदात्मनात्मानम् आत्मानामवसादयेत्' हें प्रभु श्रीकृष्णानें प्रतिपादन केलेले सूत्र आम्हीं सार्थ करून दाखविल्याचें श्रेय आम्हास मिळेल

प्रस्तुत ग्रथ उदयास येण्याच्या मुळाशींही हेच विचार संलग्न झालेले आहेत, आणि मथळ्यावर दिलेल्या भगवद्वाक्यानें त्या विचारांना सचालन दिलेलें आहे प्रत्यक्ष भगवान् 'मी सर्वांचे मूलस्थानीं आहे' असा दिव्य संदेश जगास देत असतांना सर्व जग हें 'क्षात्रमयजगत्' असू शकणें अगदींच संभवनीय आहे हें क्षात्रमयजगत् लोकानिदर्शनास आणून देणें हें आमचें कर्तव्य आहे जगत् हें क्षात्रमय नाहीं, असें कोणीही मोठमोठ्यानें ओरडत सुटला तरी आमच्यातर्फे प्रत्यक्ष भगवान् श्रीकृष्ण परमात्मा त्या विरोधकास

आपल्या क्षात्रतेजानें स्वात्मरूपीं विलीन करून टाकण्यास गीतारूपानें आजही चक्रसुदर्शन हातीं धरून आसेतुहिमाचल व्यापून उरलेले आहेत, ही एकच गोष्ट जगत् हें क्षात्रमय आहे हें अबाधित तत्त्व पुन्हाही ध्वनित करण्यास बस्स आहे

जगत् हे क्षात्रमय आहे कीं नाहीं हें अन्य दृष्टींनीं कसोटीस लावूं म्हटले तर तें अस्सल बावनकशी क्षात्रमय उतरते कीं नाहीं याचा विचार करणेंही येथें क्रमप्राप्त आहे कारण कोणताही सिद्धान्त जगापुढें मांडावयाचा असला म्हणजे त्याचीं सर्व अंगें-उपांगें उलथींपालथीं करून जनतेच्या डोळ्यांत घुसविलीं पाहिजेत असा नियम आहे आणि या नियमास अनुसरूनच आतां ही कसोटी लावून पाहण्याचें ठरविलें आहे

या दृष्टीनें विचार करतां आपण असें पाहात आलों आहोत कीं, पांच सहाहजार वर्षांपूर्वीपासून म्हणजे भारतवर्षांत आर्यांचें प्रथम पाऊल पडल्यापासून तों इ० सनाच्या नवव्या शतकांतील आद्यशकराचार्यांच्या काळापर्यंतच्या सतत पाचहजार वर्षांच्या दीर्घ कालांत भारतवर्षांतील राष्ट्रसस्थापक, राष्ट्रसंवर्धक आणि राष्ट्रसंरक्षक या तीनही प्रकारच्या राजकीय धुरीणत्वाचीं सूत्रें जशीं क्षत्रियांच्याच हातीं मुख्यत्वेंकरून चालत आलीं, तशींच धर्मसंस्थापक, धर्मसवर्धक आणि धर्मसंरक्षक या क्षेत्रांतील सूत्रेंही मुख्यत्वेकरून क्षत्रियांनींच मूलत· आपल्या अलौकिक प्रतापानें त्या कालपर्यंत आपल्या पवित्रतम ध्येयाशीं निगडित करून ठेविलीं होतीं याबद्दल वेद, शास्त्रें, पुराणे आणि प्राचीन व अर्वाचीन इतिहास एकमुखानें ग्वाही देत आहेत प्रस्तुत ग्रथांतही ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट केलेली आहे

सुमारें सहा हजार वर्षांपूर्वी क्षत्रियांनींच आपल्या अलौकिक क्षात्रतेजाच्या बळावर भारताची सस्थापना केली भारतास 'भारत' हे नांव ज्याच्या विस्तृत राज्यमर्यादेचें बोधक म्हणून पडले तो 'भरत' राजाही क्षत्रियकुलोत्पन्नच होता भारताची संस्थापना याप्रमाणें प्रामुख्येंकरून क्षत्रियांनी केल्यावर त्याच्या धार्मिक अंगाचा विचारही वेदांना जन्म देऊन क्षत्रियांनींच केला या वैदिक काळापासून तों तहत आजपर्यंत 'गोब्रह्मप्रति-पालक' असा उदात्त शिक्का क्षात्रकुलोत्पन्न नरवीरांनींच प्राप्त करून घेतला इतरेजनांच्या सरक्षणाचे पुण्यकार्य करीत असतां आपल्या प्राणांची जिवत आहुति देण्यांतही आजवर श्रेष्ठ दर्जाचा लौकिक या क्षत्रिय नररत्नांचाच आहे मानवी अस्तित्वास आवश्यक अशा ब्रह्मविद्येंतही हातखडा हे क्षत्रियकुलमुकुटमणीच

**न प्राक् त्वतः पुरा विद्या ब्राह्मणान्गच्छति ।**
**तस्मादु सर्वेषु लोकेषु क्षत्रस्यैव प्रशासनमभूत ॥**

—छांदोग्योपनिषद्.

या श्लोकाचा भावार्थ असा आहे कीं, ब्रह्मविद्येचा संस्कार ब्राह्मणांस झालेला नाहीं, अर्थात् ती त्यांना अवगत नाहीं केवळ क्षत्रियांनाच ती अवगत आहे कारण ब्रह्मविद्या ही क्षत्रियांमुळेंच अस्तित्वांत आली

या सूत्रावरून ब्रह्मविद्येंत क्षत्रियांचा जगमान्य अधिकार स्पष्ट होतो, तर—

**यदा यदा ही धर्मस्य ग्लानिर्भवति भारत।**
**अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥**

—भगवद्गीता, ४-७

या भगवान् श्रीकृष्णाच्या पूज्य वचनावरून क्षत्रियांचा जगमान्य धर्मसंस्थापन अधिकार स्पष्ट होतो या सूत्रांत भगवान् श्रीकृष्ण परमात्मा, क्षत्रियकुलकोहिनूर यादववंशीय महात्मा, स्पष्टपणें अखिल जगास आपल्या अधिकारी वाणीनें जाहीर करीत आहे कीं, जेव्हां जेव्हां धर्माचा लोप होतो तेव्हां तेव्हां सद्धर्मप्रस्थापनकार्याकरितां व धर्मास उजळा देण्याकरितां मला–क्षत्रियकुलदीपकाला–शरीर धारण करावें लागतें, म्हणजेच अवतार घ्यावा लागतो यावरून क्षत्रियाच्या धर्मस्थापनेच्या जगमान्य अधिकाराबद्दल वादच राहात नाहीं राष्ट्राच्या सरक्षण, सस्थापन, सवर्धनादि क्षेत्रांत क्षत्रियाचा जगमान्य अधिकार जाहिर करणारें

**स्वधर्ममपि चावेक्ष्य न विकम्पितुमर्हसि।**
**धर्म्याद्धि युद्धाच्छ्रेयोऽन्यत्क्षत्रियस्य न विद्यते ॥**

—भगवद्गीता, अ० २

हें भगवतांचें सूत्र असून त्यात प्रभूनीं अखिल जगास आपला असा सदेश पाठविलेला आहे कीं, तुम्हास आपल्या क्षात्रधर्माप्रमाणेही भयाचा त्यागच केला पाहिजे कारण क्षत्रियांना युद्धापेक्षां जास्त हितकर असें कांहींच नाहीं यावरून राष्ट्रसरक्षणास आवश्यक असें कर्तव्य आचरून तो अधिकार प्राप्त करून घेण्याचा जगमान्य हक्क क्षत्रियांचाच आहे असें स्पष्ट झाल्याशिवाय राहात नाहीं,

क्षत्रियांच्या उदारतेचा अधिकारही जगमान्य आहे कीं नाहीं हें लक्षात घ्यावयाचें असल्यास—

**अजीवस्तु यथोक्तेन ब्राह्मणः स्वेन कर्मणा।**
**जीवत्क्षत्रियधर्मेण सह्यस्य प्रत्यनंतरः ॥**

—मनुस्मृति, अ० १०

हें सूत्र अवलोकनांत घ्यावें त्यांत म्हटलें आहे कीं, जर ब्राह्मण आपल्या उक्तकर्मापासून उदरपोषण करण्यास असमर्थ होईल तर क्षात्रधर्माच्या आश्रयानें त्यानें आपली उप जीविका करावी

जगाच्या धारणेस ज्या मुख्य मुख्य तत्त्वाची आवश्यकता असते ती सर्व मुख्य मुख्य तत्त्वें क्षत्रियांनींच अस्तित्वांत आणिलीं त्यांचें पालन व वर्धन केलें व जगास त्यांच्या पायावर उभें केलें आणि म्हणूनच आतांपर्यंतच्या विवेचनावरून जगत् हें क्षात्रमय आहे कीं नाहीं हें आपण सर्व अगांउपागांचा विचार करून पाहूं गेलो असतां आपल्या तोंडून अस्तिपक्षींच उद्गार बाहेर पडतील ही गोष्ट नि.सदेह आहे

जगाची घटना ज्या तत्त्वावर झालेली आहे त्या तत्त्वांचे उत्पादक केव्हांही क्षत्रियच असल्यामुळें 'क्षात्रमयजगत्' हें नांव जगास केव्हांही शोभण्यासारखें आहे एवढेंच

नव्हे तर तें नांव भारतास 'भारत' या संज्ञेनें पूर्वापार चालतही आलेलें आहे. शिवाय क्षत्रियकुलोत्पन्न प्रभु गोपालकृष्णाच्या स्वरूपीं विनम्र होत्सातें सर्व जग 'क्षात्रमय' बनलेलें अखिल सजीव मानवांना पूर्णपणें माहितच आहे आणि म्हणूनच एवढें विवेचन झाल्यावर सर्व जग क्षात्रमय आहे असा सिद्धान्त आपणांस ठांसून सांगता आला

जगांत ज्या अलौकिक विभूतींचीं नांवें आपण ऐकतों, ज्याना आपण परमेश्वर-स्वरूपीं मानून त्यांची पूजा करितों आणि ज्यांच्या भजनांत सर्व जग आज गुंग झालेलें आपण पाहातों, अशा वद्य विभुति तरी क्षत्रियच असल्या पाहिजेत असें यावरून स्पष्ट होतें कारण जग हें जर क्षत्रियांच्या पवित्र अस्तित्वानेंच अस्तित्वांत राहिलें आहे तर त्यांतील वद्य विभूति सुद्धां क्षत्रियकुलोत्पन्नच असणे क्रमप्राप्त आहे तशा त्या आहेत कीं नाहींत हे जर आपण पाहूं गेलों तर समता, शांति, सत्यता आणि न्यायदक्षता या गुणांचा पुतळा प्रभु श्रीरामचंद्र, उपनिषदुपदेशक ब्रह्मविद्यापारगत राजा जनक, वेदमन्त्रद्रष्टा राजर्षि विश्वामित्र, गीताधर्मसंस्थापक भगवान् श्रीकृष्णप्रभु, बौद्धधर्मसंस्थापक गौतम-बुद्ध, जैनधर्मसंस्थापक महावीर, सम्राट् चंद्रगुप्त मौर्य, सम्राट् अशोक, महाराजा भर्तृहरि, एकादशअवतार श्रीमच्छत्रपति शिवरायप्रभु, महाराणी दुर्गावती, सीता, तारा, अहिल्या, द्रौपदी, जिजामाता इत्यादि त्रिखंडपूजित वद्य विभूति क्षत्रियकुलनभःप्रांगणांत आपल्या दिव्यतेजाने तळपत असलेल्या आपल्या दृष्टीस दिसतात यावरूनही क्षात्रतेजाच्या किरणांनींच इहलोक प्रकाशमान् झालेला आहे हा सिद्धान्त तात्त्विक व निःपक्षपाती बुद्धीस पटल्याखेरीज राहात नाहीं

याप्रमाणे अखिलविश्व हे क्षात्रधर्माशीं निगडित झालेलें आहे असें ठरल्यावर त्या जगतांतील निरनिराळ्या घटकाची ओळख करून घेणे अत्यावश्यक असतें आम्हीं सुद्धां प्रस्तुत ग्रंथ लिहिताना हेच तत्त्व डोळ्यांसमोर ठेविले होतें आणि म्हणूनच त्या तत्त्वाचें स्वारस्य आम्हीं शक्त्यनुसार प्रस्तुत ग्रंथांत ओतण्याचा प्रयत्न केलेला आहे सर्व जग हें माझेपासूनच उत्पत्ति पावलें आहे, मीच सर्वांचा निर्माणकर्ता आहे, मी सर्वांच्या प्रपिता-महांचाही प्रपितामह आहे आणि असा जो श्रीकृष्ण तो क्षत्रियकुलोत्पन्न आहें असा भग-वान श्रीकृष्णाचा संदेश हृदयातरीं जाऊन भिडतांच आम्हाला तें तत्त्व पटलें त्याचा जनात प्रसार करावा असें वाटलें, आमचें चित्त त्या कार्यांत नटलें आणि त्याच तत्त्वास मूलभूत धरून प्रस्तुत ग्रंथात जसें वाटले तसें शक्त्यनुसार क्षात्रधर्माचे चित्र आम्हीं रेखाटले आमचें हृद्गत हेंच कीं, श्रीकृष्णाच्या संदेशाचें लोण अखिल जगास वाटावें, आमचा इष्ट हेतु हाच कीं जगत् हें क्षात्रमय आहे हा श्रीकृष्णाचा शब्दपडसाद, तोच प्रतिध्वनि पुन्हां निनादित करावा आणि हे कार्य खास भगवताचेंच असल्यामुळें त्यांच्या अधिष्ठानाचा लाभ या कार्यांत आम्हास व्हावा येथपर्यंत जे विवेचन झालें तो झाला आमचा व्यापक उद्देश, तो झाला आमचा सामुदायिक इष्टहेतु आणि तें झाले आमचें विस्तृत क्षेत्रदर्शक हृद्गत

आतां कालमानेंकरून या क्षत्रियत्वाची, या क्षात्रधर्माची, या क्षत्रियवर्णाची हुडी

स्वार्थी दंडुक्यानें, दंडुकधारी स्वार्थी बागुलबुवाने फोडून टाकून ती मधील क्षत्रियत्वाचे शितोडे कसे अस्ताव्यस्त व इतस्ततः छिन्नविच्छिन्न स्वरूपांत विभागले गेलेले आहेत त्याचा किंचित् आकुंचित क्षेत्राच्या दृष्टीने विचार करू. असे करणेंच आज आपणांस परिस्थितीच्या दृष्टीने विचार करतां प्रयुक्त भासणार आहे कारण अगोदर आपल्या घरांतील व्यवस्था, नतर दारांतील व्यवस्था, नतर आपल्या मोहल्ल्यांतील व्यवस्था, नंतर गांवांतील व्यवस्था, नतर परगण्यांतील व्यवस्था, नंतर तालुक्यांतील व्यवस्था, नतर जिल्ह्यांतील व्यवस्था, नंतर प्रातातील व्यवस्था, नतर इलाख्यांतलि व्यवस्था, नंतर देशांतील व्यवस्था आणि नंतर जगतांतरी त्या व्यवस्थेचीं सूत्रे घुसवावीं लागतात असा सघटनेचा नियम आहे सघटणेची त्रिज्या ही अशी असल्यामुळे तूर्त आपणास आकुंचित स्वरूपाचाच विचार करणे भाग आहे एकदा हे सुकर व फलप्रद झाले म्हणजे मूलभूत तत्त्वानुसार अखिलजग हे क्षात्रमय बनलेलें असें आपण सहज पाहूं शकू स्वार्थी लोकांनी बिघडविलेली घडी प्रथम आपणांस नीट बसविली पाहिजे तेव्हां तिकडेच आपलें उद्दिष्ट तात्पुरते आपण वळवू या

'क्षत्रियांचा इतिहास' हे व्यापक नाव या प्रथास आम्हीं दिलेले आहे क्षत्रियांत मराठा, कुळबी, राजपूत, राणे, राठोड, कायस्थ, चारण, मारवन, गुरखे, कोच, मालव, भडारी, वजारी, लोणारी, आगरी, रगारी, बारी, खत्री, पटवे, लेवे, कछवे, जाट, भाट, भाटे, भट्टी, पलाईत, खडाईत, अहिर, नदगौळी, माळी, साळी, शिंपी, कोष्टी, गारपगारी (नाथ), गोसावी, तेली, जोशी, न्हावी, सैनी, कुमावत ऊर्फ कुभार, सुतार, लोहार, पवार कासार, भावसार, धनगर, पाथरवट, ताबटकर, नाग, नाईक, गोपाळ, सांताळ इत्यादि अनेक जाती पोटजातींचा समावेश होतो, अशासबधी बरीच माहिती मिळते वरील जातींपैकीं कांही जातींचे इतिहास 'क्षत्रियांचा इतिहास–भाग २' या प्रथामध्यें दिलेले आहेत या प्रत्येक जातींचे मूळवश, गोत्रें, कुळे, कुळाचार, उपनांवे ऊर्फ आडनांवें, जन्मविधि, अत्यविधि, लग्नविधि, आदिकरून मुख्य धर्मविधींचे सस्कार, प्रचलित रूढीधर्म, चालीरीति, आचार, विचार, स्थानपरत्वें आपापसांत होणारे रोटीव्यवहार, बेटीव्यवहार इत्यादि गोष्टींचा पडताळा मिळवून पाहिला, त्या गोष्टींचा बारकाईने विचार केला, उदारमनानें व निःपक्षपाती बुद्धीने त्यांच्यांतील प्रचलित आचार, विचारांचा व वश गोत्रांचा मेळ मिळविला तर पजाब, राजपुताना, मारवाड, बगाल, सयुक्तप्रांत व गुजराथ या उत्तरहिंदुस्थानच्या भागातील आणि महाराष्ट्र, मुंबई इलाखा, मद्रास इलाखा, नागपूर प्रांत व वऱ्हाडप्रांत या दख्खन ऊर्फ दक्षिण हिंदुस्तानमध्यें मोडणाऱ्या भागांतील, क्षत्रिय म्हणविणाऱ्या लोकांचे परस्पर धागेदोरे आज देखील बऱ्याच अंशांनी एकांत एक बरोबर मिळतात. आणि तसे ते मिळणें अगदीं साहजिकच आहे कारण हे किरकोळ जाती उपजाति–सज्ञक विभाग म्हणजे क्षत्रियरूपी नवनीताचे स्वार्थी लोकांच्या घुसळाघुसळीनें झालेले लहान लहान कणच होत तेव्हां ते भिन्नभिन्न रूप केव्हांही पावावयाचे नाहींतच ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट आहे.

'क्षत्रियांचा इतिहास–भाग २' या ग्रंथांत हे धागेदोरे परस्पर कसे मिळालेले आहेत हें स्पष्ट दाखविलेलेच आहे असेंही झालेलें आहे कीं, क्षत्रियांमधील निरनिराळ्या लोकांच्या धंद्यांवरून, त्यांच्या पराक्रमावरून, विशेष पुरुषांच्या नांवांवरून, वतनदारीच्या गांवांवरून व अशाच इतर भिन्नभिन्न कारणांवरून त्यांचीं निरनिराळीं नांवें साहजिकच पडलीं व त्यांनाच पुष्कळ काळ लोटल्याने पुढे जातींचें स्वरूप आलें मात्र वस्तुतः भूमिका–विस्तृत भूमिका–ही क्षत्रियकुलभूमिकाच होय त्या भूमिकेवर निरनिराळे जाति-वृक्ष वाढले, निरनिराळ्या लोकाना आल्हाद देऊ लागले, निरनिराळ्या नामाभिधानास पावले, निरनिराळ्या मुलुखोंमुलुखी विहरले, विखुरले व प्रसरण पावले ह्या सर्व गोष्टी झाल्या तरी मूल भूमिका–आद्य भूमिका–क्षत्रियकुलाचीच होय ही गोष्ट लक्षांत ठेवण्या-सारखी आहे आणि म्हणूनच आमची मनीषा, आमचें हृद्गत, आमचा इष्ट हेतु हाच आहे कीं, धंद्यावरून, पराक्रमाच्या महत्कार्यांवरून, विशेष पुरुषांच्या नांवांवरून, वतन-दारीच्या गांवांवरून व अशाच इतर कारणांवरून पडलेली, हल्लीं रूढीमध्यें वहिवाटींत चालू असलेली, क्षत्रिय या एकाच मुख्य अंगाचीं वर दर्शविलेलीं अनेक पोटनांवें ऊर्फ पोटजाति मुखाने उच्चारण्याचा त्रास न घेतां क्षत्रियांत मोडणाऱ्या सर्व जातींनीं आपली जात सांगावयाची ती

## क्षत्रिय जात

हीच सांगावी, मानावी आणि वहिवाटींत आणावी क्षत्रिय जात ही प्रभु गोपालकृष्णाची जात आहे, ही प्रभु रामचंद्राची जात आहे, क्षत्रिय जात ही विश्वामित्र जनकादिकांची-जात आहे, आणि क्षत्रिय जात ही प्रभु शिवराय छत्रपतींची जात आहे अशी ही पुण्य-मय जात, अशी ही थोर जात, अशी ही कर्तबगार आणि पवित्र जात मुखाने उच्चार-ताना कोणास स्वर्गानंद वाटणार नाही बरें ! कोणास अभिमान उत्पन्न होणार नाहीं बरें आणि कोणास आपल्या कुलाबद्दल धन्यता वाटणार नाहीं बरें ! सर्व जग जेथें क्षात्रमय आहे तेथें आपणच आपल्याला–खास स्वतःला–क्षत्रिय म्हणविले नाहीं तरच आश्चर्य आणि म्हणूनच आमचा मनोदय आहे कीं, सध्यां निदान आकुंचित क्षेत्रापुरता विचार करून तरी उपरिनिर्दिष्ट वर्गांनी आपणास क्षत्रिय म्हणवावें, क्षत्रियत्व अंगीं बाणण्यास झटावें, क्षात्रधर्माचा पुनरुद्धार करण्याच्या प्रयत्नास लागावे, क्षात्रवृत्तीशीं तादात्म्य पावावे आणि आपल्या क्षत्रियत्वाचा डंका क्रमाक्रमानें अखिल भारतांत निनादित करून—

**न मे विदुः सुरगणाः प्रभवं न महर्षयः।**
**अहमादिर्हि देवानां महर्षीणांच सर्वशः॥**

या भगवान् गोपालकृष्णाच्या ध्वनीचा पडसाद प्रभूस ऐकविण्याचें सुलभ पण पुण्यकर्म आचरावें ही आमची मनीषा, हा आमचा इष्ट हेतु आमचे क्षत्रिय बांधव अवश्य विचारांत घेऊन आम्हांस उपकृत करतीलच करतील, अशी दृढाशा आम्ही बाळगतों.

एक वेळ क्षत्रिय ही एकच मुख्य भूमिका सर्वांनीं आपल्या मनोभूमिकेशीं समरस केल्यावर क्रमाक्रमानें आपापसांतील रोटीव्यवहार, बेटीव्यवहार, पूर्ववत् चालू करण्याचा

स्तुत्य उपक्रम आरंभावा. असे होत गेले म्हणजे राष्ट्रालाही सुसंघटितपणा अनायासेंच प्राप्त होईल, एकराष्ट्रीयत्वाचें आदर्श असें आपले हे राष्ट्र बनेल आणि आजच्या मृतप्राय झालेल्या भारताला–सध्यांच्या जातिभेदाच्या बजबजपुरीमुळें अत्यंत विस्कळित स्वरूपाप्रत गेलेल्या भारतवर्षाला–आपसातील फुटीमुळे दुसऱ्यांचा गुलाम बनलेल्या गुलाम हिंदी राष्ट्राला–नवजीवन प्राप्त होऊन, एक जीव झालेल्या क्षात्रतेजाच्या बळावर हल्लीच्या गुलामगिरीतून वर डोके काढण्याचा राजमार्गही खुला होईल

उपरिनिर्दिष्ट आमची सूचना–आमचा इष्ट हेतु–आमची मनीषा सकृद्दर्शनी पुष्कळ अडाणी लोकांना दुर्घट किंवा अशक्यही वाटण्याचा संभव आहे, पण विचारांती सत्य-तत्त्व ओळखून वागणे हेच शहाण्याचे काम आहे, हे त्यानीं अवश्य लक्षात असू द्यावें. शिवाय ही गोष्ट अशक्य म्हणून सोडून देण्यातही पुरुषार्थ नाहीं, कारण प्रयत्नानें, अभ्यासाने, सायासाने कांहींही अशक्य राहू शकत नाहीं, हे तत्त्व–पूजनीय संतभूषण-सुप्रसिद्ध तुकोबाराय यानीं—

**'असाध्य तें साध्य, करितां सायास । कारण अभ्यास तुका म्हणे'**

या आपल्या अनुभविक वचनाने जगास पटवून दिले आहे शिवाय जगप्रसिद्ध वीर नेपोलियन बोनापार्ट यानेही आपला अनुभव जगासमोर अशा रीतीने मांडलेला आहे कीं—

" The word *impossible* is found in the dictionery of fools."

म्हणजे '**अशक्य**' हा शब्द मूर्खांच्याच कोशात फक्त सापडतो.

म्हणजेच करू गेल्यास उपरिनिर्दिष्ट उपक्रम आरंभिणे अशक्य आहे असें कांहीं नाहीं स्वत्वाचा, क्षत्रियत्वाचा, आपल्या परमपूज्य भगवान् श्रीकृष्णाचा अभिमान हृदयांत जागृत करून कर्तव्य मात्र केलें पाहिजे उपरिनिर्दिष्ट संघटना प्रयत्नांती होऊ शकते की नाहीं याचें एकच ढळढळीत उदाहरण बस्स आहे आणि ते म्हटले म्हणजे इ० सन १९०९ सालीं डिसेंबरच्या २५ तारखेला मराठा शिक्षण परिषदेचें जे तिसरे अधिवेशन उमरावतीस झाले होतें त्याप्रसंगींचें होय त्यावेळीं वऱ्हाड आणि नागपूर प्रांतातील **कुळंबी** महाराष्ट्रातील **मराठ्यांना** स्वतःपेक्षा हलके समजत होते उलट पक्षीं स्वतःस राजे, महाराजे, सरदार, दरबारी वगैरे म्हणविणारे दख्खनचे मराठे, वऱ्हाडातील हलक्या मानलेल्या कुळंब्यांचे शिक्षण परिषदेत जाऊन बसल्यास आपला दर्जा कमी होईल अशी स्वाभिमानी गर्जना वर्तमानपत्रातून राजरोसपणे करीत होते तरी उभय पक्षातील पुढारी मंडळींनीं या परिषदेत दोन्ही पक्ष एकत्र करण्याचा घाट मोठ्या मुत्सद्देगिरीनें जुळवून आणला. जेव्हा परिषदेच्या पहिल्याच दिवशीं उभय पक्षातील विद्वानांची ओजस्वी व मुद्देसूद अशीं व्याख्यानें झालीं, तेव्हा त्या दोन्ही पक्षास आत्मीयत्वाची जाणीव होऊन ते लागलीच प्रेमानें परस्परांच्या छातीशीं छाती भिडवून एकजीव झाले ऐक्याची ओळख त्यावेळीं उभयपक्षीयांना पटून ते एकत्रित झाले. एवढेंच नव्हे तर त्यांच्यात परस्पर रोटीबेटी-व्यवहार आज सुरू असून गेल्या १०–१५ वर्षांतच शेंकडों शरीरसंबंधही घडून आलेले

आहेत त्याचप्रमाणें क्षत्रियांत मोडणाऱ्या अनेक पोटजातींतही अलीकडे रोटीव्यवहार परस्परांत सर्रास सुरू झालेले आहेत ही आनंदाची गोष्ट आहे

कोल्हापूरचे राजे घाटगे–मराठा क्षत्रिय–यांच्या कन्येचें लग्न इंदूरचे होळकर सरकार सर सवाई तुकोजीराव महाराज यांच्या पुत्राशीं सहा सात वर्षांपूर्वींच झालेलें आहे नालचेरकर कायस्थ याची कन्या इंदूरच्या सवाई तुकोजीराव महाराजांनी आपली राणी केलेली आहे तसेंच वऱ्हाडांतील साधानचे मोहोड म्हणजे मूळचे राणे रजपूत, पण हल्लींचे कुळंबी, आणि काकडा व पळसो येथील इंगळे व देशमुख, हल्लींचे कुळबी पण मूळचे रजपूत, याचे शरीरसबंध वऱ्हाडातील नामांकित देशमुख क्षत्रियांशीं आहेत. तसेंच उमरावती जिल्ह्यांतील जळू, तळेगांव ठाकूर, मोझरी, नायगाव इत्यादि ठिकाणचे सिसोदे राजपूत, राणे राजपूत, पुण्याचे चांद्रसेनीय कायस्थ प्रभु, गुजराथ, राजपुताना, मारवाड येथील रजपूत आणि दक्षिणेतील देशमुख, पाटील, कुळबो, मराठा म्हणविणारे क्षत्रिय, यांचे परस्पर अनेक शरीरसबंध घडून आलेले आहेत. त्यांची नामावळी क्षत्रियांच्या इतिहासांत शरीरसबंध या प्रकरणात दिलेली आहे यावरून विचार करतां प्रयत्नांतीं क्रमाक्रमानें क्षात्रिय तेथून एक, ही भावना आचारांत, विचारात, व्यवहारात आणि जगात उद्भूत होणे अगर तशी प्रस्थापित करणे काहीं मोठेंसें अशक्य नाहीं हे निदर्शनास येतें

आतापर्यंत केलेल्या विवेचनावरून जगत् हें क्षात्रमय आहे व त्यास क्षात्रमय करणे आहे एवढी गोष्ट वाचकाच्या ध्यानात आली असेलच परतु जगत् हें जर क्षात्रमयच आहे तर त्याला पुन्हा क्षात्रमय करणे म्हणजे कसें काय करणे हा पेच सकृद्दर्शनीं वाचकांना पडणे साहजिकच आहे, आणि मूळच्या क्षात्रमयजगताला पुन्हा क्षात्रमय करण्याची आवश्यकता ती काय, अशी त्याना जिज्ञासाही प्राप्त होणे साहजिकच आहे त्याचेंच निराकरण आता आम्ही करणार आहो आमचे वाचक ही गोष्ट पूर्णपणे जाणूनच असतील कीं, पांढऱ्या शुभ्र अशा कागदावर जर कोणीं उपद्व्यापी व खोडकर अशा मुलाने काळ्या शाईच्या आडव्या उभ्या रेघोट्या ओढून तो कागद अगदीं गलिच्छ व घाणेरडा केला, तर आपण त्या रेघोट्या रबरानें साफ पुसून काढून त्याचे मलीनत्व व घाणेरडेपणा काढून टाकण्याचा स्तुत्य व क्रमप्राप्त उपक्रम आरंभीत असतो कागद हा मूळचा पांढरा शुभ्रच असतो, परंतु आपणाला तो पांढर करावा लागतो या म्हणण्यात जी गोम आहे; तीच गोम जगत् हें क्षात्रमय आहे व त्यास क्षात्रमय करणे आहे या म्हणण्यांत आहे. असा हा पेच पडण्यास एकच कारण झालेलें असते कीं, मूळच्या शुद्ध स्वरूपावर जेव्हां कोणी विघ्नसंतोषी व उपद्व्यापी आपल्या करणीने शिंतोडे उडवून ते स्वरूप दूषित करतात, तेव्हां त्या दूषित स्वरूपास पुन्हा शुद्ध करणें सज्जनास भाग पडतें मूळचें स्वरूप शुद्धच, परंतु मध्ये जो घोंटाळा झालेला आहे आणि त्यायोगानें तें स्वरूप जे तात्पुरते अशुद्ध झाले आहे तो अशुद्धपणा काढून टाकणे म्हणजेच पुन्हा मूळ स्वरूप दृश्यमान करणे होय. यावरून मूळचे क्षात्रमयजगत् पुन्हां क्षात्रमय करण्याची योजना वाचकाच्या सहजासहजी

लक्षांत येण्यासारखी आहे. जर मूळच्या क्षात्रमयजगतावर कोणाही स्वार्थी उपद्व्यापी महाशयाकडून बोळा फिरविण्याचा प्रयत्न करण्यात आला नसता, आणि धर्माचें मूळचें उज्ज्वल स्वरूप जर कोणाकडूनही भ्रष्ट केले गेलें नसतें, तर पुन्हा हें जगत् क्षात्रमय करण्याची योजना व हेतु जागृत होण्यास कांहीही कारण नव्हतें परंतु ज्याअर्थी तशी आवश्यकता आज भासत आहे व दुर्दैवानें तसा प्रसग आज भारतावर आलेला आहे त्याअर्थी पुन्हा क्षात्रमय जगत् अस्तित्वांत आणणे भाग आहे ही गोष्ट तात्त्विक दृष्टीनें व निःपक्षपातबुद्धीनें विचार करणारास कदापि पटल्यावांचून राहात नाहीं

भारतावर हा जो दुर्धर प्रसग आलेला आहे त्याचें मूळ वर्णाश्रमधर्मप्रस्थापनेच्या स्वार्थी मनोवृत्तींत रुजले गेलेलें आहे असे नाइलाजानें म्हणावें लागतें ही वर्णाश्रमधर्मव्यवस्था पूर्वी तर शून्याकारांतच होती

**चत्वार एकस्य पितुः सुताश्च । तेषां सुतानां खलु जातिरेका ।**
**एवं प्रजानां हि पितैक एव । पित्रैक भावन्नच जातिभेदः ॥**

—भविष्यमहापुराण, अ० ४२.

म्हणजे, एकाच पित्याची चार मुले जशीं एकाच जातीचीं असतात, तद्वतच एकाच विश्वनिर्मित्यापासून उत्पन्न झालेली प्रजा जातिभेदात्मक कशी राहूं शकेल ?

याप्रमाणें जेव्हां शुद्ध मनोवृत्ति समाजात नांदत होती, याप्रमाणे वर्णाश्रमधर्मव्यवस्था जेव्हा शून्याकारी होती आणि याप्रमाणे जेव्हा एकाच सृष्टिनिर्मित्यापासून–भगवान् गोपालकृष्णापासून–उत्पन्न झालेली प्रजा ज्याकाली अर्थातच क्षात्रमय होती, त्याकालीं क्षात्रमय जगताची साक्ष दुसरी कोणतीच नको होती सृष्टिनिर्मित्याचा वर्ण तोच प्रजेचा वर्ण, सृष्टिनिर्मिता प्रभु गोपालकृष्ण क्षत्रिय, तेव्हां अर्थातच जगत् हे क्षात्रमय, आणि सृष्टींतलि धर्म तोच पवित्र क्षात्रधर्म, अशी त्याकालीं एकच तत्त्वग्रथि सर्व जगांत नांदत होती

पुढें भगवतानीं वर्णाश्रमधर्मासबधाने आपलें अधिकारी वचन पुढे माडले की,—

**'चातुर्वर्ण्यं मयासृष्टं गुणकर्मविभागशः'**

याप्रमाणे अगच्या गुणांवरून जेव्हां वर्ण ओळखण्याची व मानण्याची पद्धति प्रचलित झाली, तेव्हा मूळच्या क्षात्रमय जगतांतच निरनिराळे पोटभेद पडले क्षत्रियांतच अट्टल लढवय्ये, कमालीचे तरवारबहाद्दर, भास्करसमप्रतापि अशा लोकांचा जो एक विशिष्ट वर्ग आढळून आला; त्यांना त्यांच्या अगच्या गुणांप्रमाणे 'क्षत्रिय' अशी पदवी दिली क्षात्रतेजविहीन, नेभळट वृत्तीचे पण कारस्थानांत व कपटपटुत्वांत अग्रगण्य असा जो एक विशिष्ट वर्ग त्या क्षत्रियांतच आढळून आला, त्याला त्याच्या अगच्या गुणकर्मांप्रमाणे ब्रह्मानदीं टाळी लावून स्वस्थपणें रामराम करीत बसणारे,म्हणून 'ब्राह्मण' ही पदवी दिली व्यापारधद्यांत व हिशेबांत वगैरे पारंगत असा जो विशिष्ट वर्ग त्या क्षत्रियगणातच आढळून आला, त्याला त्याच्या अगच्या गुणकर्मांप्रमाणें वैश्य ही पदवी दिली आणि सेवाधर्मतत्पर असा जो एक थोर मनाचा विशिष्ट वर्ग त्या क्षत्रियांतच आढळून आला, त्याला त्याच्या अगच्या गुणाप्रमाणें

शूद्र ही पदवी दिली गेली. याप्रमाणें मूळच्या क्षत्रियांचेच गुणकर्मानुसार पोटभेद पाडून त्यास निरनिराळ्या विशिष्ट पदव्यांनीं संबोधिण्यांत येऊ लागलें यावेळींही आपापल्या अंगच्या सामर्थ्यानुसार वर्णप्राप्तीची पद्धति प्रचलित असल्यामुळें वर्णाश्रमधर्मांत गोंधळ व बजबजपुरी माजणे शक्य नव्हतें परंतु पुढें मात्र हें वर्णाश्रमधर्माचें बंड फारच विकृत होत होत जाऊन त्याच्यांत पुन्हा स्वार्थी मनोवृत्तीचें मिश्रण झाल्यानें साराच गोंधळ झाला भगवंताच्या अत्यंत उदार व अत्युच्च अशा पवित्रतम वर्णव्यवस्थेच्या तत्त्वांचा खून करून, त्यांवर धडधडीत धूळमाती फेंकून, **'गुणकर्मविभागशः'** या जागीं **'जन्मजातिविभागशः'** या स्वार्थबुद्धिप्रेरित त्रागड्याची घिसाडभरती भरतीस घालून अखिल आर्यलोकांना अधोगतीस नेणारें व साऱ्या जगाचे गुलाम बनविणारें, आणि त्याबरोबरच गुणकर्महीन अशा नामधारी ब्राह्मणास मात्र जन्मावरून सर्वांत श्रेष्ठ ठरविणारें भिकार भिक्षुकीतत्त्व इसवीसनाच्या नवव्या शतकांत म्हणजे आज सुमारें एक हजार वर्षांपूर्वी आद्य शंकराचार्यांनें जन्मास आणलें प्रथमत या स्वार्थी तत्त्वाचा अग्नि आंतल्याआंतच पेटत राहिला गेल्या पांच सातशें वर्षांत त्याला लटकें मूर्त स्वरूप येऊन त्याच्या ज्वाला इतरेजनास चटके देऊ लागल्या आणि पेशवाईच्या चालत्या सैतानी काळात म्हणजे सुमारें दीड दोनशें वर्षांत त्याला सैतानशाहीचें अत्यंत उग्र स्वरूप प्राप्त होऊन हल्लीं तर त्याचा वणवा ज्वालाग्राही पर्वताप्रमाणे इतस्ततः भडकत चालला आहे यासंबधानें आम्हीं जास्त लिहूं गेल्यास आमच्यावर ब्राह्मणद्वेषाचा लटकाच आरोप व्यर्थ येणार हें आम्ही जाणून आहोंत आणि म्हणूनच या बाबतींत कान टोंचण्याचें काम आम्हीं सोनाराकडेच देत आहो

श्री० र ल भिडे हे ब्राह्मणगृहस्थ 'धर्म व जाति' या आपल्या लेखांत म्हणतात—

**"शंकराचार्यांच्या याच मुख्य आत्मघातकी व स्वार्थी धोरणामुळें उच्चनीचपणाचा पाया पडून आपसांत फूट पडूं लागली. आपसांतील फुटीमुळें बंधुप्रेमाच्या, राष्ट्रप्रेमाच्या व भावनैक्याच्या चिंधड्या उडाल्या, उच्चनीचत्वाच्या भावना उत्पन्न झाल्या, त्यामुळें रोटीबेटीव्यवहार हळुहळू बंद पडूं लागले, नीतिप्रधान सनातनधर्म बुडून जातिप्रधान सनातनी नव्हे सैतानीधर्म डोकें वर काढूं लागला उभें आडवें गंध लावणें न लावणें, मूर्तिपूजा करणें न करणें, अमुक व्यक्तीशीं अगर व्यक्तिसमुच्चयाशीं रोटीबेटीव्यवहार करणें न करणें वगैरे रूढींसच धर्म मानण्यांत येऊं लागलें, समाजांतील या विचित्र मनोवृत्तींमुळें परिस्थिति बदलली व तिनेंच भावनैक्याचा व राष्ट्रैक्याचा खून केला. या आपसांतील फुटीमुळेंच आर्य म्हणजे श्रेष्ठ हें आपलें मूळचें नांव नष्ट होऊन त्याच्या जागीं हिंदु म्हणजे गुलाम हें भ्रष्ट नांव आर्यांच्या नशिबीं आलें." शंकराचार्यांच्या या धार्मिक व सामाजिक फुटीचा पुरा पुरा फायदा तत्कालीन धूर्त मुसलमानांनीं**

**घेऊन आपल्या तरवारीच्या जोरावर लाखों—क्रोडों—आर्यांना आपले गुलाम बनवून काबूल, कंदाहार, गिझनी येथें नेलें. या फुटी-मुळेंच मुसलमानांना लाखों हिंदी गुलाम हिंदुस्थानांत मिळूं लागले, त्यामुळें हिंदु म्हणजे गुलाम, हिंदुधर्म म्हणजे गुलामांचा धर्म आणि हिंदुस्थान म्हणजे गुलामांचा देश हे नवीन फारशी शब्द मुसलमानांनीं जन्मास आणले. 'हिंदू' हा शब्द शंकराचार्यांच्या पूर्वींच्या आर्यांच्या कोणत्याही ग्रंथांत सांपडत नाहीं. इतकेंच नाही तर मुसलमानांच्या फारशी ग्रंथांत मात्र ह्या काळापासून हिंदू म्हणजे गुलाम हा शब्द प्रथम प्रचारांत आला व तोच फारशी शब्द पुढें मुसलमानांच्या सहवासानें हिंदूंच्या हाडींमासी खिळून बसला. हाच वरील गोष्टीचा निर्विवाद पुरावा होय "**

क्षात्रमय जगतांत जो गोंधळ माजला व मूळचे क्षात्रमय जगत जें विकृत झाले ते हे असेंच, आणि म्हणूनच 'जन्मजातिविभागश.' या आत्मघातकी, भिकार, भिक्षुकी, धर्म-तत्त्वामुळेंच जर आपलें श्रेष्ठत्व नष्ट होऊन आपण गुलाम बनलों आहोत तर हे निराधार भिक्षुकी तत्त्व पार झुगारून देऊन, या स्वार्थी तत्त्वास नेस्तनाबूद करून, त्याचा धुव्वा उडवून आणि त्यात क्रान्ति घडवून आणून आपण भगवान् श्रीकृष्णाच्या प्रस्तुत लेखाच्या शिरोभागी उध्दृत केलेल्या वचनाच्या पूर्तीकरितां अवश्यमेव झटलें पाहिजे

जगत् हे क्षात्रमय कसें आहे, ते क्षात्रमय कसे होते, मध्यतरी तें विकृत कसें झालें आणि आतां पुन्हा ते क्षात्रमय करण्याची आवश्यकता कां आहे एवढया गोष्टी जगदांतरीं भेदून क्षात्रमयमजगत ज्या दिवशीं खरें क्षात्रमय होईल, ज्या दिवशीं जिकडे तिकडे क्षात्रधर्माच्या पताका फडकत असलेल्या दृष्टीस पडतील, ज्या दिवशीं भगवान् श्रीकृष्ण-परमात्मा आपल्या क्षत्रिय वंशजाना क्षात्रकुलभूमीत स्वच्छंद व क्षात्रधर्मयुत अशा स्थितींत आणून सोडील आणि ज्या दिवशी—

**कृण्वतो विश्व क्षत्रम्**

ही आमची मनीषा, हें आमचे व्रत आणि हा आमचा इष्टहेतु पूर्णपणे पार पडेल त्याच दिवसावरून—त्या महान् शुभ दिवसावरूनच—आम्ही आपले प्रस्तुत ग्रथ लिहिण्याचे श्रम ओंवाळून टाकूं आम्ही कृतकृत्य होऊ आणि सद्गदित अत.करणाने आम्ही आपल्या भगवान् श्रीकृष्णाची—आमच्या क्षात्रकुलकोहितुराची—विनम्रभावाने उच्च स्वरांत प्रार्थना करूं कीं,

**सर्वेऽत्र सुखिनः संतु सर्वे संतु निरामयाः ।**
**सर्वे भद्राणि पश्यंतु मा कश्चिद्दु:खमाप्नुयात् ॥**

**—ग्रंथकर्ता.**

# आत्मनिवेदन

**आपुलिया स्वानुभवें । आपणांस निवेदावें ।**
**आत्मनिवेदन जाणावें । ऐसें असे ॥ १ ॥**

**—दासबोध.**



पुष्कळ दिवसांपासून माझी तीव्र इच्छा होती की, क्षात्रप्रभाकराचा दैदीप्यमान् प्रकाश सुप्तावस्थेतील भारताच्या म्लान मुखमंडलावर पाडून त्यास क्षात्रतेजाची चुणूक दाखवून द्यावी ही माझी इच्छा कशा तऱ्हेनें मला पार पाडून घेता येईल याचा जेव्हां मी विचार करू लागला, तेव्हां मला अकस्मात् नवचैतन्यमय संदेश स्फुरविता झाला की, क्षात्रतेजयुक्त असा क्षत्रियांचा सामाजिक व धार्मिक स्वरूपाचा इतिहास जर जनताजनार्दनाचे पुण्यचरणीं मला अर्पण करतां येईल, तर माझी ही उत्कट इच्छा बव्हंशानीं सफळ झाल्यावाचून राहाणार नाहीं असा हा संदेश माझ्या मनोदधींत आपल्या भ्रमणक्रियेने जेव्हां विवेकाचे भोंवरे उत्पन्न करू लागला, तेव्हा अर्थातच मलाही चैतन्य प्राप्त होऊन त्या भोवऱ्यांचे अनुरोधानेच माझी वृद्धबुद्धि क्षात्रसागराच्या अफाट खळबळाटांत संशोधनदृष्ट्या प्रयत्न करतांना पाणबुड्याप्रमाणें मोठ्या उत्साहाने भराभर बुड्या मारू लागली या कित्येक बुडयात तिच्या हातीं केव्हा केव्हां क्षात्रसागराच्या तळाशी असलेले शंखही लागले व बहुमोल रत्ने—उपरत्नेही पुष्कळच मिळालीं जेव्हां तिला या क्षात्रसागरांत अनेक अमूल्य रत्नें—उपरत्ने प्राप्त झाली, तेव्हां साहजिकच तिला आणखीही मोह सुटला व तिचे प्रयत्न पुढेंपुढे जिवापाड होऊ लागले या बाबतींत तिनें कसकसे प्रयत्न केले व क्षात्रसागराच्या उसळत्या लाटाबरोबर ती कुठेंकुठें वाहात गेली हेच मला येथे निवेदन करावयाचे आहे.

वैदिक काळापासून आजतागायत क्षत्रियाचे राजकीय स्वरूपाचे शेकडों इतिहास प्रसिद्ध झालेले असून त्यांचा सामाजिक व धार्मिक स्वरूपाचा एकत्रित असा विस्तृत इतिहास जेव्हां मला टोंचणी मारू लागला, तेव्हां त्याच्या हांकेकडे लक्ष देणे मला भागच पडले वास्तविक पाहिले असतां एवढे जंगी धाडस करणे धोक्याचें होईल अशी मला अंतःसूचना मिळेल की काय असा मला संशय यावयास पाहिजे होता कारण या अवाढव्य कार्याचे स्वरूपच सकृद्दर्शनी मोठे भयानक असावयाचे ही गोष्ट सर्वश्रुत व

सर्वपरिचित आहे परंतु या बाबतींत माझी मनःस्थिति पहिल्यापासूनच मोठ्या आनंदांत व उत्साहांत विलीन झालेली होती, आणि ही तिची स्थितीच वाचकांसमोर पुढील आत्मनिवेदन मांडण्यास खरीखुरी कारणीभूत झालेली आहे माझ्या त्या वेळच्या आनदी व उल्हसित मनोवृत्तीचें चित्र आतांही जेव्हां जेव्हां मी आपल्या डोळ्यांसमोर उभें करतो तेव्हा माझें मलाच मोठें आश्चर्य वाटतें व मी स्वानदसाम्राज्यांत मुग्ध होऊन जातों

अशाप्रकारें आनदी मनोवृत्तीच्या व उल्हसित बुद्धिबलाच्या आधारानें जेव्हां मी प्रस्तुत ग्रंथलेखनाच्या विचारांत दंग झालो, तादात्म्य पावलों, तेव्हां मला न कळतच या क्षेत्रांतील निरनिराळ्या लहानमोठ्या गोष्टी मजकडून जगच्चालक प्रभु घडवून आणवूं लागला

हा ग्रथ लिहिण्याच्या विचारांची लाट इ० सन १८९७ सालीं अगदीं प्रथम माझ्या मनांत उद्भूत झाली त्याच वर्षी वऱ्हाडांत उमरावतीस भारतीय कॉंग्रेस भरली होती, व शारीरिक अस्वास्थ्यामुळे मीही औषधोपचाराकरिता त्याच वर्षी उमरावतीस येऊन राहिलों होतों या कॉंग्रेसकरितां अलम् भरतखडांतून व त्यांतही विशेषेंकरून वऱ्हाड व मध्य-प्रांतामधून क्षत्रियांच्या निरनिराळ्या शाखांतील निवडक विद्वद्रत्नें उमरावतीच्या कॉंग्रेस-नगरांत येऊन विराजमान झालीं होती त्या सुवर्णसधींचा फायदा घेण्याच्या हेतूनें मीं माझें कार्य साधून घेण्याची एक योजना लढविली निरनिराळ्या शाखांच्या क्षत्रियां-ची निरनिराळ्या दिशानीं माहिती मिळविण्याचे धोरणानें कोष्टकवजा कांहीं तक्ते छापून घेऊन ते तक्ते कॉंग्रेसकरितां आलेल्या अनेक प्रांतांतील अनेक विद्वानांकडून मीं भरून घेतले त्यामुळे जाति, वंश, कुळे, गोत्रें, कुलाचार इत्यादि अनेक प्रकारच्या उपयुक्त माहितीच्या भाडाराचा बराच अश मला त्या काग्रेसच्या सुवर्णमय पर्वणींत लाभला माझ्या ऐतिहासिक जिज्ञासेच्या लाबच्या प्रवासमार्गांतील माझें हे पहिलेंच पाऊल या सुमगल सुमुहूर्तावर अशा प्रकारे यशस्वी रीतीनें पुढें पडल्यामुळें माझ्या आवडीच्या कार्याविषयींची माझी जिज्ञासा जास्त उत्साहाने वाढत गेली

या वेळेपासून पुढे या दिशेन माझे प्रयत्न चाललेच होते निरनिराळ्या ग्रथकारांचे इंग्रजी, मराठी व सस्कृत भाषेतील उपलब्ध ग्रथ वाचून त्यातील उपयुक्त माहिती सग्रहित करण्याचे उद्योगास मी पुढें लागलो हा ग्रथवाचनाचा, मननाचा व त्यातील सग्राह्य तत्त्वें सग्रहित करण्याचा माझा भगीरथ प्रयत्न इ० सन १९२१ पर्यंत चालूच होता या पंचवीस वर्षांच्या कालावधींत व आजपर्यंत या कार्याकरिता मी मुख्यत खालील ग्रंथांचें व मासिकादिकांचें परिशीलन केले जिज्ञासु वाचकांसाठीं ती यादी खालीं दिलेली आहे

१ रामायण (तुलसीदासकृत), २ महाभारत, ३ ऋग्वेदसहिता, ४ वेदाच मराठी भाषांतर (श्रुतिबोध), ५ भगवद्गीता, ६ गीतारहस्य, ७ यजुर्वेद, ८ व्यासकृत स्कंधपुराण, ९ अथर्ववेद, १० सन्यासगीता, ११ सह्याद्रिखड, १२ वज्रसूचिकोपनिषद, १३ शकर-दिग्विजय, १४ सिद्धान्तविजय, १५ छांदोग्योपनिषद, १६ स्वात्मबोध, १७ राजस्थानचा इतिहास हिंदी, १८ ब्राह्मण निर्णय, १९ कात्यायनाचें वार्तिक, २० वऱ्हाडचा इतिहास

२१ न्यायीवर्णनिर्णय, २२ बुद्ध देव, २३ साउथ इंडियाच्या इतिहासाचा प्रारंभ, २४ सरस्वति-मंडळ, २५ पृथ्वीराज रासा, २६ दख्खनचा प्राचीन इतिहास, २७ नागपूरकर भोंसल्याची बखर, २८ अजमीरचा इतिहास, २९ हरिवंशविजय, ३० प्राचीन भरतभूमि, ३१ संस्कारकौस्तुभ, ३२ म्हैसूर व कुर्गचा इतिहास, ३३ ऐतिहासिक गोष्टी, ३४ विवेकानंद समग्र ग्रंथ, ३५ ओरायन, ३६ भारतवर्षका इतिहास, ३७ शाहू छत्रपतींचें चरित्र, ३८ भारतीय ज्योतिषशास्त्र, ३९ आर्यांचे सणांचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास, ४० सत्यार्थप्रकाश, ४१ मध्ययुगिन भारत–भाग १–२, ४२ ग्रामण्याचा इतिहास, ४३ औरंगजेबाचें चरित्र, ४४ हिंदी राजस्थान–भाग १–२, ४५ मराठी रियासत, ४६ राधामाधव विलासचंपू, ४७ हिंदुस्तानचा अर्वाचीन इतिहास, ४८ मराठ्यांचा इतिहास, ४९ निर्णयसिंधु, ५० गुलाबरावमहाराज मधानकर यांचें चरित्र, ५१ वाल्मीकि रामायण, ५२ धर्मसिंधु, ५३ कूर्मीक्षत्र कुलादर्श, ५४ कबीराची गाथा, ५५ शूद्रकमलाकर, ५६ क्षात्रकुलादर्श, ५७ तुकारामाची गाथा, ५८ स्पर्शास्पर्श, ५९ क्षात्रवंशसागर, ६० व्रतार्क, ६१ इतिहास तरंगिणी, ६२ वंशभास्कर, ६३ गर्भगीता, ६४ गुरुचरित्र, ६५ बडोद्याचे राज्यकर्ते, ६६ कौलरहस्य, ६७ इतिहाससंग्रह, ६८ मराठा कुळांचा इतिहास, ६९ ज्ञानसंकलिनी तंत्र, ७० शंकराचार्यांचें चरित्र, ७१ वंशावळी शहाण्णव कुळी, ७२ मूलस्तंभ, ७३ सरदेसाईचा इतिहास, ७४ शहाण्णव कुळी, ७५ एकनाथी भागवत, ७६ रामायणकालीन सामाजिक स्थिति, ७७ दक्षिणचा इतिहास, ७८ सिद्धान्तबोध, ७९ मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष, ८० हिंदुस्थानचे प्राचीन भूवर्णन, ८१ पांडवप्रताप, ८२ शैव व वैष्णव पंथ, ८३ हर्षचरित्र, ८४ ज्ञानेश्वरी, ८५ मनुस्मृति, ८६ पराशर माधवग्रंथ, ८७ दासबोध, ८८ आर्यलोकाचें मूलस्थान, ८९ गौतम धर्मसूत्र, ९० कलंकी पुराण, ९१ शिवरहस्य, ९२ भिक्षुकशाहीचें बंड, ९३ ब्रह्मांडपुराण, ९४ लिंगपुराण, ९५ क्षत्रिय आणि त्याचें अस्तित्व, ९६ गरुडपुराण, ९७ बृहदारण्यकोपनिषद्, ९८ क्षत्रियमाहात्म्यपुराण, ९९ मत्स्यपुराण, १०० भारतवर्षभूवर्णन, १०१ कूर्मपुराण, १०२ वराहपुराण, १०३ ब्रह्मवैवृत्तपुराण, १०४ गणेश पुराण, १०५ मार्कंडेयपुराण, १०६ नारदपुराण, १०७ भविष्यपुराण, १०८ ब्रह्मपुराण, १०९ पद्मपुराण, ११० नवनाथभक्तिकथासार, १११ पराशर धर्मसूत्र, ११२ रघुवंश, ११३ आपस्तंब धर्मसूत्र, ११४ अत्रिस्मृति, ११५ अर्वाचीन महाराष्ट्र, ११६ निजाम व इंग्रज यांचे तहनामे, ११७ पराशरस्मृति, ११८ इतिहासमंजरी, ११९ अत्रिसंहिता, १२० गुजराथ देशाचा इतिहास, १२१ चितोडगडचा वेढा, १२२ छत्रपति शिवाजी, १२३ पृथ्वीराज चव्हाण, १२४ भारतीय संग्राम, १२५ भारताचा उपसंहार, १२६ मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष, १२७ मराठ्यांच्या प्रसिद्ध लढाया, १२८ महिकावतीची (माहिमची) बखर, १२९ मराठ्यांची बखर, १३० आचाररत्न, १३१ ऋग्वेदी ब्रह्मकर्मसमुच्चय, १३२ नारायणभट्टी, १३३ हिंदुधर्ममीमांसा, १३४ क्षत्रियवैश्यांच्या धार्मिक हक्कांचें संरक्षण, १३५ हिंदुधर्मशास्त्र, १३६ अमरकोश, १३७ महाराष्ट्रीय ज्ञानकोश, 138 Some Kshatriya tribes of ancient India, 139 History of Afganistan, 140 Who

are the Marathas, 141 Ethnographical Survey of India, 142 All India census Report for 1911, 143 All India Census Report for 1921, 144 Census Report of C P and Berar for 1921 145 Bombay Gazetteer, 146 Berar and C P Gazetteer, 147 Ancient history of Deccan, 148 Historian's history of the World, 149 Arctic home in the Vedas, 150 Religion and philosophy of India, 151 Rigveda suctas trans, 152 Sketh of vedanta philosophy, 153 Shranta bhumi, १५४ श्री० जोशी यांचे चित्रमय जगत् ( मासिक ) १५५ श्री० ठाकरे यांचे प्रबोधन ( मासिक ), १५६ श्री० कोल्हटकर यांचें श्रुतिबोध (मासिक), १५७ श्री० सडेकर यांचें लोकमित्र ( मासिक ), १५८ श्री० कृष्णमूर्ति यांचें इद्रधनुष्य ( मासिक ) १५९ श्री० दळवी यांचें मराठा मित्र ( मासिक )

याप्रमाणे ग्रथपरिशीलनाचे काम जरी सरासरी २५ वर्षेपर्यंत मधून मधून चालत होतें, तरी इ० सन १९१४ सालापर्यंत मी आपलें आयुष्य नायब तहसीलदार या नात्यानें सरकारी नोकरींत गहाण ठेविलें असल्यामुळें मजकडून व्हावे तसे नेटानें हे एकच कार्य होणें अपरिहार्य होते इ० सन १९१४सालीं मी पेन्शन् घेतलें, परंतु लगेच "सुबोधमाला" नांवाच्या मासिकाचे सपादकत्वाचें जोखमीचे कार्य मी आपल्या शिरावर घेतल्यामुळे हें इतिहाससंशोधनाचे नाजूक पण अत्यत महत्त्वाचे कार्य करण्यास इ० सन १९२० पर्यंत मला फारच थोडा अवसर मिळाला आणि यामुळें पुन्हाही या अवधींत मजकडून ऐतिहासिक लेखनाचे कार्य अविरतपणें होऊ शकले नाहीं

इ० सन १९१५ तें १९२० पर्यंत मीं सुबोधमालेचे जनक व संपादक या नात्यानें लालन पालन केले पुढे १९२१ सालांत माझ्या वयाचे ६१ वें लोटून गेले व बाल्या वस्थेंत असलेल्या माझ्या आवडत्या सुबोधमालेचें लालन-पालन नियमितपणे करण्याचें माझें पवित्र कर्तव्य, माझ्या वृद्धावस्थेमुळे मला डोईजड वाटू लागले त्यामुळें मालेचा जनक या नात्यानें तिचें लग्न एका विद्वान् मराठा तरुण सपादकाशीं लावून देऊन मीं आपल्या मालेचें सालंकृत कन्यादान केले त्यावर्षी सुबोधमालेचे एकदर सर्व खर्च वजा जातां पाचशें रुपये निव्वळ नफा राहिला होता या नफ्यासुद्धां सुबोधमालेचे सर्व हक्क पूर्णपणें नवीन संपादकाच्या स्वाधीन केले याप्रमाणें सुबोधमालेचें पाणिग्रहण तिच्या योग्य सपादकानें केल्यामुळे तिच्या भावी ससाराच्या काळजींतून अर्थातच मी मोकळा झालों

यापुढे मात्र ऐतिहासिक संशोधनास व लेखनास मला बरीच सवड मिळू लागली आणि तसतसें माझें कार्यही भराभर होत गेले गेल्या ६।७ वर्षांत मी आपल्यास केवळ याच एका मुख्य कामास सर्वस्वीं वाहून घेतल्यामुळें या कालावधींत पुष्कळशा महत्त्वाच्या ग्रंथांचे वाचन व परिशीलन झालें. अनेक ठिकाणीं फिरून उपयुक्त माहिती गोळा करतां आली, अनेक वर्तमानपत्रांतून तत्संबंधीं उहापोह करतां आला, अनेक विद्वानांचीं मतें

मिळवितां आली, पुष्कळ तज्ज्ञांशीं पत्रव्यवहार करून त्यांच्याजवळ असली नसली माहिती मागवून तिचा यथोचित उपयोग करतां आला, वर्तमानपत्रांतून जाहिराती देऊन व कांहीं विशेष माहिती मिळविण्याकरितां पन्नास हजार छापील तक्ते १५-२० वर्तमान-पत्रांतून वांटून अनेक प्रकारची उपयुक्त माहिती हिंदुस्तानच्या बहुतेक भागांतून मिळवितां आली, आणि याप्रकारें सर्व घटना घडून आल्यावर लेखनाच्या जुळवाजुळवीचें त्रास-दायक कामही शनैः शनैः चालू झाले

माझें हे लिखाण कधीं पूर्ण होतें व इतिहासाच्या स्वरूपांत मी त्याला कधीं पाहातों याचाच मला यावेळीं सारखा ध्यास लागून गेला होता जनीं, मनीं, स्वप्नीं मला माझा **'क्षत्रियांचा इतिहास'**च दृग्गोचर होत होता माझा हा इतिहास आपल्या जन्माचें सार्थक्य केव्हां करून घेतो व मीही पर्यायानें केव्हां कृतकृत्य होतों त्या कालाचीच मी यावेळीं एकाग्रतेनें मार्गप्रतीक्षा करीत होतों कारण,—

"श्व कार्यमद्यकुर्वीत् पूर्वाह्णे चापराह्णिकम् । नहि प्रतीक्ष्यते मृत्यु: कृतमस्य न वा कृतम्' हे तत्त्व मी जाणून होतो

वास्तविक पाहिलें असता पुस्तक बाहेर पडण्यापूर्वी मला एवढें उतावीळ होण्याचें कांहींही कारण नव्हते परतु माझे 'पुस्तक' हे पुस्तक नसून '**इतिहास**' होतें, आणि तेंही दिव्य क्षात्रतेजाने युक्त अशा इतिहासाचे 'पुस्तक' होते इतिहास हें एक गतकालीन गोष्टींचे यथार्थ चित्र होय इतिहास हा एक भूतकालीन क्रान्त्या-उत्क्रान्त्या दाखविणारा चलचित्रपट होय आणि आमच्या क्षात्रक्षेत्रातील ह्या क्रान्त्या-उत्क्रान्त्या फारच प्रदर्शनीय अशा असल्यानें त्यांचें चित्र जगापुढे शक्य तितक्या लवकर यावें अशी स्वाभाविक उतावीळता मला लागली होती उत्क्रात्यवस्थेच्या प्रवासांत अर्धवट अधारांत पुढे पाऊल टाकीत असता, चुकाच्या ठेंचा वारवार लागू नयेत म्हणून इतिहास गतानुभवाची दिवटी घेऊन मानवी सृष्टीच्या पुढेपुढे हुजऱ्याप्रमाणे धांवत असतो, परमेश्वरी गूढतत्त्व बरेंचसे नीट न उमगल्यामुळे मनुष्यांच्या हातून जी घोर कृत्ये घडतात, तीं पुन्हा घडू नयेत म्हणून हाच इतिहास मानवांच्या चुकाचा धडा त्यांच्या तोंडावर धडाधड वाचून दाखवून त्यांची कानउघाडणी करीत असतो, भूतकाळीं घडलेल्या क्षुल्लक चुकीचा भयंकर परिणाम वर्तमानकालीन मानवांना स्पष्टपणे सांगून, त्यांच्या विचारयंत्राला नियंत्रित करण्याची कामगिरी इतिहासच करीत असतो, भूतकालांतील पापांचे पर्वत मनुष्यांच्या डोळ्यांपुढे मूर्तिमत आणून उभे करणारा आणि "पहा, याउप्पर जर तुम्ही आपले वर्तन सुधारणार नाहीं, तर हेच पापांचे पर्वत साऱ्या जगापुढे मांडून मी तुमच्या बदनामीचा डंका पिटीत राहीन" असा सडेतोड दम भरणाराही इतिहासच पोटांत एक आणि ओंठांत एक अशा दांभिक गारुड्यांच्या चल्चल् मदारीच्या हातचलाखीने खोट्यानाट्या कल्पनांची धूळ डोळ्यांत गेल्यामुळें राष्ट्र जेव्हां डोळे चोळूं लागतें, व त्यामुळे त्याची प्राणज्योत जेव्हां मिणमिण करू लागते, तेव्हां सिंहासारखी गर्जना करून व राष्ट्राच्या कानांत त्याच्या पूर्व-

संचिताचा दिव्यमंत्र फुंकून त्याला निमिषार्धात सचैतन्य करणारा इतिहासाशिवाय दुसरा कोण समर्थ आहे ?

इतिहास हा अशीं कार्यें करीत असतो आणि अशीं कार्यें क्षात्रक्षेत्रांत आज अत्यावश्यक आहेत, म्हणूनच माझें सर्व लक्ष माझ्या 'इतिहासा'कडे लागून गेले होतें. येनकेनप्रकारेण कसेंबसें मीं आपलें लिखाण तर पूर्ण केलें माझें हस्तलिखित लिखाण जेव्हां पूर्ण झालें तेव्हां मला बहुंशीं आनंद झाला, पण उलटपक्षीं तितकीच भीति वाटूं लागली वाचकांना ह्या माझ्या भीतीचें कोडें कदाचित् सकृद्दर्शनीं उलगडणार नाहीं, आणि म्हणूनच मीही पण त्यांना विनाकारण बुचकाळ्यात न पाडतां माझ्या भीतीचें कोडें मीच उलगडून दाखवितों मला जी भीति वाटत होती ती '**काळाची भीति**' होय इतिहास लिहिण्याच्या अविश्रांत श्रमांमुळे माझें शरीरयत्र इतकें खिळखिळें झाले होतें की, तें केव्हां नेस्तनाबूद होईल याचा कांहीं नियमच राहिला नव्हता माझ्या वयाला यावेळीं ६५ वें वर्ष पूर्ण होऊन ६६ वें वर्ष लागले होतें शरीर जीर्ण झालें होतें जरा ही आ पसरून माझ्यासमोर राक्षसीप्रमाणें दत्त म्हणून उभी होती, शरिरांतील यत्रें आपापली कामें सुरळितपणे चालू ठेवण्यास असमर्थ झालीं होतीं स्पष्ट सांगावयाचें म्हणजे '**म्हातारा निकामी झाला**' अशी स्थिति प्राप्त झाली होती, आणि त्यांतही लेखन, वाचन, मनन, श्रवण, भ्रमण हीं पचमहाभूतें रात्रदिन जखडून माझ्या जीर्ण छातीवर बसून मला इतका बेजार करून सोडीत कीं, दुनियेला आपणांला लवकरच निरोप मागावा लागणार असें मीं भाकित केलें होतें या प्रसगीं–इतिहासलेखनाच्या प्रसंगीं–जनताजनार्दनाच्या चरणयुग्मावर इतिहासरूपी करीरकुसुम अर्पण करण्याचे ऐन प्रसगीं, माझ्या वृद्धपणाच्या शारीरिक अवस्थेला एवढा भयकर झटका बसला होता कीं, अगदीं प्रत्यक्ष माझ्या छातीतून रक्ताचा एक गोलक गडगड करीत येऊन तोंडातून खालीं पडत असे हा प्रकार झाला म्हणजे माझें काळीज चर्रर होई, माझें अवसान फांकून जाई, माझे छक्केपजे सुटून जात व ज्याकरितां आपण या मृतावस्थेला येऊन पोंचलों त्या कार्याचें मधुर व सुरुचिर फल आपणास चाखावयास न मिळताच आपण इहलोक सोडून जाणार अशी कल्पना मनांत येऊन माझें हृदय भडभडून येत असे मला दुसरें तिसरे कांहीं वाईट वाटत नव्हतें, विशेष दुःख तें एवढेच कीं, माझी ही साधीभोळी कृति–इतिहासाचा ग्रथ–जगापुढें न येतां अधारांतच राहाणार व मी जनताजनार्दनाच्या पुण्यमय सेवेस आंचवणार हीच जाणीव माझे हृदय जाळीत होती

अशा चिंताक्रांत अवस्थेत आयुष्याचा एकेक दिन कमी कमी होऊं लागला व त्या बरोबरच माझा 'इतिहास' जगापुढें येण्याचा दिवस जवळ जवळ येऊं लागला अखेर भगवतानें एक सुदिन दाखविलाच त्या सुदिनाचें वर्णन करण्यास दुनियेंतील कोणत्याही कोशांतील शब्द अपुरेच पडणार असल्यानें तो कल्पनातीत महत्त्वाचा सुदिन माझ्या आयुष्यांतील एक महत्त्वाचा सुवर्णदिन होय एवढेंच मी त्याचें बालबोध वर्णन करतों. तो सुदिन इ० सन १९२७ सालांतील एक अलभ्य पर्वदिन होय त्या दिवशीं भगवान्

श्रीकृष्णानें माझा 'इतिहास' एकदम जगापुढें आणला. **'तुका म्हणे येथें करावाचें काम। मग आहे राम जवळीच ॥'** हें तत्त्व त्या दिवशीं मला बालंबाल पटलें. परमेश्वराचे मनांत माझ्याकडून जनतेची थोडीबहुत सेवा करून घ्यावयाची होती, म्हणून परमेश्वरानें आपला वरदहस्त माझ्या शिरावर ठेवून एवढ्याही बिकट प्रसगांतून मला व माझ्या 'इतिहास' अपत्याला शीरसलामत रीतीनें जगत्कांतारीं डुलत राहूं दिले, या असीम कृपेबद्दल मी भगवान् श्रीकृष्णाची कशा रीतीनें प्रार्थना करू तेंच मला समजत नाहीं

माझ्या इतिहासाचें म्हणणें आजपर्यंत हेंच निनादित होत आलेलें आहे कीं, पुराण कालाबद्दल फाजील अभिमान बाळगून, जुनें तेवढें सोनें अशी प्रवृत्ति ठेवून राष्ट्राच्या भूतकालीन पापांच्या पर्वतांवर पांघरूण घालणे म्हणजे नव्या मन्वतराच्या नव्या आशीर्वादास आम्ही अपात्र आहोंत अशी जबानी देणेंच होय दिव्याखालीं अधार हा असावयाचाच, परंतु जेव्हां एखादे राष्ट्र दिव्याच्या उजेडाचाच तेवढा इतिहास पुढें आणतें आणि अंधाराबद्दल जाणूनबुजून अज्ञान दाखवितें, किंवा अधारास उजेडाचें नकली स्वरूप देऊन उजेडास अधारात लपविण्याचा गारुडी थाटाचा प्रयत्न करतें, तेव्हां तें राष्ट्र—त्याची प्राचीन संस्कृति कितीही उज्ज्वल असो—नवीन मन्वतराच्या प्रसादाला पात्र होणें कधींही शक्य नाही इतकेंच नव्हे तर उलट पक्षीं त्याचे नकली गारुड उघडकीस येतांच **'अतो भ्रष्टस्ततो भ्रष्टः'** या म्हणीप्रमाणे त्याचा सर्वस्वीं ऱ्हासच होऊन ते राष्ट्र जगाच्या उपहासास मात्र पात्र होतें म्हणूनच वृथाभिमानास बळी न पडतां खऱ्या खोट्या अशा दोन्ही बाजूनीं छाननी करून व दोन्ही रगाचें चित्र रंगवून इतिहासाचें बाळसेंदार गोंडस स्वरूप जनताजनार्दनाच्या दृष्टोत्पत्तीस आणले पाहिजे

माझा 'क्षत्रियांचा इतिहास' शक्यतोवर मीं असाच ग्रथित केलेला आहे असे माझें मला वाटतें इतरेजनांना, माझ्या प्रिय वाचकाना तो कसा काय वाटला व कसा काय आवडला याचें एकच प्रत्यतर सध्या मजजवळ आहे आणि ते प्रत्यतर म्हटले म्हणजे हेंच की, प्रस्तुतचे आत्मनिवेदन हे माझ्या **इतिहासाच्या दुसऱ्या अवतारा**मागे फक्त एकाच वर्षानतर अवतरलें आहे माझ्या इतिहासाचा पहिला अवतार इ० सन १९२७ मध्ये झाला त्या अवताराचे व्यापकत्व जगदांतरीं विश्वाच्या अफाट पसाऱ्यांत एकाच वर्षांत एक जीव होऊन गेलें आणि आज आता हा पुन्हा दुसरा अवतार दुसऱ्याच वर्षी माझ्या इतिहासाला घ्यावा लागत आहे हा अवतार पहिल्या अवतारापेक्षा काल-मानपरिस्थितीस अनुसरून विशेष मनोहर व हृदयस्पर्शी स्वरूपांत वाचकाच्या अतःकरणाशीं मिलिंदायमान विलीन होईल असा आम्हांला आत्मविश्वास वाटतो हा दुसरा अवतारही जगत्कांतारी आपल्या मधुर परिमळाच्या घमघमाटानें लवकरच तद्रूप होऊन जाईल तर लगेच तिसरा अवतारही अवतरित करण्याचें धाडस आम्ही करू. मात्र तोंपर्यंत आमचा स्वतःचाच अवतार संपणार हीही गोष्ट निर्विवाद आहे!

माझा जो हा इतिहास मी आपल्या वाचकांच्या हातीं देत आहें, तो देतांना माझी त्यांना प्रेमळपणाची एवढीच एक सूचना आहे कीं, माझा इतिहास जर कुणाला तीक्ष्णतेच,

बागुलबुवा दाखवील तर त्या नरपुंगवानें (?) माझा इतिहास खुशाल खालीं ठेवून द्यावा. माझा इतिहास हा 'क्षत्रियांचा इतिहास' आहे, माझा इतिहास हा रक्तमिश्रित प्रतापांचा इतिहास आहे, माझा इतिहास हा समरांगणी रक्तरगण करणाऱ्यांचा इतिहास आहे, माझा इतिहास हा नवचैतन्यसचारक व नवतेजप्रेरक इतिहास आहे आणि म्हणूनच तो तीक्ष्ण आहे, म्हणूनच त्याची तत्त्वें परिणामकारक आहेत, म्हणूनच त्याची उभारणी सजीव आहे व असें आहे म्हणूनच तो 'क्षत्रियांचा इतिहास' आहे जातिवत क्षत्रिय जे नसतील त्यांना माझ्या या इतिहासांत पक्षद्वेषाचें अगर पक्षपातीपणाचें भूतही कदाचित् दिसेल, माझा इतिहास तशांच्या दृष्टीनें कदाचित् कटुही ठरेल आणि माझ्या कृतीवर तशांकडून शिंतोडेही उडविले जातील, परतु,—

**'खळ निंदिति म्हणुनि बुधें टाकावी काय हरिगुणासक्ति?'**

या एकाच तत्त्वाला मी धरून असल्यानें मला त्याचे कांहींच वाटले नाहीं–वाटत नाही व वाटणार नाही मला सत्यतत्त्व जगापुढें माडावयाचें आहे सत्य हें केव्हाही कटु असतें, सत्याचे भोक्ते दुनियेंत फार थोडे लाभतात, असत्याच्या बाजारात सत्याच्या हिऱ्यास काडीचीही किंमत येत नसते, दधिदुग्ध हें घरोघर घेऊन हिंडावे लागतें व दारूचीं पीपेंच्या पिपे बसल्या आसनावर खलास होतात ह्या सर्व गोष्टी मला, तशाच माझ्या क्षत्रिय-बांधवानाही माहीत आहेतच परतु त्यानी तिकडे लक्ष दिले पाहिजे, तिकडे ते वळले पाहिजेत, सत्यतत्त्वाची जाणीव त्यांनी करून घेतली पाहिजे, सत्याकरितां तात्पुरते हाल सहन करून परिणामी त्यापासून लाभणारें सच्चिदानदमयी सौख्य त्यानीं अनुभविलें पाहिजे एवढें त्यांनीं केले म्हणजे माझ्या या श्रमाचे सार्थक झालें मला खलांची पर्वा नाहीं

> कर्पूरधूली रचितालवाल. । कस्तूरिका कुकुमलिप्त देह. ॥
> सुवर्णकुंभै. परिसिंच्यमानो । निज गुणं मुंचति किं पलांडु. ॥

कापराच्या धुळीचें अळें करून, केशरकस्तुरीचा लेप करून, सुवर्णकलशानीं जरी कांद्यास पाणी घातले तरी तो आपला मूळ दर्प सोडणार नाहीं तद्वतच खल हा असाच विचित्र प्राणि आहे कीं, तो स्वयभू दर्पमान् आहे त्याच्यांत केव्हांही पालट होणें शक्य नाहीं आणि म्हणूनच माझ्या या कृतीपासून ज्यांच्या स्वार्थावर कांहीं घाला येण्यासारखा असेल असे काहीं खल माझ्या इतिहासाकडे वक्र दृष्टीनें पाहातीलच तर त्यांना माझा असाच प्रेमळ सदेश मी देत आहे कीं, " बाबांनों ! सत्य हें केव्हांही सत्य आहे, तें दिव्य आहे, त्यांत तुम्ही कृपया एक तर विलीन होऊन जा नाहींतर हा आपला मानवजन्म लवकर उरकून टाकण्याविषयीं भगवताची प्रार्थना करा ! " मात्र हा सदेश स्वार्थी बुद्धीनें प्रेरित झालेल्या खलाकरितांच मुद्दाम 'रजिस्टर्ड' केलेला आहे इतरांनीं अन्य दृष्टीनें जर माझ्या इतिहासाकडे क्रूरदृष्टीनें पाहिलेंच, तर तशी त्यांची दृष्टि होण्यास माझ्या इतिहासांतील असलें नसलेलें सदोषत्व तर कारणीभूत झालें नसेल ना ? असा विचार करून वाटल्यास त्यांचा मी हृदयांतरीं ऋणको होईन

आमचें आत्मनिवेदन आतां जास्त लांबविणें आम्हांला प्रशस्त वाटत नाहीं. कारण

विस्तृत प्रस्तावना, ग्रंथकर्त्याचें दुव्रत व इष्टहेतु, आणि प्रस्तुतचे लांबलेलें आत्मनिवेदन यांनीं पुस्तकाचीं बरींच पानें व्यापून गेलेलीं आहेत शिवाय अनुक्रमणिका, विल्हेवार अनुक्रमणिका वगैरेंचा व्यापही तसाच मोठा आहे शिवाय **क्षत्रियांचा इतिहास— भाग २** या ग्रंथास उपोद्घात लिहिला आहे प्रस्तुत ग्रंथास विल्हेवार अनुक्रमणिका देऊ नये असाही विचार होता, कारण तो एक विचित्र व डोकें कूट करणारा त्रासदायक प्रकार आहे, परंतु ती नसणे हाही एक वाङ्मयभक्ताकडून होणारा वाङ्मयक्षेत्रांतील गुन्हाच समजला जातो ! लॉर्ड कॅम्बेल म्हणतातः—

" . So essential did I consider an index to be to every book, that I proposed to bring a bill into Parliament to deprive an author who publishes a book without an index of the privilege of the copy-right, and moreover to subject him for his offence to a pecuniary penalty " कायद्याचे सक्तीचे भय आपणास नसले तरी कायद्याहूनही श्रेष्ठ असे जे आपले वाचक, त्याच्या अवकृपेचा धाक आम्ही धरला पाहिजे व त्याची सोय पाहाणे पवित्र कर्तव्य मानलें पाहिजे " या दृष्टीनें पाहातां, ग्रंथाला विल्हेवारी अनुक्रमणिका दिली पाहिजेच, तेव्हां हा विस्तार बराच वाढत जाईल म्हणून आतां आत्मनिवेदन शक्य तेवढें आटोपतें घेऊ.

मात्र हीही एक गोष्ट त्याबरोबरच आम्हांला आमच्या वाचकांना सांगावयाची आहे कीं, सगळा पूजाविधि झाल्यानंतर ज्याप्रमाणे आरती करून नंतर त्या विधीची समाप्ती करतात, आरतिशिवाय जसा विधि पद्धतशीर व ईश्वरमान्य होत नाहीं, तद्वतच आमच्या या आत्मनिवेदनाच्या विधीची शेवटची एक महत्त्वदर्शक व पवित्र आरती करणें आम्हांस अगदीं अत्यावश्यक आहे ती आरती केल्याशिवाय आमच्या आत्मनिवेदन-विधीची पूर्तता व्हावयाचीच नाहीं ही आरती कोणची असें जर आमचा अफाट वाचक-वर्ग आम्हांस विचारील, तर आम्ही त्यास हेंच सांगूं कीं, ज्याच्या बहुमोल मदतीनेंच या संपूर्ण ग्रंथाची ही द्वितीयावृत्ति रंगारूपास आली, किंबहुना ज्यांना या **ग्रंथाचे उपसंपादक** या नामाभिधानानें संबोधिले तरच ते अगदी यथार्थ होईल, व नुसत्या अभिनंदनानेंच ज्यांच्या ऋणांतून आम्हाला कदापि मुक्त होता येणार नाहीं, अशा एका सुप्रसिद्ध विद्वान् गृहस्थास ही आरती ओंवाळावयाची असून तिचा परिमळ सर्व वाचकांस अनुभविण्यास लावावयाचा आहे हे सुप्रसिद्ध विद्वान् गृहस्थ म्हटले म्हणजे, शरीरबल-संवर्धन क्षेत्रांतील 'व्यायाम' नामक महाराष्ट्रप्रसिद्ध मासिकांतील उदबोधक अशा अनेक लेखांचे व कवितांचे **सर्वपरिचित लेखक**, नैष्ठिक ब्रह्मचर्य पालन करून योगशास्त्रा-भ्यासपूर्तिप्रीत्यर्थ ज्यांनीं एक वर्षभर अज्ञातवास पत्करून ( नियतकालिकांतून यांची ही प्रतिज्ञा जगजाहीर झाली होती ) आपला अज्ञातवासीपणा सक्रिय रीतीनें सार्थ करून दाखविला असे **अज्ञातवासी**, इच्छाशक्ति (will power), मेन्टल् हीलिंग् सायन्स,

योगशास्त्र आणि ब्रह्मचर्ययुक्त शारीरिक अतुल सामर्थ्य, यांच्या एकीकरणाचे बळावर ज्यांनीं अनेक ठिकाणीं आपल्या आश्चर्यजनक व अद्भुत शक्तीच्या प्रयोग (physical feats) प्रदर्शनानें भरपूर प्रसिद्धि मिळविली असे विख्यात **प्रोफेसर,** ॲस्ट्रॉलजीचा अगदीं सूक्ष्म रीतीनें अभ्यास करून ॲस्ट्रॉलॉजिकल एक्झामिनेशनमध्यें सी पी व बेरार यांतून फर्स्ट नबर येऊन उत्तीर्ण झालेले, **पूना सर्टिफाइड् ॲस्ट्रॉलॉजर** म्हणून जे विख्यात, मेडिकल् एक्झामिनेशनमध्यें उत्तीर्ण झालेले, **कलकत्ता सर्टिफाइड् 'आयुर्वेदमार्तंड' व 'भिषक् शिरोमणि',** म्हणून जे आयुर्वेदशास्त्रपारंगत, शिवाय **'कविरत्न'** (कलकत्ता), **'कविराज', एक्सूपर्ट् इन दि कॅलिग्राफि, महाराष्ट्रांतील सुविख्यात लेखक व प्रतिभासंपन्न कवि, 'इंद्रधनुष्य'** नियतकालिकाचे **कलमबहादर संपादक, गोल्ड् मेडॅलिस्ट्, प्रोफेसर कृष्णमूर्ति डी. पोटफोडे** हे होत श्री० कृष्णमूर्तींनीं आपल्या अविरतोद्योगि अशा महत्त्वाच्या जीवनक्रमात किंचित् काल का होईना, पण माझ्या म्हाताऱ्याच्या सन्मानप्रदर्शनासाठीं, व्यत्यय आणून ह्या ग्रथास आपल्या प्रासादिक लेखणींतून उतरलेल्या मार्मिक व विस्तृत प्रस्तावनेने सालकृत करून देऊन त्याबरोबरच आणखीही या कार्यात त्यांनीं मला जें अत्यत श्रेष्ठ प्रतीचें साहाय्य केलेलें आहे, त्याचें वर्णनही करतां करवत नाही, आणि म्हणूनच केवळ एवढ्याच प्रेमाच्या शब्दानी मी त्याचा उतराई होऊ इच्छितो की, ह्या ग्रथाच्या जगदीकरणाचे श्रेय पुन्हाही एकवार मी त्यांचेकडेच देतों याशिवाय त्यांच्या परिश्रमाची जास्त परिस्फुटता मला करता येत नाही याबद्दल खेद वाटतो

**श्री० द. स. सुळे, संपादक—वऱ्हाड शाळापत्रक,** ह्या गृहस्थानी, शिवायही ज्या ज्या महाशयांनीं, ज्या ज्या विद्वान् महाशयाच्या पुस्तकांनी, मासिकांनी व लेखांनी, आमच्या विचारास चालना देऊन आमच्या कार्यास या परिणत स्वरूपांत आणून सोडले, त्या **सर्वांच्या चरणी आम्ही कृतज्ञतेनें आपला माथा नमवितों.** या पलीकडे हृदयातर्गत प्रेमळ भावनेचे व कृतज्ञबुद्धीचें प्रदर्शन करण्याचा दुसरा कोणताही मार्ग आज तरी आम्हाला आढळत नाही

**'विजय' प्रेसचे चालक श्री० अनंत सखाराम गोखले** यांनी आमच ग्रथ उत्तम रीतीनें छापून देण्याचें मनावर घेतल्यामुळेच इतक्या लवकर हा ग्रथ अशा स्वरूपांत आम्ही आमच्या प्रेमळ वाचकांच्या हाती देण्यास शक्त झालों, म्हणून त्यांचेंही अभिनंदन करणे हें आमचें एक मुख्य काम आम्ही समजतो

शेवटीं ज्या जगन्नियत्यानें 'क्षत्रियाचा इतिहास' **दुसऱ्या अवतारक्षेत्रांत** आज वाचकांच्या हातीं देण्यास आम्हांस सर्वतोपरी शक्त केले, त्याच्या चरणकमलीं अनन्यभावें अनेकवार माथा नमवून व पुढेंही जनताजनार्दनाची सेवा करण्यास आम्हांस समर्थ कर अशी त्याची नम्र प्रार्थना त्रिवार भाकून, ग्रंथाच्या सदोषत्वाविषयीं आमच्या वाचकांस आमची हीच नम्र अनुप्रार्थना आहे कीं,—

**चुकत वाकत आठवलें । इतुकें संकलित बोलिलें ।**
**न्यून पूर्ण क्षमा केलें । पाहिजे श्रोतीं ॥**

तद्वतच आमच्या प्रेमळ वाचकांना आमच्या **आत्मनिवेदनांतील रहस्य** आम्ही संत तुकोबारायांचे पुण्यमय पण साध्याभोळ्या शब्दांतच असें कथन करितों कीं,—

**काय म्यां पामरें बोलावीं उत्तरें ।**
**परि त्या विश्वंभरें बोलविलें ॥**

सर्वांचा नम्र सेवक

**ग्रंथकर्ता.**



# क्षत्रियांचा इतिहास

## भाग पहिला

### प्रकरण पहिलें

## 'क्षत्रिय' शब्दाची व्युत्पत्ति, व्याप्ति व महती

१ मूळ शब्द कोणता ?
२ 'क्षत्रिय' शब्दाची पहिली स्थूल व्युत्पत्ति.
३ 'क्षत्रिय' शब्दाची दुसरी स्थूल व्युत्पत्ति.
४ 'क्षत्रिय' शब्दाची तिसरी स्थूल व्युत्पत्ति.
५ 'क्षत्रिय' शब्दाची चवथी स्थूल व्युत्पत्ति.
६ 'क्षत्रिय' शब्दाची सार्थ व्युत्पत्ति

**१ मूळशब्द कोणता ?**—'क्षत्रिय' या शब्दाची व्युत्पत्ति लावण्याचेपूर्वी 'क्षत्रिय' हा शब्द स्वयंभू बनलेला आहे की दुसऱ्या कोणत्या शब्दाच्या घटनेवरून घटित झालेला आहे हे पाहाणे अत्यावश्यक आहे त्याशिवाय 'क्षत्रिय' शब्दाची यथायोग्य व्युत्पत्ति लागणे शक्य नाही आणि म्हणूनच प्रथम 'क्षत्रिय' शब्दाच्या मूळस्वरूपाकडे जिज्ञासूंनीं आपली दृष्टि फिरविणे वास्तव होणार आहे 'क्षत्रिय' शब्दाचा या दृष्टीनें विचार करूं लागलों असता, हा शब्द स्वयंभू बनलेला नसून दुसऱ्या एखाद्या शब्दप्रयोगाचे तें घटित रूप आहे असें तज्ज्ञांच्या निदर्शनास तेव्हांच आल्यावांचून राहात नाहीं

'मननीय', 'दर्शनीय', स्पर्शनीय', 'सहनीय', 'आत्मीय', 'सजातीय', 'विजातीय', 'स्पृहणीय', इत्यादि शब्दप्रयोग जसे मूळ शब्दाच्या घटित घटनेने झालेले आहेत, म्हणजे 'मनन' शब्दापासून 'मननीय', 'दर्शन', शब्दापासून 'दर्शनीय', 'स्पर्शन', शब्दापासून 'स्पर्शनीय', 'सहन' शब्दापासून 'सहनीय' 'आत्म' शब्दापासून 'आत्मीय', 'सजात' शब्दापासून 'सजातीय', 'विजात' शब्दापासून 'विजातीय', 'स्पृह' शब्दापासून 'स्पृहणीय' अशीं जीं ही शब्दरूपे झालेलीं आहेत, त्याचप्रमाणे 'क्षत्रिय' हा शब्दही मूळच्या एका शब्दापासून झाला असून तो शब्द म्हटला म्हणजे **'क्षत्र'** हा होय **'क्षत्र'** शब्दाचें घटितरूप **'क्षत्रिय'** असें झालें आहे अर्थातच 'क्षत्रिय' या शब्दाची व्युत्पत्ति लावतांना

प्रामुख्याने '**क्षत्र**' शब्दासंबंधानेंच विशेष विचार करणें वास्तव आहे. 'क्षत्रिय' शब्दांतर्गत् '**क्षत्र**' हा शब्दच मुख्य असल्याने अनेक ठिकाणीं या शब्दानेंच क्षत्रियांस संबोधिलेले आहे जसें:—

" ब्राह्मवा* इदमग्रे आसीदेकमेव तदेक सन्न भवत
तच्छ्रेयो रूपम् आत्म सृजत् क्षत्र "

" न प्राक् त्वत्त. पुराविद्या ब्राह्मणान्गच्छति। तस्मादु सर्वेषु लोकेषु **क्षत्रस्यैव** प्रशासनमभूत "¶

" कदा **क्षत्रश्रियं** नरमा वरुणं करामहे "†

" ब्राह्मणाः सश्रिता· **क्षत्रं** न **क्षत्रे** ब्राह्मणाश्रित "‡

" तस्मात् **क्षत्रात्** परन्नास्ति "§

इत्यादि अनेक वचने डोळ्यांसमोर ठेविली असता त्यामधून '**क्षत्र**' शब्दाचाच उल्लेख केलेला आढळून येतो तेव्हा व्युत्पत्ति प्रतिपादनार्थ हा '**क्षत्र**' शब्दच घेणे श्रेयस्कर व भाषाशास्त्राच्या दृष्टीने योग्य आहे याप्रमाणें एक वेळ 'क्षत्रिय' शब्दांतर्गत मूळ शब्द ठरल्यावर आता त्याच्या व्युत्पत्तीचें निवेदन करण्याचे काम राहिलें परतु तत्पूर्वी 'क्षत्रिय' शब्दासबधी ज्या काही दोनचार प्रचालित स्थूल व्युत्पत्त्या लावण्यात आल्या आहेत त्याचा ओझरता उल्लेख करणे श्रेयस्कर आहे म्हणजे पुढे सूक्ष्म व्युत्पत्तीच्या विवेचनाचा मार्ग जास्त सुकर होईल

**२ 'क्षत्रिय' शब्दाची पहिली स्थूल व्युत्पत्ति**—'क्षत्रिय' शब्दाची व्युत्पत्ति लावताना काही ग्रथकर्त्यांनी ती खालीलप्रमाणे लाविली आहे

'क्षत्रिय' या शब्दात मूळ धातु '**क्षद्**' किंवा '**क्षत्**' अर्थातच 'क्षत' या सस्कृत शब्दाचा अर्थ **जखम, घाव, व्रण,** असा असल्याने 'क्षत्रिय' या शब्दाचा अर्थ **जखमा करणारा, घाव करणारा, व्रण करणारा, हिंसा करणारा, कापाकापी करणारा** असा जो तो क्षत्रिय ही 'क्षत्रिय' शब्दाची एक प्रकारची व्युत्पत्ति झाली ! या व्युत्पत्तीसबधाने विचार करता, भाषाशास्त्र व व्यवहारशास्त्र या दोहोंसही झुगारून देणारी अशी ही निखालस चुकीची व्युत्पत्ति आहे असे स्पष्ट होते भाषाशास्त्रदृष्ट्या विचार करता, 'क्षत्रिय' या शब्दामधून 'क्षत्' किंवा 'क्षद्' धातू काढल्यावर बाकीचें जे त्या शब्दामधील शेष रूप कायम राहातें तें अगदींच निरर्थक व भिसाडभरतीप्रमाणे विकृत घटनेंत अस्तित्वात राहातें 'क्षत्रिय' शब्दामधून 'क्षत' असा एक स्वतत्र घटक

---

* बृहदारण्यकउपनिषद्, अ. ४, काण्ड ११

¶ छांदोग्य उपनिषद.

† ऋग्वेद, मंडल १

‡ कार्तवीर्य उपाख्यान १५३-१७-१८

§ शतपथब्राह्मण, १४-४-२-२६.

काढला म्हणजे अवशेष शब्दघटना जी राहील ती 'रिय' अशी विकृतावस्थेत राहाते. या 'रिय' शब्दाचा कोणताही अर्थ करून तो या व्युत्पत्तिसिद्धकरणप्रसंगीं उपयोगांत आणल्याचे दिसत नाही म्हणजे ही व्युत्पत्ति लावतांना फक्त 'क्षद' किंवा 'क्षत्' एवढ्याच शब्दावर काय ती सगळी भिस्त ठेवण्यात येऊन बाकीचे रूपास अजिबात फाटा देण्यांत आला असल्यानें भाषाशास्त्रदृष्ट्या ही व्युत्पत्ति कुचकामाची ठरविल्यावांचून गत्यतरच राहात नाही हे या व्युत्पत्तीमधील भाषाशास्त्रासंबंधाने झालें व्यावहारिक दृष्ट्या तरी ही व्युत्पत्ति कितपत विश्वसनीय व निःपक्षपातीपणाची वाटते हें पाहूं गेलो असतां, 'क्षत्रिय' म्हणजे जखमा करणारा, घाव करणारा, हिंसा करणारा असा एक घातकी जीव आहे असे ठरते ! ! अर्थातच—

" **महो*त्साहा महात्मानो धार्मिकाः सत्यवादिनाः ।**
**प्रियदर्शना वपुष्मन्तो महावीर्य्यो धनुर्धरा ॥**
**वराही युधिजायन्ते क्षत्रियाः शूरसत्तमा ।**
**त्रेतायां क्षत्रिया राजन् सर्वे वै चक्रवर्तिनः ॥** "

अशी जी महाभारतामध्यें **क्षत्रियांची मुक्तकंठरवानें स्तुति** केलेली आहे, अत्यत उत्साही, उदारवृत्तियुक्त, धर्मनिष्ठ, सत्यभाषी व सत्याभिलाषी, दर्शनीय, वीर्यवान्, बलसपन्न, धनुर्विद्यापारंगत आणि शौर्यमेरु अशी जी यथायोग्य क्षत्रिय गुणधर्मप्रणालि महाभारतामध्ये निर्विकल्पनेनें वर्णिलेली आहे, तिच्यावर या उपरिनिर्दिष्ट 'क्षत्रिय' शब्दाच्या व्युत्पत्तीने अगदी अथेतिपर्यंत बोळा फिरविण्याचा अव्यवहार्य खटाटोप केला असल्याचे स्पष्ट दिसून येते केवढा देदीप्यमान् तो **क्षात्रवश**, आणि त्याची सभावना घातकी अशा अर्थाने अभिप्रेत असलेल्या व्युत्पत्तिप्रकथनानें व्हावी हे एक नवेच आश्चर्य **आहे** असे म्हटल्यावाचून राहावत नाही या व्युत्पत्तिप्रकारावर जास्त टीका करण्याचे कारण नाही वड मेंदूचा कोणताही प्राकृत मनुष्यसुद्धा 'क्षत्रिय' शब्दाची ही व्युत्पत्ति कबूल करील की नाही हा प्रश्न नकारार्थी उत्तरानेच मडित होऊन येईल यात शका नाहीं

आतां अशीच एक दुसऱ्या प्रकारची प्रचलित **स्थूल** व्युत्पत्ति घेऊ—

**३ 'क्षत्रिय' शब्दाची दुसरी स्थूल व्युत्पत्ति**— काही लेखकानी क्षत्रिय शब्दाची व्युत्पत्ति अशी लावली आहे की,

**'क्षतात्त्रीयते† सः क्षत्रिय '**

या व्युत्पत्तिसशोधकानेही **'क्षत्रिय'** या शब्दातून **'क्षत्'** हा धातु बाहेर काढलाच, पण पुढे **'त्रीयते'** (?) म्हणजे तारण करणारा, रक्षण करणारा, तारणारा, या कपोलकल्पित अर्थाच्या शब्दाची योजना करून **'क्षतात्त्रीयते'** म्हणजे क्षत्=सकट, व

---

* महाभारत—क्षात्रधर्म ।

† रघुवश, द्वितीयसर्ग

त्रीयते=तारणारा, संकटापासून तारणारा, रक्षण करणारा असा जो तो क्षत्रिय, अशी 'क्षत्रिय' शब्दाची व्युत्पत्ति लाविली आहे हा 'क्षत्रिय' या शब्दाच्या व्युत्पत्तीचा दुसरा एक स्थूलप्रकार झाला !

या व्युत्पत्तिप्रकारासबधानें पाहूं गेलों असतां, क्षत्+त्रीयते=संकटाचें निवारण करणारा असा जो तो क्षत्रिय (?) असा ओढून ताणून आणलेला हा शब्दार्थप्रकार होय. या व्युत्पत्तिप्रकारांत 'क्षत्' शब्दाचा अर्थ संकट असा उत्पादित केलेला आहे व पुढें 'त्रीयते' हा शब्दप्रयोग तेथे योजून त्याचा सरसकट अर्थ सकटाचे निवारण करणारा असा योजिला आहे वस्तुस्थितीशीं समरस होईल अशा तऱ्हेचा जरी ही व्युत्पत्ति लावण्याचा विचार असला, तरी 'क्षत्रिय' शब्दामधून 'क्षत' हा धातु स्वतत्र काढून घेतल्या वर पुढील अवशेष शब्दरचना सार्थ करून दाखविण्याकरितां 'त्रीयते' हा शब्दप्रयोग जो नियोजित केला आहे तो चमत्कारिक वाटतो आणि त्यातल्या त्यांत 'क्षत्रिय' शब्द-घटनातर्गत 'क्षत्र' हा मूळ शब्द अभिप्रेरित असल्यामुळें तर ही व्युत्पत्ति अगदींच सकुचित वाटल्याशिवाय राहात नाही कारण 'क्षत्र' हा शब्द घेऊन त्याचे रूपकावरून जर अशा तऱ्हेची व्युत्पत्ति लावण्याचा प्रयत्न केला तर तो सफल होणे कठिण आहे. अर्थातच भाषाशास्त्राचे दृष्टीने सूक्ष्मरीत्या चिकित्सा केली असतां ही व्युत्पत्ति लगडी पडल्यावाचून राहात नाही व्यावहारिकदृष्ट्या या व्युत्पत्तीचा विचार केला असतां, सकटापासून रक्षण करणाराच जर क्षत्रिय होत असेल तर डोक्यावर अपघात होऊ नये म्हणून त्याचे रक्षण करण्यास तत्पर असलेल्या फेटयास, पटक्यास, पगडीस अगर टोपी-सही 'क्षत्रिय' म्हणता येईल ! कारण सकटापासून रक्षण करण्याचे कार्य उपरिनिर्दिष्ट वस्तूही करीत असतात एवढेच नव्हे तर 'क्षत्रिय' शब्दाचा अभिप्रेत अर्थ जर 'सकटा-पासून रक्षण करणारा' एवढाच असू शकेल तर राहाण्याचे घर, हातातील वेताची छडी, छत्री, योद्ध्याच्या अगावरील चिलखत, लढाईचे वेळात उपयोगात येणारी ढाल, चोरांच्या मुठीतील जबिया इत्यादि सकटनिवारणतत्पर वस्तूना क्षत्रियप्रणालीत बरेच उच्चस्थान द्यावे लागेल ! परतु असें होणे शक्य नसल्यामुळे 'क्षत्रिय' शब्दाची ही व्युत्पत्तीही गोष्पदमुद्रातर्गत जलवत् अपूर्ण व असमाधानकारक आहे

या व्युत्पत्तीप्रमाणेच पण किंचित् फरकाने आणखी एक निराळ्याच प्रकारची 'क्षत्रिय' शब्दाची व्युत्पत्ति लावण्यात येते ती खालीलप्रमाणे.—

**४ 'क्षत्रिय' शब्दाची तिसरी स्थूल व्युत्पत्ति**—'क्षत्' म्हणजे जखम, घाव, आघात, शरीरावयवावर कांही विवक्षित कारणानें पडलेली छिद्रे, आणि 'त्रीयते' म्हणजे रक्षण करणारा अर्थात् 'क्षत्रिय' म्हणजे जखमेपासून, घावापासून, आघातापासून रक्षण करणारा असाही एक व्युत्पत्तिप्रकार आहे ! दुसऱ्या प्रकारची जी व्युत्पत्ति मागे वर्णन केलेली आहे त्याच धोरणाची ही एक 'क्षत्रिय' शब्दाची आणखी तिसऱ्या प्रकारची व्युत्पत्ति आहे पदच्छेद, रूपच्छेद, शब्दच्छेद इत्यादि सर्व बाबतींत दुसऱ्या प्रकारच्या व्युत्पत्तीशीं

ही व्युत्पत्ति तंतोतंत जुळते. परंतु अर्थभेदानें मात्र ह्या व्युत्पत्तिकरणाचा एक स्वतंत्र प्रकार घडतो 'क्षत्रिय' शब्दाची व्युत्पत्ति लावतांना क्षत्+त्रीयते असाच शब्दप्रयोग (बहुधा हा दुसऱ्या प्रकारच्या व्युत्पत्तिप्रकथनावरूनच थोड्या फेरफारानें कोणास सुचला असावा ) येथेंही केलेला आहे, परंतु या ठिकाणीं 'क्षत्' शब्दाचा अर्थ जखम, घाव, शरीरावरील व्रण अगर भेद अशा अर्थी योजिलेला असून तो शब्द भाषाशास्त्राचे दृष्टीनें त्या त्या अर्थाचा अभिप्रेरित आहे हीही गोष्ट कबूल करण्यास माघार घेता यावयाची नाहीं उदाहरणार्थ—'उरक्षत्' नामक एक रोग असून त्यामध्यें छातीच्या अतर्विभागीं एक प्रकारची पीडा दणारी जखम, खाडुक उत्पन्न होत असते येथे 'क्षत' हा शब्द जखमा खांडुक, भेद, गळू इत्यादि शब्दाचा पर्यायशब्द म्हणूनच योजिला आहे, व तो योग्य आहे सारांश, 'क्षत' म्हणजे जखम, घाव हें ठीक झालें, परतु पुढें 'त्रीयते' हा तारण करणारा, रक्षण करणारा, बचावणारा, या अर्थाचा जो शब्द योजिला आहे त्याची योजना करताच दुधात मिठाचा खडा पडल्याप्रमाणें होऊन सारेंच प्रकरण ब्रह्मघोंटाळ्यात पडतें, कारण 'क्षत्' म्हणजे जखम आणि त्यापुढें 'त्रीयते' म्हणजे तारण करणारा अर्थात 'जखमे पासून तारणारा' जो तो क्षत्रिय अशी ही व्युत्पत्ति लावावी लागते

ज्या महान् प्रतापी व रणशार्दूल वीरपुगवाना धारातीर्थी पतन पावण्यांतच स्वर्ग सुखाचा आनद वाटतो, वाटेल तशा बलाढ्य शत्रूशी सामना करून आपल्या कमरेच्या समशेरीचें तेज.पुज पाणी जोखून पाहाण्याचें ज्याना व्यसनच लागलेलें असतें, रिपूचा कठ-नाळ चरचरा चिरून आपल्या शरीरातील रक्ताचाही अभिषेक त्याना आनदपूर्ण वृत्तीनें घालण्यास ज्याची मनोदेवता उत्सुक असते आणि मर्दपणाने 'जय हरहर' म्हणून समरांगणावरील धुमश्चक्रीत आपल्या स्वत च्या शरीरावरील भगवा रुधिरप्रवाह आनदाने बघण्यात ज्याना आयुष्यसार्थक्य वाटत असते, ते क्षत्रिय मर्द योद्धे जखमा देणें आणि जखमा घेणे याची कधी तरी पर्वा ठेवू शकतील काय ? जखमेपासून तारणारे, जखमेचें निवारण करणारे असे गालबोट क्षत्रिय वीरपुगवाना तरी लावणें श्रेयस्कर होणार नाहीं समरागणावर शत्रूशी धुमश्चक्री चालू असता केवळ जखमेपासून तारण्याचें, जखमेचे निवारण करण्याचेंच जर ते काम करीत राहिले असते तर त्याचा एवढा कीर्ति डिंडिम सर्वत्र—त्रैलोक्यीं—गाजलाच नसता कारण केवळ स्वतःच्या प्राणाची पर्वा करून, स्वतःच्या शरीराचा जखमेपासून साभाळ करून जर कोणीही कोणतीही क्रान्ति घडवून आणण्याचे मनावर घेईल तर तें केव्हांही शक्य होणार नाही मग मर्द क्षत्रियांनी तर अलौकिक कार्यें घडवून आणली आहेत, तीं काय केवळ जखमेपासून स्वत च्या शरिराचा सांभाळ करूनच ! अर्थातच क्षात्रधर्म ही गोष्ट केव्हांही कबूल करणार नाही आणि म्हणूनच तात्पुरती योजिलेली ही व्युत्पत्ति 'क्षत्रिय' शब्दास लागू पडत नाही या व्युत्पत्ती-संबंधानें ही क्षात्रवृत्तिविरोधी गोष्ट क्षणभर जरा बाजूला ठेवून सर्वसामान्य व्यावहारिक दृष्ट्या तत्संबधीं विचार केला तरीही पण अगिकृत व्यवहारकार्य करीत असताना तत्संबधीं देवाण—घेवाण झाल्यावाचून तें कार्य चालणेंच शक्य नाहीं, तें कसें तें पाहा समरभूमीवर

वीरांशीं दोन दोन हात करताना 'जखमेपासून तारण करणें' मोठ्या मुष्किलीचें होऊन बसेल. शिवाय क्षत्रिय वीरांना जखमा होणें, वार लागणें ही गोष्ट लांछनास्पद नसून उलट त्यांच्या क्षात्रतेजाच्या दैदीप्यमान वृत्तीची स्पष्ट निदर्शकच असते मग क्षत्रिय हे 'जखमेपासून तारणारे' असा सिद्धान्त ठोकून देऊन अव्यवहार्यतेचा आक्षेप वरील व्युत्पत्ति लावून आपल्या शिरावर का ठसवून घ्यावा ? 'क्षत्रिय' शब्दाची व्युत्पत्ति 'जखमेपासून निवारण करणारा' अशा अर्थाची जर लागली, तर व्यापारी शब्दाची व्युत्पत्ति 'ग्राहका-पासून निवारण करणारा' अशी लावावी लागेल ! व्यापाऱ्याला जसें ग्राहकांवाचून शून्य वत् भासेल, तसेंच जखमाची देवाण-घेवाण करणाऱ्या क्षत्रियांनाही समरांगणांतील व्यापारात जखमांना डरून चालणार नाहीं जखमा ह्याच क्षत्रिय वीरांच्या आनंदोत्साह-लहरी होत म्हणूनच ही दोन व्युत्पत्ति क्षत्रियाना लावणें श्रेयस्कर नव्हे

यापेक्षां निराळ्याच तऱ्हेने आणखीही 'क्षत्रिय' शब्दाची एक व्युत्पत्ति लावण्यात येते तिचाही निदेश करणे आवश्यक आहे

**९ 'क्षत्रिय' शब्दाची चवथी स्थूल व्युत्पत्ति —'क्षेत्रात् रमते सः क्षेत्रियः'** अशा न्यायाची ही व्युत्पत्ति असून तिचे सरळ विवेचन असें आहे कीं, **'क्षेत्र'** म्हणजे शेत, यामध्यें सतत रममाण होत्साता शेतीविषयक म्हणजेच कृषिकर्म विषयक कर्तव्यास जो आचरतो तो **क्षेत्रिय** म्हणजे कुळबी, अथवा **'क्षेत्र'** म्हणजे रणक्षेत्र, समरागण, धारातीर्थ, युद्धभूमि, लढाईचें मैदान यांमध्यें जो रममाण होणारा तो क्षत्रिय ऊर्फ क्षेत्रिय, हा एक 'क्षत्रिय' शब्दाच्या व्युत्पत्तीचा प्रकार प्रचलित दिसतो !

'क्षेत्रिय' हा मूळ शब्द धरल्यावर, 'क्षेत्र+इय' अशा घटनेनें मूळच्या शब्दाचें रूप 'क्षत्रिय' बदलून **'क्षेत्रीय'** असें होते

**'क्षेत्रीय'** या शब्दामधून **क्षेत्र** हा स्वतत्र शब्द काढून ठेवल्यावर उरलेल्या तदतर्गत **ईय** या प्रत्ययाचा अर्थ तत्सबधीं असा होतो अर्थात क्षेत्रीय म्हणजे, क्षेत्रासबंधींचा— क्षेत्राशीं सबध ठेवणारा, असा अर्थ झाला क्षेत्र म्हणजे रणक्षेत्र, अर्थात रणक्षेत्राशी संबंध ठेवणारा तो क्षेत्रीय किंवा क्षत्रिय असा त्याचा एकप्रकारे अर्थ होतो दुसरा अर्थ,—क्षेत्र म्हणजे शेत, आणि क्षेत्रीय म्हणजे शेतासबधीचा, शेताशी एकजीव होणारा अर्थात् शेतकरी—कुळबो **कुळंबी** हा शब्द **कुळंबीजं** या सस्कृत शब्दाचे पर्यायिरूप आहे. कुळांचे जे बीज तें **कुळबीज बीज** आणि **बी** हे दोन्ही शब्द एकाच अर्थी वापरतात, म्हणून कुळबीज या सस्कृत शब्दाचे—कुळबीज—कुळंबी—असे प्राकृतरूप अगदी सरळ—सार्थ— व भाषाशास्त्र आणि व्याकरणशास्त्र याच्या आधारें अगदी यथार्थ आहे कुळंबी मराठा क्षत्रियाच्या मुख्य शहाण्णव कुळांचें जे **बी** तेंच **कुळंबी** क्षत्रियांच्या शहाण्णव कुळांचें मूळ खरें बीज आर्य-क्षत्रिय आहेत ही इतिहासप्रसिद्ध गोष्ट सर्वांस माहीतच आहे यावरून कुळबी म्हणजे आर्य-क्षत्रिय हा स्पष्ट अर्थ निर्विवाद सिद्ध झाला आर्य-क्षत्रियांनीं आर्यावर्तांत येऊन प्रथम जगलें तोडून व शेती करूनच आपला अंमल बसविला, व नंतर राज्यें स्थापन केलीं, ही गोष्ट इतिहासप्रसिद्ध आहे शे ती करणें हा आर्य क्षत्रियांचा मूळ उद्यम

धर्म होता. आजचा कुळंबी शेतकरी आपल्या आर्य-पूर्वजांच्या धंद्यास धरूनच आहे आणि म्हणून तो गुणकर्मांनें व प्रत्यक्ष आचरणानें आर्य क्षत्रिय आहे ही खरी गोष्ट वरील पुराव्यानें सप्रमाण सिद्ध होते शांततेच्या काळीं क्षेत्रीय म्हणजे शेतकरी आणि लढाईच्या वेळीं क्षत्रिय म्हणजे रणधुरंधर योद्धा हें गुणवैशिष्ट्य कुळंबी–मराठा–क्षत्रियांत आजहीं मूर्तिमत दिसून येतें

**६ क्षत्रिय शब्दाची सार्थ व्युत्पत्ति**—वर चार प्रकारें क्षत्रिय शब्दाची व्युत्पत्ति सांगितली तरी पण सर्वांत सत्य, सूक्ष्म आणि अत्यंत उच्चतम अशा पुढें दिलेल्या व्युत्पत्तीशीं वरील सर्व व्युत्पत्तींची तुलना केली म्हणजे, हिऱ्यापुढें गारगोटी-प्रमाणेंच वरील सर्व व्युत्पत्तींची तुलना ठरते 'क्षत्रिय' या थोर शब्दाची व्युत्पत्ति त्यांच्या अलौकिक तेजाप्रमाणेंच तेजस्वितादर्शक आणि प्रभावशाली आहे **सूर्यप्रकाशा**प्रमाणे 'क्षत्रिय' शब्दाची व्युत्पत्ति स्पष्ट–अगदीं स्पष्ट–आहे त्या व्युत्पत्ती-करितां शब्दांची ओढाताण नको, अर्थविपर्यास नको, किंवा अव्यवहार्य तत्त्वांची अगी कृति नको क्षत्रियांचे वृत्तीसबधाने असा उल्लेख आहे कीं:—

> **तपत्यादित्य** वच्चैष चक्षुंषि च मनांसि च ।
> न चैव भुवि शक्नोति कश्चिदप्यभिविक्षितु ॥
> सोऽग्निवताति वायुश्च **सोर्कः सोमः** सधर्मराट् ।
> सकुबेरः स वरुणः स महेंद्रः प्रभावतः ॥ १ ॥

—मनु०, अ. ७

भावार्थ.—क्षत्रियाचें तेज एवढे **प्रखर** आणि **दैदीप्यमान** आहे कीं, या नवखंड पृथ्वीवरील कोणताही मानवी प्राणि, कोणताही व कसाही प्रतापी मनुष्य, त्याच्या **तेजस्वितेसमोर** उभा राहू शकत नाहीं क्षत्रियाचें प्रखर **तेज तप्त सूर्याप्रमाणें** जाज्वल्य असल्यामुळें इतरांच्या दुर्बल मनास व चक्षूस ते असह्य भासतें क्षत्रिय हा अग्नि, वायु, **सूर्य आणि चंद्र** यांचे प्रतिस्वरूप असून धर्मन्यायी आहे कुबेर, वरुण, महेंद्र याच्याप्रमाणे तो प्रभावशाली आहे

याप्रमाणे क्षत्रियवृत्तीची भूमिका असून अर्थातच 'क्षत्रिय' शब्दाची व्युत्पत्तीही त्याच अर्थाची असली पाहिजे आणि ती तशीच आहेही, हे निम्नलिखित प्रमाणावरून स्पष्ट कळून आल्याशिवाय राहात नाहीं

**क्षत्रिय** हा मूळचा स्वतत्र शब्द नसून तो '**क्षत्र**' या शब्दापासून विशिष्ट रूप पावला आहे, हे वर विस्तारपूर्वक प्रतिपादिले असल्यानें येथें पुन्हा द्विरुक्ति नको आतां. या '**क्षत्र**' शब्दाची सार्थ व्युत्पत्ति आपणांस पाहावयाची आहे '**क्षत्र**' हा शब्द सस्कृत भाषेंतील असून '**क्षत्र**' या शब्दाचा स्पष्ट अर्थ '**आकाशस्थित**' असा निष्पन्न होतो संस्कृत भाषेत **एकाक्षरी** असे जे कांहीं शब्दप्रयोग रूढ आहेत, त्यांपैकींच '**क्ष**' हाही संस्कृत भाषेंतील **एकाक्षरी** शब्दप्रयोग आहे. जसें, 'अ' हा एकाक्षरी शब्दाचा अर्थ '**नाहीं**'

असा होतो, 'आ' ह्या एकाक्षरी शब्दाचा अर्थ 'पर्यंत' असा होतो, 'कु' ह्या एकाक्षरी शब्दाचा अर्थ 'वाईट' असा होतो, 'ख' अगर 'क्ष' ह्या एकाक्षरी शब्दाचा अर्थ '**आकाश**' असा होतो, 'ग' ह्या एकाक्षरी शब्दाचा अर्थ 'गमन करणारा' असा होतो 'ज' ह्या एकाक्षरी शब्दाचा अर्थ-'जन्म' असा होतो, '**त्र**' ह्या एकाक्षरी शब्दाचा अर्थ '**स्थित**' असा होतो, 'द' ह्या एकाक्षरी शब्दाचा अर्थ 'देणे' या अर्थी होतो, 'धी' ह्या एकाक्षरी शब्दाचा अर्थ 'बुद्धि' असा होतो, 'न' ह्या एकाक्षरी शब्दाचा अर्थ 'नाहीं' असा होतो, 'प्र' ह्या एकाक्षरी शब्दाचा अर्थ 'फार' असा होतो, 'भ' ह्या एकाक्षरी शब्दाचा अर्थ 'नक्षत्र' असा होतो, 'स' ह्या एकाक्षरी शब्दाचा अर्थ 'सहित' असा होतो, 'ज्ञ' ह्या एकाक्षरी शब्दाचा अर्थ 'जाणणारा' असा होतो, 'स्थ' ह्या एकाक्षरी शब्दाचा अर्थ 'स्थित' असा होतो, 'गो' ह्या एकाक्षरी शब्दाचा अर्थ 'गाय' असा होतो इ०....

याप्रमाणें संस्कृत भाषेमधील जसे अनेक एकाक्षरी सार्थ शब्दप्रयोग आहेत; तसाच 'क्षत्र' हा संस्कृत शब्दही दोन संस्कृत एकाक्षरी शब्दाच्या सम्मीलनाने बनलेला संयुक्त शब्द आहे दोन एकाक्षरी शब्दांच्या सम्मीलनानें बनलेले असे अनेक शब्द संस्कृतज्ञास संस्कृत भाषेंत आढळून येतात आता 'क्षत्र' ह्या **दोन एकाक्षरी संस्कृत शब्द संमीलित** शब्दांतर्गत अर्थाचा विचार करणे क्रमप्राप्त आहे तत्संबधी विचार करतां 'क्ष' म्हणजे '**आकाश**' ( अगर* ख' म्हणजे आकाश ) आणि '**त्र**' म्हणजे '**स्थित**' असे या दोन शब्दांचे अनुक्रमें अर्थ आहेत 'त्र' म्हणजे स्थित असणारे --जसें सर्वत्र, अन्यत्र, म्हणजे सर्व ठिकाणी, अन्य ठिकाणीं स्थित असणारे तेंव्हा अर्थातच 'क्षत्र' या संस्कृत शब्दाचा स्पष्ट अर्थ '**आकाशस्थित**' असा सिद्ध झाला 'आकाशस्थित', 'खस्थ', इत्यादि शब्दही संस्कृत मिश्रितच असल्याने शुद्ध मराठी भाषेत आणि सरळ व साध्या अशा रीतीनें जर 'क्षत्र' ह्या **संस्कृत भाषेतील शब्दाचा** अर्थ करू गेलों तर तो '**आकाशामध्यें राहाणारे**' असा होतो याप्रमाणे 'क्षत्रिय' शब्दातर्गत मूळ 'क्षत्र' या संस्कृत शब्दाचा स्पष्टार्थ आहे 'क्षत्र' या मूळ शब्दापासूनच 'क्षत्रिय' असें रूप बनलें असल्यानें 'क्षत्रिय' शब्दातून 'क्षत्र' हा शब्द स्वतंत्र झाल्यावर मग 'क्षत्र+इय' या पैकीं 'इय' ह्या प्रत्ययाचा विचार करणे क्रमप्राप्तच आहे

'दर्शन+इय' अशा शब्द-प्रत्ययीकरणाने दर्शनीय म्हणजे दर्शनोचित अगर दर्शन संबंधीं योग्य अशा अर्थानें अभिप्रेरित असलेला 'दर्शनीय' शब्द तयार झाला, 'अनुकरण+इय' अशा शब्द-प्रत्ययीकरणानें 'अनुकरणसंबधीं योग्य', अशा अर्थाने अभिप्रेरित

---

* 'क्ष' आणि 'ख' हे शब्द संस्कृत भाषेत एकाच अर्थी म्हणजे परस्पराचे पर्याय शब्द या भावानें योजितात '**खकारो क्षकारो** भेदनास्ति' हा संस्कृत भाषेचा एक नियम आहे व्यवहारातही 'क्ष' आणि 'ख' हे शब्द परस्पराच्या पर्यायार्थी योजितात असें-'**लखमीचंद**', '**खत्री**', '**खार**', '**खीर**', '**खौर**', '**खेमराज**', '**अलख**' इ०.

असलेला 'अनुकरणीय' हा शब्द तयार झाला, याचप्रमाणे **मननसंबंधीं योग्य अशा अर्थाचा** 'मननीय' ( मनन+ईय ), स्पर्शनसबधीं योग्य अशा अर्थाचा '**स्पर्शनीय**' ( **स्पर्शन + ईय** ), स्मरणसबंधीं योग्य अशा अर्थाचा 'स्मरणीय' ( स्मरण + ईय ) इत्यादि शब्द 'ईय' प्रत्यय लागून तयार झालेले असून त्यामधील 'ईय' हा प्रत्यय '**तत्संबंधीं उक्त**' हा अर्थबोध करून देतो अर्थातच 'क्षत्र + इय' अशा शब्द-प्रत्ययीकरणाने '**क्षत्र-संबंधी उक्त**' अगर क्षत्रसबधी योग्य अशा अर्थानें अभिप्रेरित असलेला '**क्षत्रिय' हा** सस्कृत शब्द तयार झाला, ही गोष्ट अगदीं स्पष्ट आहे याप्रमाणे 'क्षत्रिय' शब्दांतर्गत शब्दप्रत्यय–अर्थासबधी विचार झाल्यावर अर्थातच '**आकाशस्थसबंधी उक्त**' असे **जे,** ते **क्षत्रिय** लोक, अशी '**क्षत्रिय शब्दाची व्युत्पत्ति अगदी स्पष्ट स्पष्ट** होते.

आतापर्यंत '**आकाशस्थ** सबधी उक्त' अशा प्रकारची 'क्षत्रिय' शब्दाची तात्त्विक व्युत्पत्ति सिद्ध झाली, परतु '**आकाशस्थ**' या प्रमेयाचा स्पष्ट उलगडा झाला नसल्याने तिकडे लक्ष देणे विशेष अगत्याचें आहे '**आकाशस्थ**' या प्रमेयाचा उलगडा अगदीच साधा व सहज समजण्यासारखा असून तो समजताच 'क्षत्रिय' शब्दाच्या **दिव्य व्युत्पत्ती**बद्दल कोणाच्याही मनात कल्पनातीत आदरभाव उत्पन्न झाल्याशिवाय राहात नाहीं '**आकाशस्थ**' या किंचित् गीर्वाण शब्दाचा अर्थ '**आकाशांत वास करणारे**' असा असून त्याचाच स्पष्टार्थ 'आकाशातील दिव्य ज्योति, चद्र, सूर्य असा आहे यानाच मुख्य **खस्थ ज्योति** म्हणतात अर्थातच 'आकाशस्थसबधीं उक्त-म्हणजे **चद्रसूर्यासंबंधी उक्त**' असे जे लोक ते दैदीप्यमान क्षत्रिय होत '**चंद्र सूर्यसंबधी जे** लोक **तेच क्षत्रिय**' अशी 'क्षत्रिय' शब्दाची दैदीप्यमान व्युत्पत्ति—

" **तपत्यादित्य** वच्चैष चक्षुषिच मनासि च ।

\+ ० + ।

**सोग्निवताति** +++ **सोर्कः सोम** '+++++ ।"

—मनुस्मृति, अ. ७

या सूत्राशी समरस होऊन त्याची पर्यायरूपच होते ही गोष्ट सिद्ध आहे तसेंच—

" कथयत यदि **सोम**वश सभवो **सूर्य**वश सभवो वा
युवा भूपतिरभूदेव विधः "

अथवा—

" भवान्भुवि **सूर्यचंद्रमसो**स्तृतीय इव
महतो राजवशस्य कर्ता भविष्यति "

इत्यादि वचनेही 'क्षत्रिय' शब्दाच्या उपरिनिर्दिष्ट दिव्य व्युत्पत्तीशी समानार्थी आहेत, हेंही विसरून चालणार नाहीं क्षत्रियांचे **मुख्य वंश**ही दोनच आहेत एक **सूर्यवंश** आणि दुसरा **सोमवंश** ऊर्फ **चंद्रवंश** ( या दोन मुख्य शाखांमधूनच पुढें नागवंश, अग्निवंश इत्यादि पोटभेद निर्माण झाले.) अर्थातच क्षत्रिय **हे सूर्यचंद्रसंबंधीं** आहेत ही व्युत्पत्ति पुन्हाही स्पष्ट ध्वनित होते. या व्युत्पत्तीचा व **क्षत्रियांच्या चंद्रसूर्य-**

**वंश प्रकथनाचा अन्योन्यसंबंध** अगदीं दृढ आहे. **चंद्र–सूर्यविषयक** अलंकारोपमायुक्त **अर्थानें प्रबोधित** झालेले हे दोन क्षत्रियवंश–**क्षत्रिय गुण प्रबोधक** असे हे दोन **सोम–सूर्यवंशाख्य** कल्पतरु–क्षत्रिय शब्दाच्या या व्युत्पत्तीभूमिकेवरच उभारले गेले आहेत, ही गोष्ट तर 'क्षत्रिय' शब्दाच्या या सार्थ व्युत्पत्तिसंबंधी **धडधडीत साक्ष** देत आहे आणि म्हणूनच 'क्षत्रिय' शब्दाची ही व्युत्पत्ति सत्यार्थप्रबोधक, व्यवहार्य आणि गुणकर्मानुकूल अशी स्पष्ट आहे ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकीच स्पष्ट आहे

वरील विवेचनावरून असें स्पष्ट सिद्ध होतें की, आपल्या अद्वितीय बुद्धिप्रभावाने जनतेला दिपवून सोडणारे आणि आपल्या अचाट बाहुबलानें जनताजनार्दनाचें आक्रमण करून लोकसंग्रह करणारे–लोकाग्रणी–जनतेचे नेते–मुख्य पुढारी–सूर्य–चंद्रवंशी लोक असा क्षत्रिय या शब्दाचा खरा अर्थ आहे सारांश, बुद्धिबल आणि बाहुबल या दोनही सद्‌गुणांचा संयुक्तप्रभाव ज्याच्या अगांत वास करीत असेल तोच क्षत्रिय, पण ज्याच्या अगांत बुद्धिबल नसून नुसतें बाहुबलच आहे, त्याला फक्त पहिलवान किंवा मल्ल म्हणतां येईल अशा बुद्धिहीन मल्लाला क्षत्रिय म्हणता येणार नाहीं याच्या उलट ज्याच्या अगीं नुसते बुद्धिबल असून बाहुबल नसेल त्याला क्षत्रियावलबी–निर्वीर्य–नि सत्व–भट्टभिक्षुक (भिकारी) म्हणतात असे परावलबी, निर्वीर्य व नि सत्त्व भट्टभिक्षुक स्वत च्या पोटाची टीचभर खळगी भरण्याच्या स्वार्थबुद्धीनें देशबाधवांत दुही माजवून मातृभूमीवर घाला घालतात, पण खरा क्षत्रिय हें नीचकर्म प्राणातीही करीत नाहीं.



# प्रकरण दुसरें

# क्षात्रघटनावैशिष्ट्य

१ सृष्टीचें अनाद्यनंतत्व.
२ क्षत्रियोत्पत्ति व आक्रमण.
३ क्षत्रिय ऊर्फ आर्य.
४ क्षत्रियोत्पादित वैदिकधर्म.
५ श्रीरामकाल.

**१. सृष्टीचें अनाद्यनंतत्व**—सृष्टीच्या अनाद्यनतत्वासंबधीं विचार करू गेलों असतां, मानवी मति कुंठित होऊन जाते सृष्टीच्या अनाद्यनंततत्वाविषयीं सूक्ष्म व समाधानकारक निर्णय मानवी बुद्धीला लागला नाहीं सृष्टीच्या उत्पत्तीसबंधानें केव्हांही असेंच म्हणणें प्राप्त आहे, आणि म्हटलेलेंही आहे कीं,* ज्याच्या योगानें ही सृष्टि निर्माण झाली, जो या सृष्टीचा धारण, पोषण व वर्धनकर्ता आहे, जो या सृष्टीचा अतिव्यापक असा स्वामि आहे, ज्याच्या योगानें सर्व जग, उत्पत्ति, स्थिति आणि लयाप्रत पावतें असा एकच विधाता आहे, असा एकच सृष्टिकर्ता आहे आणि असा परमात्माच विश्वनिर्मिता आहे त्यालाच सृष्टिकर्ता म्हणतां येईल इतराला म्हणतां येणार नाहीं तात्त्विकदृष्ट्या आणि सूक्ष्मरीत्या विचार केला असतां, असें दिसून येतें कीं, प्रकृति, जीव आणि परमात्मा हीं तीनच प्रमेयें सृष्ट्युत्पत्तीच्या मुळाशीं निगडित आहेत. आणि या तीन प्रमेयांची घटना मानवी बुद्धीच्या शक्तीबाहेरची आहे प्रकृति या प्रमेयाची तात्त्विक मीमासा अशी आहे कीं सत्त्व, रज आणि तम ह्या तीन घटना एकत्रित घटित झाल्या म्हणजे त्या संघातास 'प्रकृति' असें नाव प्राप्त होते या प्रकृतीपासूनच बुद्धि, अहकार, पांच सूक्ष्म भूततन्मात्रा, दशेंद्रियें, मन, पचतन्मात्रातर्गत पृथ्वि आदि पचमहाभूतें इत्यादि स्थूल सूक्ष्म भूतसंघात बनून, त्या सघाताचें पर्यवसान जीव आणि आकृति यांत होतें. त्यालाच पुरुष अशी सज्ञा आहे या क्रमानुसारच सृष्ट्यतर्गत क्रिया प्रक्रिया उद्भूत झाल्या आहेत वरील प्रमेयापासूनच आकाश, वायु, अग्नि, जल आणि पृथ्वी यांची उत्पत्ति झाली आणि पुढें **पृथ्वीपासून** औषधी, औषधीपासून अन्न, अन्नापासून वीर्य आणि वीर्यापासून दृश्य शरीर असा सृष्टिक्रम अस्तित्वांत आला उत्पत्ति, स्थिति, लय या अबाधित घटनेने तो कायमचा निर्बंधित झाला आहे. हें सृष्टिक्रमचक्र अनादि

---

* इयं वि सृष्टिर्यत् आ बभूव यदि वा दधे यदि वा न ॥
यो अस्याध्यक्षः परमे व्योमन्त्सो वेद यदि वा न वेद ॥
—ऋग्वेद, मण्डल १०.

कालापासून चालत आहे हा क्रम अनाद्यंत आहे ही मानवसृष्टि त्रिविष्टपीं अगदी प्रथम निर्माण झाली

सृष्टीच्या उत्पत्ति, स्थितीसंबंधाने आज अखिल जगांत जे ग्रंथ, व जो पुरावा उपलब्ध आहे, त्या सर्वांत प्राचीन, सर्वांत श्रेष्ठ, सर्वांत साधार आणि सर्वांत विश्वसनीय पुरावा म्हटला म्हणजे आर्यांचे वेदग्रंथ हे होत त्यांतही आद्य ऋग्वेद हा ग्रंथ सर्वांत श्रेष्ठ मानला जातो ऋग्वेदाइतका प्राचीनतम ग्रंथ दुसरा कोणताच नाहीं तोच मूळपाया होय गौरवर्णी आर्यांची मूळ उत्पत्ति उत्तरध्रुवाच्या अत्यंत थंड अशा हिममय व दुर्गम प्रदेशांत झाली अर्थात गौरवर्णी सृष्टीच्या उत्पत्तीस प्रारंभ उत्तरध्रुवाच्या शीतल प्रदेशात झाला, याबद्दल प्राचीन व अर्वाचीन आर्य ग्रंथकाराचें एकमत आहे उत्तरध्रुवाकडून आर्यांच्या मोठमोठ्या टोळ्या मध्यएशियांतून दक्षिणेस पसरत पसरत सुमारें ५।६ हजार वर्षांच्या-पूर्वी चंद्र व सूर्यवंशी आर्यांच्या टोळ्या हिंदुस्थानात आल्या, व कांहीं टोळ्या इराण, तुर्कस्तान, युरोप, आफ्रिकाखंडांत पसरल्या पण ज्या ज्या मुलुखांत आर्यांनीं प्रवेश केला त्या त्या प्रत्येक भूप्रदेशात शीत, उष्ण समशीतोष्ण वातावरणानुसार गौरवर्णी, निम गौरवर्णी आणि श्यामवर्णी मूळच्या रहिवाश्यांच्या वसाहती होत्या असाच उल्लेख सर्व ठिकाणीं सापडतो यावरून सृष्टीच्या उत्पत्तीला फक्त उत्तरध्रुवाकडेच प्रारंभ झाला नसून तो सृष्टीच्या अनेक भागावर झाला असावा हिंदुस्तानांत सुमारें सहा हजार वर्षांच्यापूर्वी आर्यलोक आले त्यावेळी इकडे देखील इकडचे मूळचे श्यामवर्णी लोक आणि आर्यांच्याही पूर्वी बाहेरून आलेले द्रविड लोक यांच्या वसाहती होत्याच इकडे आर्य क्षत्रियानीं राज्य संस्थापना केल्यावर सुमारें पाचहजार वर्षांच्यापूर्वी ऋग्वेदाची रचनाही केली ऋग्वेद काली सूर्यवंशी विष्णूचा पुत्र ब्रह्मा ऊर्फ ब्रह्मदेव होऊन गेला त्या ब्रह्मदेवानें सृष्टि उत्पन्न केली अशी हिंदूंची समजूत आहे, पण ती निराधार आहे ब्रह्मा हा सृष्टीचा उत्पन्नकर्ता नसून ब्रह्मदेवाच्यापूर्वी लाखों वर्षांच्या अगोदर सृष्टि उत्पन्न झालेली होती, इतकेंच नाहीं तर ब्रह्मदेवाच्या काली कोट्यावधि लोक खुद्द हिंदुस्तानातही होते, असा पुरावा वेदांतच आहे यावरून सृष्टि अनाद्यनंत आहे असेंच म्हणणें भाग आहे तिच्या विचारासंबंधानें मानवी मति कुंठित होते

सुमारे दोनशे वर्षांपूर्वी आफ्रिकाखंडातील **सहाराडेझर्ट** नावाच्या हजारो मैल विस्तृत अशा अफाट वालुकामय प्रदेशाच्या तळाशी मनुष्यांची कांही हाडें व सांगाडे सांपडले **सहाराडेझर्ट** येथें हजारों वर्षांपूर्वी अफाट समुद्र असावा आणि तो सुकल्या-मुळें आज तेथें अफाट वालुकामय शुष्क समुद्र दिसत आहे असें भूगोलशास्त्रज्ञाचें मत आहे या वालुकामय निर्जल व निर्जन प्रदेशाच्या तळाशी जसे कांही मानवी सांगाडे सांपडले तसेंच उत्तर ध्रुवाच्या प्रदेशांतही कांहीं मानवी व इतर प्राण्यांचे हाडांचे सांपळे सापडले आहेत त्यांच्या हाडांचा आकार आणि मोजमाप यांची तुलना आजच्या मानवी सांगड्याशीं करून पाहिली असतां, शारीरशास्त्रपारंगत आणि भूगोल व खगोलशास्त्र-पारंगत विद्वानांनीं अनेक पुराव्यांनिशीं असें मत प्रदर्शित केलें आहे कीं, सृष्टि उत्पन्न

होण्यास आज निदान कमींतकमी अडीच तीनलाख वर्षे झालीं असावीं. हा तरी ठोकळ अदाजच आहे! निश्चित सिद्धान्त सिद्ध करणें मानवी बुद्धीच्या आटोक्याबाहेर आहे; म्हणूनच सृष्टीला अनाद्यनंत असेंच म्हणणें भाग आहे

**२. क्षत्रियोत्पत्ति व आक्रमण**—सृष्टिक्रमानुसार क्षत्रियांची पूर्वउत्पत्ति उत्तर ध्रुवाच्या हिममय प्रदेशांत होऊन पुढें लौकिकरित्या त्यांचा व्यापविस्तार जसजसा वाढत गेला तसतसा भूमिविभाग त्यांनीं आक्रमण करण्याचें सुरू केलें त्यांना जो जो विभाग योग्य वाटला तिकडे तिकडे त्यांनी आपलीं ठाणीं वसविली हल्लीं आपण ज्याला आर्यावर्त¶ म्हणतो तो भूमिविभाग सर्व दृष्टीनें त्यांना अत्यंत योग्य भासल्यानें तेथेंच त्यांनीं आपलें वास्तव्य प्रामुख्यानें केलें क्षत्रियांना स्वतःच्या बाहुबलाची, शौर्याची, जाज्वल्य पराक्रमाची आणि अद्वितीय बुद्धिमत्तेची पूर्ण खात्री असल्यामुळे मोठ्या अभिमानाने आणि अधिकारानें त्यांनीं स्वतःच्या वास्तव्यस्थानास †'आर्यावर्त' असें श्रेष्ठतादर्शक, उच्चत्व-प्रबोधक आणि सत्यप्रदर्शक नांव दिले उत्तरेकडून हिंदुकुश पर्वतावरून अफगाणिस्तानांत येऊन हल्लींच्या तिबेट, कदाहार, काबूल या भागांतून हिमालयाचा खैबरघाट ओलांडून क्षत्रिय जेव्हां इकडे आले तेव्हां या भागांत द्रविड नामक लोक वास्तव्य करून राहिले होते या लोकांनी क्षत्रियाच्या पूर्वीच आपले ठाणे इकडे बसविले होते त्यांचीं राज्येंही त्यानीं आपल्या वसाहतीत स्थापिली होती या द्रविड लोकांनी येथील मूळच्या रानटी अशा लोकाना पादाक्रांत करून तेथें आपली वसाहत केली होती क्षत्रिय लोक जेव्हां त्या विभागांत आले तेव्हा तेथील रमणीयता बघून त्यांना अत्यत हर्ष झाला, आणि द्रविड लोकांना आपल्या दिव्य पराक्रमाचे जोरावर उधळून लावण्याचें त्यानीं ठरविले द्रविड लोक जरी मूळच्या रानटी लोकाना जिकून विजयी झाले होते, तरी या आर्यक्षत्रियाच्या तेजस्वितेपुढें त्यांचा टिकाव लागणे शक्य नव्हतें आर्यक्षत्रियाचा प्रवेश स्वतःच्या मुलुखांत होत आहेसें दिसतांच द्रविडाच्या भीरु मनाने कच खाल्ली, आणि ते उत्साहविहीन झाले. त्याची अशी विगलित स्थिति पाहाताच क्षत्रियानीं त्यांना आपल्या

---

¶ आसमुद्रात्तु वै पूर्वादासमुद्रात्तु पश्चिमात्।
तयोरेवातर गिर्योरार्य्यावर्त विदुर्बुधाः ॥१॥
सरस्वतीदृषद्वत्योर्देवनद्योर्यदन्तरम्।
त देवनिर्मित देशमार्यावर्तं प्रचक्षते ॥२॥

—मनु०, २–२२–१७.

अशी आर्यावर्ताची रूपरेषा आणि मर्यादा वर्णिलेली आहे.

† 'आर्यावर्त' या शब्दाची व्युत्पत्ति, आर्य+आवर्त='आर्यावर्त' अशी आहे. 'आर्य' म्हणजे श्रेष्ठ, आणि 'आवर्त' म्हणजे वेढा अर्थातच ज्या स्थानी श्रेष्ठ लोकांनीं आपला वेढा दिलेला आहे म्हणजे श्रेष्ठ लोकांच्या वास्तव्यानें जें स्थान वेष्टित झालेलें आहे त्यास 'आर्यावर्त' म्हटलें.

अद्वितीय बाहुबलाचा व अकल्पनीय शौर्याचा प्रताप दाखविण्यास कमी केले नाही जेव्हां क्षत्रियांनीं त्या द्रविड लोकांना आपल्या वीरतेचे पाणी दाखविले; तेव्हां तेथून पळून जाण्याशिवाय त्यांना अन्यमार्ग उरला नाही तरीपण द्रविडांनीं क्षत्रियांशीं झुंज देण्याचा थोडाथोडका प्रयत्न करून पाहिला, परंतु त्यात त्यांना यश न आल्यामुळे त्याचा पूर्ण पाडाव होऊन त्यांना आपल्या राज्यास मुकावें लागले

याप्रमाणे क्षत्रियांनीं द्रविड लोकांना पराभूत करून दक्षिणविभागांत हांकून लाविलें व तेथे आनदाने आपली ठाणीं कायम केली बिचाऱ्या द्रविडांनी अगोदरच इकडच्या मूळच्या लोकाना जिंकण्याकरितां बराच प्राणायाम* केला, पुढें तेथें आपलीं ठाणीं बसविण्याच्याप्रीत्यर्थही बरीच मेहनत केली, पुढें क्षत्रियाशीं थोडेंबहुत तोंड देण्याचाही प्रयत्न करून पाहिला, तत्प्रीत्यर्थ भयकर त्रासही सोसला आणि अखेर आपले चंबुगवाळें उचलून जाण्याचीच त्याच्यावर पाळी आली अर्थातच त्याची एवढी मेहनत व एवढे प्रयत्न व्यर्थ गेल्यानें द्रविडांनीं† आपली जी हिमत सोडली ती पुन्हा त्याच्या मनोवृत्तीत उद्भूत झाली नाहीं

द्रविडांच्या मुलुखांत जसा क्षत्रियांनीं आपला तळ दिला, तसेंच विशेष विस्तारानें युरोपखड, इराण तुर्कस्तान, अरबस्तान, इत्यादि भूमिविभागातही त्यानीं आपले आक्रमण केलें होते क्षत्रियांचा जो पहिला सघ आर्यावर्तांत आला त्यात विशेषत. सूर्यवशी क्षत्रियाचाच भरणा होता त्यांनी द्रविड आणि हिंदुस्तानच्या मूळ रानटी§ रहिवाशाना हाकून लावून आपलें बरेंच प्रस्थान आर्यावर्तात बसविल्यावर काही कालाने क्षत्रियाची दुसरी एक अफाट टोळी हिंदुस्तानांत पुन्हा आली या दुसऱ्या सघांत विशेषेकरून चद्र वशी क्षत्रिय होते ही दुसरी चद्रवशीय क्षत्रियाची टोळी जेव्हा हिंदुस्तानात आली, तेव्हां पुन्हा त्या टोळीनें आपल्या क्षात्रतेजाने बहुतेक मुलूख हादरून सोडला, व बहुतेक मुलूख आपल्या ताब्यात घेतला याप्रमाणे सूर्यचद्रवशी क्षत्रियाचा विस्तार आर्यावर्तात पुढें पुढे तर अगदीं अफाट प्रमाणांत झाला पजाब प्रात, सरस्वती नदीपर्यतचा मुलूख, गगा व

---

* यावरूनच 'द्राविडी प्राणायाम' हा विशेषकष्टप्रदर्शक शब्दप्रयोग रूढ आहे

† द्रविड लोक आणि इकडचे मूळचे रहिवासी, हे पराभूत झाल्यावर त्याना अनार्य असुर, दस्यु इत्यादि तुच्छ शब्दप्रयोगाने सबोधण्यात येऊ लागले. क्षत्रिय हे जेते व द्रविड वगैरे जित असल्यामुळे द्रविडाची अशी हीन दशा झाली पुढे जित असे जे थोडेबहुत द्रविड तेथें क्षत्रियशरणागत होऊन कायम राहिले त्यानाही 'दस्यु' अशा हीन शब्दांनी सबोधण्यात येई

§ हल्लीं पारधी वगैरे लोकांना आपण ज्या स्थितीत पाहातो, त्याप्रमाणेच परतु त्या पेक्षांही विकृतस्थितीची पूर्वीच्या हिंदुस्तानच्या मूळच्या रहिवाशी लोकांची राहाणी होती त्यांना पाकनिष्पत्तिशास्त्र माहित नव्हतें म्हणून ते कच्चें मांस खात असत वस्त्रप्रावरणा बद्दल अज्ञान असल्यानें जनावरांचीं चामडीं वस्त्राबद्दल उपयोगांत आणीत असत. हत्यारां ची त्यांना अत्यावश्यकता भासत असल्यामुळें दगडांचीं हत्यारें ते वापरीत असत हत्यारां-करितां लागणाऱ्या धातूंची त्यांना माहिती नव्हती

यमुना या नद्यांचे कांठचा पूर्वविभाग, चबळ नदीच्या काठचा प्रदेश, माळवा, गुजराथ इत्यादि बहुतेक उत्तर हिंदुस्तानचा भाग, या क्षत्रिय सघांनीं व्यापून टाकून तेथें आपल्या कायमच्या वसाहती केल्या

**३. क्षत्रिय ऊर्फ आर्य** — उत्तरध्रुवाच्या हिममय प्रदेशांतून सूर्यचंद्रवंशी क्षत्रिय भारतवर्षात आल्यावर द्रविडांना पराभूत करून स्वतःच्या अद्भुत बाहुबलाच्या सामर्थ्यावर ते आर्यावर्तात आनंदाने नादू लागले हे आर्यावर्तात आलेले व आर्य नावानें संबोधिले जाणारे वीर ब्राह्मण होते, असे काही स्वार्थी व दिशाभूल करणारे लोक प्रतिपादन करीत असतात, परंतु ऐतिहासिक सत्यापुढें ही गोष्ट टिकाव धरूं शकत नाहीं. कारण इकडे येऊन द्रविडादि लोकांशी मर्दपणाने छातीस छाती भिडवून त्यांना आपल्या जाज्ज्वल्य शौर्याचें पाणी पाजावयास लावण्याचे काम नाजुक ब्राह्मण कालत्रयींही करू शकणार नाहींत ब्राह्मणी वृत्ति ही वीर्यपूर्ण वृत्ति नव्हे ती लढाऊ वृत्ति नव्हे लुळ्या भावनेचे व क्षीण वृत्तीचे ब्राह्मण लढवय्या, राज्यकर्त्या द्रविड लोकांशी कधींही टक्कर देऊ शकणार नाहीत, आणि ब्राह्मणीवृत्तीस दांडग्या द्रविडांनीं भीकही घालणें शक्य नव्हते ब्राह्मणाची पोथी व पंचांग ऐकून किंवा त्याच्या पळीपंचपात्रीच्या ठणठण आवाजाला भिऊन द्रविडांनी आपली राज्ये निवार्य ब्राह्मणी आर्यांच्या स्वाधीन केलीं असतील, ही गोष्ट अगदी असंभवनीय आहे ब्राह्मणाच्या व ऋषींच्या यज्ञावर दस्यु म्हणजेच राक्षस हल्ले करून यज्ञाचा विध्वंस करीत असत, तेव्हा ते ब्राह्मण व ऋषि क्षत्रियांच्या मदतीची वारवार याचना करीत असत विश्वामित्रराजर्षीने रामलक्ष्मणास शूरत्वप्रदर्शनार्थ नेले होते, ही गोष्ट रामायणात वर्णिली आहे म्हणूनच या क्षत्रियांनाच आर्य म्हणवून घेण्याचा खरा अधिकार आहे तो अधिकार ब्राह्मणाचा नव्हे एवढेच नव्हे, तर मूळचे आर्य म्हणजे क्षत्रिय आणि क्षत्रिय म्हणजेच आर्य होत ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट आहे. या आर्यांनाच क्षत्रिय अशी गुणवर्णनपर संज्ञा दिलेली आहे या वीर्यशाली आर्य क्षत्रियांतच काही थोडे हीनवीर्य व कमजोर लोक असणे साहजिक आहे. अशा शौर्यहीन लोकानी आपल्या प्रकृतिगुणधर्मानुसार सात्त्विक वृत्तीच्या ईश्वरभक्तींत निमग्न राहून ईश्वरविषयक गोष्टींचा अभ्यास करणें ही गोष्ट सृष्टिनियमानुसारच आहे म्हणून ईश्वर (ब्रह्म) संबधीं विषयातच मग्न असलेल्या थोड्याशा लोकांना ब्राह्मण ही संज्ञा पडली पण बहुजनसमाज जाज्ज्वल्य वृत्तीचा क्षत्रियच होता

आर्य आणि क्षत्रिय यात कांहींही भेद नसून हे दोन्ही शब्द परस्पर पर्यायवाचक आहेत हे आर्य ऊर्फ क्षत्रिय लोक आपल्या दिव्य पराक्रमाचे जोरावर जेव्हां आर्यावर्तात येऊन दाखल झाले, तेव्हां आर्यावर्तात* एकच धर्म, एकच वर्ण आणि एकच

---

* एक एव पुरा वेदः प्रणवः सर्व वाङ्मयः ।
देवो नारायणो नान्य एकोऽग्निर्वर्ण एव च ॥

—श्रीमद्भागवत, स्कंद ९, अ. १४.

प्रणव चालू होता क्षत्रियांनीं जिंकून पराभूत केलेल्या द्रविडांना आणि मूळच्या जंगली लोकांना मात्र जित म्हणून दस्यु, या शब्दप्रयोगानें संबोधीत असत अर्थातच क्षत्रिय म्हणजे ज्यांनीं आपल्या क्षात्रतेजाच्या पराक्रमाने द्रविडांना व मूळच्या रहिवाशांना पराभूत केलें ते, आणि पराजित झालेले ते द्रविड ऊर्फ दस्यु, हे दोनच प्रकार आर्यावर्तांत कायम होते वेदातही क्षत्रिय ऊर्फ आर्य आणि दस्यु उर्फ अनार्य याच शब्दांचा उपयोग केलेला आहे हल्लींचे गांवाबाहेर राहाणारे महार, मांग आणि रानावनांत राहाणारे कोरकुभिल्ल वगैरे लोक स्वत स हिंदुस्तानचे मूळचे रहिवाशी म्हणवितात इतिहासज्ञ लोक आणि सरकार देखील त्यांना तसेंच समजतात शूद्र ही पदवी त्यांनाच लावतात यावरून ते हिंदुस्तानचे मूळचे रहिवाशी असावेत, म्हणूनच पूर्वपरपरेला अनुसरून त्यांच्याशीं म्हणजे जित लोकाशी वरिष्ठ जातीचे स्वत स आर्य म्हणजे श्रेष्ठ म्हणविणारे हिंदु अद्यापि शत्रुत्वाच्या भावनेने वागतात यावरून हिंदुलोक मोठे दीर्घद्वेषी आहेत असें दिसतें मा=लक्ष्मि, हर=हरण करणे यावरून ज्यांची लक्ष्मि ( ऐश्वर्य ) हरण करण्यात आलेली आहे ते महार अर्थात् जित गोंड लोकाची लहान लहान राज्ये पहाडपट्टीत अद्यापि आहेत यावरून हिंदुस्तानचे मूळचे राज्यकर्ते तेच लोक होत असे दिसते, म्हणूनच स्वत स आर्य म्हणविणारे हिंदुलोक जित आणि जेते या नात्याने त्याचा तिरस्कार करतात

दुसरें असे की, आर्यांची म्हणजेच क्षत्रियाची सूर्यवशी टोळी जी आर्यावर्तांत आली, तिचें व्यापकत्व बरेंच वाढल्यावर त्याच्या वसाहती काशी, बिहार, अयोध्या इत्यादि प्रदेशाच्या आसमतात् प्रस्थापित झाल्या त्यांची राज्येही इकडे बरीच प्रस्थापित झाली ही राज्ये स्थापन करणारे राजेही क्षत्रियच होते एवढेच नव्हे, तर आर्यांची जी सूर्यवशी क्षत्रियाची पहिली टोळी इकडे आली, त्या सूर्यवशांतच क्षत्रियकुलमुकुटमणि श्रीरामचद्राचा जन्म झाला यावरून आर्यलोकाचा हा जो सघ इकडे आला तो आर्य क्षत्रियांचाच होता असें स्पष्ट सिद्ध होते

याचप्रमाणे चद्रवशी टोळीतूनच क्षत्रियकुलोत्पन्न भगवान् श्रीकृष्णाने जन्म घेतला, आणि कौरवपाडवही या चद्रवशांतच जन्म पावले अर्थातच आर्यावर्तांत प्रसृत झालेले आर्य नामक लोक हे खात्रीने क्षत्रियच होते, दुसरे कोणीही नव्हते हे स्पष्ट सिद्ध होते

चंद्रवशी क्षत्रियाना जेव्हा राज्यप्रस्थापनेप्रीत्यर्थ सुदास नामक दस्यूशीं खूप झगडावे लागलें, व अशा या झगडण्यात जेव्हां क्षत्रियमुकुटमणि भरतराजाचा विजय होऊन दस्यु पराजित झाले, तेव्हा भरताच्या वशजानीं गगा व यमुना या नद्याच्या मध्यभूप्रदेशांत आपली ठाणी बसवून हस्तिनापुर नामक गाव आपले राजधानीचे शहर वसविले हेच आर्य कौरवपाडव या नावानें प्रसिद्ध आहेत आणि ते क्षत्रिय आहेत भरत या क्षत्रियकुलोत्पन्न वीराचे नांवावरून हिंदुस्तानास भरतखड असें नाव पडले या सर्व ऐतिहासिक सत्यांचा सूक्ष्म विचार केला असतां आर्य हे दुसरे तिसरें कोणी नसून क्षत्रियच होते हें ऐतिहासिक सत्य निःसंदेह सिद्ध होतें

क्षत्रियांच्या आर्यत्वाबद्दल आणि आर्यांच्या क्षत्रियत्वाबद्दल प्राचीन वेदांत स्पष्ट

खुलासा आढळून येतो. पुढें पुढें श्रीकृष्णाच्या कालीं श्रमविभाग योजनेप्रमाणे या क्षत्रिय ऊर्फ आर्यांचेच चार संघ निर्माण होऊन एका क्षत्रिय संघाचेच चार भाग पडले. तेही या क्षत्रियांचे ठायीं असलेल्या विशिष्ट* गुणप्रणालीचा विचार करूनच योजिले गेल्यानें त्यांच्याही मुळाशीं आर्य ऊर्फ क्षत्रियच आहेत तात्पर्य, आर्य अथवा क्षत्रिय* हेच सर्वांत प्रथम उद्भूत झाले असून विशिष्ट व्यवस्थेकरिता समाजघटनेचे प्रकार पुढें निर्माण झाले

**४. क्षत्रियोत्पादित वैदिक धर्म**—सूर्यवंशी क्षत्रियांचा पहिला संघ ज्याकाली आर्यावर्तांत आला, तो काल सुमारे इसवी सनापूर्वी चार-हजार वर्षांपूर्वीचा आहे असे सिद्ध होतें याप्रमाणे आर्यावर्त चंद्रसूर्यवंशीय क्षत्रियांनी आक्रमण केल्यावर कांही कालाने त्यांना साधारण विश्रांति मिळाली आर्यावर्ताच्या बहुतेक विभागीं त्यांनीं आपली ठाणीं स्वपराक्रमाने स्थापन केल्याबद्दल त्यांना साहजिक संतोष वाटू लागला, म्हणून त्यानंतरचा कांही काल त्यानी परमेश्वराकलनातच घालविण्याचा प्रयत्न केला या शांततेच्या कालांत बुद्धिमान् व कल्पक क्षत्रियांनी जी धार्मिक सूत्रे रचिलीं त्याच्या एकत्र संग्रहालाच ऋग्वेद म्हणतात.

या काली क्षत्रियांचेंच वर्चस्व असल्यामुळे सर्व कृति त्यांच्याकडूनच होणें वस्तुस्थितीस धरूनच आहे धार्मिक सूत्रें रचणारे क्षत्रियच होते वेदाची मंडले रचणारे क्षत्रियच होते ऋषि क्षत्रियातूनच निर्माण झालेले होते युद्धकलेंत अत्यंत निष्णात असे क्षत्रियच होते ब्रह्मविद्येंत पारंगत क्षत्रियच होते थोडक्यात सांगावयाचे म्हणजे वैदिककाळीं सर्व महत्त्वाच्या घटना घडवून आणणारे क्षत्रियच होते या म्हणण्याचा अर्थ असा कीं, त्या काली सर्वत्र क्षत्रियच होते आणि अर्थातच सर्व महत्कृत्ये तेच करीत होते याचे सप्रमाण वर्णन पुढे क्रमाक्रमाने येणारच आहे

ज्या विद्वान् क्षत्रियांनीं धर्मसूत्रें व वेदसूत्रें निर्माण केलीं, एवढेच नव्हे तर

---

* चातुर्वर्ण्यं मयासृष्टं गुणकर्मविभागशः ।

—भगवद्गीता

* तच्छ्रेयो रूपमत्य सृजत क्षत्रम् यान्येतानि देवत्ता क्षत्राणींद्रोवरुणः सोमोरुद्रः पर्जन्यो यमो मृत्युरीशान इति तस्मात् क्षत्रात् परंनास्ति तस्माद् ब्राह्मण. क्षत्रिया दधस्तोदुपास्ते राजसूये ॥

—बृहदारण्यकोपनिषद्, १।४।११.

**भावार्थः**—या जगांत पहिल्यानें ब्रह्म म्हणजे ईश्वरस्वरूप एकटेंच होतें त्यानें पुढें इंद्र, वरुण, सोम, रुद्र, पर्जन्य, यम, मृत्यु व ईशान या अष्ट देवतांच्या अंशापासून उत्तम प्रकारचा क्षत्रिय निर्माण केला यास्तव **या जगांत क्षत्रियापेक्षां दुसरा कोणीही श्रेष्ठ नाहीं**. याच कारणास्तव यज्ञाचे वेळीं ब्राह्मण क्षत्रियांच्या खालीं बसतात.

ब्रह्मविद्येंतही ‡ जे क्षत्रिय अग्रगण्य होते, त्यांनीं ऋग्वेदाची मंडलें फावल्या वेळात रचून एका मोठ्या वेदग्रंथास जन्म दिला ऋग्वेदाचीं एकंदर दहा मंडलें आहेत पुढें दिल्या प्रमाणें बहुतेक क्षत्रिय ऋषींनींच ती रचलीं आहेत, अंगदेशाच्या कक्षिवान्[१] नामक क्षत्रिय राजपुत्रानें ऋग्वेदाचे प्रथम मंडलातर्गत सतराव्या अनुवाकांतील एकशें सोळा ते एकशे सव्वीसपर्यंतचीं सर्व सूत्रें रचिलीं हा कक्षिवान् अंगदेशाच्या राजाचा पुत्र होता, याचा उल्लेख ऋग्वेदाची अनुक्रमणिका, सायनाचार्याचें भाष्य आणि महाभारत यात सांपडतो ऋग्वेदाचें द्वितीयमंडळ गृत्समद नामक भृगुकुलोत्पन्न राजऋषीने रचिलें असून भृगु[२] हा क्षत्रियाचा गोत्रऋषि आहे विश्वामित्र नामक चंद्रवंशी क्षत्रिय राजर्षीनें[३] ऋग्वेदाचे तिसरें मंडल रचिलें सर्व वेदांचें सार म्हणजे ज्याच्या पठनानें शूद्रालाही द्विजत्व प्राप्त होतें असा अत्यंत पवित्र गायत्रिमंत्र देखील विश्वामित्र ऋषीनेच निर्माण केला आहे वामदेव नामक क्षत्रिय राजर्षीने ऋग्वेदाचें चवथें मंडल रचिलें सोमवंशी क्षत्रिय—सोमाच्या पित्यानें (अंत्रीनें[४]) ऋग्वेदाचे पांचवें मंडल रचिलें सोमराजा चंद्रवंशाचा मूळ पुरुष होय क्षत्रिय राजर्षि भारद्वाज[५] या क्षत्रियगोत्र ऋषीनें ऋग्वेदाचें सहावें मंडल रचिलें ऋग्वेदाचे सातवें मंडल वशिष्ठाने रचिलें कण्व क्षत्रिय राजर्षीने काहीं सूत्रे खेरीजकरून आठवें मंडल रचिलें कण्व[६] हा पौरव कुलात जन्मलेला क्षत्रिय आहे विष्णुपुराणात व भागवत पुराणात तसा स्पष्ट उल्लेख आहे ऋग्वेद मंडलातर्गत अनुवाक २ सूक्तें ६५–६६ हीं सूक्तें वैसुकर्ण[७] नामक वैश्य ऋषीनें रचिलीं आहेत असे आर्यविद्यासुधाकरात सांगितलें आहे ऋग्वेदाचें नववें मंडल अंगिरस[८] नामक क्षत्रिय ऋषीनें रचिलें ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलांतील अनुवाक ३ सूक्तें ३० पासून ३४ ही चार सूक्त कवषएलूष[९] ऋषाने रचिलीं आहेत हा कवषएलूष शूद्र होता

---

‡ न प्राक् त्वत्त. पुरा विद्या ब्राह्मणान्गच्छति
तस्माद् सर्वेषु लोकेषु क्षत्रस्यैव प्रशासनमभूत —छांदोग्योपनिषद्

प्रावाहण, जैबाली ( क्षत्रिय राजर्षी ) यांच्या जवळ जेव्हां ( गौतम ब्राह्मण ऋषी ) ब्राह्मविद्याभ्यासाकरितां गेला, तेव्हां ते म्हणाले, "गौतमा ! ब्रह्मविद्या ही तुझ्यापूर्वी इतर ब्राह्मणास अवगत झाली नाहीं, अर्थात ती त्याना दुष्प्राप्य आहे ती प्राप्त करून घेण्याचा अधिकार फक्त क्षत्रियाचाच आहे आणि तिचे उत्पादकही पण क्षत्रियच आहेत"

१ ऋग्वेदाची अनुक्रमणिका, सायनाचार्यांचें भाष्य, महाभारत पाहा
२ कायस्थप्रभु क्षत्रियाची गोत्रावळी पाहा
३ वाल्मिकि रामायण पाहा
४ वैकुंठाचा पहिला क्षत्रिय राजा विष्णु त्या विष्णूचा पुत्र ब्रह्मदेव व त्याचा पुत्र अत्रि. क्षत्रियांचे वंश—चंद्रवंश पाहा.
५ सूर्यवंशाचीं गोत्रें परिशिष्ट नं २ पाहा.
६ विष्णुपुराण व भागवतपुराण पाहा.
७ आर्यविद्यासुधाकर ग्रंथ पाहा
८ बाहुसार क्षत्रियांची गोत्रावळी पाहा.
९ ऋग्वेदाची अनुक्रमणिका पाहा

याचा पुरावा ऐतरेय ब्राह्मणाची पत्रिका व ऋग्वेदाची अनुक्रमणिका यात आहे वेदरचना झाल्यावर अर्थातच पूर्वीच्या आर्यधर्मास **वैदिकधर्म** असें नाव पडले व त्याचाच प्रचार पुढें होऊ लागला याचें ज्यास्त तपशीलवार वर्णन सहाव्या प्रकरणांत केले आहे क्षत्रियाचे सूर्यचंद्रवंशी दोन संघ जेव्हां आर्यावर्तांत आले, तेव्हां त्यांनीं जो धर्म निर्माण केला तो **आर्यधर्म** होय नंतर आर्यधर्माचेंच पर्यायनाव वेदरचनेमुळे '**वैदिकधर्म**' असें प्रचलित झालें अर्थातच आर्यधर्माचे उत्पादकही क्षत्रियच होते व वैदिक धर्माचे निर्माणकर्तेंही क्षत्रियच होते हा वैदिकधर्मप्रस्थापनेचा काल पांच हजार वर्षांच्या पूर्वीचा आहे असें सिद्ध झाले आहे इसवी सनापूर्वी सुमारे तीनहजार वर्षांच्या पूर्वीचा हा काल आहे

५. **श्रीरामकाल** — याच सुमाराचे कालांत सूर्यवंशी क्षत्रियकुलोत्पन्न प्रभु रामचंद्राचा जन्म झाला रामकाल हा वैदिक कालच होय प्रभु रामचंद्राच्या अलौकिक गुणप्रणालीचें वर्णन करणे कठिण आहे, ऐतिहासिक दृष्ट्या श्रीरामचंद्राचा काल फारच महत्त्वाचा आणि आदर्शभूत असा झाला यांत शंका नाहीं आर्य ऊर्फ क्षत्रियाचा जो एक संघ उत्तरध्रुवाकडून इकडे आला त्याचा एकभाग हिंदुस्थानच्या पूर्वेकडील भागी प्रसृत होऊन तदंतर्गत शूर व पराक्रमी क्षत्रियवीरानी आपलीं राज्येंही स्वपराक्रमाचे बळावर तिकडे प्रस्थापित केली त्यापैकीं काही राज्ये अयोध्या, बिहार, काशी या आसमंत भागीही प्रस्थापित झाली या राज्यप्रस्थापक शूर क्षत्रियांत काशी, कोसल व विदेही अशा तीन शाखेचे क्षत्रिय होते कोसल शाखेचे जे क्षत्रिय होते, त्यानी आपली मुख्य राजधानी अयोध्या येथें स्थापित केली होती आणि विदेही शाखेचे जे क्षत्रिय होते त्यांनी आपली राजधानी मिथिला येथें प्रस्थापित केली होती जनक नामक क्षत्रियकुलोत्पन्न सुप्रसिद्ध राजा मिथिला नगरीचा सुविख्यात अधिपति म्हणून प्रसिद्ध असून श्रीरामराय या क्षत्रियकुला-वतंस वद्य नरश्रेष्ठाच्या पादस्पर्शानें अयोध्या नगरी पुनित झाली होती हीही गोष्ट सर्व-विश्रुतच आहे

श्रीरामकालीं क्षत्रियानी स्वपराक्रमानें व्यापिलेला भूमिविभाग अत्यंत मनोहर, वृक्ष-लतादिकांनीं युक्त, उत्तम प्रकारचा सुपीक असा असून त्या भूमिविभागाची पुण्याई फारच श्रेष्ठ दर्जाची दिसून येत होती याच भूमिविभागातून गंगानदी ही पवित्र सरिता भूम्या-क्रमण करीत असून तिच्या आसमंत भागी अनेक पर्णकुटिकांतून महान् महान् तपस्वी आपल्या तपोबलाचे, योगबलाचे आणि पुण्यबलाचें यथास्थित संवर्धन करण्यात मग्न झालेले दिसून येत असत. या विभागातील बहुतेक लोक शरीरसंपत्तीनें अगदींच सुदृढ आणि निरोगी असे असून ब्रह्मचर्यव्रताचे तात्त्विक पालन करणारे होते. त्यामुळे शत्रूंचे निर्दालन व हनन करण्यास त्याना अतिशय सुलभ जाऊन आपल्या यशाचा डंका सर्वत्र निनादित करितां येत असे. त्यावेळीं शारीरिक बलाची अत्यंत महती वाटत असून तेच एक बल सर्वश्रेष्ठ गणले जात असें कारण त्या बाहुबलावरच त्यावेळीं पुढील सगळी मदार अवलंबून असे ज्यांच्यांत बाहुबलाचा अभाव असेल असे लोक क्षत्रियत्वास भूषणभूत होत नसत आणि या गोष्टीमुळे सर्वांत आद्यकर्तव्य शरीरबलसंवर्धन करणे व

वीरताउद्बोधक विचारप्रणालि अंतःकरणांत जागृत ठेवण्याचा प्रयत्न करणें या गोष्टीं-कडेच क्षत्रियांचे विशेष लक्ष होतें यमुना नदी ओलांडून जाण्याचा जेव्हां रामलक्ष्मण व सीता ह्यांना प्रसग आला तेव्हां रामलक्ष्मणांनीं सीतेस एका काष्ठावर बसवून तें काष्ठ लोटत लोटत पैलतीरास नेले ही गोष्ट तत्कालीन बलवर्धनाची निदर्शक आहे श्रीराम-कालीन योद्ध्याच्या पराक्रमाविषयीं ऐतिहासिक वर्णनेही याच गोष्टीची स्पष्ट साक्ष देत आहेत

श्रीरामकालीं पुरुषवर्ग जसा वीरताउद्बोधक विचारानी व शारीरिक बलानें परि-पूरित असा दृष्टोत्पत्तीस येत असे, तशीच वस्तुस्थिति तत्कालीन स्त्रीवर्गाचीही होती स्त्रियाही आपापल्या परी शारीरबलाने युक्त व पराक्रमसपन्न अशाच होत्या पातिव्रत्याकडे त्या काली भयकर पारडे झुकलेले असून रामकालीन समयापासूनच आर्यस्त्रियांची प्रणालि पातिव्रत्याच्या बाबतींत अत्यत प्रभावशाली होती या पातिव्रत्याच्या व वीरता संपन्नवृत्तीच्या जोरावरच तत्कालीन क्षत्रिय ऊर्फ आर्यस्त्रिया महान् महान् प्रसगी आपले अलौकिक आणि असामान्य तेजोबल दृष्टोत्पत्तीस आणीत असत दशरथपत्नी कैकेयीनें आपल्या पतीच्या मोडलेल्या रथास स्वतःच्या हातावर उचलून धरून युद्धप्रसगी पूर्ण आणि महत्त्वाचा आश्रय दिला आणि स्वतःस वरप्राप्ति करून घेतली ही गोष्ट रामकालीन स्त्रियांच्या तेजोबलाची स्पष्ट निदर्शकच आहे सीताहरणानतर ती जेव्हा राक्षससमूहा च्या देखरेखीखालीं परस्थ अशी एकटीच बदिखान्यात अडकून पडली, तेव्हांही तिने आपल्या धैर्याचा मेरु ढासळू दिला नाहीं हीही गोष्ट तत्कालीन स्त्रियाच्या धैर्यवीर्ययुक्त मनोवृत्तीची व तेजाची प्रत्यक्ष साक्ष देत आहे

श्रीरामकाली गोवर्धन व गोरक्षण अत्यत उत्तम प्रकारचे होत असे गोरक्षणाचा व गोपालनाचा आद्यमान इतर कोणासही प्राप्त होऊ शकत नाही तो अधिकार फक्त क्षत्रियाचाच आहे रामकाली गाई-वासराचे तेजःपुज असे कळपचे कळप इतस्ततः प्रसृत झाल्याचें आढळून येई आणि तत्कालीन गोवशोद्धार बघून मन उल्हसित होई रामकालीन गोवशोद्धाराची सिद्धता एकाच गोष्टीवरून सिद्ध होते, ती गोष्ट ही की, श्रीरामचंद्रप्रभुवर जेव्हा वनवासगमनाचा अकस्मात् प्रसग आला, तेव्हा त्यांच्या वनगमनप्रसगी गोगण आपले कळपचे कळप एकत्रित करून रामचंद्राच्या वनवासगमनोत्सुक रथास अडवीत असत ! असा अनेक वेळ श्रीरामचद्राचे रथास अडथळा झाला श्रीरामचद्रानेही त्यावेळीं त्या गोगणांस त्रास न देता आपला रथ पुढे नेला ज्या वेळेस रामाचा वन-वासी रथ खरखर असा भीषण व हृदयविदारक आवाज करीत मार्ग आक्रमीत असे त्या वेळीं मानवी प्राण्यांच्या डोळ्यातून दुःखाश्रूचे लोट वाहिल्यास त्यांत काहींच नवल नाहीं, परंतु गाईचा हबरडा ऐकून मात्र अंतःकरणाला पीळ पडल्यावांचून राहात नसे त्या वेळीं साऱ्या अयोध्या नगरीतील गोगण आर्तस्वरांत हबरडे फोडून आपल्या दुःखाति रेकाची साक्ष पटवून देत होते यावरून रामप्रियता तर सिद्ध होतेच पण तत्कालीन गोवशोद्धाराचीही स्पष्ट कल्पना आल्याशिवाय राहात नाहीं रामकालीं जसें गोरक्षण

व गोप्रतिपालन होत असे तसेंच ते पुढें श्रीकृष्णकालींही होत होते. क्षत्रियकुलोत्पन्न भगवान् श्रीकृष्ण परमात्मा तर स्वतः गाई राखण्याचें, चारण्याचे आणि त्यांची सेवा-शुश्रूषा करण्याचे सर्व काम करीत असे या गोष्टीवरून क्षत्रियांचा गोरक्षणविषयक अधिकार व रामकालीन गोप्रतिपालनाची कळकळ आणि गोवर्धनविषयक आस्था ह्या गोष्टी स्पष्ट होतात

श्रीरामकालीन आर्य म्हणजेच क्षत्रिय आपल्या क्षात्रतेजप्रसारक वृत्तींत अगदीं तल्लीन असत क्षात्रोक्त कर्म करण्यात त्याना अत्यत उत्साह वाटत असून शस्त्रास्त्रविद्या, धनुर्विद्या, इत्यादि विद्या व कलांचें अध्ययन करण्यांतच ते नेहमीं आपल्या कालाचा सद्व्यय करीत असत धनुर्विद्येंत क्षत्रियानीं रामकालांत जी अद्वितीय प्रगति केली, ती कल्पनातीत व अवर्णनीय आहे श्रीरामकालीन सर्वसामान्य क्षत्रियवीर नुसत्या ध्वनि-श्रवणावर बाणाने निशाण मारू शकत असत श्रावण हा आपल्या मातापित्यांस काशीस घेऊन जात असतां वाटेत त्याना तहान लागली, म्हणून श्रावण पाण्याकरितां त्या अरण्यांतील एका सरोवराजवळ गेला आणि त्यानें सरोवरात भांडें बुडविलें त्या भांड्या-चा बुड् बुड् असा आवाज तितक्यातच शिकारीसाठीं भटकत असलेल्या दशरथाच्या कानीं गेला तेव्हा त्याला हें कोणी तरी जनावरच पाणी प्यावयास आलें असावें असें वाटून त्याने त्या आवाजाच्या अनुरोधानेंच बाण सोडला याबरोबर श्रावण तेथेंच मरण पावला या एकाच गोष्टीवरून त्या वेळीं ही विद्या कशी प्रचलित होती हें दिसून येते आणि त्या कालीं अशी ही चातुर्ययुक्त धनुर्विद्या सर्वसामान्य म्हणून गणली जात असे रामकालीन क्षत्रिय विशेषत गाद्यागरद्यावर लोळण्यात आनद मानीत नसून इतस्तत. भटकून व दुष्टाच्या निर्दालनार्थ अहोरात्र गुग राहून आपल्या क्षत्रियत्वाचें, क्षात्रवृत्तींचें व क्षात्रतेजाचे स्पष्ट उदाहरण सिद्ध करण्यातच त्याना परमावधीचा आनद वाटत असे रामचद्र, लक्ष्मणादि वीराच्या उदाहरणावरूनच हे ऐतिहासिक सत्य सिद्ध होतें

श्रीरामकालीन क्षत्रिय क्षात्रतेजाने परिपूर्ण—मडित—तर होतेच, परतु त्या बरोबरच अध्यात्मज्ञान, ब्रह्मज्ञान, धर्मज्ञान इत्यादि ज्ञानविषयक क्षेत्रातही त्याची पूर्ण प्रगति झालेली होती, या कालीं क्षत्रियांमध्ये ज्यांच्या ज्याच्या ठायीं अलौकिक बुद्धिमत्ता वास करीत होती अशा लोकांनी विज्ञानप्राप्तीकडे आपले सारसर्वस्व खर्च करून तिची प्राप्ति करून घेतली. तत्कालीन विद्वान् क्षत्रियानाच ऋषि अशी सज्ञा होती. त्यानीच वेदातर्गत सूत्रे, धर्मसूत्रें, गायत्र्यादि मत्र यांचें सशोधन व ग्रथन केले अर्थातच रामकाली बाहुबलाने विशेष श्रेष्ठ असे क्षत्रिय युद्धकलाभिज्ञतेकरितां प्रयत्न करीत होते, तर बाहुबलानें श्रेष्ठ पण बुद्धिबलानें श्रेष्ठतम असे क्षत्रिय विज्ञानप्राप्तीकरिता प्रयत्न करीत होते स्वतःच्या साध्यासाध्यतेकडे दृष्टि देऊन त्या वेळच्या सर्व घटना अबाधित चालू होत्या सर्वमान्य असा गायत्रिमत्र रामायणकालींच विश्वामित्र नामक क्षत्रियकुलभूषण ऋषीनें निर्माण केला. आणि पुढें त्याचा महिमा प्रसृत झाला गायत्रिमत्राच्या आद्यजनकत्वाचा मान क्षत्रिय ऋषी विश्वामित्र यानाच असून ही घटना रामकालांतच घडून आली. या कालीं

ब्रह्मविद्येंत क्षत्रियांची इतकी भयंकर प्रगति झालेली होती की, त्यांच्या ब्रह्मविद्याविषयक ज्ञानापुढे कोणाचाही टिकाव लागत नसे क्षत्रियकुलोद्भव जनकराजा हा ब्रह्मविद्येंत एवढा पारंगत होता की, याज्ञवल्क्यादिकांनीं त्याची सेवा करून आणि त्यास शरण जाऊन त्याच्याजवळून ब्रह्मविद्येची प्राप्ति करून घेतली चित्रगगायनी, प्रावाहण, जैबाली, कैकेय, अश्वपति, अजातशत्रु इत्यादि ब्रह्मविद्यापारंगत क्षत्रियकुलभूषण पूज्य विभूतींकडून अनेकांनीं ब्रह्मविद्येची प्राप्ति करून घेतलेली होती यावरून रामकालांतच काय पण त्या कालाच्या दीर्घकालमर्यादेपर्यंतही ब्रह्मविद्यापारंगततेचा आद्यमान क्षत्रियासच होता हे स्पष्ट होते परमेश्वरविषयक ज्ञानाचा बोध इतरेजनास देणारे, धार्मिक विवेचन करून त्यांत प्रथम प्रगति करून घेणारे आणि ईशस्वरूपी तादात्म्य पावणारे असे जर कोणी या भूतलावर असतील तर ते देदीप्यमान क्षात्रियच होते यात तिलप्राय संदेह नाहीं रामकालीन जनकराजा हा अखिलअध्यात्मविद्यापारंगत असा ब्रह्मविद्यामयूखधर तेजोमणि दिग्गणांवर स्वयंभू प्रकाशमान होत होता ही गोष्ट नव्यानें सांगण्याचीही आवश्यकता नाहीं वामनादि अवतार नाममात्र अस्तित्वांत राहून श्रीरामावतार व श्रीकृष्णावतार हे क्षत्रिय तेजोगोल अखिल ब्रह्मांडावर आपल्या दिव्य तेजानें अजूनही लखलख तळपत आहेत, याची कारणमीमांसाही हीच आहे की, या क्षत्रियावताराचे ठायीं स्वभावसिद्ध नियमानुसार ब्रह्मविद्यारश्मि एकीकरणानें उत्फुल्ल झालेले असून इतर अवतारांच्या ठायीं अर्थातच त्यांचा अभाव भासत होता याच्याच विशेष परिस्फुटणाकरितां योगवासिष्ठांतर्गत श्रीरामविवेककथनप्रणालि आणि श्रीमद्भगवद्गीतांतर्गत भगवान् श्रीकृष्णकथित विवेकप्रणालि लक्षात घ्यावी लागते म्हणजे ब्रह्मविद्यामयूखानी श्रीराम व श्रीकृष्ण हे सूर्यचंद्रवंशी दोन्ही सूर्यचंद्रतेजोगोल कसे विभूषित झाले होते याबद्दल अंतःकरणांत खरीखरी जाणीव उत्पन्न होऊन प्रेमादरानें हृदय उचंबळू लागतें

श्रीरामकालीन स्त्रीवर्गाचे महत्त्व× अत्यंत उज्ज्वल होते स्त्रियांना मोठा मान मिळत असे, एवढेंच नव्हे तर स्त्रीविना जीवन शून्य आहे, जेथें स्त्री नाहीं तेथें देवता नाहीं, जेथें स्त्री नाहीं तेथें विजयश्री नाहीं, यशसौख्य नाहीं, ज्या कुळात स्त्रियांना तामसदुःख असतें ते नाश पावते, स्त्री ही पतीचा एक मोठा प्रेमळ मित्र आहे, धर्मार्थकाममोक्षाची प्रदायिनि स्त्रीच आहे इत्यादि भावना त्यावेळीं चांगल्या श्रद्धापूर्ण रीतीने अस्तित्वात होत्या. अर्थातच स्त्रियांची चरित्रेंही तशीच उद्बोधक असत हे निराळे सांगणे नकोच वेदकालीन क्षत्रियांचें व तत्कालीन परिस्थितीचे सविस्तर वर्णन **क्षत्रियांचा वैदिककाळ** या प्रकरणात स्वतंत्रपणे केले आहे

---

× पूज्या लालयितव्याश्च स्त्रियो नित्यं जनाधिप । स्त्रियो यत्र च पूज्यन्ते रमन्ते तत्र देवता ॥ अनुशासनपर्व, ४६।५ तसेंच

अपूजिताश्चयत्रैतासर्वास्तत्राफला क्रिया । तदा चैतत्कुलं नास्ति यदा शोचन्ति जामयः ॥ अनु०, ४६।६ तसेंच

अर्धं भार्या मनुष्यस्य भार्या श्रेष्ठतम सखा । भार्या मूलं त्रिवर्गस्थ भार्या मूलं तरिष्यतः ॥ आदि०, ७४।४०

*

## शिव-धनुर्भंग



क्षत्रियकुलावतंस प्रभु रामचंद्र आपल्या अतुल क्षात्रसामर्थ्यानें महान् दिव्य अशा शिव-धनुष्याचा भंग करीत आहे.

*

# प्रकरण तिसरें

# क्षात्रप्रबोधक गीताधर्म

१ श्रीकृष्णकाल

२ क्षत्रियोत्पादित गीताधर्म

१. **श्रीकृष्णकाल**—श्रीरामकालानतर सुमारें दोन हजार वर्षानीं म्हणजे आज सुमारें बत्तीसशें वर्षांचेपूर्वी क्षत्रियकुलोत्पन्न चंद्रवशी यादव घराण्यांत भगवान् श्रीकृष्णाचा जन्म झाला व श्रीकृष्णकालास आरभ झाला भगवान् श्रीकृष्णाच्या कालांतही प्रभु रामचद्रकालीन क्षात्रघटनानुसारच कांहीं विशिष्ट घटना घडून आल्या वैदिकधर्मानतर जो गीताधर्म प्रचलित झाला, त्याचा उत्पादक भगवान् श्रीकृष्णच होय या भगवान् श्रीकृष्णोत्पादित गीताधर्माची महती वर्णन करण्यापूर्वी व त्याची रूपरेषा आंखण्यापूर्वी त्याच्या निर्माणकर्त्याचे ऐतिहासिक असें त्रोटक चरित्र येथे देणे वास्तव असल्यानें प्रथम त्याचा उल्लेख करणे क्रमप्राप्त आहे

प्रभु रामचद्रकाली शत्रुघ्नाने यमुना नदीच्या दक्षिण विभागीं मधुवन नावाचा एक प्रदेश प्राप्त करून घेतला होता या प्रदेशांत प्रथम मधु नांवाचा कोणी राक्षस वास्तव्य करीत असल्याने त्याला मधुवन असें सार्थ नाव प्राप्त झाले होतें याच विभागाला मधुवन या नावाशिवाय शूरसेनदेश याही नांवाने सबोधीत असत

या शूरसेन अथवा मधुवन देशावर शत्रुघ्नाच्या क्षत्रियवशजांनीं कालचक्रनेमीक्रमानुसार कांही कालपर्यंत आनदानें राज्य केले, परतु पुढे शत्रुघ्नाच्या वशजाकडून ती सत्ता जाऊन शूरसेनदेश अथवा मधुवनदेश निराळ्याच वसाहतवाल्यानी माडित झाला या वेळी या शूरसेनदेशात एकदर सात चंद्रवशीय घराणीं नांदत होती ती यादव, अधक, भोज, भौम, कुकुर, दाशार्ह व वृष्णि ही होत या सर्व घराण्यात त्यावेळीं यादव घराणे सपन्न व सत्ताधारी असून त्यात वसुदेव हा एक माडलिक होता त्या काली शूरसेन देशावर उग्रसेन राजाची सत्ता प्रस्थापित झाली होती या उग्रसेनास कस नामक जो पुत्र होता तो अत्यत क्रूर, दुष्ट आणि अनीतिमान् असा होता उग्रसेनाचे नाव जरी उग्र होते, तरी तो मात्र मोठा उदार, निष्कपटी, पापभीरु आणि दयाशील असा होता कसाने स्वतःच्या बापास म्हणजे उग्रसेनास कैद करून राज्यकारभार तो स्वतःच पाहाण्याची हांव धरू लागला कंसानें राज्यकाराभाची सूत्रें हातांत घेतल्यापासून शूरसेन नगरीतील सर्व प्रजाजन जुलूम, अन्याय आणि क्रौर्य या त्रयीच्या भयंकर त्रासाने होरपळून निघू लागले या कंसाची बहीण देवकी ही शूरसेन देशाचा राजा वसुदेव यांस दिली होती कंसानें आपल्या बहिणीची सांत अपत्यें जन्मतःच मारून टाकली वसुदेवदेवकीच्या पोटीं अवतरलेले आठवें

अपत्य **श्रीगोपाळकृष्ण हे** होय हा श्रीकृष्ण कंसाचा सख्खा भाचा होता पण त्यालाही मारण्याचे अनेक उपाय कसानें केले ते व्यर्थ जाऊन अखेर श्रीकृष्णाचेच हातून कंस मारला गेला

**२. क्षत्रियोत्पादित गीताधर्म**——भगवद्गीतेमधून जो प्रतिपादित झालेला आहे तोच गीताधर्म होय वैदिकधर्माचे प्रचारानतर हा गीताधर्म प्रस्थापित झाला म्हणजे क्षत्रियोत्पादित गीताधर्म प्रस्थापित होण्यास आज सुमारें तीन हजार वर्षे लोटलीं. गीता धर्माचे प्रस्थापनकालापर्यंत वैदिक धर्माचींही बरीच क्लिष्ट स्वरूपे झालीं होतीं गीताधर्म उद्भूत होईपर्यंत वैदिककालीन ऋग्वेदाचे आणखी तीन भाग निर्माण झाले व ऋग्वेद एकदर चार भागात विभागला गेला प्रथम ऋग्वेद, नतर यजुर्वेद, पुढें सामवेद आणि अथर्ववेद अशीं नामाभिधाने या भागांस पडली यजुर्वेदामध्यें यज्ञ, याग, पूजाअर्चादिकाची शिकवण दिलेली असून सामवेदामध्ये धार्मिक मत्राचे सगीत कलातर्गत ज्ञान प्रकट केले आहे म्हणजे परमेश्वरास आळविण्याकरिता, धार्मिक तत्त्वे अत.करणात ठसविण्याकरिता आणि शातता निर्माण करण्याकरिता गायनकलायुक्त असा सामवेद निर्माण झाला चवथा जो अथर्ववेद निर्माण झाला त्यात चौदा विद्या, चौसष्ट कला इत्यादिकाचे व मत्र-

---

(१) १ ज्योतिष, २ वैद्यक, ३ नाटय, ४ रसायन, ५ ब्रह्मज्ञान, ६ व्याकरण, ७ श्रुतिकथा, ८ धनुर्धरत्व, ९ जलतरत्व, १० सगीत, ११ अश्वावरोहण, १२ कोक, १३ चौर्य, १४ चातुर्य अशी चौदा विद्याची नामाभिधाने आहेत

(२) १ वाद्य, २ नृत्य, ३ गीत, ४ नाटय, ५ आलेख्य, ६ विशेषकच्छेद्य, ७ तंदुलकुसुमबलिप्रकार, ८ पुष्पास्तरण, ९ दशन वसनांगराग, १० मणिभूमिकाकर्म, ११ शयनरचन, १२ उदकवाद्य, १३ नेपथ्ययोग, १४ उदकघात, १५ चित्रयोग, १६ माल्य ग्रथनाविकल्प, १७ कर्णपत्रभग, १८ पानकरस रागासव योजन, १९ सूचीवान कर्म, २० सूत्रक्रीडा, २१ सुगधयुक्ति, २२ वीणाडमरुकवाद्यानि, २३ प्रहेलिकाकूट वाणिज्ञान, २४ प्रतिमाला, २५ दुर्वचकयोग, २६ पुस्तकवाचाशक्ति, २७ नाटकाख्यायिका दर्शन, २८ काव्यसमस्यापूरण, २९ पट्टिकावेत्रबाणविकल्प, ३० पुष्पवाटिका निमित्त ज्ञान, ३१ यत्रमातृकाधारणमातृकासवाच्यम्, ३२ मानसी काव्यक्रिया, ३३ छलितयोग, ३४ तर्ककर्म, ३५ तक्षण, ३६ वास्तु, ३७ रौप्यरत्न परीक्षा, ३८ धातुवाद, ३९ मणिरागज्ञान, ४० बालक्रीडन, ४१ अकारज्ञान, ४२ वृक्षायुर्वेदयोग, ४३ मेषकुक्कुटलावकयुद्धविधि, ४४ शुकसारिका प्रलापन, ४५ उपत्साहन, ४६ केशमार्जनकौशल्य, ४७ अभिधानकोश, ४८ शेखरापीड योजन, ४९ भूषण योजन, ५० ऐंद्रजाल, ५१ क्रौंचमारणयोग, ५२ हस्त लाघव, ५३ चित्रशास्त्रादिप भक्षविकारक्रिया, ५४ अक्षरमुष्टिकाकथन, ५५ देशभाषाज्ञान, ५६ छंदोज्ञान, ५७ क्रियाविकल्प, ५८ वस्त्रगोपन, ५९ द्यूत, ६० आकर्षक क्रीडा, ६१ म्लेंच्छितकविकल्प, ६२ वैनाविक विद्याज्ञान, ६३ वैजायिका विद्याज्ञान, ६४ वेतायिक विद्याज्ञान अशीं चौसष्ट कलांचीं नावें वर्णिलीं आहेत

तंत्रांचें ज्ञान प्रकट केले आहे या वेदांची रचना गीताधर्मकालापर्यंत होतच होती, एवढेंच नव्हे तर शेवटचा जो अथर्ववेद तो इसवीसनापूर्वी सहाशें वर्षांच्या सुमारास (अर्थात् श्रीकृष्णकालानतर) म्हणजे ऋग्वेदानंतर २५०० वर्षांनीं अथर्ववेद रचला गेला आहे या प्रमाणे वैदिक कालानतरही क्रमाक्रमानें गीताधर्मकालाच्या मर्यादेंतही वेदरचनेचें काम चालूच होतें गीताधर्म हा तत्कालीन धार्मिक घटनेवर लख्ख प्रकाश पाडणारा धर्म होय. गीताधर्माची महती अवर्णनीय आहे

" सर्वोपनिषदो गावो· दोग्धा गोपालनदनः ।
पार्थोवत्सः सुधिर्भोक्ता: दुग्धं गीतामृतंमहत् ॥ "

म्हणजे, सकल उपनिषत्‌रूपी गायींचे दोहन करून प्रभु श्रीकृष्णानें गीतारूपी दुग्धामृत अर्जुनास प्राशन करविले

प्रवृत्तिपर मार्गावरून निवृत्तिपथावर आणण्यास गीताधर्म जसा समर्थ आहे, तद्वतच निवृत्तिपथावरून प्रवृत्तिपर मार्गावर आक्रमण करण्यास शिकविण्याचे कामही गीताधर्म अगदीं बिनचूक करू शकतो गीताधर्म हा प्रत्येक मनुष्यास उक्त मार्गावर लावून देणारा मार्गदर्शक आहे गीताधर्म हा ससारसागराची वाट चुकलेल्या प्रत्येक ससारीजीवाला योग्य कर्मावलबन करण्यास शिकवणारा गुरु आहे आणि संसारविन्मुख अशा योगिजनासही युक्त प्रबोध देणारा कोटिभास्कर आहे. गीताधर्माच्या शिकवणुकीमुळें आजपर्यंत अनेक थोर थोर आर्यांना शातिलाभ प्राप्त करून घेता आला, अनेकांना ईशप्राप्तीचा व तज्जन्य ज्ञानाचा दिव्य बोध मिळाला आणि अनेकाना ससाराक्रमण करीत असतांही मोक्षपदाची प्राप्ति करून घेता आली गीताधर्माचा दरवाजा सर्ववर्णीयाना व सर्व नरनारींना सारखाच सताड खुला आहे गीताधर्माची शिकवणूक अमक्याच एका विशिष्ट वर्णानें किंवा पुरुषाने घ्यावी असा निर्बंध नाहीं हा गीताधर्म कथन करून क्षत्रिय कुलावतस भगवान् श्रीकृष्ण यानीं आपले नाव सकल विश्वांत घुमदुमत ठेवलें आहे श्रीकृष्ण हा विश्वातील एक मोठा धर्मसस्थापक पुरुष झाला यात तिलप्राय सदेह नाहीं

गीताधर्मांत जीं दिव्य तत्त्वे ग्रथित केलेली आहेत त्याचा दिव्य प्रकाश सकल विश्वांतील यच्चावत् वस्तूस प्रकाशित करणारा आहे गीताधर्म हा सर्व वेदांचे आणि उपनिषदांचे उत्तमोत्तम सार आहे, म्हणून आज सर्व जगात गीताधर्म सर्वमान्य झाला आहे. भगवद्गीतेची भाषातरें इंग्रजी, जर्मन, फ्रेंच, फारशी व चिनी ह्या भाषातूनही झालीं आहेत यावरून क्षत्रियप्रबोधित गीताधर्माची जगमान्यता व महती सिद्ध होते



# प्रकरण चवथें

# क्षत्रिय आणि बौद्धधर्म

१ बुद्धकाल

२ बौद्धधर्मप्रसारक क्षत्रिय अशोक

**१. बुद्धकाल**——श्रीकृष्णकालानतर बुद्धकाल हा क्षात्रघटनेतील एक महत्त्वाचा काल प्रसृत झाला गीताधर्माची प्रवृत्ति जेव्हां वाढत्या स्वरूपांत होती तेव्हां बुद्धकालासबधीं कल्पनाही नव्हती परंतु बुद्धकाल जेव्हां प्रसृत झाला तेव्हां जिकडे तिकडे त्या कालाची दवडी पिटली गेली बुद्धकालामधील वैशिष्ट्य हे कीं, या काली गीताधर्मानंतरचा दुसरा विस्तृत धर्म जो बौद्धधर्म त्याचा विकास बुद्धानें सपादून केला हा बौद्ध धर्म चांगलाच वाढीस लागून त्याचा विस्तारही बराच झाला होता या धर्माचे प्रस्थापकत्व गौतमबुद्धाकडे असल्याने बुद्धधर्मविवेचनाचेपूर्वी गौतमबुद्धाच्या ऐतिहासिक चरित्र विभागाकडे नजर फेकली पाहिजे

इसवी सनापूर्वी ५६७ या वर्षी वशाख शुद्ध पौर्णिमेस गोरखपूर परगण्यांतील कपिलवस्तु नांवाच्या राजधानींत **क्षत्रियांच्या** शाक्य ( चालुक्य ऊर्फ साळुके ) कुलांत शुद्धोदन राजाच्या वडील राणीचे पोटीं गौतमबुद्धाचा जन्म झाला

गौतमजन्माचे वेळीं शाक्यास कोसलांनी जिंकून घेतले असले, तरीपण त्यांनीं स्वतत्र प्रजासत्ताक राज्याचा उपभोग अनेक वर्षे घेतला होता शाक्य जेव्हां जिंकले गेले तेव्हां अर्थातच त्यांच्यावर आपत्तीचा प्रसग कोसळला

शुद्धोदनाचे राज्य चागले भरपूर असून सर्वत्र विस्तृत रीतीने पसरले होतें या शुद्धोदनास दोन बायका असून त्या एकमेकीच्या बहिणीच होत्या त्यांचीं नावे माया देवी आणि महाप्रजापती गौतमी याप्रमाणे होतीं परमेश्वरकृपेनें जेव्हां मायादेवी गर्भवती झाली, तेव्हां स्वत च्या मालकीच्या एका उपवनांत राहाण्याचा तिने आपला विचार शुद्धोदन राजाजवळ प्रकट केला या उपवनाचें ठिकाण लुंबिनि नामक गांवांत होतें शुद्धोदनानें तिचा विचार मान्य करून त्याप्रमाणे तिला त्या उपवनात योग्य व्यवस्थेनें ठेविलें त्या उपवनात असतांनाच वर सांगितलेल्या दिवशीं मायादेवीस एक तेजस्वी मुलगा झाला तोच गौतमबुद्ध होय

गौतमबुद्धाचा जन्म झाल्यावर दोन तीन दिवसांनीं असित नांवाच्या एका भविष्यज्ञाने असें भविष्य वर्तविलें कीं, हा मुलगा सकलसुलक्षणसपन्न असल्याचें दिसून येत असून पुढें याला महत्पदाची प्राप्ति होईल

बुद्धाबद्दलचें हें भविष्य श्रवण करून त्याच्या आईबापांस व आप्तगणांस अत्यंत आनंद झाला व ते स्वतःस धन्य मानूं लागले परंतु या प्रसंगीं अशी एक अत्यंत दुःख-दायक गोष्ट घडून आली कीं, हा आनंद आणि आपल्या मुलाचें कौतुक पाहण्यास राणी मायादेवी जगली नाहीं बुद्धाच्या जन्मानंतर सात दिवसांनींच तिनें आपली इहलोकची यात्रा संपवून सर्वांस दुःखोदधींत लोटून दिलें

मायादेवीचे मृत्यूनंतर बुद्धाचें पालन संगोपन पुढें महाप्रजापती देवी गौतमीनें केलें मायादेवी ही तिची बहीणच असल्यामुळें बहिणीच्या मुलाचें संगोपन करीत असतांना तिच्या ठिकाणी सापत्नभाव उद्दीपित झाला नाहीं स्वतःच्या मुलाप्रमाणेच तिनें बुद्धाचें संगोपन केलें व त्याला जिवापलीकडे जपून लहानाचा मोठा केला.

बुद्धाचीं अनेक नांवें होतीं त्यांपैकीं सात आठ नांवें प्रचलित असून त्या नामा-वलीची गणना अशी आहे:—

" स शाक्यसिंह: सर्वार्थः सिद्धः शौद्धोदनिश्च सः ।
गौतमाश्चार्कबंधुश्च मायादेवीसुतश्च स· ॥ "

'सुत्तनिपाल' नामक पालीग्रथांत असें कथन केलेले आहे की, बाल्यावस्थेपासून परिव्राजिकता अंगीकारीपर्यंत त्यांना गौतम म्हणत असत तेथून पुढे सबोधि होईपर्यंत बोधिसत्त्व म्हणत असत आणि तदनंतर बुद्ध असे म्हणत असत

गौतमबुद्धास आणखीही कांहीं नावे आहेत त्यांपैकीं वर दिलेलीं जीं शाक्यसिंह आणि अर्कबंधु हीं दोन नांवे आहेत, तीं त्यांच्या कुलावरून व वंशावरून संबोधण्यांत आलेलीं असावीं शाक्यकुलोत्पन्न म्हणून शाक्यसिंह आणि सूर्यवंशी म्हणून अर्कबंधु.

बुद्ध हे नेहमीं ध्यानधारणेत मग्न असत त्यांच्या पित्याचा जो बगीचा होता त्यांतील जांभळीच्या झाडांच्या दाट छायेखाली ते नेहमीं बसत असत व तेथेंच ध्यानधारणेत मग्न असत ध्यानधारणेंत त्याचे लक्ष अगदीं बालपणापासून उपजतच होते

" मी जांभळीच्या झाडाखाली बसत असें हे मला चांगले आठवतें अविकारी मनांतील सूक्ष्म विचाराकलनाने प्राप्त झालेल्या सच्चिदानंदाची माधुरी मला याच झाडां-खालीं चाखावयास मिळाली विज्ञानदुर्गाचा हाच रस्ता असेल काय? शुद्धांतःकरणपूर्वक एकाग्रता अवलंबिल्यामुळेच मला विज्ञानमार्गाची ओळख झाली व विज्ञानमार्ग हाच आहे अशी माझी खात्रीही पण झाली अग्गिवेस्सा! विकारी विवेकसरणीपासून अलिप्त असणा-ऱ्या सच्चिदानंदास मीं भ्यावे काय? मीं असा कृतनिश्चय केला आहे की, त्याला केव्हांही घाबरावयाचे नाहीं "

बुद्धाचा असा दाखला **मध्यमनिकायांत** दिलेला आहे या दाखल्यावरून विचार करतां बुद्धाच्या वृत्तीची चांगलीच कल्पना करतां येण्यासारखी आहे.

बुद्धाने आपली ध्यानदेवता कोणती ठरविली होती याचा विचार करणे क्रमप्राप्त आहे विश्वव्यापक प्रेमदेवता हीच त्याची ध्यानदेवता होती असे अनेक ठिकाणीं कथन केलेले आहे

प्रेम आणि ध्यान या बाबतीत याप्रमाणे बुद्धाची स्वभावतःच प्रवृत्ति असल्यानें त्याच्या पुढील कार्यकर्तृत्वाची दिशा अगोदरच स्पष्ट दिसत होती बुद्धाला विलासोपभोग भोगण्यास पूर्णपणें सवड होती राजपुत्राच्या नात्यानें विलासोपभोगाचे सर्व प्रकार बुद्धास प्राप्त झाले होते परंतु बुद्धानें तिकडे दुर्लक्ष केले

'अहिंसापरमोधर्म' 'सर्वं ब्रह्ममयजगत्' म्हणजे हिंसा न करणे, कोणाचेंही मन न दुखविणें आणि सृष्टींतील सर्व प्राणिमात्र एकाच परमेश्वराचीं लाडकीं लेंकरें आहेत, म्हणून प्रत्येकाशीं आपले बधुभावाचें नातें लागू होतें म्हणूनच भेदभाव सोडून व सर्वांना परमेश्वर-रूप समजून बधुप्रेमानें वागावें हाच खरा धर्म होय हे पवित्र व अत्यत श्रेष्ठतम धर्मतत्त्व गौतमबुद्धाने जगास शिकविलें हा उत्तम तत्त्वांचा धर्म प्रस्थापित करून व प्रसृत करून **क्षत्रियकुलोत्पन्न** गौतमबुद्ध इसवी सनापूर्वी ४७७ या वर्षी निजधामास गेला या वेळीं गौतमबुद्धाचें वय ९० वर्षांचें होतें गौतमबुद्धाच्या मृत्यूनतर त्याच्या अनेक अनुयायांनीं पाटणा शहराजवळ गुहेंत एक सभा भरवून बौद्धधर्माचे प्रवर्तन करण्याचा ठराव केला ही सभा इ० सनापूर्वी ३७७ चे सुमारास भरविली होती या सभेनतर पुन्हा दुसरी एक महासभा बौद्धधर्मानुयायानी बोलावून बौद्धधर्मीय लोकाची दोन पक्षांमध्ये विभागणी केली ते दोन पक्ष म्हणजेच उपरिनिर्दिष्ट **हीनयानपथ** व **महायानपथ** हे होत

**२. बौद्धधर्मप्रसारक क्षत्रिय अशोक**—या सभेनंतर बौद्धधर्मीय लोकाची एक जगी सभा इसवी सनापूर्वी २४२ या वर्षी चंद्रगुप्ताचा नातू अशोक यानें भरविली आणि त्यानें बौद्धधर्माची प्रवर्तन, स्थापन, विवर्धन इत्यादि बाबतीत योग्य व्यवस्था लावून दिली अशोक हा बौद्धधर्माचा मोठा प्रचारक व प्रवर्तक होऊन गेला, त्यानें आपल्या अविरत प्रयत्नानें बौद्धधर्माचा भयकर प्रसार केला

सम्राट अशोक हा फारच ऐश्वर्यसपन्न असा राजा झाला इसवी सनापूर्वी २७२ वर्षे हा त्याच्या राज्यकारभाराचा काल गणला जातो अशोकाचें अधिराज्य सीरियाचा अन्तोकोस्टियस्, इजिप्तचा टोलेमि फिलाडेल्फॉस, सिरीनचा मगास्, मॅसिडोनियाचा ॲंटिगोनोस गोनाट्स, एपिरसचा अलेक्झांडर इत्यादिकांनीं मान्य केले होतें पाटलीपुत्र या शहरी त्याची राजधानी असून शिवाय तोशाली, उज्जयिनी, तक्षशीला, सामपा अशीं मोठमोठीं व महत्त्वाची अनेक शहरें अशोक राज्यांतर्गत होतीं अशोकाच्या अफाट राज्य-विस्ताराचा प्रदेश, यवनदेश, कांबोज, गाधार, राष्ट्रिक, पैठणिक, आंध्र, पुलिंद, भोज, नभक, नभपति इत्यादि देशांतही प्रसृत झाला होता

अशोकाचें राज्य एवढें विस्तृत असून त्याचा राज्यकारभार मात्र सुरळित आणि न्यायपूर्वक चालला होता राज्याभिषेकानतर नवव्या वर्षाच्या सुमारास बौद्धधर्माचा स्वीकार सम्राट् अशोकानें केला राज्याभिषेकानंतर अकराव्या वर्षापासून हळुहळू बौद्धधर्मप्रसारास त्यानें सुरुवात केली अशोककालीं युरोप, आशिया, आफ्रिका या खंडांत बुद्धधर्मीयांचें मिशन गेलें होतें त्यानें ६४००० धर्मप्रसारक नेमले होते मगध देशांत विहार (धर्ममंदिरें) ही



गौतमबुद्ध



गुरु नानक



संत सांवतामाळी

पुष्कळ बांधून दिले या विहारांवरून मगध देशास बिहार (बहार) हें नांव प्रचलित झालें अशोकाचा पुत्र महेंद्र आणि कन्या संघमित्रा यांनाही त्या सम्राट् नृपानें सिलोनमध्यें धर्मप्रसारार्थ पाठविलें होतें यावरून अशोकाची धर्मप्रसाराची कळकळ व्यक्त होते अशोकाचे अनेक शिलालेख आहेत त्यांपैकीं एक कपुद-गिरी येथें आहे कपुदगिरी सिंधू नदीच्या कांठच्या अटक शहरापासून वायव्य बाजूस सुमारें ३५ मैलांवर आहे या शिलालेखावरील लिपी मुसलमानी—उर्दू—लिपीच्या पद्धती-प्रमाणें उजवीकडून डावीकडे अशी उलटी लिहिलेली आहे दुसरा शिलालेख खालसी येथें आहे खालसी हिमालय शिखरापासून निघालेल्या यमुनाप्रवाहाच्या वाटेत आहे. तिसरा शिलालेख गिरनारवर आहे हें ठिकाण गुजराथमध्यें सोमनाथाचे उत्तर बाजूस सुमारें चाळीस मैलांवर आहे चवथा शिलालेख धौलि येथे आहे हे ठिकाण ओरिसा-मध्यें कटकच्या दक्षिण बाजूस वीस मैलांवर आहे आणि पांचवा शिलालेख जौगड येथे असून हे ठिकाण चिलका सरोवराजवळ गजमच्या वायव्यप्रदेशीं सुमारें अठरा मैलावर आहे आणखीही उपलब्धानुपलब्ध असे अनेक शिलालेख आहेत या शिला-लेखांवर धर्मसबधी अशा जाहीर आज्ञा कोरलेल्या आहेत या कोरींव शिलालेखांचा त्रोटक व अतिव्यापक असा खालीलप्रमाणे अर्थ निघतो

[१] जनावराची हिंसा बद करावी

[२] मनुष्यांकरितां आणि जनावरांकरितां औषधोपचाराची व्यवस्था केलेली असून तिचा फायदा सर्वांनी भेदभावरहित वृत्तीनें घेण्यास विसरू नये

[३] पाचव्या वर्षी धार्मिक समेलने भरवीत असावी

[४] धर्मानुग्रहाचे ज्ञान करवून घेऊन त्याप्रमाणे आपले वर्तन ठेवाव

[५] बौद्धधर्मप्रसारार्थ धर्माधिकारी व भिक्षु नेमलेले असून त्यांचा सर्वांनीं उपयोग करून घ्यावा

[६] लोकांच्या नैतिक वर्तनावर देखरेख ठेवण्याकरितां नीतिपरीक्षक नेमलेले आहेत.

[७] धर्मप्रसार करा त्यापासून ऐहिक व पारमार्थिक अशी दोन्ही प्रकारचीं सौख्यें लाभतील

[८] विषयसुखापेक्षां धार्मिक सुख भोगणे श्रेयस्कर आहे

[९] काश्मीर, गांधार, महिष, राजपुताना, पश्चिम पजाब, महाराष्ट्र, ग्रीस, सीरिया, इजिप्त, मॅसिडोनिया, सिरीन एपिरस, हिमवस्, ब्रह्मदेश, सिलोन येथे धर्मप्रचारक पाठविले आहेत कलिंगदेश जिंकला आहे सिरियाचा राजा, मॅसिडोनियाचा राजा, इजिप्तचा राजा, सिरीनचा राजा, आणि एपिरसचा अलेक्झांडर राजा या सर्वांनीं बौद्ध धर्म स्वीकारला आहे

याप्रमाणें उपलब्ध शिलालेखांवरील लेखनाचा मथितार्थ आहे हा अशोक राजा—

**बौद्धधर्माचा मुख्य प्रसारक क्षत्रिय**–इसवी सनापूर्वी २२२ व्या वर्षी स्वर्गवासी झाला हा बौद्धधर्म सुमारें १५०० वर्षेपर्यंत जोरानें चालला आज जगांत ४३ कोटी लोक बौद्धधर्मीय आहे एकट्या हिंदुस्तानांत एक कोटी सोळा लक्ष बौद्धधर्मी आहेत अशी ही बौद्धधर्माची संक्षिप्त माहिती असून त्यांत विशेषत्व हें आहे कीं, बौद्धधर्माचा उत्पादकही क्षत्रियकुलोत्पन्नच होता आणि मुख्य प्रसारकही क्षत्रियकुलोद्भवच होता क्षात्र घटनेंतील हेंही एक वैशिष्ट्य आहे



# प्रकरण पांचवें

# क्षत्रिय आणि धर्मप्रस्थापन

१ क्षत्रियोत्पादित जैनधर्म.
२ क्षत्रियाश्रित हिंदुधर्म
३ क्षत्रियांचा धर्मसंस्थापनेचा हक्क.

**१. क्षत्रियोत्पादित जैनधर्म**— बुद्धाच्या कालींच महावीर नामक एक विद्वान् पुरुष प्रसिद्धीस आला होता या महावीराचा जन्म इसवी सनापूर्वीच्या सहाशें वर्षांच्या कालात पाटणा शहराजवळील वैसालि येथें झाला हा सिद्धार्थ नामक सुप्रसिद्ध क्षत्रिय राजाचा पुत्र होता हा महावीर तीस वर्षांचा झाल्यावर आकस्मिक उपरतीमुळें गृहत्याग करून व राज्य सोडून बैरागी बनला पारसनाथाच्या प्रणालींत त्याने आपलें शिष्यत्व प्रस्थापित केले व त्या पारसनाथाच्या सांप्रदायातच महावीर अगदी पहिल्यानें प्रवेश करता झाला कांही दिवस या पंथात राहिल्यावर नंतर त्यानें आपल्या वयाच्या चाळिसाव्या वर्षी जैनधर्मप्रस्थापनेचें काम केले त्याकरिता अनेक प्रसारकगणाची त्याने योजना केली या महावीरासच महावीरस्वामि म्हणून संबोधितात जैनांचे चोविसावे तीर्थंकर **क्षत्रिय महावीरस्वामी** हे होत भगवान् स्वरूप बुद्धाच्या वेळी हे अर्हत् शासनाचा प्रसार करीत होते

जैनधर्मांतील तत्त्वें व बौद्धधर्मांतील तत्त्वे वरवर पाहिली असता जरी सारखीं भासतात तरी सूक्ष्म दृष्टीनें विचार केला असता त्यांमध्यें बराच फरक दिसून येतो बौद्धाचें जे अहिंसातत्त्व आहे त्याची उभारणी दयेच्या पायावर झालेली आहे आणि जैनाचें जें अहिंसातत्त्व आहे, त्याची उभारणी आत्मोद्धाराच्या पायावर झालेली आहे सृष्टिकर्तृत्वा बद्दल बौद्धानी मौन धारण केलेले असून जैनानीं स्वयंभू परमेश्वराची व्याख्या प्रसृत करून ईश्वरी कर्तृत्वाचें खंडन केलेले आहे याप्रमाणे अहिंसावाद व निरीश्वरवाद ह्या दोन तत्त्वां-मधील दोघाच्या विचारसरणींत भयंकर फरक आहे आणि म्हणूनच जैनधर्म बौद्ध धर्माशीं अगर बौद्धधर्म जैनधर्माशी कोणताही विशिष्ट संबंध ठेवूं शकत नाहीं

जैनांत श्वेतांबर व दिगंबर असे दोन पंथ आहेत त्यापैकीं दिगंबर हा पंथ महावीरा-नंतर ८२ वर्षांनीं उत्पन्न झाला

जैनधर्मांतील तत्त्वसिद्धान्त असे आहेत की—

[१] आत्मतत्त्व, जडतत्त्व, काल, कर्म आणि तत्संबंधीं पुण्य, पाप, आस्रव, संवर, निर्जरा मोक्षादितत्त्वें अनाद्यनंत आहेत.

[२] ईश्वर म्हणजे स्वयंभू, अकलंक, उपाधिरहित, चैतन्यमय, व वीतरागी शुद्धात्मा होय

[३] आत्मतत्त्व व जडतत्त्व ही परस्परांपासून अगदी भिन्न असून ती केव्हांही एकत्व पावणे शक्य नाही दोन्हीही अनाद्यनंत आहेत

[४] जीवात्मा हा सम्यक्ज्ञान, सम्यक् दर्शन आणि सम्यक् चारित्र्य, या रत्नत्रयीचा उपयोग करून परमात्मा होऊं शकतो

[५] उत्तम अहिंसा, उत्तम सत्य, उत्तम अस्तेय, उत्तम ब्रह्मचर्य, उत्तम अपरिग्रह या महाव्रताच्या आचरणानें जीवात्मा हा शुद्धात्मा होऊं शकतो

[६] मोक्ष हा अभवि आत्म्यांना मनुष्यजन्मानंतर मिळूं शकतो

[७] पुनर्जन्म व परलोक आहे

हिंदुस्तानमध्ये जैनधर्मीयांची संख्या सुमारे पंधरा लाखावर आहे जैनधर्माचा प्रसार करण्यास क्षत्रिय महावीर यास मगध व वैशाली या राजकुलांतील राजांचा चांगला आश्रय मिळाला कारण महावीराचा या कुलाशीं कांहीं नात्याचा संबंध होता

महावीराच्या अनुयायांना जिन अशी संज्ञा आहे आणि जैन या शब्दाचें रूप या जिन शब्दावरूनच बनलेले आहे या जैनधर्माचें मोठें तीर्थ वऱ्हाडांत नागपूरच्या सरहद्दीवर मुक्तागिरी येथें आहे हे तीर्थ दिगंबरी पंथाचें होय बाभजी नामक महातीर्थ दक्षिणेंत आहे

अशा प्रकारची जैन धर्मासंबंधीची ऐतिहासिक माहिती उपलब्ध आहे या जैनधर्माचा मुख्य प्रवर्तक जो **महावीर क्षत्रिय**, तो क्षत्रियच होता ही गोष्ट जैनधर्मकथनांत विशेष लक्षांत ठेवण्यासारखी व महत्त्वाची आहे हा महावीर अशा रीतीनें जैन धर्म प्रसृत करून इसवी सनापूर्वी ५२७ व्या वर्षी इहलोक सोडून गेला

**२. क्षत्रियाश्रित हिंदुधर्म**—आठव्या शतकाच्या सरत्या काळांत म्हणजे इ० सन ७८८ या वर्षी आद्यशंकराचार्यांचा जन्म झाला त्यालाही धर्मसंस्थापनेची लटकी हांव उत्पन्न होऊन त्यानेंही या धाडसास आपणास प्रवृत्त करून घेतले एखादा नवीन हितपरायण धर्म प्रस्थापित करून तिकडे तत्कालीन जनसमाजाचे लक्ष वेधून घेण्याचा विचार तर त्यानें ठरविलाच, पण त्याकरितां काय काय प्रयत्न केले पाहिजेत व कोणत्या दिशेनें प्रयत्न केले पाहिजेत या विचारांतच त्याचा पुष्कळ काळ गेला

धर्मसंस्थापनेचा खरा ओलावा अंतःकरणांत जागृत नसल्यामुळे अर्थातच एवढा विचार करूनही त्याला धर्मसंस्थापनेचें एकही सत्य व सर्वमान्य तत्त्व सांपडलें नाहीं; परंतु तेवढ्याने त्यानें आपली हांव सोडली नाहीं काय वाटेल ते झालें, अनर्थ कोसळले, सद्धर्म बुडाला, सत्कर्मांचा नाश झाला, खऱ्या वैदिक धर्मास ग्लानि आली, समाजघटना बिघडली तरी पर्वा नाहीं, परंतु आपला भट्टी ऊर्फ भिक्षुकी धर्म प्रस्थापित करायचाच अशी त्यानें हांव धरली आणि अखेर या हांवेचे स्वरूप दृश्य प्रमाणांत अवतीर्ण झाले

चालत आलेल्या उच्चतम वैदिक धर्मप्रणालीचा फडशा पाडून एक नवीनच धर्म शंकराचार्यानें प्रस्थापित केला हाच तो हिंदुधर्म ऊर्फ आचारप्रधान भिक्षुकीधर्म होय. या हिंदुधर्माचा कल्पक शंकराचार्य यानें बौद्धधर्मातील कांही तत्त्वें, जैनधर्मातील कांहीं तत्त्वें, वैदिक धर्मातील कांही तत्त्वे, आर्यधर्मातील कांही तत्त्वें या सर्वांची सरमिसळ करून व त्यांच्यांत पुन्हा आपल्या कल्पनेतील कांहीं तत्त्वांचें घोडें दामटून देऊन "उत्तर मीमांसा" नावाचें एक पुस्तक लिहिलें हे पुस्तकच हिंदुधर्माची किणकिण घटी होय या पुस्तकातील तत्त्वे सर्व लोक मान्य करतील, व अशा रीतीने हिंदुधर्माचा प्रसार होऊन आपले मनोवाञ्छित सिद्धीस जाईल अशी शंकराचार्यांची कल्पना होती परंतु या पुस्तकातील त्या तत्त्वाना किंमत देण्यास कोणीही तयार होईना कारण त्यांतील तत्त्वें उदात्त विचारसरणीस धरून नव्हतीं धार्मिक तत्त्वे जशा तऱ्हेची पाहिजेत तशीं तीं नव्हतीं त्यात भेदभावाचा आणि कृत्रिमपणाचा स्पष्ट निर्देश दिसून येत होता एवढेंच नव्हे तर वास्तव विचार करता तो धर्मग्रंथच नव्हे असे लोकाच्या मनाने घेतलें होतें या हिंदुधर्माची तत्त्वे जी या पुस्तकात शंकराचार्यांने प्रतिपादिलीं होतीं, त्याचा त्रोटक माथितार्थ असा आहे का —

[१] सोंवळ्या ओंवळ्याचे प्रस्थ विशेष माजवावे जुन्या भेदभावरहित व ईश्वरनिर्मित जीवसाम्यत्वास फाटा देऊन सोंवळेशाही प्रस्थापित करावी

[२] चातुर्वर्ण्याची मीमांसा जन्मजात स्थितीवरून अमलात आणावी गुणकर्माचा त्या मीमांसेशीं कांहींही संबंध नाही जन्मावरून वर्ण ओळखले जावेत

[३] क्षत्रिय वर्ण हा सर्वश्रेष्ठ व गोब्राह्मणप्रतिपालक असा पोषक वर्ण प्रथम दर्जाचा असूनही त्याला तेथून खेचून तेथें ब्राह्मणवर्णाची स्थापना करावी म्हणजे येन-केनप्रकारेण ब्राह्मणवर्णास बढती मिळावी

[४] जो ब्राह्मणाचे पोटीं जन्म घेईल तो कितीही नीच, केवढाही दुराचारी कसाही कपटी आणि कशाही प्रकारचा व्यसनी असला तरी त्याला भू देव म्हणावें तो भूमीवरील ईश्वरावतार म्हणून त्याची पादपूजा करावी त्यालाच ईश्वर म्हणावे

[५] जन्मावरून वर्ण मानावा तशाच जातीही धंद्यावरून मानाव्यात

[६] वैदिक धर्माची पंचतत्त्वाची तात्त्विक व मानसपूजा सोडून विष्णु, शंकर, सूर्य, गणपति आणि देवी, या पंचायतनाची पूजा करावी

याप्रमाणे अनेक अव्यवहार्य अशी तत्त्वें या धर्मास चिकटवून दिल्यामुळें अर्थातच तो व्यवहार्य धर्म वाटत नव्हता धर्म हा केव्हाही व्यवहार्य असावयास पाहिजे आहे आचरणीय असावयास पाहिजे आहे निष्कपट वृत्तीने प्रेरित झालेला असावयास पाहिजे आहे आणि सत्य सिद्धान्तमय असावयास पाहिजे आहे परंतु शंकराचार्यांच्या या हिंदुधर्माच्या नांवाखालील उत्तरमीमांसा पुस्तकांत असें व्यवहार्य तत्त्व दृष्टीस पडणें मुष्किलीचें होऊन बसलें सर्व तत्त्वे अव्यवहार्य आणि मतलबीपणाचीं द्योतक अशीं [illegible]

दिसूं लागलीं आर्यधर्मांचीं जीं त्या कालपर्यंत वैदिकधर्म, गीताधर्म, बौद्धधर्मादि पर्याय-रूपें बनलीं होतीं त्या सर्वांहून हे गाडें कांहीं निराळेंच दिसूं लागले एवढेंच नव्हे तर त्यांच्याशीं अगदींच विरुद्ध दिसूं लागलें

आर्यधर्मांत, वैदिकधर्मात, गीताधर्मात अगर बौद्धधर्मात प्रस्थापित केलेली कांहीं महत्त्वाचीं उदात्त तत्त्वें या शकराचार्यानें निर्माण केलेल्या पुस्तकांतील तत्त्वांशी अगदींच विरुद्ध पडू लागल्याचे दिसून येताच तत्कालीन लोकाना हा सारा खेळखडोबा कळून आला आणि त्यानी शकराचार्यांच्या या कपोलकल्पित उत्तरमीमासात्मक हिंदुधर्मास तुच्छ व अव्यवहार्य लेखले त्यामुळे अनायासेच शकराचार्यास आपला हा 'हिंदुधर्म' नामशेष होतो की काय अशी भीति उत्पन्न झाली आणि आता काय करावे असा त्याला विचार पडला.

यानतर शकराचार्यास एक शक्कल सुचली त्यानें अबू पर्वतावर जाऊन कर्मफलाशेने यज्ञ करण्याचा घाट घातला आणि त्या वेळच्या अबूच्या पवार राजकुलास त्या यज्ञा करिता वश करून घेतले **पवार** हे **क्षत्रिय**मुगुटमणि होते यांनाच प्रमार म्हणतात

क्षत्रियांचा बाणा शरणागताचे रक्षण करणे हा असल्याने, व क्षत्रियांचे अत करण निसर्गत च पुष्पापेक्षांही नाजुक आणि वज्रापेक्षाही कठीण असल्याने या वेळी प्रमार ऊर्फ पवार घराण्यातील **क्षत्रिय** राजानी आपल्या अत करणाची थोरवी दाखविण्याच्या सहजच उत्पन्न झालेल्या—भावनेनें शकराचार्याचा धिक्कार न करतां त्याला इच्छित कार्याप्रीत्यर्थ साहाय्य देण्याचे कबूल केलें

क्षत्रियाजवळून एकदाचे अभियवचन मिळाल्यामुळे शकराचार्यास थोडेंसे समाधान वाटले आणि त्याला स्वर्गानद झाला कारण क्षत्रिय हे एकवचनी असल्याबद्दलची त्यांची जगविख्यात ख्याति शकराचार्यही जाणून होता

शकराचार्यास पवार कुलोत्पन्न क्षत्रिय राजाकडून अभियवचन मिळताच क्षीणवृत्तीनें आणि मोठ्या परोपकाराचे भावनेनें अत करण उद्दीपित झालेले आहे असा आव आणून अखेर शकराचार्यानें हिंदुधर्माचा प्रसार करण्याविषयींचा आपला मनोदय क्षत्रिय राजा समोर माडला व त्याकरिता त्याच्याकडून साहाय्याची याचना केली

धर्मसस्थापनेचे पवित्र कार्य पत्करण्यास क्षत्रिय केव्हाही तयार असतात, एवढेंच नव्हे तर धर्मसस्थापनकार्याप्रीत्यर्थ फक्त **क्षत्रियच** तयार असतात अशी आजपर्यंतची धर्मप्रणालि पाहिली असता स्पष्ट दिसून येते या क्षत्रियाच्या धर्मप्रेमी वृत्तीस साजेशीच पवाराचीही वृत्ति होती त्यानीं सरळ मनानें एकदम शकराचार्यांचे कार्यास भरपूर मदत देण्याचे वचन दिले आणि अशा तऱ्हेने हिंदुधर्मास प्रमार ऊर्फ पवार क्षत्रियानीं हातभार लावला

इसवीसनाच्या नवव्या शतकाच्या प्रारंभीं इ० स० ८१० च्या सुमारास अबू येथील पवार घराण्यांतील राजानें एक नवीन तऱ्हेचा घृतयज्ञ केला त्या यज्ञाकरितां म्हणून त्यानें पुष्कळ राजेलोकास आमंत्रणे दिली होतीं त्याप्रमाणें यज्ञप्रसगीं पुष्कळ राजेही आले होते त्या समयीं पवार राजानें हिंदुधर्मप्रसाराची ही गोष्ट राजेलोकांजवळ काढली. पवार राजाचें वजन त्यावेळा चांगलेच असल्यानें त्याच्या विनतीचा अखेर कोणा सही

करण्याची हिंमत होईना शेवटीं पवार राजाच्या या योजनेस प्रतिहार, चालुक्य आणि चव्हाण हीं तीन राजघराणीं आपापल्यापरी पुष्टि देण्याचें अभिवचन देऊन गेलीं त्यांचीही राज्यें व राज्यैश्वर्य फार मोठीं होतीं सर्व साधनसामुग्री व लोकपरिस्थिति यांचें त्यांना चांगलें ज्ञान होतें अशा रीतीनें हिंदुधर्माची किल्ली, प्रमार ऊर्फ पवार, चालुक्य ऊर्फ साळुंके, प्रतिहार आणि चव्हाण या चार क्षत्रिय राजाच्या हातीं आली

यांच्या हातीं या हिंदुधर्माची किल्ली आल्यावर शकराचार्यास मग फक्त ऐश्वर्ययुक्त थाटामाटांत पुढील परिस्थितीचा खेळ पाहात बसण्याचेंच कार्य उरलें होतें या चार राज घराण्यांची मदत त्याच्या योजनेनें मिळतांच तो कृतकृत्य झाला आतां हिंदुधर्माच्या प्रसाराची त्याला किंचितही काळजी उरली नव्हती पहिल्यानें आपल्या उत्तरमीमांसेस लोकसमाज कवडीचीही किंमत देत नाहींसें दिसतांच त्याला जेवढे वाईट वाटले होतें तेवढाच त्याला आता हिंदुधर्माच्या विस्तृत प्रसाराचीं स्वप्नें दिसू लागल्यानें परमानद होत होता या परमानदाचें मूळ क्षत्रियाच्या आश्रयांत होतें हे सागावयास नकोच.

प्रतिहार, पवार, चालुक्य आणि चव्हाण यांनी हिंदुधर्माचा प्रसार करण्याचें मनावर घेताना त्यानीं पहिल्यानें असा विचार केला कीं, अगोदर बौद्धधर्माचा आपणास नि पात केला पाहिजे, त्याशिवाय हिंदुधर्म स्थापण्याचे कार्यात यश मिळणार नाहीं हा विचार सर्वांनाच पसत पडल्यावर त्यांनीं बौद्धधर्माचा पाडाव करण्याचे प्रथम योजिले

त्यावेळीं पार्श्वनाथ नामक बौद्धधर्माचा प्रचारक व प्रवर्तक बौद्धधर्माचा प्रसार करीत होता त्या पार्श्वनाथाचा त्यानी पाडाव केला त्याचा पाडाव केल्यावर हिंदुधर्माचा सपाट्न प्रसार करण्याच कार्य या क्षत्रियानी तनमनधनेंकरून करण्याचा सपाटा चाल विला हा प्रयत्न पुढे क्रमश चालता चालता दहाव्या शतकापर्यंत बौद्धधर्मास बरीच ग्लानि प्राप्त झाली आणि तितकाच हिंदुधर्म वाढीस लागला वरील चार क्षत्रियकुळाच्या राजानीं पुढाकार घेऊन बौद्धधर्माचा धुव्वा उडविला हिंदुधर्मप्रस्थापनेच्या कालापासून धर्मग्रथलेखनाचीं सूत्रें ब्राह्मणवर्गाच्या हातात अनायासेच गेलीं कारण त्या वेळीं म्हणजे दहाव्या शतकात मुसलमानाचा उपद्याप जोरानें सुरू झाल्यामुळे, मर्द रणगाजी क्षत्रिय योद्धे आपापल्या नग्या समशेरी उपसून रणकदनात आनद मानण्यात गुग झाले होते किंबहुना शत्रूशीं सामना देण्याकरितां त्यांना तसे करणे भागच होते जोंपर्यत धर्माला ग्लानि आली होती तोंपर्यत त्यानी तेही काम केलें, आणि जेव्हा शत्रूशीं दोन हात करून जीव धोक्यांत घालण्याचा प्रसग आला तेव्हांही त्यानीच आपापल्या तरवारी उपसल्या. तात्पर्य हे कीं, हिंदुधर्मप्रस्थापनेच्या कालापर्यंत धार्मिक दृष्ट्या लेखन व रणकदन हे दोन्ही अधिकार—हे कळकळीचे व तळमळीचे दोन्हीही हक्क— क्षत्रियाकडेच होते पण पुढे अर्थातच त्यापैकीं लेखनाचा अधिकार ब्राह्मणाकडे अनायासेच गेला आणि तेव्हांपासून सर्व नासाडीच नासाडी होऊन गेली कारण स्वार्थी वृत्ति मध्ये आड आल्यानें पुढील कामें बरोबर पार पडलीं नाहीत क्षत्रियाना दोन्हीं कामें सांभाळणे शक्य नव्हते त्यामुळें इकडे त्याना विशेष लक्ष ठेवतां आले नाहीं

शंकराचार्याने आपल्या कपोलकल्पित आणि स्वार्थी वृत्तीनें प्रेरित होऊन जो 'हिंदुधर्म' वाढीस लावला त्या योगानें जनसमाजाचें मनस्वी नुकसान झालें सर्व घटनेची घडी कायमची बिघडून गेली. आणि मूळच्या आर्य, वैदिक, गीतादि धर्मावर तर बोळाच फिरला वस्तुस्थितीस अनुसरून धर्मकथन केला असे समजून चलावें तर तसेंही कांहीं त्यावेळीं दिसत नव्हतें शंकराचार्यानें मांडलेल्या या हिंदुधर्मानें समाजाची घटना कशी विस्कळित झाली, याचें वर्णन अकराव्या शतकांत अलइद्रिसी नावाच्या प्रवाशानें हिंदुस्तानात प्रवास करून जे प्रवासवर्णन लिहून ठेविले त्यावरून स्पष्ट होतें

"हिंदुस्तानात निरनिराळे बेचाळीस पंथ आहेत कांहीं ईश्वर मानतात आणि काही प्रेषित पुरुष मानतात कांहीं प्रेषित पुरुष मानीत नाहीत तर काही अगदींच नास्तिक आहेत खोदीव मूर्तीवर संसारतारक म्हणून कोणी विश्वास ठेवतात तर कांहीं फक्त दगडाचीच घृतादिकाने पूजाअर्चादि करितात कांहीं अग्निपूजक आहेत तर काहीं सूर्योपासक आहेत, ते सूर्यालाच ईश्वर मानतात काही वृक्षाची पूजा करितात तर कांही नागाची पूजा करितात कित्येक हे सर्व प्रकार झूट मानतात तर कित्येक शिव, विष्णु, आदित्य, गणेश, देवी या पांच दैवतांच्या मूर्तीची पृथक् पृथक् किंवा एकत्र पूजाअर्चा करितात अलीकडे मूर्तिपूजा सुरू झाल्यामुळे राजे, राण्या, मंत्री, श्रीमंत, सावकार हे सर्वच आपपल्या उपास्य दैवतांची मंदिरें बांधण्यात अतिशय धन्यता मानतात हे लोक देवालये बांधण्याकरिता व देवाची पूजाअर्चा चांगली चालविण्याकरिता जो पैसा खर्च करितात त्याची गणतीच करवत नाहीं सर्व देश सुशोभित व विशाल अशा देवालयांनीं फुलून गेलेला दिसतो अर्थात् अशा देवालयातील विपुल संपत्तीविषयीं परकीयांना लोभ उत्पन्न झाला असें सांगतात का, मूलस्थान ( मुलतान ) जरी मुसलमानांनीं ताब्यात घेतले तरी त्यांना मुलतानच्या सर्व मंदिरास कधी आडकाठी केली नाहीं कारण मुलतानच्या सूर्याचे यात्रेंत सर्व हिंदु येत असत आणि त्यामुळे देवालयांत अलोट संपत्ति जमत असे प्रतापशाली प्रतिहारांना मुलतान शहर सहज काबीज करता आले असतें, कारण तें कनोजवरून फार जवळ होतें परंतु ज्या ज्या वेळीं कनोजचे राजे मुलतानवर स्वारी करीत त्या त्या वेळीं मुलतानी मुसलमान मंदिरांतील मूर्ति फोडण्याचा धाक घालीत, आणि म्हणून हिंदु सैन्य मुलतानवर हल्ला न करितांच परत फिरे"

या प्रवासवृत्तावरून तत्कालीन हिंदुधर्मीयांची विकृत विचारसरणी कशी शिखरास पोचलेली होती हें स्पष्ट होतें या नवीन प्रस्थापित झालेल्या हिंदुधर्मातील तत्त्वांनीं अंधश्रद्धा विशेष वाढली जाऊन त्या योगानें समाजाचें मनस्वी नुकसान झाले हिंदुधर्मांतर्गत तत्त्वप्रतिपादनाप्रमाणे अनेक उपास्य दैवतांचीं निरनिराळीं देवालये स्थापन झाल्यावर तेथें पूजाअर्चादि व्यवस्था ठेवण्याकरितां पुजारी वगैरे लोकही नेमावे लागले व तत्प्रीत्यर्थही बराच द्रव्यव्यय होऊं लागला सर्व लोकांत अहमहमिका लागून ते परस्परांचे शत्रू बनले एकजण एका दैवताचा उपासक तर दुसरा एक त्याच दैवताचा शत्रू या भावनेच्या प्रवृद्धीकरणामुळे आपपसात कलहाचें बीज पेरलें जाऊन अनेक निरनिराळे तट समाज-

रचनेंत उद्भवूं लागले प्रत्येक मताचे निरनिराळे ग्रंथ हिंदुधर्माच्या नांवाखालीं ब्राह्मणवर्ग उत्पादित करूं लागले, आणि अर्थातच अशा रीतीनें मूळच्या आर्यधर्मातर्गत वैदिक-धर्माची पायमल्ली होऊन हिंदुधर्माचें फाजील स्तोम माजविलें गेलें यावेळीं आगम नामक ग्रंथोत्पत्ति होऊं लागली होती, व या आगम ग्रथांस लोकांकडून जबरदस्तीनें महत्त्व प्राप्त करून घेण्यांत येत होतें अशा रीतीनें ब्राह्मणवर्गानें या आगम ग्रथाची थोरवी पुढेंपुढें तर अशी प्रस्थापित केली की, त्याना वेदापेक्षांही जास्त महत्त्व ते देऊं लागले व जनते-कडून तसें करवून घेऊं लागले मुसलमानी स्वाऱ्यामुळें हा काळ मोठा धकाधकीचा असल्यामुळें क्षत्रिय वर्ग शत्रूशीं टक्कर देण्यातच गुतला होता व त्या वर्गास इकडे एवढ्या बारकाईनें लक्ष पुरवण्यास सवडही नव्हती त्यामुळें ब्राह्मणवर्गाने भलभलतीच सोंगे उत्पन्न करून राईचा पर्वत करून दाखविण्याचा सपाटा चालविला होता या आगमामुळें अनेक पथ तर निर्माण झालेच, पण अधश्रद्धाही भयकर वाढली आगमानुसार आर्य व अनार्य या दोघांनाही तपश्चर्या करता येई त्यामुळे जिकडे तिकडे तपश्चर्या करणारे यति दृष्टोत्पत्तीस येत असत तत्कालीन मुलतानच्या बाजारपेठेंत तपश्चर्या करणाऱ्या एका यतीचें वर्णन सुलेमान नामक प्रवाशानें केलेलें आहे त्यात तो म्हणतो —

" हा तपस्वी दिवसभर सूर्याकडे तोंड करून उभा राहात असे त्याचा असा हा क्रम अव्याहत सोळा वर्षेपर्यंत चालला होता त्याला सूर्याच्या प्रखर उष्णतेपासून मात्र कांहींही विकृति वाटली नाही आणि त्याला तें तेज बाधूंही पण शकले नाहीं "

असेच दुसऱ्या जगलात तपश्चर्या करणाऱ्या यतींचें वर्णनही त्याच सुलेमान नामक प्रवाशाने केलेलें असून त्यात तो म्हणतो —

" हे जगलातील तपस्वी आपला सर्व काळ पर्वताच्या गुहांतून कठीन असतात त्यांना एकांताची विशेष आवड असून लोकांशीं ते क्वचितच सबध ठेवूं शकतात बहुश लोकाशीं त्याचा सबध येऊं शकणार नाही अशीच त्याची वसतिस्थाने असतात ते आपला उदरनिर्वाह कदमूलादिकावर करीत असतात त्यापकीं कित्येक नग्नही असतात "†

याप्रमाणें त्यावेळी तपश्चर्या जिकडे तिकडे प्रसृत झाली होती यज्ञयागादिकही क्वचित् प्रसगीं होत असत मात्र पशुयज्ञाबरोबरच फल घृतादि यज्ञाचीही विशेष वाढ होती आगमग्रथाच्या प्रसारामुळे शालिग्राम, विष्णूचे बाण इत्यादिकाची खूप समृद्धि झाली यज्ञामध्ये पशूच्या ऐवजीं जरी फल घृतादिकांचा उपयोग होऊं लागला होता तरी क्षत्रिय आणि ब्राह्मण याच्यात श्राद्धप्रसगी वगैरे मांसाशन चालूच होते या वेळीं क्षत्रियामध्यें विशेषत शिवोपासना प्रचलित झाली होती हिंदुधर्माच्या प्रस्थापनप्रसगी अनेक ग्रथांतून नवी नवीं वचनें घुसडली गेलीं व त्या सर्वांमधून स्वार्थीपणाचे भूत आपला शिरोभाग सर्व जनतेस दर्शवूं लागले जसे—

**१ धर्मतो ब्राह्मण· प्रभु (१–९३) उत्पत्तिरेव विप्रस्यमूर्ति धर्मस्य शाश्वति । स हि धर्मार्थमुत्पन्ना ब्रह्मभूयाय कल्पते ॥ —मनुस्मृति १–९८.**

---

† ( इलिअट भाग पहिला ) सुलेमान प्रवासवर्णन

म्हणजे–ब्राह्मण हा या सर्व सृष्टीचा प्रभु आहे केवळ ब्राह्मणाच्या शरीराची उत्पत्ति हेंच धर्माचे अविनाशी शरीर होय ब्राह्मण हा धर्माकरिताच उत्पन्न झाला आहे आणि म्हणून तो आत्मज्ञानद्वारा मोक्षपदास जातो धर्मसबधीची ही केवढी विकृत भावना आहे हें आर्यधर्माचे अवलोकन केलें असता स्पष्ट दिसन येते व ज्या हिंदुधर्मात ब्राह्मण ही एक विशिष्ट व्यक्तीच सर्व धर्मांचें मूळ म्हणून प्रतिपादन केलेलें आहे, त्या भिक्षुकी धर्माची ही घटना कशी स्वार्थी वृत्तीने प्रेरित झालेली आहे हेंही स्पष्ट निदर्शनास आल्यावाचून राहात नाही याचप्रमाणे धार्मिक सूत्रे हातीं येताच अनेक घोटाळे धर्मात निर्माण करून स्वत.ची टिमकी वाजविण्यास शिकविणारा एकच धर्म ब्राह्मणांनीं उत्पादित करण्याची भट्टी सुरू केली ब्राह्मण हाच प्रतिपरमेश्वर, ब्राह्मण हाच सर्व देवाचा नायक, ब्राह्मण हाच सर्वश्रेष्ठ असा मथितार्थ प्रतिपादन करणारी अनेक सूत्रे ब्राह्मणानीच रचिली व त्यांचा एकच ओघ हिंदुधर्मात मिश्र केला

देवाऽधीन जगत्सर्व । मत्राऽधीनच दैवत ॥ ते मत्रा ब्राह्मणाऽधीन ।
ब्राह्मणोमम दैवत ॥१॥ —भागवत

अशा अनेक कपोलकल्पित सूत्रांनी सामान्य जनसमाज सहजच हुरळून गेला व त्याची दिशाभूल झाली उत्तरमीमासा नामक हिंदुधर्माच्या तत्त्वप्रथनाचा व प्रसाराचा परिणाम अखेर जो व्हावयाचा तोच होऊन राष्ट्रात अधश्रद्धा, सत्य-तत्त्वांगभूत दृष्टीचा अभाव, अयोग्य कर्मावलबन, उच्चनीच भेदभाववृत्ति, मतमतांतर प्रकार इत्यादिकाची अपरिमित वाढ झाली आणि त्या योगाने मूळच्या आर्यधर्माचा लोप होऊ लागला त्याबरोबरच आपापसात भयकर फुट पडली व या फुटीचा परिणाम असा झाला की, अखेर मुसलमानांचा आर्यावर्तात शिरकाव होऊन त्याना या फुटीचा फायदा भरपूर घेता आला त्यानी या नव्या शकराचार्यकथित हिंदुधर्माच्या दलामलीच्या काळांतच म्हणजे इ० सनाच्या नवव्या व दहाव्या शतकाच्या काळातच हिंदुस्तान काबीज केले आणि हिदुस्तान अशा रीतीनें गुलामांचे राष्ट्र बनले

फारशी भाषेत 'हिदु' या शब्दाचा अर्थ गुलाम असा होतो 'हिद' म्हणजे सिंधु नदीच्या उत्तरेकडील प्रदेश आणि 'सिध' म्हणजे सिंधूनदीच्या दक्षिणेचा मुलुख अशी 'हिद' आणि 'सिंध' हीं प्रदेशबोधक सबोधनें आहेत 'हिद' व 'सिध' हे दोन्ही शब्द सिंधु शब्दापासून अपभ्रशरूप पावलेले आहेत त्यापैकी 'हिद' हा शब्द इकडील लोकांनीं उचलेला आहे या दोन्ही शब्दाचे जनकत्व मुसलमानाकडेच आहे गिझनीचा महमद वगैरे लोकानी हिंदुस्तानांत स्वाऱ्या केल्या त्यावेळीं या प्रदेशास त्याना उपरिनिर्दिष्ट तुच्छ-व वैरत्वदर्शक शब्दानीं सबोधिले होते हे लोक तुर्क असले तरी त्यांची दरबारी भाषा फारशी होती आणि 'हिदु' हा शब्दही त्याच भाषेतून उगम पावलेला आहे हिंदु म्हणज गुलाम आणि हिंदुस्तान म्हणजे गुलामांचा मुलुख, अफगाणिस्तान म्हणजे अफगाण लोकांचा मुलुख, तुर्कस्तान म्हणजे तुर्क लोकांचा मुलुख, अरबस्तान म्हणजे अरब लोकांचा मुलुख. याप्रमाणें जसें आद्यशकराचार्यांच्या कपोलकल्पित धर्मरचनेच्या व्यवस्थेप्रमाणें ब्राह्मणांनीं

पोथीपुराण वगैरे घोकत बसणे हाच त्यांचा धर्म, क्षत्रियांनीं राष्ट्राच्या सरक्षणार्थ हातावर शीर घेऊन शत्रूशीं प्राणावर उदार होऊन इमानीपणानें झगडणे हाच त्यांचा धर्म, वैश्यांनीं सपत्ति मिळविणें हाच त्यांचा धर्म आणि शूद्रांनी सेवावृत्तीचा अवलब करणे हा त्यांचा धर्म, अशी धर्मरचनेची आकुंचित व आपापल्या पुरतीच अव्यवहार्य भावना शिकविण्यांत आल्यामुळें आर्यांच्या भूमीवर मुसलमानांस आपली पताका फडकवितां आली कारण प्रत्येकाच्या धर्माला बधन घालून दिल्यामुळें प्रसगीं क्षत्रियांशिवाय कोणासही मुसलमानांशीं झुंज देतां आली नाहीं क्षत्रियाशिवाय इतर कोणीही युद्धकर्मांत लक्ष घालूच नये, तसें केल्यास धर्माचा उच्छेद (?) होतो अशी दुष्ट शिकवणुकीची बेडी तत्कालीन समाजाच्या पायांत घट्ट घातली गेली असल्याने रणशूर क्षत्रियानींच तेवढे आपल्या रक्ताचे पूर मुसलमानांशीं झुजतांना वाहवले व त्यांनींच आपलीं पवित्र शिरकमले आनदानें मातृभूमीच्या अर्कीं अर्पण केली इतरांना तशा आणीबाणीच्या प्रसगीही स्वत चा विशिष्ट धर्म सोडण्याची पचाईत प्राप्त झाली आणि अखेर एकटा क्षत्रिय वर्ग लढतां लढतां सहजच थकून गेला आमचे धर्मबधू अशावेळीं धांवत येऊन आम्हाला किंचित जरी उत्तेजन देतील तरी आम्ही शत्रूचा नि पात करूच करू अशी आरोळी क्षत्रियवीराच्या समरयुद्ध हलकल्लोळांत निनादित होत असतांही क्षत्रियांस वैश्यही मदत करू शकले नाहींत, शूद्रही मदत करू शकले नाहींत आणि ब्राह्मण तर दूरच राहिले कारण त्याना आपापले धर्म सोडतां येत नव्हते, अशी शकराचार्य-कथित हिंदुधर्माची आज्ञा होती ! यामुळें अखेर मुसलमानांनीं आपल्या एकजुटीच्या साह्यानें परस्पर फूट असलेल्या हिंदूस कद करून नेण्याचा सपाटा सुरू केला असंख्य हिंदु तुर्क लोकांनी कैद करून नेले व विकून टाकले या विकत घेतलेल्या गुलामांना अफगाण लोक 'हिंदु' म्हणू लागले व अशा तऱ्हेनें या हिंदूची राखरांगोळी हिंदुधर्मानें केली 'हिंदु' म्हणजे गुलाम हा शब्द अफगाणमधून पुढें रूम प्रांतांत म्हणजे आशिया मायनरमध्यें गेला व इसवी सनाच्या चवदाच्या शतकांतील जलालुद्दीन रूमीनें तो आपल्या काव्यांत दाखल करून घेतला या 'हिंदु' शब्दाचा जन्म इसवी सन १००० नंतर झाला आणि 'हिंदु' धर्माच्या अवनतीचा कालही हाच होय

कोणत्याही धर्मात विश्वबधुत्वाचे नातें असावें लागतें तरच तो धर्म व्यवहार्य असा ठरतो ज्या धर्मांत विश्वबधुत्वाच्या नात्याचें हें तत्त्व असू शकत नाहीं तो धर्म कल्याणप्रद होऊ शकत नाहीं आर्यधर्मांत हे विश्वबधुत्वाचें नातें दृढ रीतीने निगडित झाले होतें त्यानतर आर्यधर्मांतर्गत वैदिक धर्मांतही विश्वबधुत्वाच्या पवित्र नात्यास भरपूर वाव होता पुढें आर्यधर्मांतर्गत गीताधर्मांनही विश्वबधुत्वाचे नातें स्पष्ट प्रतिपादित केलें होतें तदनतर आर्यधर्मांतर्गत बौद्धधर्मानेंही या नात्यास पुष्टि दिली होती आणि त्यानतर म्हणजे आद्यशकराचार्यांच्या कपोलकल्पित हिंदुधर्मात मात्र विश्वबंधुत्वाच्या नात्यास वाव मिळाला नाहीं उलट परस्पर शत्रुत्वोत्पादक सूत्रांनीं गलिच्छ बनलेला असा हा धर्म (?) आहे अर्थातच धर्माचे व्यवहार्य स्वरूपाचें जे विश्वबधुत्व, तें या आद्यशकराचार्यानें अमलांत येऊं दिलें नसल्याने हिंदुधर्मास धर्म म्हणणे मुष्किल होऊन बसले आणि म्हणूनच

आर्यधर्म हे उज्ज्वल नामाभिधानच कर्णमधुर आणि आचरण्यास योग्य असें वाटूं लागल्यास नवल नाहीं

दुसरी गोष्ट अशी कीं, धर्मास शास्त्राचा भरभक्कम आधार पाहिजे प्रत्येक धर्मास शास्त्राचा आधार हा असावयाचाच असा स्वयसिद्ध नियम आहे ख्रिस्ती धर्माचे शास्त्र बायबल, मुसलमानी धर्माचे शास्त्र कुराण, पारशाचें अवेस्ता, यहुद्यांचें जुनाककरार, शीखाचे ग्रंथसाहेब याप्रमाणें धर्माची शास्त्रे आहेत तसें शास्त्र शकराचार्याच्या धर्मास नाहीं आद्यशकराचार्यांने कल्पिलेला उत्तरमीमासा हा ग्रथ हिंदुधर्माचें शास्त्र नव्हे, ही गोष्ट नेहमीं प्रत्ययास येते धर्मसबधीं एखादा निवाडा सामाजिकरीत्या करावयाचा असला म्हणजे 'धर्मसिंधु' हे शास्त्र पुढें माडाव की 'शूद्रकमलाकरा'चा आधार घ्यावा कीं, 'निर्णयसिंधु' अमलात आणावा कीं, मनुस्मतीचीं' पानें चाळावीं की, 'उत्तरमीमासा' समोर ठेवावी याचाच हिंदुधर्मीयास मोठा विचार पडतो अर्थातच आद्यशकराचार्यांचा हा धर्म शुद्धतत्त्वावर उभारलेला धर्म नव्हे कारण या धर्मास विश्वबधुत्वाच्या नात्याचीही जोड नाही आणि शास्त्राचाही आधार नाहीं असा ताळमेळ नसलेला खिचडीवजा धर्म हा आहे या धर्माची मीमांसा करताना असें स्पष्ट म्हणावें लागते कीं, ज्या आद्यशकराचार्यांनें उत्तरमीमांसा कथन करून अनेक जाति निर्माण करण्याची भावना समाजात उत्पन्न केली, ज्या धर्मात अठरापगड जातीचा बुजबुजाट झालेला आहे, ज्या धर्मात एक पुरष दुसऱ्या पुरषासच गाढवापेक्षाही हीन समजून अस्पृश्य मानू शकतो, ज्या धर्माची मर्यादा स्वत:च्या पाकापुरतीच आकुचित आहे, आणि ज्या धर्माचीं तत्त्वे आचरण्यास अव्यवहार्य आहेत त्यास धर्म हें पवित्र नांव खरोखरच शोभत नाही अशा धर्मात विश्वबधुत्व नादणे कदापि शक्य नाही ज्या धर्मात जातिमत्सराचा कलहाग्नि पेटलेला असेल त्या धर्मात विश्वबधुत्व केव्हाही असूच शकत नाही आणि ज्या धर्मात विश्वबधुत्व वास करीत नाही तो धर्म, धर्म या सज्ञेस पात्रच होत नाही या दृष्टीने पाहिले असता उत्तरमीमासेच्या कथनाचा हा 'हिंदुधर्म' धर्म सज्ञेस पात्र होऊ शकत नाही आणि ज्या अर्थी हा धर्म 'धर्म' सज्ञेस पात्र होत नाहीं, त्याअर्थी आद्यशकराचार्य हा धर्मप्रस्थापकही होऊ शकत नाही हा सारा भातुकलीचा खेळ आहे

'हिंदुधर्म' हा असा अव्यवहार्य असल्यामुळे शकराचार्यांच्या या हुर या हिंदुधर्मातील कनिष्ठ भावनेने प्रेरित होऊन उद्विग्न झालेले लाखो लोक प्रत्यही परधर्मात प्रवेश करीत असल्याचें इतिहासावरून स्पष्ट होत आहे 'हिंदुधर्म' नामक धर्मातील लोकांची सख्या दिवसेंदिवस एकसारखी घटत आहे, हेच अव्यवहार्य धर्माचें लक्षण होय दर दहा वर्षांनीं होणाऱ्या खानेसुमारीचे आंकडे लक्षात घेता असें दिसून येते कीं, दर दहा वर्षांत हिंदूची सख्या शेंकडा २ या प्रमाणांत कमी होत चालली आहे ज्या धर्मात विश्वबधुत्वाचें प्रेमळपणाचें नातें उत्कट रीतीनें वास करीत असेल त्या धर्माचा आश्रय करण्यास व तेथें आपली दाद लावून घेण्यास समाज नेहमीं उद्युक्त असतो आर्यधर्मात हें नातें परिपूर्ण रीतीनें वास करीत असल्यामुळें त्या काळीं आर्यधर्म सपाटून फोंफावला गेला

होता, परंतु तोच आर्यधर्म आज हिंदुधर्माच्या रूपांतरांत गर्दीगर्द गाडला जाऊन त्याचें भेसूर चित्र आर्यलोकांस भेडसावून सोडीत आहे इतिहासाच्या घटनेप्रमाणे आणि काल-चक्रनेमिक्रमाप्रमाणें अजूनही रूढ असलेला पण ज्यासबधीं अलीकडे लोकजागृति होऊन त्याच्या सत्यतत्त्वांप्रत लोकांची दृष्टि लागलेली आहे, असा हा हिंदुधर्म अघटित घटनेनें उपस्थित झालेला आहे या नव्या हिंदुधर्माचा इतिहास हा असा आहे पुढें पुढें या धर्माचा प्रसार बराच होत गेला, परंतु त्याच्या प्रसाराचा पहिला आशीर्वाद **क्षत्रिय-कुलोत्पन्न पवार, प्रतिहार, चालुक्य चव्हाणादि** वंशजांनींच दिला होता ही गोष्ट क्षत्रियांच्या उदारतेची व धर्मप्रस्थापक वृत्तीची साक्ष पटवीत आहे क्षात्रघटनेंतील वैशिष्ट्य हेंच आहे कीं, धर्मसंस्थापन व विवर्धनकार्यांत क्षत्रियांचा अगदीं पहिल्या-पासून हात आहे

**३. क्षत्रियाचा धर्मसंस्थापनेचा हक्क**—पांच हजार वर्षांपूर्वीचा पहिला **आर्यधर्म क्षत्रियांनींच प्रस्थापित केला.** त्यानंतरचा **वैदिकधर्म क्षत्रिय** राजर्षींनींच योजिला, कथन केला आणि प्रसृत केला व तदनंतरचा **गीताधर्म क्षत्रिय-कुलावतंस भगवान् श्रीकृष्णानेंच** आपल्या दिव्य वाणींतून उद्भूत केला, व तो **अर्जुन नामक क्षत्रिय वीरासच** प्रथम कथन करून प्रचारांत आणला त्यानंतर **बौद्ध धर्म हा क्षत्रियकुलोत्पन्न गौतमबुद्ध** यानींच प्रस्थापित केला व तो **क्षत्रियकुलोत्पन्न सम्राट् अशोक** यांच्या अविरत प्रयत्नानेंच प्रसृत झाला त्याचा समकालीन **जैनधर्म हाही क्षत्रियकुलोत्पन्न राजपुत्र महावीर** यानींच प्रस्थापित केला व तो मगध आणि वैशालि या **राजकुलांनींच प्रसृत केला** तदनंतरचा म्हणजे इ० सनाच्या नवव्या शतकांत शंकराचार्यांनीं योजिलेला कपोलकल्पित 'हिंदुधर्म' नामक धर्महीं **क्षत्रिय-कुलोत्पन्न पवार, प्रतिहार, चालुक्यचव्हाणादि राजांनींच प्रसृत केला.** हा हिंदुधर्म अगदींच अव्यवहार्य व स्वार्थबुद्धिप्रेरित असल्यामुळें त्याचें उत्पादकत्व मात्र **स्वतःकडे क्षत्रियांनी** ठेवलें नाहीं कारण यांना असा खिचडीवजा धर्म उत्पादित करून देशाची राखरांगोळी करावयाची नव्हती त्यानीं निर्माण केलेले आर्य, वैदिक, गीता, बौद्धादि धर्म जसे उज्ज्वलतेची साक्ष पटवीत आहेत, तशी साक्ष हिंदुधर्म पटवीत नाहीं आणि म्हणूनच तो क्षत्रियोत्पादित नाहीं फक्त क्षत्रियाश्रित आहे आणि तोही शरणागतास मरण देऊ नये या भावनेने क्षात्रियाश्रित झालेला आहे एवढी एकच गोष्ट लक्षात ठेवली म्हणजे क्षात्रियवृत्ति, क्षात्रतेज आणि ब्राह्मणवृत्ति व भिक्षुकी भावना यांतील महदंतर दृष्टोत्पत्तीस येतें हा न्याय अगदींच निःपक्षपाती बुद्धीनें व दुरभिमानास तिलांजलि देऊन कोणासही शुद्धांतःकरणानें सोडविता येतो

याप्रमाणें पांच हजार वर्षांपूर्वीपासून तों तहत नवव्या शतकापर्यंत धर्मसंस्थापन, विवर्धन व प्रतिपालन हीं कामें क्षत्रियांनीच केलेलीं असल्यामुळें क्षत्रियांचें महत्त्व केव्हांही

सर्वश्रेष्ठ असेंच राहाणें साहजिकच आहे यापुढें मात्र मुसलमानांच्या स्वाऱ्या हिंदुस्थानावर होऊ लागल्यामुळें क्षत्रियांना समशेर खुली करावी लागल्यानें धर्मसूत्रें त्यांच्या हातून सुटणें क्रमप्राप्तच होतें त्यावेळीं देशसरक्षण हा धर्म–सद्धर्म–आचरण्यास त्यांच्या मनाची प्रवृत्ति झाल्यानें अर्थातच ब्राह्मणांनी धर्मसूत्रें आपल्या हातीं येतांच सारा धांगडधिंगा माजवून दिला आणि धर्माचे स्वरूप भेसूर करून सोडलें ब्राह्मणांच्या स्वार्थी वृत्तीनें जर थोडीशी उचल खाली नसती तर धर्माच्या अशा चिंधड्या उडाल्या नसत्या, परंतु त्यांच्याकडून स्वार्थी वृत्तीचे दमन झाले नाही आणि क्षत्रियांनी मोठ्या कष्टानें सस्थापन, संवर्धन व प्रतिपालन केलेला आर्यधर्म विकृत होऊन गेला

पुढेही मात्र ज्या ज्या वेळी क्षत्रियाना किंचित् सवड मिळत गेली त्या त्या वेळी त्यांनीं आपला धर्मप्रतिपालनाचा बाणा सोडला नाही तेराव्या शतकाच्या चवथ्या चरणांत म्हणजे इ० स० १२७२ ते १२९० या कालांत देवगिरी येथील **क्षत्रिय रामदेवराव जाधव** या राजासच धर्माधिकाराचा सर्वमान होता याबद्दल 'ज्ञानेश्वरी'मध्ये स्पष्ट दाखला दिलेला आहे सतराव्या शतकांत **क्षत्रियकुलकेसरी श्रीमच्छत्रपती शिवाजी-महाराज** यांच्याकडेच धर्माधिकाराची सूत्रे होतीं, व तीं त्यानी प्राणापलीकडे कष्ट करून आचरणात आणलीं **श्रीशिवाजीमहाराजांचें धर्मप्रतिपालन** चारही खडांत निनादित होत आहे. धर्मयुद्धांत आपली विजयपताका फडकाविणारा मर्द मराठा श्री-शिवराय हाच दिव्य पुरुष होय

बजाजी निबाळकर यास मुसलमानांतून पुन्हा मराठा जातींत श्रीशिवरायानेंच घेतलें व हिंदुधर्माच्या सघटनेचा पहिला पाया भरला

श्रीशिवाजीमहाराजांनीं ज्याला रकाचा राव करून सोडले होतें, तो खुद्द त्यांचा प्रधान मोरोपत पिंगळे, जेव्हा महाराजांच्या राज्याभिषेकाचे वेळी निरनिराळीं विघ्नें उपस्थित करून सकटें उत्पन्न करण्याचा प्रयत्न करू लागला, तेव्हां शिवाजीमहाराजानी भट्टभिक्षुकास दूर ठेवून स्वत आपणांसच—आपल्या धर्माधिकाराच्या आत्मविश्वासावर भर देऊन काशीचे गागाभट्टास बोलावून—राज्याभिषेक करवून घेतला शिवरायाची स्वारी जेव्हां राज्याभिषेकार्थ निघाली, तेव्हां वाटेत अनेक भट्टभिक्षुक उघडेबोडके होऊन महाराजांच्यापुढें आडवे पडले, व अपशकुन झाल्याचे महाराजांना पुन्हा पुन्हा प्रतिपादन करू लागले परतु श्रीशिवरायानीं त्यांच्या कांगाव्यास कवडीची किंमत न देतां आपले स्वीकृत कार्य पार पाडले, ही गोष्ट इतिहासविख्यातच आहे शिवाजी-महाराजांचे कारकीर्दीत भट्टभिक्षुक व अहमन्यशास्त्री स्वत स धर्ममार्तंड, धर्माधिकारी म्हणवून घेऊन धर्माच्या नांवाखालीं ब्राह्मणेतर बहुजन समाजास त्रास देऊन अडवीत असत, म्हणून महाराजांनी आज्ञापत्रें काढून भट्ट ब्राह्मणांचा धार्मिक जुलूम बंद केला व त्यांच्या धर्माधिकारीपणास लगाम घातला याचे दाखले शिवाजीमहाराजांच्या चरित्रांत प्रसिद्ध झाले आहेत

याप्रमाणें क्षत्रियांनीं धर्माधिकारीपणाचा आपला पवित्र हक्क प्रामुख्यानें वैदिक-कालापासून आजतागायत एकसारखा बजाविलेला आहे. यांत तिलप्राय शंका घेण्यास जागा नाहीं. क्षात्रघटनेंतील हें धार्मिक वैशिष्ट्य मननीय व अभिनंदनीय असल्यामुळें इतिहासांत क्षत्रियांस श्रेष्ठ दर्जाचा मान दिला गेला आहे



# प्रकरण सहावें

# क्षत्रियांचा वैदिककाल

[ इसवी सनापूर्वी ३००० वर्षापूर्वीचा काल ]

१ क्षत्रियनिर्मित वैदिककाल व कलियुगास प्रारभ
२ वेद पौरुषेय आहेत
३ वेदरचना काल
४ ग्रंथरचना
५ वेदकालीन क्षत्रिय

**१. क्षत्रियनिर्मित वैदिककाल**—भरतखडातील क्षत्रियाचा पहिला काल पाहू गेलें असता, तो काल वैदिककाल होय असे स्पष्ट होतें हा कालविभाग अत्यंत मोठा असून प्राचीन आहे या कालात क्षत्रियानी विशेष घटना घडवून आणल्या असून त्या घटनाच्या योगाने वैदिककाल हा क्षत्रियाचा आहे असे ऐतिहासिक सत्य उघडकीस येते या कालचा ऐतिहासिक वृत्तान्त कालाच्या भरभक्कम उदरात गडप झाल्याने तद्विषयक स्मृतीही जवळ जवळ नष्ट होऊ लागली व क्षत्रियाच्या वैदिककालाचें परिज्ञान अगदीच नाहींसे होऊ लागले कालपटलामुळे त्याचे नक्की अवतरण सापडणे जरी कठिण असलें तरी तद्विषयक स्थिति सुघटित रीतीने समजून घेण्यास इतिहासाच्या मार्गाचा अवलब करणेंच श्रेयस्कर होय

**कलियुग**—शालिवाहन शकाचे पूर्वी ३१७९ च्या चैत्र शुद्ध प्रतिपदेस कलियुगास प्रारभ झाला असे ज्योतिष ग्रथात वर्णिले आहे त्यापूर्वी एक महिन्याचे अगोदर म्हणजे कलियुगाच्या प्रारभापूर्वीच्या फाल्गुन महिन्यात पहिल्या परिक्षिति राजाचा जन्म झाला असें महाभारतात सांगितलें आहे आर्यांची राज्यसस्थापना झाली त्या काळचा हा क्षत्रिय राजा होता पाडवाच्या कालींही दुसरा परिक्षिति नावाचा राजा होऊन गेला. पण हा पहिला परिक्षिति राजा भारत कालचा नसून वैदिक कालचा होय. सध्या १८५० हा शालिवाहन शक चालू आहे शालिवाहन शकाच्या ३१७९ वर्षांपूर्वी कलियुगास प्रारभ झाला असें ज्योतिष्याचें मत *पचांगांत प्रतिपादिलें आहे म्हणून शके

* 'अथगतकलि. नव विंशत्युत्तर पचसहस्र मिताब्दा.' म्हणजे कलीला प्रारंभ होऊन आज ५०२९ वर्षे झालीं शेष कलि ४२६९७१ वर्षे आहे असें शके १८५० च्या म्हणजे इ० सन १९२८–१९२९ च्या पंचांगाच्या संवत्सरफलांत लिहिलें आहे

१८५०+३१७९=५०२९ इतक्या वर्षांपूर्वी कलियुगास प्रारंभ झाला असे स्पष्ट होत पंचांगांतही कलियुगास प्रारभ ५०२९ वर्षांपूर्वीच झाला असें स्पष्ट लिहिलें आहे आर्या वर्तांत आर्यांची राज्यसस्थापना होऊन वैदिक घटनेस प्रारभ होण्याचा कालही तज्ज्ञपंडितांनीं पांच हजार वर्षांपूर्वीचाच ठरविला आहे यावरून भरतखंडांत आर्य क्षत्रियाची राज्य-सस्थापना झाल्यापासूनच कलियुगाच्या कालगणनेस सुरुवात झाली असें दिसून येतें कोणत्याही सुप्रसिद्ध शककर्त्या राजाच्या राज्यारभापासून त्याच्या शकाचा प्रारभ होत असतो असा नियम आहे या नियमानुसार आर्यक्षत्रियाच्या राज्यसस्थापनेपासून म्हणजे पहिल्या परिक्षिति राजापासून कलियुगास प्रारभ झाला असावा व तीच कलियुगारभाची कालगणना आर्यांच्या-हिंदूच्या पचागांत सुरू केली असावी, असे वरील ऐतिहासिक पुराव्यावरून दिसून येते आर्यकालापूर्वीचा किंवा वैदिक कालापूर्वीचा सप्रमाण इतिहास आज मुळीच उपलब्ध नाहीं सर्वांत प्राचीन पुरावा वेदाशिवाय दुसरा कोणताच नाही वेदकालापूर्वीची सर्व वर्णने आनुमानिक आहेत वेदापेक्षा जुना ग्रथ दुसरा कोणताच नाही म्हणून वैदिक कालापूर्वीची वर्षगणना देण्यासही आधार नाही याच कारणामुळे पचांगांतील कलियुगारभाची कालगणना ही आर्यक्षत्रियांच्या राज्यारभाचीच कालगणना असावी असे मानण्यास सबळ कारण आहे इतकेंच नाहीं तर हा पुरावा खोडून काढण्यास दुसरा पुरावा मुळीच मिळत नाही भारत इतिहास सशोधक मडळाचे जें द्वितीय समेलन वृत्त (१८९६) प्रसिद्ध झाले आहे त्यावरूनही विचार करता कलियुगास प्रारभ होण्यास आज ५०२९ वर्ष झालेली आहेत असेच सिद्ध होतें

आता कलियुगात क्षत्रिय व वैश्य मुळाच नाहींत असे म्हणणाऱ्या भट्ट ब्राह्मणाच्या पुढे असा सवाल उघडपणे सहजच येतो की, आर्यांच्या प्रारंभकालापासूनच जर कलि युगास प्रारभ झाला आहे तर मूळच्या आर्यांपासूनच क्षत्रियाचा अभाव आहे, असाच—

कलावाद्यतयो स्थिति ॥

या भिक्षुका आधुनिक वचनाचा अर्थ समजावा काय ? आता मात्र भिक्षुकी द्वेषबुद्धीची येथे कमाल झाली !

इतिहासाच्या दृष्टीनें विचार करू गेले असता, उत्तर ध्रुवाच्या हिममय प्रदेशांत सुमारे अडीच लाख वर्षांच्यापूर्वी मानवी सृष्टीची उत्पत्ति झाली उत्तर ध्रुवाच्या भागात प्राचीनकालच्या मनुष्याची हाडे सापडली आहेत त्याच्या आकारावरून व मोजमापावरून आजच्या मानवी आकृतीशीं तुलना केली असता, सृष्टि उत्पन्न होण्यास आज सरासरी अडीच लाख वर्षे झाली असावी असा अदाज तज्ज्ञानी बसविला आहे उत्तर ध्रुवाच्या हिममय प्रदेशांतून, मध्यएशियातून क्षत्रियाचे सघ आर्यावर्तात येऊन पाच सहा हजार वर्षांपूर्वी त्यांनी द्रविडांना पराभूत केल्यानतर आपली राज्यें इकडे प्रस्थापित केली, तेव्हा त्या कालानतर त्याना जो थोडाबहुत विश्रांतीचा काल मिळाला, त्या काली त्यांनीं वेद-रचना केली क्षत्रियांचा धर्म सतत लोकहिततत्पर असणे असा उदात्त असल्याने द्रविडांशीं युद्ध करून थकल्याभागल्या वेळांतही आपला काळ फाजील कामांत खर्च न

करता, त्या काळा त्याना वदसूत्र रचण्याचें महत्त्वाचें काम केले या महत्त्वाच्या क्षत्रिय संपादित वेदरचनेमुळेंच त्या कालास वैदिककाल असे सार्थ नांव प्राप्त झालें त्या काळीं क्षत्रियानी जी सूत्रें ग्रथित केली, तीं श्रुति आणि स्मृतिवाचक होतीं. तदनंतर त्यांचा एकत्रित संग्रह केल्यावर त्यास सहिता असें नामभिधान प्राप्त झालें श्रुति शब्दाचा सबध श्रवणक्रियेशी येतो म्हणजे श्रवण केलेलें जें कथन तें 'श्रुति' शब्दानें संबोधिलें जातें तसेंच, स्मृति शब्दाचा सबध स्मरणक्रियेशी येतो जें प्रतिपादन स्मरणानें कायम ठेवण्यात आले त्याला स्मृति म्हणतात असा श्रुति व स्मृति यांचा अनुक्रमे भावार्थ आहे लेखनकला अवगत नसलेल्या काळात श्रुति–स्मृतींचे उच्चारण मात्र अव्याहृत चालू होतें व पुढे त्या श्रुति–स्मृतींना सहितारूप प्राप्त होऊन त्याचें रूपातर ऋग्वेदात झालें प्रारभी सर्व सूक्ताचा मिळून हा ऋग्वेद नामक एकच ग्रथ उत्पादित झाला ऋग्वेद या शब्दाचा अर्थ ऋक्+वेद=ऋचासबधी विज्ञान ज्यात आहे, धार्मिकमत्रासंबधी ज्ञान ज्यात प्रतिपादन केलें आहे असा जो सूत्रसग्रह तो ऋग्वेद ऋग्वेदांत १०५८० ऋचा म्हणजे धर्मविषयक श्लोक आहेत या सर्व ऋचाचा समावेश ऋग्वेदाचे दहा विभाग पाडून त्या दहा मडलात केलेला आहे पुढें काहीं कालानतर त्यातील यज्ञ-यागादिक सबधाचा जेवढा भाग होता, तेवढा स्वतत्र नियोजित करून त्याची निराळीच ग्रथनावलि तयार झाली हा यज्ञयागासबधीचा जो ऋग्वेदातर्गतच पण स्वतत्र असा भाग निर्माण झाला त्यास 'यजुर्वेद' असे नाव दिले 'यज' म्हणजे पूजा करणे, आणि तत्सबधींचें ज्ञान ज्यात कथन केले आहे तो 'यजुर्वेद' अशी यजुवेदाची व्याख्या आहे यजुर्वेद हा गद्यपद्यमय आहे यजुवेदात ब्रह्मवर्तातील सतलज आणि यमुना यांमधील स्थलाचें वर्णन दृश्यमान् होतें यावरून यजुर्वेदकाली क्षत्रियाचा प्रसार सतलजयमुनेपर्यंत झाला होता असें अनुमान काढण्यास बरीच जागा आहे ऋग्वेदामध्ये पजाबमधील स्थलाचाच तेवढा उल्लेख आढळून येतो यजुवेदामध्ये ऋग्वेदातील यज्ञयागसबधीचा अवतरित भाग तर आहेच, पण त्याशिवाय यज्ञयागादिप्रसगा आपापसात तत्सबधी झालेल्या चर्चात्मक निर्णयाचीही माहिती ग्रथित केली आहे हा भाग गद्यरूप आहे

ऋग्वेदातर्गत जो भाग यज्ञयागादिकाचे प्रसगी गायनशास्त्राच्या पद्धतीप्रमाणें सूरबद्ध रीतीनें उच्चारण्यालायक होता तोही स्वतत्र करून त्यास 'सामवेद' असे नाव दिलें सामवेद हा गायनात्मक वेद आहे याप्रमाणें प्रथम ऋग्वेद, तदनतर यजुवेद आणि हा तिसरा सामवेद असे ऋग्वेदातर्गतच वेदाचे तीन भाग उपयुक्ततेकडे लक्ष देऊन पाडले गेले ह्यासच 'त्रयीविद्या' असें नाव आहे पुढें दुसरे अनेक विषय उपस्थित झाले, त्या सर्वांचा समावेश 'अथर्व' नावाच्या वेदात केलेला आहे अथर्ववेदाची रचना सर्वांच्या मागाहून झालेली आहे याप्रमाणे ऋग्वेदरचनेनतर त्याचेच पुढें क्रमश विभाग पडत गेलेले असून **मूळचा ऋग्वेद हा वैदिककालीन क्षत्रियांनीं आपल्या ब्रह्मविद्यापारगततेवर व धर्मविषयक ज्ञानाच्या अमोघ व्यापकतेवर** उद्भुत केलेला असल्यानें **क्षत्रियांचा वैदिककालावर मुख्यतः प्रकाश** पडलेला आहे

एवढेंच नव्हे तर क्षत्रियांच्या या ऋग्वेदरचनेमुळेच या कालास **वैदिककाल** असें नांवही पण प्राप्त झाले आहे

**२. वेद पौरुषेय आहेत**— वेदाची रचना ही मानवी प्राण्यानींच केलेली आहे, परमेश्वरानें केलेली नाही, असें वेदरचनेच्या मुळाशी गेलों असता दिसून येतें ऋग्वेदाच्या एकदर दहा मंडलापैकी प्रत्येक मंडल कोणत्या ऋषीनें रचले याची माहिती नंबर दोनच्या प्रकरणात मागे दिली आहे वेदामध्यें ज्या प्रार्थना केलेल्या आहेत त्या माणसांनींच केलेल्या असल्या पाहिजेत असें त्या प्रार्थनामधील अर्थावरून कळून येतें उदाहरणार्थ, कांही ऋग्वेदांतर्गत प्रार्थनांचा येथे अवतरणे घेऊ

"हे वज्रधारि इंद्रा! आम्ही तुझी स्तोत्रे गातो तीं ऐक! तू आपले शस्त्र दस्यूवर टाक आणि आर्यांचे बल व कीर्ति वृद्धि पावेल असें कर!"

—ऋग्वेद, १-१०३-३.

"हे इंद्र आणि वरुणा! तुम्ही जे आमच्या प्रार्थना नेहमी एकता, ते आमच्या जवळ या! आणि तुम्ही आपला आश्रय आम्हांस द्या!"

"हे इंद्र आणि वरुणा! श्वेतवस्त्रें परिधान केलेल्या व जटाचे टोप घातलेल्या त्रित्सु ऋषींनी स्तोत्रें म्हणून व यज्ञ करून जेव्हा तुमची आराधना केली, तेव्हा तुम्हीं सूदाना दहा राजानीं घेरला असतां लढण्यास हिमत दिली!"

"इंद्र लढाईत शत्रूचा नाश करतो व वरुण आमच्या पारमार्थिक विधींचें संरक्षण करितो आम्ही तुमची स्तोत्रें गाऊन तुम्हास आळवीत आहोत हे इंद्र आणि वरुणा! आम्हास सौख्य द्या!"

"इंद्र, वरुण, मित्र आणि आर्यमान् आम्हास संपत्ति आणि विस्तृत घरें देवोत! आदितीची कान्ति आम्हांस सुखकर होवो! आम्ही देवि सवितृदेवतेचे स्तोत्र गातों!"

—ऋग्वेद, ७-८-३

ह्या प्रार्थनावरून विचार केला असता, वेदाचे रचनाकार हे पुरुषच आहेत असें स्पष्ट ध्वनित होते वेद जर अपौरुषेय असते तर अशा तऱ्हेच्या प्रार्थना वेदांत आढळून येण्याची जरूर नव्हती ह्या प्रार्थना त्रिगुणात्मक‡ आहेत अर्थातच त्या पौरुषेय आहेत. अशा भौतिक सौख्यात्मक प्रार्थना ईश्वरीज्ञानाच्या दृष्टीने अपौरुषेय असू शकत नाहीत वेदाची रचना महान विद्वान् अशा क्षत्रिय राजर्षि, गोत्रऋषी व क्षत्रिय राजपुत्रानी केलेली आहे, हे प्रकरण नं २ दोन यांत विस्ताराने प्रतिपादन केलेच आहे वेद अ-पौरुषेय म्हणण्यापेक्षां ते अ-लौकिक सामर्थ्याच्या महात्म्याकडून रचले गेले असे म्हणणे केवळ सयुक्तिकच नव्हे तर वस्तुस्थितीस धरून होते सामान्य माणसाच्या दृष्टीनें वेद अपौरुषेय वाटणे साहजिकच आहे, कारण सर्वसाधारण मनुष्य स्वतःला 'पुरुष' या संज्ञेने ओळखून नंतरच वेद 'अ-पौरुषेय' असावे असा तर्क काढीत असतो कारण पौरुषेय व अपौरुषेय

‡ त्रैगुण्या विषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन। —भगवद्गीता

याची मीमांसा तो स्वतःच्या पौरुषत्वावरून करूं पाहत असतो आणि अर्थातच स्वतःच्य पौरुषत्वाचा विचार केल्यावर त्याला वेद हे अ–पौरुषेय वाटू लागतात अशा दृष्टीनें वेद हे अपौरुषेय आहेत अशी जरी भावना असली तरी ते आपणांपेक्षां–सर्वसामान्य माणसांपेक्षां–विशेष बुद्धिमत्तेच्या व ज्ञानवंत लोकांनी, विज्ञानवंत पुरुषांनींच रचलेले आहेत एवढी गोष्ट मात्र सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट आहे

वेद, बायबल, कुराण, अवेस्ता, जुनाकरार ग्रंथसाहेब इत्यादि ग्रंथास तद्धर्मीय लोक अपौरुषेय असेंच मानण्याचा प्रयत्न करितात याचं कारण एक तर स्वतःच्या ज्ञानावरून विचार करता त्याना ते ग्रंथ अपौरुषेय वाटतात दुसरें असें कीं, तसें प्रतिपादन केल्याशिवाय आपल्या धर्मग्रंथास महत्त्वच प्राप्त होणार नाही अशीही एक समजूत या भावनेच्या मुळाशीं आहे परंतु हा सर्वच घोंटाळा समजुतीचा असल्यामुळे ऐतिहासिक सत्य त्यामधून एवढेंच बाहेर पडते कीं, कोणताही धर्मग्रंथ केव्हाही ईश्वरप्रणित म्हणजे अपौरुषेय असूंच शकत नाही कोणताही धर्मग्रंथ अपौरुषेय म्हणजे ईश्वरप्रणित आहे अशी भावना प्रसृत करणे म्हणजे ईश्वरविषयक अज्ञानाचें प्रदर्शन करणे होय निराकार, निर्गुण, निर्विकारी असा परमेश्वर ग्रंथरचना करण्याचे कार्यास स्वतःस कसा गुंतवून घेऊं शकेल, याचा विचार केला असता, **वेद हे अपौरुषेय नसून क्षत्रियोत्पादित आहेत** हेंच स्पष्ट होतें

**३. वेदरचनाकाल**—वेदरचनेचा प्रारंभकाल कोणता याविषयीं ऐतिहासिक दृष्ट्या विचार करणें विशेष अगत्याचें आहे वेदरचनेच्या कालासंबंधी जी मतें प्रचलित आहेत, त्यांत कै० शंकर बाळकृष्ण दीक्षित यांच्या 'भारतीय ज्योतिषशास्त्र नामक पुस्तकांत प्रतिपादन केलेलें मत विशेष ग्राह्य आहे आणि तें वस्तुस्थितीस धरूनही आहे

तैत्तिरीय* संहितत आणि शतपथ ब्राह्मणांत कृत्तिकादि नक्षत्रांचा उल्लेख आहे सबब त्यांचा म्हणजे यजुर्वेदाचा काळ शें दोनशें वर्षांच्या छाटयाने इ० सनापूर्वी तीन हजार वर्षांचा असावा ज्यापेक्षा ऋग्वेदसंहिता ही यजुर्वेदापेक्षा पुष्कळ जुनी आहे, व तींत कृत्तिकादि नक्षत्रें नाहींत त्यापेक्षा ऋग्वेदसंहिता इ० सनापूर्वी तीन हजार वर्षांपलीकडील असल्याचें निर्विवाद सिद्ध होतें म्हणजे आज सुमारें पांच हजार वर्षांपलीकडील कालांत ऋग्वेदातील ऋचा आमच्या पूर्वजांनी गाइल्या असल्याचें उघड दिसतें

वेदरचनेचा प्रारंभकाल उपरिनिर्दिष्ट विधानावरून इ० सनापूर्वी तीन हजार वर्षांच्या पलीकडील आहे असें सिद्ध होतें त्या विधानास पुष्टि देणारी आणखी एक दुसरी गोष्ट अशी आहे कीं, ऋग्वेदाचीं प्रारंभींचीं काहीं मंडलें विश्वामित्र नामक क्षत्रिय राजर्षीनें रचल्याचा पुरावा वेदांतच असून तो विश्वामित्र श्रीरामचंद्राचा समकालीन ऋषि असून रामचंद्राचा गुरु होता श्रीरामचंद्राचा काल इ० सनापूर्वी तीन हजार

* दीक्षितकृत ज्योतिषशास्त्र.

वर्षांच्या पलीकडीलच सिद्ध झालेला आहे. आणि म्हणून श्रीरामचंद्राचा गुरु क्षत्रिय राजर्षि विश्वामित्र यानींच ऋग्वेदाचीं काहीं मडलें रचिलीं असल्यानें अर्थातच विश्वामित्रकाल तोच ऋग्वेदरचनाप्रारंभकाल आणि श्रीरामकाल तोच विश्वामित्रकाल अशा तात्त्विक दृष्टीने वेदरचनेचा प्रारभकाल हा इ० सनापूर्वी तीन हजार वर्षापूर्वीचा म्हणजे सुमारें पाच हजार वर्षापलीकडीलच ठरवितां येतो.

वेदरचनाप्रारभकालाचे अनुमान काढताना कै० टिळकांनीं 'ओरायन'मध्यें जी विचारसरणी उद्धृत केलेली आहे, ती ही येथें दिल्यास तुलनात्मक दृष्ट्या विचार करण्यास ठीक पडेल

‡ "नाक्षत्रिक प्रमाणावरून वेदनिर्माणकालाला म्हणजे ऋग्वेदास आरभ होण्याला आज सुमारें दहा हजार वर्षे झाली असावीत कारण वेदांगज्योतिष हे वेदाच्या उत्तर-कालीन झाले असून त्याची पूर्वमर्यादा इ० सनापूर्वी १५०० वर्षांची आहे त्याची उत्तर मर्यादा इ० सनापूर्वी ५०० वर्षें म्हणजे पूर्वमर्यादेनतर एक हजार वर्षांची आहे अर्थात् वेदांगज्योतिषाला प्रारंभ झाल्यापासून तें पूर्ण होण्यास हजार वर्षे लागलीं सर्वात शेवटला वेद म्हणजे अथर्ववेद पूर्ण होऊन त्यानतर त्यावरून तयार होणाऱ्या वेदांगज्योतिषाचा प्रारभकाल जर इ० सनापूर्वी १५०० वर्षे आहे, तर त्याच्या हजारों वर्षापूर्वी निर्माण झालेला सामवेद व त्याच्यापूर्वीचा यजुर्वेद व त्याच्याही पूर्वीचा अगदीं सर्वांत आद्य असा जो ऋग्वेद त्याला प्रारभ होण्यास दहा हजार वर्षे लोटली असावी यात सशय नाही"

**ग्रंथरचना—वेद्**–वेदाचे चार भाग अनुक्रमें ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद आणि अथर्ववेद हे वर्णिले आहेत एवढ्यावरच ग्रथरचना न थाबतां ती पुढेही अनेक प्रकारें प्रसृत झाली यज्ञप्रसगी जेव्हा अनेक विद्वान् एकत्रित होत असत तेव्हा अनेक गहन विषयावर त्याच्यामध्ये चर्चा व वादविवाद होत असे मोठमोठ्या यज्ञप्रसगी असे चर्चा त्मक वाद विद्वज्जनाकडून अवश्य उपस्थित होत असत ही गोष्ट त्या वेळीं सर्वसामान्य गणली जात असल्याने अगोदरच यज्ञप्रसगी 'ब्रह्मा' म्हणून एक मनुष्य अध्यक्ष नेमून टाकीत असत याला यज्ञप्रसगीं उद्भवलेल्या वादविवादाचा निकाल देण्याचा अधिकार दिला जाई या 'ब्रह्मा'सच 'ब्रह्मदेव' असेही म्हणून सबोधीत असत ब्रह्मदेव हा सृष्टीचा

---

‡ टिळककृत ओरायन

'ओरायन'मधील या प्रतिपादनाला आनुमानिक आधाराचीच विशेष जोड असल्या-मुळें व वस्तुस्थितीस विरोधक असे हे अवतरण असल्यामुळे पौर्वात्य आणि पाश्चिमात्य विद्वानांना हे प्रतिपादन मान्य नाहीं दीक्षितांचे वेदरचनाप्रारभकालगणतीसच विशेष महत्त्व दिले गेले आहे कारण ते प्रतिपादन, नाक्षत्रिक आधारांनी प्रबाधित असें असून शिवाय वस्तुस्थितीस हुबेहुब मिळणारें आहे आणि म्हणून **वेदरचनेचा प्रारंभकाल** श्रीरामकाली म्हणजे **इ० सनापूर्वी तीन हजार वर्षांच्या पलीकडील** आहे असें स्पष्ट सिद्ध झालेले आहे

उत्पन्नकर्ता नसून तो आपल्या यज्ञसृष्टीचा नायक मात्र होता ब्रह्मदेवास सृष्टिउत्पन्नकर्ता असें मानण्याचे काहीही प्रयोजन नाहीं कारण, ब्रह्मदेव हा विष्णूचा पुत्र होता आणि विष्णु हा तत्कालीन आर्यांचा वैकुंठचा सत्ताधारी पहिला राजा होता ज्या अर्थी विष्णु हा राजा होता त्या अर्थी त्याचे प्रजाजनही त्याकाळीं पुष्कळच असणे साहजिकच आहे त्याचें सैन्य, (फौज) अंकित संस्थाने, संस्थानिक हेही कोट्यावधि लोकांच्या गणतीनें गणले जाणार हेही स्पष्टच आहे अर्थातच ज्याच्या हाताखाली कोट्यावधि प्रजाजन नांदत होते त्या विष्णूला ब्रह्मदेव नावाचा पुत्र झाला असताना त्यालाच सृष्टिकर्ता कसे म्हणता येईल याचाच विचार पडतो कारण ब्रह्मदेवाच्या अगोदर विष्णूस प्रजाजन वगैरे अनेक होतेच म्हणजे सृष्टि ही ब्रह्मदेवाच्या पूर्वीच होती आणि म्हणूनच ब्रह्मदेव हा सृष्टि उत्पन्नकर्ता नव्हे

**ब्राह्मण ग्रंथ**—यज्ञयागप्रसंगा होणाऱ्या वादविवादाचा निकाल देण्या करिता जेव्हा 'ब्रह्मा' नेमीत असत, तेव्हां गहनविषयावरील सर्व वादविवादाचा तथ्यांश काढून तो एकत्र ग्रथित केला जाई कारण तो वादविवाद अत्यंत मननीय आणि प्रबोधक असा असे अशा रीतीनें हे ग्रथनकार्य झाल्यावर ज्या ग्रंथातून ते वादविवादरहस्य ग्रथित केले जाई त्यास 'ब्राह्मण' अशा संज्ञा दिली जात असे 'ब्रह्मा' या शब्दावरून 'ब्राह्मण' या शब्दाची घटना घडून आली ब्राह्मण ग्रंथ म्हणजे ब्रह्म्याच्या नेतृत्वाखाली झालेल्या वादविवादाचे ग्रंथ याप्रमाणे **'ब्राह्मण' ग्रंथाची रचना** होत गेली

**आरण्यके**—तसेच कित्येक गहन विषयांची चर्चा जेव्हा एकांतवासाशिवाय होतच नसे, तेव्हा सर्व विद्वज्जन मिळून एखाद्या शांत आणि निर्जन अरण्यात जाऊन बसत असत व तेथें मग शांतपणाने वादविवाद चालत असे अरण्यात जाऊन वाद-विवाद व चर्चा चालत असे, म्हणून ब्राह्मण ग्रंथातील तद्विषयक भागास 'आरण्यके' अशी संज्ञा आहे याप्रमाणे **आरण्यक ग्रंथांची रचना** झाली

**उपनिषदे**— परमेश्वरस्वरूपाची माहिती करून देणारे, सृष्टीच्या उत्पत्ति स्थितिलयासबंधी ज्ञानाने विभूषित झालेले, अध्यात्मविषयक गहनविचारांनीं ओथंबलेले अशा काही ग्रंथांची रचना पुढे उद्भूत झाली या ग्रंथास उपनिषत ग्रंथ असे म्हणतात. ही **उपनिषदें पुरूरवा, जनक इत्यादि क्षत्रिय राजर्षींनी** रचलेली असून त्यांच्यापासून ब्राह्मणांनी पुढे त्यांचा अभ्यास केला क्षत्रियाजवळ बसून ब्राह्मणाना हा उपनिषदे शिकून घेतली, क्षत्रियाजवळून ब्राह्मणांनी उपनिषदाची माहिती करून घेतली म्हणूनच तीं उपनिषत म्हणजे जवळ बसून शिकणे, अशा अर्थाने सर्वोविर्ली जात आहेत ब्राह्मणास क्षत्रियांचे उपाध्याय मानतात ते याच कारणामुळे की, त्यांनी क्षत्रियांजवळ बसून उपनिषदाचें अध्ययन केलले आहे स्वाध्याय म्हणजे स्वत. अध्ययन केलेलें उर्फ स्वार्जित, आणि उपाध्याय म्हणजे दुसऱ्याजवळ ( अर्थात् क्षत्रियाजवळ ) अध्ययन करणारे जे, ते उपाध्याय, याप्रमाणें **उपनिषत् ग्रंथांची रचना** घडून आली मूळच्या

चार 'संहिता', पुढें 'ब्राह्मणग्रंथ', त्यापासून 'आरण्यकें', 'उपनिषदें', याप्रमाणे **वेदांतर्गत ग्रंथरचना** होत गेली या ग्रंथरचनेचे **सर्व श्रेय क्षत्रियांनाच आहे** ही गोष्ट विशेष लक्षांत ठेवण्यासारखी आहे

**सूत्र**—याप्रमाणे ग्रंथरचना वेदांतर्गत व्यवस्थेप्रमाणे घडून आली याशिवाय 'सूत्र' अशा संज्ञेने संबोधित झालेली ग्रंथरचनाही झाली पाल्हाळिक वर्णनें लक्षांत ठेवणें जेव्हा कठिण जाऊ लागले, तेव्हा त्या सोयीसाठी म्हणून थोडक्यात पुष्कळ अर्थाचा बोध करून देणाऱ्या सूत्राची रचना करण्यात आली या 'सूत्रा'मध्ये विशेष हे की, ती लक्षात ठेवण्यास सुलभ अशी असून पुष्कळ अर्थानें व्यापलेली अशी असतात इ० सनापूर्वी ५०० ते इ० सनापूर्वी २०० या काळात सूत्रें रचली गेली या सूत्रांचे मुख्य भाग तीन आहेत ते अनुक्रमे असे की, श्रौतसूत्रे म्हणजे यज्ञयागादिकासंबंधाने माहिती ग्रथित केलेली सूत्रे, गृह्यसूत्रे म्हणजे घरच्या घरी करावयास लागणाऱ्या विधीसंबंधी माहिती देणारी सूत्रे आणि धर्मसूत्रे म्हणजे समाजाचे योग्य रीतीने नियमन करण्यासंबंधी माहिती देणारी सूत्रे, याप्रमाणे सूत्रविषयक मुख्य तीन विभाग आहेत ह्याशिवाय व्याकरण, न्याय, वेदान्त वगैरे दुसऱ्या विषयावरही पुढे सूत्रग्रंथ निर्माण झाले उपरिनिर्दिष्ट जी धर्मसूत्रे वर्णिलेली आहेत, त्यासंबंधी 'स्मृति' नावाचे विस्तृत ग्रंथ पुढे लिहिले गेले मनु, याज्ञवल्क्य, पराशर वगैरेंचे स्मृतिग्रंथ इतस्ततः प्रसृत झालेले आहेत मनुस्मृतीचा जनक मनु याचा जन्म इ० सनाच्या दुसऱ्या शतकात झाला

**५. वेदकालीन क्षत्रिय**—क्षत्रियांनी आपल्या कारकीर्दीत जे पहिले युग निर्माण केले, ते वैदिककालयुग होय या वैदिककालातच क्षत्रियांनीं आपल्या वर्चस्वाचा दरारा आर्यावर्तात बसविला होता मूळच्या लोकापासून जेव्हा क्षत्रियांनी आर्यावर्त जिंकून घेतले, तेव्हा त्या युद्धप्रसंगीचा त्यांचा उत्साह, त्यांची धडाडी आणि त्यांची कार्यतत्परता ही अवर्णनीय अशी भासत होती या युद्धांतील बारीकसारीक हकीगती उपलब्ध होणें शक्य नाही, परंतु या काळाचे यथार्थ चित्र ज्यात रेखाटले आहे असा ऋग्वेद समोर ठेवून त्यामधील सूत्रांचा विचार केला असता तत्कालीन क्षत्रियांची कर्तबगारी कळून आल्याशिवाय राहात नाही, या ऋग्वेदामध्ये अशी सूत्रे क्षत्रियांनी ग्रथित केलेलीं आहेत कीं, त्यांचें ऐतिहासिक दृष्ट्या यथार्थ रीतीने मनन केले असता अजूनही क्षत्रवंशास उत्साहाच्या लहरी आल्यावाचून राहणार नाहीत या विजयी क्षत्रिय लोकांनी तो अरण्यमय प्रदेश झाडेझुडपे तोडून अगदी सुंदर असा तयार केला मूळच्या वसाहतवाल्यांना आपल्या अमोघ शौर्याचे बळ वर तेथून हाकून लावले कृषिकर्मविद्या, शस्त्रास्त्रविद्या, ब्रह्मविद्या, आत्मज्ञान इत्यादिकांची अत्यंत ऊर्जितावस्था निर्माण केली आणि आर्यधर्म आणि आर्यसत्ता यांचा कीर्तिडिंडिम सर्वत्र निनादित केला.

मूळच्या जंगली लोकांचा नायनाट व पराभव आर्यक्षत्रियांनी कसा केला ही हकीगत इतिहासावरून स्पष्टच समजून येते. ख्रिस्तानंतर अठराशें वर्षांनीं ज्याप्रमाणें

मिसिसिपी नदीच्या किनाऱ्यावर अमेरिकेतलि मूळच्या अरण्यांत पारध करून राहाणाऱ्या पूर्ण सत्ताधारी, शूर व रणोत्सुक अशा इंडियन लोकांचा समूळ नाश करण्यांत आला; त्याचप्रमाणें ख्रिस्ताचे तीन साडेतीन हजार वर्षांपूर्वी सिंधूनदी व तीस मिळणाऱ्या अनेक नद्या यांच्या किनाऱ्यावर राहाणाऱ्या मूळच्या लोकांचा फडशा उडाला क्षत्रियांनीं या मूळ लोकांचा फडशा उडविल्यावर त्याना अर्थातच राज्यसंस्थापनेचीही इच्छा उत्पन्न झाली व त्या दृष्टीनेच त्यानी पुढें तो प्रदेश राज्यसंस्थापनकार्यास प्रयुक्त असा तयार केला त्यांनी दुर्गम असे मार्ग साफ करून टाकले, अरण्याचे ठिकाणीं नूतन सुदर शहरे निर्माण केली, आपल्या समाजात धर्म, नीति, राज्यपद्धति याचे सुयत्रितपणें व उच्च दर्जाचें संवर्धन केले, आणि तो मूळचा रानटी प्रात व ते रानटी वातावरण यांचे एक पुण्य-प्रद स्थान तयार केलें तोच प्रदेश 'आर्यावर्त' होय हा आर्यावर्त क्षत्रियानी सर्वश्रेष्ठ असा तयार केला पूर्वी तो 'आर्यावर्त' नव्हता

आर्य क्षत्रियाची पूज्यदैवते आकाश, सूर्य, अग्नि, प्रचडवायु ही त्या काळी मानलीं जात होती त्याना यज्ञ करून आहुति दिल्या जात ज्या ज्या ठिकाणीं त्यानीं मुलूख जिंकला असेल त्या त्या ठिकाणीं ही देवताची आराधना व याज्ञिक विधि ते आचरणात आणीत असत त्या वेळच्या दस्यू लोकामध्येही सृष्टिदेवताची आराधना करण्याची चाल नव्हती व त्यांच्यात यज्ञयागादिक करण्याचीही पद्धति अमलात आणली गेली नव्हती दस्यूच्या या आचरणास क्षत्रिय अत्यत निंद्य मानीत व हा भ्रष्टाकार आहे असें त्याना वाटत असे दस्यू हे उपरिनिर्दिष्ट सृष्ट दैवतांची आराधना करीत नसल्यामुळे आपल्या पूज्य दैवताचा हा अपमान आहे अशी आर्यक्षत्रियाची भावना होती दस्यूचे असें करणे आर्यक्षत्रियाना मानवत नसल्यामुळे या दस्यूंच्या कृतीबद्दल व आचरणाबद्दल त्याना योग्य प्रायश्चित्त देण्यास ते कधीही मागेपुढ पाहात नसत आणि आपल्या इष्ट दैवताजवळही दस्यूंचा नाश करण्याबद्दल प्रार्थना भाकीत असत. दस्यूंच्या या वर्तनास नाश अथवा मृत्यु हेंच प्रायश्चित्त होते आणि तें आपल्या इष्टदेवतेकडून आर्यक्षत्रिय मागवून घेत असत म्हणजे तसे करण्याप्रीत्यर्थ ते त्या दैवतास विनवीत असत

दस्यू हे आपापल्या कुटुबासहित कोठेंतरी लपून बसत असत आणि तेथून क्षत्रिय लोकाच्या सपत्तीविषयी वगैरे ते बारीक माहिती काढीत असत अशी माहिती मिळताच ते क्षत्रियांवर दरोडा घालण्याचेही प्रसंग उपस्थित करीत असत परतु एका क्षणातच रणशूर, मर्द व गाजी क्षत्रियवीर त्याचा नि पात करीत जितक्या जोरानें ते पुढें येत तितक्याच जोराने व त्वरेनें त्याचा निःपात केला जाई परतु असा नि पात झाला म्हणून दस्यू एकदम कच खात नसत ते पुन्हा एकाद्या अरण्यात वगैरे दबा धरून बसून पुन्हा विशेष निकराने आपली टोळी पुढें सरसावीत असत परतु पुन.ही नि पातच होऊन अयशस्वितेचीच थप्पड मिळत असे

या योगाने क्षत्रियांना एक गोष्ट मात्र चांगली अनुभवास येई ती ही कीं, दस्यूनीं

ज्या जंगलाचा आश्रय धरला असेल तो जंगल लगेच तोडून साफसूफ केला जाई. याप्रमाणे दस्यूंनी क्षत्रियांच्या दिव्य पराक्रमापुढें कायमचा प्रणाम केल्यावर क्षत्रियांनी मग त्या जगली प्रदेशात लागवडीचें वगैरे काम सुरू करण्याचा सपाटा चालविला.

दस्यू हे क्षत्रियवीरांच्या घोड्यास अतिशय भीत असत त्यांच्या लढाऊ घोड्यां-बद्दल दस्यूंच्या मनांत इतकी भीति वाटत असे की, त्याचे घोडे दस्यूना स्वतःकडे येत असल्याचे दिसतांच ते पलायन करीत

मूळच्या अमेरिकन लोकाना घोड्यांची माहिती नसल्यामुळें व त्या जनावराचा त्यांना पूर्वपरिचय नसल्यामुळें त्याना स्पॅनियर्ड लोकाच्या घोड्याची जशी विलक्षण भीति वाटत असे तशीच स्थिति क्षत्रियाच्या घोड्यांपुढें दस्यूची होत असे

त्या वेळी दधिक्रा नामक क्षत्रियाचा जो मर्द घोडा होता तत्सबधींची जी सूत्रें ऋग्वेदांत वर्णिली आहेत, त्यावरून त्या घोडयास शत्रू कसे भीत असत हें चागले समजून येतें

" चोर वस्त्रें घेऊन पळाला असता लोक बोंब ठोकून हाकाटी करितात, त्याचप्रमाणे दधिक्रयास पाहिले असता कृष्णवर्ण लोक किंकाळ्या मारून मोठमोठ्यानें ओरडू लाग-तात. बुभुक्षित श्येन पक्ष्याचे अवरोहण पाहून दुसरे पक्षी ज्याप्रमाणे किलकिलाट करि-तात, त्याचप्रमाणे लूट, भक्ष्य आणि गुरेढोरें याच्या शोधात दौड करणारा दधिक्रा याची दृष्टादृष्ट झाली की, शत्रू किंकाऱ्या फोडू लागतात व दीर्घध्वनि करितात '

" शत्रूंनो ! दधिक्रयास भ्या ! तो ताम्रवर्ण असून वज्रासारखा विघातक आहे तो हजार मनुष्यास मागे टाकतो तेव्हा त्याचे बल क्षुब्ध होऊन अनावर होऊन जातें "

—ऋग्वेद, ४।३८।५।८.

याप्रमाणे क्षत्रियाच्या घोडयाचा शत्रूस धाक वाटत असे युद्धप्रसगीं तत्कालीन क्षत्रिय वीर कोणकोणतीं हत्यारें वापरीत असत याही गोष्टीचा खुलासा ऐतिहासिक दृष्ट्या अत्यत आवश्यक आणि माहिती असण्यायोग्य ऋग्वेदांतर्गत वर्णिलेला आहे तो खुलासा असा आहे कीं, तत्कालीन क्षत्रिय वीराच्या युद्धसाधनाविषयी बरेच ज्ञान त्यावरून करून घेता येतें ऋग्वेदांतर्गत एका सूत्रात यासबधीं खुलासा असून त्याचा भावार्थ असा आहे कीं:—

" लढाई समीप आली असता **चिलखत** घालून वीरपुरुष पुढे सरकतो तेव्हां तो ढगाप्रमाणे काळा दिसतो हे वीरपुरुषा ! तुझें शरीर विद्ध होऊ देऊं नको तू विजयशालि हो ! तुझें चिलखत तुझे रक्षण करो ! "

" **धनुष्याच्या** योगाने आम्ही गुरेढोरें मिळवूं धनुष्याच्या योगानें आम्ही जय संपादूं. धनुष्याने आम्ही उग्र व मगरूर शत्रूस जिंकूं धनुष्य हे आमच्या शत्रूचे मनो-दय निर्फल करो धनुष्याच्या साहाय्यानें आम्ही आपला **विजयध्वज** चारी दिशांस प्रसृत करू."

" **तूणीर** हा शरांची मातुश्री होय. व **शर** हीं तुणीरांचीं अपत्यें होत तो

वीरपुरुषांच्या पाठीवर शब्द करीतच उभा असतो आणि लढाईंत त्यास **बाणांचा** पुरवठा करून शत्रूचा पराभव करतो ”

“ हुषार **सारथी** आपल्या **रथावर** उभा राहून आपल्या इच्छेस येईल तिकडे त्यास हांकतो **आनिन** मागाहून **घोड्यास** आपल्या ताब्यात ठेवतो, त्या **आनि-नीचा** जयजयकार करा ” —ऋग्वेद, ६–७५

उपरिनिर्दिष्ट अवतरणावरून तत्कालीन युद्धप्रसगीं कोणती साधनसामग्री जय्यत होती हे समजून येते ह्याप्रमाणे योग्य रीतीची सुधारणा व साधनसामुग्री ज्या मर्द क्षत्रियांनी जय्यत तयार करून ठेविली होती त्यांच्यापुढे दस्यूचा टिकाव लागणें केव्हांही शक्य नव्हते क्षत्रिय हे रथात बसून युद्ध करीत असत व त्याच्या बाणास मृगशृंगाची अथवा लोखडाची अणकुची असे, त्यांनी अगावर चिलखते घातलेली असत ते डोक्या-वर शिरस्त्राण घालीत, खांद्यावर ढाल घेत असत आणि हातात परशु, भाले व तीक्ष्ण धारेच्या तलवारी घेत असत अशा शस्त्रास्त्रानी सज्ज झालेले क्षत्रिय वीर बघतांच शत्रूची बोबडी वळून जात असे, व त्याना कांहींच सुचेनासें होई

कधीं कधीं मर्द क्षत्रिय वीरातच आपापसात युद्धाचे प्रसग येत अशा युद्धप्रसगी मात्र दोन्ही पक्षाच्या ढाला, तरवारी, भाले, गदा, चक्र, परशु, चिलखते, धनुर्यबाण, रथ, घोडे इत्यादिकानी समरागण फुलून गेलेले दिसत असे । ग्रीक आणि ट्रोजन यांची जशी कित्येक दिवसपर्यंत चाललेली लढाई विख्यात आहे तशीच ही काही कारणामुळें आपा-पसातच उद्भवणारी मर्द क्षत्रियाची लढाई मोठी बहारदार असे

तत्कालीन राजे स्वत च मोठे योद्धे व शूर होते युद्धकला त्याना पूर्णपणे ज्ञात होती दस्यु लोकांना पराजित केल्यावर आपापल्या अतस्थ लोभामुळें अशा आपापसात लढाया जुपत असत मत्सरी लोकांचा दीर्घ मत्सर हाच या लढायाचा पाया असे व त्यावरही परस्पराच्या शत्रुत्वाची इमारत उभारली जाई

तत्कालीन सूद नांवाच्या एका क्षत्रिय राजाविरुद्ध अनेक वेळ दहा दहा क्षत्रिय राजांनी चढाई केली असल्याचें वर्णन ऋग्वेदात आहे, परंतु या सूद नामक क्षत्रिय राजानें एकही वेळ हार न खाता प्रत्येक वेळीं विजयश्रीच सपादन केली असा तो शूर रणधीर समरधुरधर क्षत्रिय राजा होता ज्या ज्या वेळीं सूदास जय मिळत असे त्या त्या वेळीं त्याच्या दरबारातील श्वेतवस्त्रें परिधान केलेले उपाध्याय, त्रित्सु अथवा वसिष्ठ, याना मोठा अभिमान वाटत असे त्या वेळी त्या विजयाबद्दल त्यांनीं स्मारकार्थ एक काव्य रचलें असून ते ऋग्वेदाच्या ७।८।३ या भागामध्यें आहे

क्षत्रियांचा विजय होत असतां जीं जीं स्थले त्यांना मिळाली, तेथें तेथें त्यांनीं कृषि-कर्मविद्या अमलांत आणली कृषिकर्मविद्येंत त्यांनीं योग्य पारगतता मिळविली, तद्विषयक अनेक शोध लावले आणि त्या विद्येपासून स्वत चा व दीन दुबळ्यांचाही बराच फायदा करून दिला. क्षत्रिय लोक मोठ्या आनदानें आपल्या या कृषिकर्मामध्यें चित्त घालीत

असत यावेळी कृषिकर्मविषयक त्यांचा आनंद कसा काय होता व ते केवढ्या उत्साहानें कृषिकर्मविद्या आचरीत याचा सुंदर इतिहास ऋग्वेदांत पाहावयास मिळतो.

" **शेतकीच्या देवा**बरोबर आम्हीं हे शेत **नांगरूं** तो आमच्या **घोड्यांचें** पोषण करो ! त्या योगानें आमचें कल्याण होवो "

" हे **क्षेत्रपालदेवते** ! **गायी** दूध देतात त्याप्रमाणे मधुर निर्मल नवनीतासारखा मिष्ट व विपुल असा **पाऊस** आम्हास दे ! उदकाच्या **वरुण** देवते ! आम्हांस आशीर्वाद दे !"

" **धान्यें** आम्हांस मधुर लागोत ! **आकाश** आणि **मेघ** व **नक्षत्रमंडळ हीं** माधुर्यानें पूर्ण भरलेली असोत ! **शेताचा देव** आम्हांवर दया करो ! त्याचे मागून शत्रूनीं अबाधित असे आम्ही चालू "

" **वृषभांस** आनदानें काम करू द्या ! **मनुष्यानो** ! आनदानें **मेहनत** करा ! **नांगर** आनदानें चालो ! **वाद्या** आनदानें बांधा ! **पराणी** आनदानें लावा."

" हे सुदैवी **तासा** ! पुढे चाल ! आम्ही तुझी प्रार्थना करितों तू आम्हांस सपत्ति आणि **विपुल धान्य** दे ! "

—ऋग्वेद, ४–५७.

यावरून क्षत्रिय हे तत्काली कृषिकर्मसबधी किती आवड बाळगीत असत व केवढ्या कळकळीने कृषिकर्म आचरीत असत हें स्पष्ट होतें या स्तोत्रावरून क्षत्रियांचा कष्टाळूपणा व साधेपणा यांचेंही प्रत्यतर कळून येते

यावेळी मोठमोठी गवतांची कुरणे इतस्तत पसरलेली दृग्गोचर होत असत गुरें ढोरे यांचीही चांगली चगळ असे गुराढोराच्या समृद्धीकडे विशेष लक्ष दिले जात असे. उच्चनीचपणाचा भेदभाव त्या वेळीं अस्तित्वात नव्हता ह्यामुळे ज्या नायकाजवळ जास्त शेतीवाडी व गुरेंढोरें असतील, तेच पुढारी होऊन लढाईचे वेळीं आपले नांव गाजवीत, व यश सपादन करून परत आल्यावर स्वतःच्या घरीं यजनयाजन करीत.

या वेळीं बहुतेक लोक शेतीवर अवलबून असत समाजामध्ये वर्णभेद मुळींच दिसून येत नव्हता लोक अतिशय युद्धकुशल व धाडसी कामे करणारे असत या वेळीं तांदूळ या धान्याची प्रगति नसून जव व गहूं यांची जास्त वापर होती मांसाहारही चालू होता घोड्याचें मांसही खाण्याकरितां उपयोगात आणीत असत सोमवल्लीचा रस हें पेय त्या काळीं मोठें सर्वमान्य असे सुदर पेय ठरले होतें ऋग्वेदकालीन ऋषी या पेयाचें मोठें सुंदर वर्णन करीत ह्या सोमवल्लीपेयप्रसार पुढें एवढा वाढत गेला कीं, पुढें सोमाची देवताच तयार होऊन तिची पूजाअर्चाही सुरू झाली

वस्त्रे विणण्याची कला व सुतारकाम यांची तत्कालीन लोकसमाजांत चांगली अभिवृद्धि झालेली होती त्या वेळीं सोनें, चांदी व लोखड ह्या धातूचा स्थळविशेषीं व कार्यप्रसंगीं उक्त उपयोग करीत असत. त्यांचा उपयोग करण्याचें त्यांना चांगलें ज्ञान होतें. सुवर्णादिकांचे दागदागिनेही त्या काळीं अमलांत आलेले होते.

लोखंडाचीं हत्यारें, चिलखतें, भाले, तरवारी, बाण इत्यादिकांतही त्यांची प्रगति होती तसेंच कंठ्या, कडीं, तोडे, सुवर्णयुक्त उपकरणें, सुवर्णमुगुट यांच्यांतही प्रगति झालेली होती शिल्पकलेंत बराच शिरकाव झाला होता दगडांवरील खोदीव कामांत मात्र प्रगति झालेली नव्हती कारण त्या वेळीं मूर्तिपूजेवर भर नसल्यामुळें त्या कामास पुष्टि मिळण्यास कांहींही कारण नव्हतें

त्या काळचे सामाजिक निर्बंध साधेच असून कुलपति सस्थेस अनुलक्षून होते. बाप हा कुटुबांतील मुख्य असून त्याचे पुत्रपौत्रादिकही एकाच कुटुबांत परिवारासह आनदानें राहात असत प्रत्येकाच्या घरीं अग्निहोत्र असे व त्यास लागणारा सोमरस व दुसरीं काहीं हवनद्रव्यें घरांतील स्त्रिया तयार करीत असत ह्या होमाच्या वेळी येऊन यजमानास संपत्ति, संतति व आरोग्य हीं देण्याकरितां आकाश, नक्षत्रमडल आणि पृथ्वी या दैवतांस आवाहन करण्यांत येत असे ह्या गृह्यज्ञांत स्त्रियाही भाग घेत असत तत्कालिन स्त्रियांनीं अनेक स्तोत्रें वगैरे रचलेलीं असून तीं अद्यापही लोकविश्रुत आहेत

त्या काळांत स्त्रियांना अवास्तव निर्बंध नव्हते लौकिकरीत्या त्यांना योग्य स्थान देण्यांत येई, व जनानखान्यांत त्यांना कोंडून ठेवण्याचीही चाल नव्हती नवरी मुलगी आपला नवरा स्वत च पसत करीत असे पण त्याबरोबरच मातापित्यांची आज्ञाही त्या मुली शिरसावद्य मानण्यास चुकत नसत त्या वेळच्या स्त्रिया स्वकार्यतत्पर व दक्ष असत. त्या पहाटेसच निद्रेंतून उठून आपल्या पतीस स्वत च्या कामास जाण्यास सुचवीत अविवाहित मुलीस बापाच्या मिळकतीस वारसा मिळत असे, आणि पतीच्या निधनानतर **विधवांचे पुनर्विवाह करण्यास पूर्ण मुभा होती.**

विवाहविधि तत्कालीन समाजास योग्य असेच होते विवाहसमारभाचे प्रसंगीं नवरा मुलगा व नवरी मुलगी एकमेकांस योग्य वचनांनीं प्रबंधित करीत असत तत्कालीन वचनपद्धति ऋग्वेदांत वर्णिलेल्या आहेत तात्त्विक मीमांसेकरितां तत्संबंधीं कांहीं अवतरणे येथें देणें अवास्तव होणार नाहीं

" हे वधू ! तुझ्या पतीच्या गृहांत सुमुहूर्तावर प्रवेश कर ! आमच्या गड्यांचें, मोलकरणींचें व गुरांढोरांचें कल्याण कर क्रोधापासून तुझे डोळे अलिप्त असोत तुझ्या पतीस सुख होईल अशी शुश्रुषा कर आमच्या गुराढोरांचें चांगले कर तुझें मन प्रफुल्लित आणि तुझे सौंदर्य अढळ राहो वीर पुरुषांची जननी हो व देवांच्या ठिकाणीं भक्ति ठेव. आपल्या गड्यांचे, मोलकरणींचे आणि गुरांढोरांचे हित पाहात जा "

" सर्व देवता आमचीं मनें एक करोत पातरिश्वन् धात्रि आणि सरस्वति हीं आमचें सुलभ करो " —ऋग्वेद, १०-८५-४२ पासून ४७ पर्यंत

नवरी मुलगी ही आपल्या पतीच्या घरी नव्यानेंच येणार असल्यानें तिला योग्य आज्ञा देण्यांत येत असत उपरिनिर्दिष्ट जें प्रथम सूत्र दिलेले आहे, त्यावरून त्या कालीं नवऱ्या मुलीस कोणकोणत्या विशिष्ट आज्ञा देत हें कळून येतें याप्रमाणें योग्य मान

व प्रतिष्ठा जीस प्राप्त झाली आहे अशी गृहपत्नी कुलपतिसंस्थायुक्त कुटुंबाची मालकीण होऊन वृद्धापकाळपर्यंत आपल्या पतीशीं संलग्न होत्साती काल कंठीत असे.

अनेक बायका करण्याची चालही या वेळीं प्रचलित होती परंतु बहुशः मोठमोठे सरदार आणि राजे लोकच एकापेक्षां अनेक विवाह करीत असत व करू शकत असत. सर्वसामान्य समाज एकच बायको संभाळून आनंदानें कालक्रमण करी

बापाच्या मिळकतीचा व इस्टेटीचा वारसाहक्क पुत्राकडे येत असे जर पोटीं पुत्र नसेल तर तो वारसाहक्क आणि त्या इस्टेटीची मालकी मुलीचा मुलगा दत्तकरूपानें घेऊन त्याच्याकडे देत असत अगर क्वचित् प्रसंगीं दुसऱ्या कोणासही दत्तक म्हणून घेतले जाई व त्याच्या नांवें वारसा हक्क करून दिला जाई

मृत्युसंस्कारासंबंधी त्या काळीं अशी व्यवस्था व रीतीरिवाज प्रचलित असे कीं, प्रेतास मूठमाती देऊन प्रेतसंस्कार करीत असत त्यानंतर लौकरच अग्निसंस्काराची रीत प्रचारांत आली प्रेतास अग्निसंस्कार देऊन त्याची रक्षा त्या काळीं जमिनींत पुरून टाकीत असत मृत्यूचे वेळीं, मृत्युशय्येवरील माणसास मृत्यूनंतर सुस्थिति प्राप्त व्हावी म्हणून प्रार्थना करण्यांत येत असे त्या प्रार्थनातील तत्त्वे मोठीं उदात्त असत

"हे मृत्युपंथस्थ गृहस्था ! त्या सुखदायक स्वर्गमार्गाकडे वळून आपल्या पूर्वजांच्या मेळांत जाऊन संलग्न हो यमास भेटून तुझ्या सत्कर्मांची फळे अनुभवास आण पापास मागें ठेव आणि तू आपल्या गृहात आतां प्रवेश कर !"

"हे आत्म्या ! हें ठिकाण सोडून दुसऱ्या ठिकाणीं जा पूर्वजांनीं तुमच्याकरितां निराळी जागा आणि निराळे ठिकाण योजून ठेवले आहे ते ठिकाण सूर्य, चकाकणारें पाणी आणि तेज यांनी अत्यंत रमणीय असे आहे यमराज मयतास ती जागा देतो."

—ऋग्वेद, १०–१४–७ ते ९ पर्यंत

ऋग्वेदांत मृत्यूनंतर प्राप्त होणाऱ्या नरकाची कोठेंही माहिती दिलेली नाहीं एवढेंच नव्हे तर ऋग्वेदामध्यें नरकवासाचें नांवही सांपडत नाही यावरून त्या वेळीं नरकवासाची भावना प्रचलित नसावी असे स्पष्ट होतें कारण तसें जर नसतें तर ऋग्वेदामध्ये नरक-वासाबद्दल बराच उल्लेख असावयास पाहिजे होता मृत्यूनंतर मृतांच्या आत्म्यास सौख्य आणि शांति मिळो या उद्देशानें मात्र प्रार्थना करीत असत मृत्युसंबधाची भीषण कल्पना त्या वेळीं समाजाच्या डोळ्यासमोर नव्हती मृत्यु हें एक सर्वसामान्य चक्र आहे व तें सतत फिरत असतें त्यांत कांहींही विशेष असे नाहीं अशीच भावना तत्कालीन ऋग्वेदा-मध्यें प्रथित केली आहे

तत्कालीन क्षत्रियांचें पूजनीय दैवत प्रथम सृष्टि हें होतें पुढें सृष्टीच्या देवाच्या पूजेंत तिचें रूपांतर झाले क्षत्रिय हे गुणग्राहक आणि मननपूर्वक कोणत्याही गोष्टीचा विचार करणारे असे असल्यामुळे तेजस्वी अशा आकाशमंडलासंबंधीं त्यांनीं आपला विचार चालविला विचाराकलनांतीं त्यांना आकाशमंडलासंबधीं अत्यंत आदर वाटू लागला आणि त्यासच ते भक्तिभावपूर्वक व श्रद्धायुक्त अंतःकरणानें पूज्य मानू लागले.

त्याचीच पूजा करू लागले त्यावेळीं त्या आकाश दैवतास ते 'द्यौस्' या नांवानें संबोधीत असत ग्रीक लोकांमधील 'झ्यूस' आणि आर्य क्षत्रियांमधील 'द्यौस्' हे समानार्थक शब्द आहेत किंचित् अपभ्रंशरूप पावले आहेत एवढेंच तत्कालीन क्षत्रियलोक दिवसास आकाशाची पूजा करावयाची असल्यास 'मित्र' या दैवतास सबोधीत असत, आणि रात्रीं आकाशाची पूजा करावयाची असल्यास 'वरुण' या दैवतास सबोधीत असत मेघ उत्पन्न करणाऱ्या आकाशास ते विशेष आदरार्थानें सबोधित असत कारण मेघांपासून त्यांच्या उपजीविकेस मुख्य आश्रय मिळत असे मेघ उत्पन्न करणाऱ्या आकाशास ते 'इंद्र' या सबोधनानें सबोधीत असत यावरूनच पुढे आर्यांचे श्रेष्ठ दैवत 'इंद्र' हे प्रचारांत आलें तत्कालीन क्षत्रियामध्यें आकाश हें दैवत तर विशेष पूज्य मानीतच असत, पण त्याच्या मागोमाग 'सूर्य' हें दैवतही मानीत असत 'आदिति'च्या तेजापासून स्वतःसही तेजस्विता मिळावी म्हणून तेजस्वि क्षत्रिय 'आदिती'ची उपासना करीत असत जो गायत्रिमत्र सर्व आर्यावर्तांत दुमदुमत आहे तो **विश्वामित्र राजर्षीकृत गायत्रीमंत्र**ही सूर्योपासनेस अनुलक्षूनच आहे एवढेंच नव्हे तर स्वतःचे ठायी अतुल तेजाची वृद्धि होण्याकरितां आणि 'आदिती'ची उपासना करण्याकरितां क्षत्रियानीं मुद्दाम रचलेला असा तो सूर्योपासनासूत्तसबोधक गायत्रीमत्र आहे गायत्रीमत्राचा सबध सूर्योपासनेशीं अगदीं दृढ आहे सूर्य, सवितृ अथवा आदित्य हें *क्षत्रियाचे पूजनीय दैवत असून त्याची मनोभावें प्रार्थना करण्याकरितां गायत्रीमत्राची योजना केलेली आहे

दररोज हा गायत्रीमत्र उच्चारिल्याशिवाय क्षत्रिय आपल्या कोणत्याही कामास प्रारभ करीत नसत प्रथम गायत्रीमत्रद्वारा तेजस्वी सूर्याची उपासना, आणि नतर पुढील दैनिक क्रम अशी दृढ आंखणी होती क्षत्रियांच्या या मनोभावनेपासून व अतःकरणापासून उद्भूत होत असलेल्या प्रार्थनेचीं फलेही त्यांना भरपूर चाखावयास मिळालीं व सूर्याप्रमाणे तेजस्विता त्याच्या ठायी निर्माण झाली ही गोष्ट इतिहासविख्यातच आहे

वैदिककालीं सूर्याचे नाव 'विष्णु' असेंही होतें पुढें हेच नाव सर्वसरक्षक अशा परमेश्वरास सबोधण्याप्रीत्यर्थ योजिण्यात येऊ लागले उदयाचलाचा बालार्क, माध्यान्हींचा सूर्य आणि संध्याकाळचा मावळणारा सूर्य हे तीन प्रकार विष्णूच्या तीन पावलांनी सबोधित होत असत म्हणजे या तीन सूर्यावस्थाना विष्णूचीं तीन पावले मानीत या **तीन पावलांतच सर्व ब्रह्माण्ड व्यापून गेलेलें आहे** अशी त्या काली भावना होती व ती खरीही पण आहे कारण सूर्याच्या ह्या तीन अवस्थाच्या अगभूतच सर्व ब्रह्मांडाची धारणा अतर्भूत झालेली आहे विष्णूचीं हीं तीन पावले म्हणजेच सूर्याच्या ह्या तीन अवस्था, सर्व

---

* क्षत्रियांचा संबध आकाशाशीं व आकाशस्थ सूर्याशीं एवढा निकट असल्यामुळें, सूर्याच्या तेजाची ते मनोभावें उपासना करीत असल्यामुळें, आणि सूर्याप्रमाणे तेजस्विता त्यांच्या ठायीं असल्यामुळेंच त्यांचा विशेष दृढ सबध आकाशस्थ दैवतांशीं जोडला गेला क्षत्रिय शब्दाची जी व्युत्पत्ति प्रथम प्रकरणांत दिलेली आहे, ती या क्षात्रयोजनेच्या संचालनानें भरपूर स्पष्टत्वनिदर्शक अशी होते

चराचर व जडाजड चित्कलांशीं दृढ संबंध ठेवणाऱ्या आहेत आणि म्हणूनच **विष्णूचीं हीं तीन पावलें** सर्वव्यापी अशीं आहेत.

पुराणांतरीं **विष्णूच्या तीन पावलां**संबंधीं भलत्याच तऱ्हेचा बोध करून देणारी कल्पितकथा वर्णिली आहे. परंतु त्या कथेचें मूळ रहस्य मोठें मननीय असें असून उपरि-निर्दिष्ट **विष्णूच्या तीन पावलांशी** निकट संबंध ठेवणारें असें आहे ती पुराणांतरींची कथा येथें देत बसणें अप्रस्तुत जरी असलें तरी ओघाओघानेंच आलेला एक मननीय प्रश्न त्या योगानें स्पष्ट होत असल्यामुळे तद्विषयक वर्णन येथे देणे अप्रयोजकपणाचें होणार नाहीं असे वाटल्यावरून तत्संबंधी योग्य खुलासा करण्याचें ठरविले आहे

बळी आणि वामन या दोन पात्रासंबधीं ही कथा वर्णिली आहे त्या कथेचें त्रोटक वर्णन असें आहे कीं, बळी हा एक मोठा राजा होता व त्याने आपल्या अतुल पराक्रमानें दशदिशा जिंकून घेतल्या होत्या त्याचें विष्णूवर अत्यंत प्रेम होतें, परंतु विष्णु हा तुला नेहमीं त्रास देत असतो असें त्याच्या अंतःकरणात असुरांनीं कपट शिर-विल्यामुळें तो विष्णूच्यासंबधी अप्रीति दर्शवूं लागला एवढेंच नव्हे तर त्याच्याशीं युद्धही करण्यास तयार झाला त्या वेळीं इंद्र हा विष्णुकडून झाला व त्यांचें युद्ध लागलें-त्यांत इंद्राचा व विष्णूचा पराजय झाला व बळी विजयी ठरला पुढें इंद्रादिकांनीं तप-श्चर्या केल्यावर भगवान् प्रसन्न झाले व आदितीच्या पोटीं जन्म घेऊन मी बळीस आक्र-मण करीन असें उद्गारले त्याप्रमाणे पुढें आदितीचे पोटीं स्वयंज्योति, स्वयंप्रकाश, स्वतःश्री अशी एक दिव्य व तेजस्वि मूर्ति अवतरली त्यास वामन या नांवानें संबोधण्यांत येऊं लागले पुढे बळीच्या येथे यज्ञप्रसंग चालू असतां तेथें हा वामन गेला व आपल्या तेजस्वितेने त्याने बळीस दिपवून टाकले बळीनें वामनास त्याचें रहाण्याचे ठिकाण, नांव आईबापाचे नाव, अभ्यास, स्थळ वगैरेसंबधी प्राथमिक सामान्य माहिती विचारली, तेव्हां तो म्हणाला, " माझा वास कोण्याही एका स्थळीं नाहीं मी नेहमीं भटकत असतों मला माझ्यासंबधीं जास्त माहितीही काही नाही मी आपणाकडे आलों असून मला कांही दान द्याल अशी आशा आहे"

वामनाचें हें भाषण ऐकून बळीनें त्यास आपली इच्छा दर्शविण्यास सांगितले. तेव्हां वामन म्हणाला, " मला दुसरे तिसरें कांहीं मागावयाचें नसून फक्त तीन पावलें जागा मला दे म्हणजे मी आपला कायमचा आश्रम बांधून त्या ठिकाणीं राहीन."

बळीला याबद्दल कांहींही कठिण असें वाटले नाहीं आणि तो तें दान त्यास अर्पण करण्यास उद्युक्त झाला. परंतु मध्येंच शुक्राचार्यांनें त्यास सुचविले कीं, " हा **विष्णु** आहे हें प्रथम लक्षांत ठेव आणि मग त्याला दान देण्याची हिंमत धर."

त्याच्या या सूचनेकडे बळीनें विशेषसें लक्ष दिले नाहीं. आणि त्यानें **तीन पावलें** जागा अर्पण केलीच. त्याबरोबरच त्या वामनरूप **विष्णूनें** विराटस्वरूप धारण करून एका पावलांतच सर्व भूप्रदेश आटविला दुसऱ्या पावलांत नभोमंडल आट-विलें आणि तिसरें पाऊल कोठें ठेवावें अशाबद्दल बळीला प्रश्न केला. बळीनें स्वतःच्या

शिरावर तिसरा पाय ठेवण्यास विष्णूस सांगतांच बळीचें शिर विष्णुरूप वामनाचे तिसऱ्या पाऊलगणतींत आटलें गेलें. याप्रमाणें **तीन पावलें जागा विष्णुरूपी वामनास बळीनें दिली.**

याप्रमाणें पुराणांतरीं ही गोष्ट वर्णिली आहे मूळच्या वास्तव स्थितीस निराळें-च स्वरूप या पुराणोक्त कल्पित कथेनें आणून सोडले आहे सूक्ष्मदृष्टीनें विचार केला असतां या गोष्टीचे धागेदोरे फारच दूरवर म्हणजे उपरिनिर्दिष्ट **सूर्याच्या त्र्यावस्थे-शीं** निगडित झालेले आहेत असें दिसून येतें ते कसें त्याचाच आतां विचार करा-वयाचा आहे

पुराणांत **बळि** असें जें नांव या कथेत वर्णिले आहे ते **'वलि'** या मूळ शब्दाचें अपभ्रंशरूप आहे 'वलि' या शब्दाचा स्पष्टार्थ **'ओळ' 'रांग'** असा होतो 'बळी'चें राज्य दशदिशा पसरलें होते, हा अलकार **आकाशस्थ ओळी** सर्वत्र पसरल्या आहेत या स्पष्टार्थाचा द्योतक आहे 'विष्णूवर बळीचें अत्यंत प्रेम होतें' हा पुराणोक्त अलंकार **सूर्याशीं या आकाशस्थ ओळींचा निकट संबंध** आहे या स्पष्टार्थाचा द्योतक आहे. विष्णु म्हणजे सूर्य हें मागें स्पष्ट केलेलेंच आहे

विष्णुपासून बळीला त्रास पोंचू लागला, हे पुराणोक्त रूपक **सूर्याच्या आक्रमण स्थितीचें** द्योतक आहे 'इंद्र व विष्णु यांच्याशीं बळीचें पटेनासें झालें' ही पुराणोक्त कथनशैली **सूर्य आणि मेघ** यांच्या आक्रमणस्थितीची दिग्दर्शक आहे इंद्राचा व मेघाचा संबंध मागें वर्णिलेलाच आहे 'आदितीच्या पोटीं जन्म घेऊन मी बळीस आक्रमण करीन असें भगवान् उद्गारले' असा अलंकार पुराणोक्त कथेंत आहे त्याचा स्पष्टार्थ असा आहे कीं, **सूर्य** नेहमीं आकाशस्थ ओळीस म्हणजे **वृत्तांस आक्रमीत** असतो 'पुढें आदितीच्या पोटीं स्वयंज्योति, स्वयंप्रकाश, स्वतःश्री अशी दैदीप्यमान मूर्ति अवतरली ती मूर्तीच वामन होय' असें रूपक पुराणांत वर्णिलें असून त्याचा स्पष्टार्थ असा आहे कीं, **सवितृ देवता** जी **आदिति** तिनें युक्त असा **प्रभाकर अवतरला** आहे म्हणजे **सूर्य हा आदितीयुक्त आहे** तोच **सूर्य वामन** होय सूर्यास **मनाचा स्वामि** मानलेला आहे, अर्थातच सूर्य हा एकतर **सूर्य** वा **मन** होय म्हणजे 'वामन' हा पुराणोक्त शब्द **मन वाचक** सूर्यास उद्देशून योजिला आहे **विष्णु** हा शब्दही **सूर्य वाचकच** आहे.

'बळीस वामनानें आपल्या तेजस्वितेनें दिपवून टाकलें' असा पुराणोक्त अलंकार असून त्याचा स्पष्टार्थ **आकाशस्थ ओळीस म्हणजे वृत्तांस सूर्य** आपल्या **तेजानें** दिपवून सोडतो असा आहे 'बळीनें वामनास नांव गांव ठिकाण वगैरे विचारलें असतां मी नेहमीं भटकत राहणारा आहे असें त्यानें सांगितलें' या पुराणोक्त कूटाचा अर्थ असा आहे कीं, **सूर्य हा नेहमीं आक्रमण** करीत असतो तो स्वस्थ नाहीं.

'बळीला वामनानें तीन पावलें जागा मागितली व तेथेंच मी आपली आश्रम बांधीन असें तो म्हणाला' असा वृत्तान्त पुराणांतरीं आहे तो स्पष्ट केला असतां असें



वीर अर्जुन बान मार कर श्री भीष्म पितामा के लिये
भूमि से पानी निकाल रहे हैं ॥

AROrBANS PRESS BLOCK MAKERS
& PRINTERS ANARKALI LAHORE

दिसून येतें कीं, **आकाशमंडल हेंच सूर्याचें आश्रमस्थान** असून उदयाचलाचा बालार्क, मध्यान्हींचा सूर्य आणि संध्याकाळचा मावळणारा सूर्य हींच **विष्णूचीं तीन पावलें** होत **ऋग्वेद्कालीं ह्या सूर्याच्या तीन अवस्थांसच विष्णूचीं तीन पावलें म्हणून संबोधीत असत** ही वामन–बळीची कथा निर्माण होण्यास **ऋग्वेद्-कालीन विष्णूचीं तीन पावलें** ही भावनाच मूळ कारण झाली म्हणजे मूळ वस्तु-स्थितीचा विपर्यास करून स्वार्थी भावनेनें मूळ रूपकास अनुसरूनच ही एक नवीन **कपोलकल्पित व रूपांतरित कथा अन्योक्ति**प्रकारानें वर्णिली गेली

'वामनरूप विष्णूनें विराटस्वरूप धारण करून प्रथम पावलांतच सर्व भूमंडळ व्यापून टाकलें दुसऱ्या पावलानें स्वर्गमंडळ व्यापिलें, व तिसऱ्या पावलाची गणति बळीच्या शरीरव्याप्तींत गणली' असा या कथेचा शेवट पुराणांत आहे याच स्पष्टार्थ असा आहे कीं, **सूर्य हा सर्व दिग्गणांवर प्रकाशित होणारा असून आकाशस्थ** बळि म्हणजे **वृत्तांनाही व्यापून टाकणारा आहे.**

याप्रमाणें या बळिवामनाच्या पुराणोक्त कल्पित कथेची मूळ आवृत्ति असून त्याचें रूपांतर बळी नांवाचा दानशूर उदार राजा व वामन वेषधारी कपटी ब्राह्मण अशा सामान्य अर्थी पुराणकारांनीं अलंकारयुक्त रीतीनें प्रथित केलें आहे परंतु त्याचा खरा खुलासा वरीलप्रमाणें असून वैदिककालीन क्षत्रिय सूर्यासंबधीं विशेष आदर बाळगीत असल्यामुळें तत्संबंधीं त्यांचे विचार ते नेहमीं प्रकट करीत असत असाच एक विचार त्यांनीं आपल्या सूर्य दैवतासंबधीं प्रकट करून सूर्याच्या आक्रमणास **'विष्णूचीं तीन पावलें'** अशी सार्थ उपमा दिली व त्याचाच एवढा कल्पतरु पुराणकारांनीं प्रसृत केला. सारांश, ही **त्रिपाद्दानाची कथा** ऋग्वेदकालीन **विष्णूचीं तीन पावलें** या भावनेस गृहीत धरून मनरंजनार्थ रचली गेली अस्तु

वेदकालीं जें सूर्यास विष्णु असें नांव होतें तेंच पुढें ईश्वरवाचक रीतीनें प्रचारांत येत गेलें. वेदकालीं क्षत्रिय अग्नीचीही पूजा मनोभावें करीत. हवन वगैरेही करीत असत. वैदिककालीं बारुद, गोळी, बंदुका, तोफा इत्यादिकांचा प्रचार नव्हता या काळीं झालेल्या लढायांच्या वर्णनांत अशा हत्यारांचा कोठेंही उल्लेख केलेला आढळून येत नाहीं तसेंच प्राचीन चित्रकलेंतही बंदुका तोफा वगैरेंचें प्रदर्शन कोण्याही चित्रामधून केलेले दिसून येत नाही

सामाजिक बाबतींसंबधानें विचार केला असतां त्या कालीं एकच **क्षत्रिय वर्ण** होता नंतरच्या कालांत म्हणजे आज सुमारें तीन हजार वर्षांपूर्वी भारतीय युद्धाचे वेळीं **क्षत्रियकुलावतंस श्रीकृष्णानें** अर्जुनास गीताधर्म कथन केला तेव्हां मात्र त्यामध्यें क्षत्रिय, ब्राह्मण, वैश्य, शूद्र या चार वर्णांची व्यवस्था स्पष्टपणें गुणकर्मानुसार विभागली गेली असल्याचें दिसून येतें * मात्र ही वर्णव्यवस्था केवळ ज्याच्या त्याच्या गुणकर्मांवर

---

* चातुर्वर्ण्यं मयासृष्टं गुणकर्मविभागशः —श्रीमद्भगवत्गीता.

अवलंबून होती पुढें हिंदुधर्मकाली तिचेंच रूपांतर अगदीं निकृष्टावस्थेत झालें प्रथम क्षत्रिय हा एकच वर्ण होता. नंतर त्या क्षत्रियांतच विशेष युद्धकलानिपुण व धाडसी असे जे वीर दिसून आले त्यांना क्षत्रिय या विशिष्ट सज्ञेने संबोधण्यांत येऊ लागलें या प्रथमच्या क्षत्रियातच ज्याची वृत्ति कमजोर, भेकड पण, ब्रह्म ( ईश्वर )विषयक अशी दिसून आली त्यांना ब्राह्मण या सज्ञेने सबोधिण्यात येऊन, बैठी कामे करण्याचें कार्य त्याच्यावर सोपविण्यांत आले त्या क्षत्रियांमधूनच व्यापारी वृत्तीत निष्णात असे कांहीं लोक आढळून आले त्याना वैश्य या सज्ञेने सबोधण्यात येऊन त्याची योजना वणिग्वृत्ती-कडे करून दिली गेली आणि या तीनही प्रमुख कर्तव्यात प्रगति करून घेण्याची ज्याची बुद्धि दिसली नाहीं, त्याना शूद्र या सज्ञेनें सबोधण्यांत येऊन त्याच्याकडे सेवाधर्म सोंपविला याप्रमाणे मूळच्या क्षत्रियवर्णांतूनच गुणधर्मविभागाप्रमाणे निरनिराळ्या वर्णाची उत्पत्ति झाली. **एका ऋग्वेदापासूनच जसे पुढें चार वेद निर्माण झाले, तसेच एका क्षत्रिय वर्णापासूनच पुढें चार वर्णांची उत्पत्ति झाली.** ही गोष्ट विशेष लक्षात ठेवण्यासारखी आहे मात्र हे वर्णाचे भांडवल वैदिककाली नव्हते वैदिक-काली एकच वर्ण प्रचलित होता आणि तो **क्षत्रियवर्ण** होय ऋग्वेदातील दहावे मडलां तर्गत शेवटल्या म्हणजे नव्वदाव्या अध्यायातील सहाव्या अनुवाकाच्या सातव्या मत्रांत चातुर्वर्ण्याचा थोडासा उल्लेख केलेला आहे परतु हा मत्र वेदकाली रचला नसून भारतकाळी रचलेला आहे ऋग्वेदाचा शेवटला भाग भारतकालीच पूर्ण झाला

त्याकाली क्षत्रियाचा सर्वश्रेष्ठ असा दर्जा होता क्षत्रियानीं ब्रह्मविद्येंतही अत्यत प्राविण्य सपादन केले होतें अग्निहोत्रातील रहस्य याज्ञवल्क्यास क्षत्रिय जनकानेंच शिकविले होते जनकराजाच्या राजदरबारात गहन अशा अध्यात्मविषयाची नेहमी चर्चा चालत असे बाबु रमेशचद्र दत्त यानी ही वैदिककालीन क्षत्रियाची श्रेष्ठत्वदर्शक प्रणालि वर्णिली आहे

याप्रमाणे वैदिककालीन क्षत्रियाच्या रीतिरिवाजाची माहिती असून तीवरून तत्का-लिन क्षत्रियांनीं समाज केवढा उन्नतयवस्थेत आणून सोडला होता हेही स्पष्ट होते



# प्रकरण सातवें

# क्षत्रिय आणि भारतीय काळ



[ इसवी सनापूर्वी ३००० वर्षांपासून तों इसवी सन ६०० पर्यंत ]

१ भारतकाळ.
२ भारतीय युद्धकाळ.
३ भारतीय युद्धांतील सैन्यगणना.
४ रामायण आणि महाभारत.
५ पुराण ग्रंथ.
६ पुराणोक्त भिक्षुकी प्रतिपादन
७ भारतीयकालीन रीतिरिवाज.
८ छप्पन देशके राजा क्षत्रिय बहाद्दुर.
९ जुन्या देशांची नवी नांवें
१० कैलास, वैकुंठ, स्वर्ग व स्वर्गगंगा
११ राक्षस-दस्यु.

**१. भारतकाळ**—श्रीकृष्णाच्या वेळचा जो काळ त्यास भारतकाळ अशी सज्ञा प्राप्त झालेली आहे या काळातच कौरव-पाडव या **क्षत्रियांचें सुप्रसिद्ध असें भारतीय युद्ध** झाले आर्य क्षत्रिय जेव्हा आपल्या वसाहती करून आपल्या वास्तव्य स्थलास 'आर्यावर्त' या नावाने सबोधू लागले, तदनतर लौकरच भरत नावाचा एक सुप्रसिद्ध विजयी **क्षत्रिय राजा** आर्यावर्तात चमकू लागला होता. त्याच्या **भरत** या नामाभिधानावरूनच पुढे आर्यावर्तास भारतभूमि, **भरतखंड**, भारतमाता, **भरतभूमि** इत्यादि नावें प्रचलित झाली. तेथूनच भारतकाळास प्रारभ झालेला आहे

**२. भारतीय युद्धकाल**—शालिवाहन शकाच्या पूर्वी ३१८० च्या फाल्गुनात राजा परिक्षितीचा जन्म झाल्याचे उपरि उध्दृत केलेलेच आहे परतु कुरूच्या वशांत दोन परिक्षिति होऊन गेले पहिला परिक्षिति हा कुरूचा पुत्र असून तो अर्जुनाच्या पूर्वीच्या अठराव्या पिढीचा पुरुष होय असे मानलेले आहे. दुसरा परिक्षिति हा अर्जुनाचा नातू होय. यावरून पाहिलें असतां शालिवाहन शकाचे पूर्वी ३१८० च्या फाल्गुनांत पहिला परिक्षिति जन्मला असावा याप्रमाणें गणती केली असतां दुसऱ्या परिक्षितीपर्यंत वीस पिढ्या होतात अर्थातच वीस पिढ्यांची दोन हजार वर्षे लोटल्यानतर दुसऱ्या परिक्षितीच्या वेळी म्हणजे इसवी सनापूर्वी अकराशे किंवा बाराशें वर्षांच्या

सुमारास म्हणजे आज सुमारें ३१०० वर्षांपूर्वी कौरव–पांडवांचें भारतयुद्ध झालें ही विचार-सरणी वस्तुस्थितीस धरून वाटते

भारतीय युद्धकालासबंधी पुराणांत शकदिग्दर्शन केलें नसल्यामुळें तत्संबंधीं विद्वानांत फारच मतभेद आहेत अनेक ज्योतिर्विदानी व विद्वानानीं भारतीय युद्धकाल निर्णयासंबंधीं आपापली मते अनेक साधकबाधक प्रमाणावरून पुढें मांडलेलीं आहेत भारतयुद्धकालनिर्णय करण्यापूर्वी अनेक विद्वानांच्या कांही मतांचीही यादी येथें दिली असता ती अप्रस्तुत होणार नाहीं

श्री० विसाजीपंत लेले यानीं असे प्रतिपादन केलेले आहे कीं, शालिवाहन शकाचे पूर्वी ५३०६ हा काळ भारतीय युद्धकाल होय श्री० जनार्दन बाळाजी मोडक यांनीं शालिवाहन शकाचे पूर्वी ५०७८, श्री० चिंतामणराव वैद्य यांनीं शालिवाहन शकाचे पूर्वी ३१७९, श्री० वराहमिहिर यांनी शालिवाहन शकाचे पूर्वी २५२६, श्री० टिळक यांनीं शालिवाहन शकाचे पूर्वी १५७८, श्री० रमेशचंद्र दत्त यानीं शालिवाहन शकाचे पूर्वी १४७८, श्री० त्रि गु काळे यांनी शालिवाहन शकाचे पूर्वी १३४१, श्री० केशव-राव दप्तरी यांनी १२७५, श्री० वेलंडी अय्यर यांनीं १२७५ आणि पाश्चिमात्य पंडितां-नीं इ० सनापूर्वी १२०० याप्रमाणें भारतीय युद्धकालासबंधी आपापलीं मतें पुढें मांडलीं आहेत पाश्चात्य पंडिताच्या मतें भारतीय युद्ध इ० सनापूर्वी सुमारें १२०० वर्षांपूर्वी म्हणजे आज सुमारें ३१०० वर्षांपूर्वी झालेले आहे राजवंशावलीच्या गणती-वरून, तदनुषंगिक इतर अनेक प्रमाणावरून आणि ऐतिहासिक प्रमाणांवरून याच सुमाराचे काली भारतीय युद्ध झाले असावे असें वाटते आणि तोच भारतीय युद्धाचा काल आपण गृहीत धरून चालू या

**३. भारतीय युद्धांतील सैन्यगणना**—भारतीय युद्धांत अठरा अक्षौहिणी सैन्य होतें असें महाभारतामध्यें प्रतिपादन केलेलें आहे सोबतच्या तक्त्या-वरून ती गणती कळून येण्यासारखी आहे मेगॅस्थनिज याने भारतवर्षाचें वर्णन दिलें आहे, त्यांत तो म्हणतो कीं, प्रत्येक रथांत सारथ्याशिवाय आणखी दोन दोन योद्धे व प्रत्येक हत्तीवर माहुताशिवाय आणखी तीन तीन योद्धे बसत होते त्याशिवाय प्रत्येकास एक याप्रमाणें तितकीच सरबराई करणारांची संख्या धरलेली आहे कारण अश्वगजांची व्यवस्था ठेवणारे, एकंदर सैन्यास घास, दाणा, पाणी, रसद आणि युद्धोप-योगी शस्त्रसामुग्री पुरविणारे आणि जखमी झालेल्या सैनिकाची शुश्रूषा करणारे व त्यांना डोलींत घालून उचलून नेणारे इत्यादि लोक रणांगणावरच पूर्वी हजर राहात असत व हल्लींही हजर राहातात या महत्त्वाच्या कामाकरितां लढाऊ सैन्याइतकेच लोक किंबहुना त्यापेक्षांही जास्त लोक रणांगणावर हजर ठेवण्याची रीत प्रचलित असे. या मानानें पाहातां भारतयुद्धांत रणांगणावर एकंदर सरासरी एक कोटि मनुष्यबळ हजर होतें असें दिसतें.

# अठरा अक्षौहिणी सैन्याची गणती

| प्रकार | पात्ति | सेनापति | गुल्म | गण | वाहिनी | पृतना | चमू | अनीकिनि | एक अक्षौहिणी | अठरा अक्षौहिणी | योद्ध्यांसह अठरा अक्षौहिणी |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ |
| हत्ती | १ | ३ | ९ | २७ | ८१ | २४३ | ७२९ | २१८७ | २१८७० | ३९३६६० | ११८०९८० |
| रथ | १ | ३ | ९ | २७ | ८१ | २४३ | ७२९ | २१८७ | २१८७० | ३९३६६० | ७८७३२० |
| घोडे | ३ | ९ | २७ | ८१ | २४३ | ७२९ | २१८७ | ६५६१ | ६५६१० | ११८०९८० | ११८०९८० |
| पायदळ | ५ | १५ | ४५ | १३५ | ४०५ | १२१५ | ३६४५ | १०९३५ | १०९३५० | १९६८३०० | १९६८३०० |
| | | | | | | | | | एकूण. | ३९३६६०० | ५११७५८० |
| याशिवाय सरभराई करणारें व घास-दाणा वगैरे देणारे बाजारबुणगे तितकेच | | | | | | | | | | .. | ५११७५८० |
| | | | | | | | | | | एकूण .. | १०२३५१६० |

या भारतीय युद्धांत छप्पन्नकोटी यादवांचा संहार करण्यांत आला अशीही कथा आहे परंतु ती वस्तुस्थितीस धरून नाही कारण रणांगणावरील व इतर योद्धे आणि सरभराई करणारे लोक मिळून एकदर एक कोटीच लोक होते असें सैन्यगणतीवरून दिसून येते शिवाय दुसरी शंका अशी आहे की, चंद्रवंशी यादव लोकच जर या युद्धात छप्पन्नकोटी मारले गेले असतील तर एकंदर भारतलोकसंख्या तरी अशी किती असावी ? सृष्टीची लोकसंख्या वृद्धिंगतावस्थेप्रत असून हल्ली सबंध हिंदुस्तानची लोकसंख्या बत्तीस कोटी आणि पृथ्वीची एकशे ऐंशी कोटी आहे तेव्हा या दृष्टीनें विचार करतांही भारतीय युद्धांत छप्पन्न कोटी यादवांचा संहार होणे संभवनीय दिसत नाहीं एकदरींत विचार करतां असें दिसून येतें कीं, ते छप्पन कोटी यादव नसून छप्पन कुळांचे यादव असावेत

**४. रामायण आणि महाभारत**—अनेक गोष्टींचे आणि पुराणाचे काळ निश्चित नसल्यामुळे प्राचीन इतिहास स्पष्टपणे समजत नाहीं वेदांत सांगितलेले प्रकार घडत असतां क्षत्रियांची उत्तरोत्तर वृद्धि होत गेली समाज व संपत्ति वाढली तशीच राज्यांची आवश्यकताही उत्पन्न झाली गंगायमुनाच्या काठच्या प्रदेशात नवीन राज्यें निर्माण झालीं अशा राज्यांचा इतिहास रामायण व भारत या ग्रंथात दिलेला असून हे दोनच ग्रंथ प्राचीन इतिहास दाखविणारे मुख्य ग्रंथ होत या ग्रंथात कित्येक गोष्टी प्रक्षिप्त तर कित्येक वस्तुस्थितीशीं अतिशयोक्तीने संलग्न झालेल्या तर काहीं योग्य प्रसंग बोधक अशा तऱ्हेने वर्णिलेल्या आहेत या ग्रंथाच्या घटनेसंबंधीं विद्वानांचाही बराच मतभेद आहे परंतु प्राचीन स्थिति जाणण्याला या दोन ग्रंथांशिवाय सबळ पुरावाच मिळत नसल्यामुळे प्राचीन इतिहासप्रबोधक असेंच या ग्रंथास स्थान मिळाले आहे

भारतकाळाच्या सुमारास म्हणजे इ० सनापूर्वी एक हजार वर्षांपूर्वी रामायण हा ग्रंथ लिहिला गेला असे ऐतिहासिक दृष्ट्या सिद्ध होतें रामावताराचा काल इ० सनाच्या पूर्वी तीन हजार वर्षे म्हणजे आज पांच हजार वर्षांपूर्वीचा समजतात रामायणाचा कर्ता वाल्मिक असल्याचा उल्लेख कोठे कोठे सांपडतो वाल्मिक ऊर्फ वाल्याकोळी ( क्षत्रिय ) असून तो क्षात्रतेजानें अजिंक्य होता त्याच्या तीव्र बाणाचा मारा सुप्रसिद्ध आहे त्याच्या बाणांच्या माऱ्यापुढें कोणाचाही टिकाव लागत नसे म्हणून त्याला सामोपचारानें व धार्मिक समजुतीनें ताळ्यावर आणण्याकरितां व त्याला आपलें धनुष्य खालीं ठेवा-वयास लावण्याकरितां स्वर्गांतून नारदालाही खालीं यावें लागले होतें तोच वाल्मिक ऊर्फ वाल्याकोळी पुढें विद्वत्तेच्या जोरावर रामायणाचा कर्ता वाल्मिक ऋषि बनला; अशी कथा आहे परंतु या कथेस ऐतिहासिक महत्त्व प्राप्त होणें कठिण आहे

वाल्मिक ऋषि हा रामाचा समकालीन ऋषि होता तेव्हां अर्थातच रामाच्या जन्मापूर्वीच त्यानें रामायण लिहून ठेवलें होतें; व रामजन्मानंतर रामानें त्याप्रमाणें कृत्यें करून दाखविलीं असें होणें असंभवनीय वाटतें एकदरींत विचार करतां असें सिद्ध होतें कीं, रामायण हें रामावतारापूर्वी वाल्मिकीनें लिहिलें नसून रामचंद्राच्या कालींच त्यानें तें

रचलें असावें आणि त्यानतर दोन हजार वर्षांनीं म्हणजे श्रीकृष्णाचे काळीं तें लिहिलें गेलें आहे याचा पुरावा रामायणांतच सांपडतो तो असा की, रामायणांत वाल्या कोळी उर्फ वाल्मिक ऋषीची कथा दिलेली आहे त्याची भाषा तृतीय पुरुषीं वापरलेली आहे "एक वाल्या कोळी होता तो वाटमाऱ्या होता त्यानें धनुष्यबाणानें हजारों ब्राह्मण व इतर प्राणी मारले तो अजिंक्य होता तो कोणास आटोपेना म्हणून स्वर्गांतून नारदमुनीची स्वारी खालीं येऊन त्याला "**रामराम**" जपण्यास उपदेश केला पण तो हिंसा करणारा क्रूर इसम असल्यामुळें "**रामराम**" हे पवित्र नाव त्याच्या तोंडी न येता "**मरामरा**" असे तो उलट म्हणू लागला मरामरा याचाच उच्चार जलदीनें केला म्हणजे त्याचेच **रामराम** असें स्पष्ट होतें त्यामुळें रामनामाच्या जपानें त्याच्या पापाचा क्षय होऊन पुढें तो पुण्यवान् वाल्मिक ऋषि झाला" अशी कथा रामायणात आहे रामायण जर स्वत· वाल्मिक ऋषींने लिहिलें असतें किंवा वाल्मिक ऋषींनें मुखोद्गत रचल्याप्रमाणेंच जर तें बरोबर लिहिलें गेले असतें तर त्यात वाल्या कोळ्याची कथा प्रथम पुरुषी भाषेत लिहिली गेली असती म्हणजे "मी एक वाल्या कोळी होतो मी वाटमाऱ्याचा धदा करीत होतों, मला नारदानें रामनामाची दीक्षा दिली त्या पुण्यामुळे मी वाल्या कोळ्याचा वाल्मिक ऋषि झालो" या भाषेंत कथा लिहिली गेली असती पण ती तृतीय पुरुषी भाषेत आहे या सप्रमाण पुराव्यावरून असे स्पष्ट सिद्ध होतें की, रामायण वाल्मिक ऋषीने स्वत· लिहिलें नाहीं किंवा त्याने रचले असले तरी त्याच्या मूळच्या रचनेप्रमाणे ते लिहिलें गेले नाही वाल्मिक ऋषीच्या मागून तें कोणीतरी दुसऱ्यानेच लिहिले आहे ज्याप्रमाणे वेद हे रचले गेल्यानतर शेंकडो वर्षांनी लिहिले गेले, त्याचप्रमाणे रामायणाचीही स्थिति झाली

ऋग्वेदाचा प्रारभींचा भाग विश्वामित्र नामक क्षात्रिय राजर्षीने रचला आहे हे सप्रमाण सिद्ध झाले असून विश्वामित्र ऋषि हा रामचद्राचा गुरु होता त्यानेच त्याला शस्त्रास्त्रविद्या शिकवून व सीतास्वयवरप्रसगीं जनकराजाचे दरबारीं शिवधनुष्य भगाकरितां नेऊन त्यानें विजय सपादन केलेला पाहिला होता अर्थातच त्यावेळीं ऋग्वेदाचेच लेखनकार्य जर झाले नव्हतें तर त्यावेळींच रामायण तरी कसें लिहिलें गेले असावें हा साहजिक प्रश्न पडतो आणि या सर्व गोष्टींचा विचार करता रामायण लेखनाचा काल इ० सना पूर्वी एक हजार* वर्षाच्या सुमाराचाच सिद्ध होतो, आणि या कारणामुळेच रामायणांत काहीं प्रक्षिप्त कथा घुसडून दिल्या गेल्या आहेत रामायणात आपल्या पूर्वजांची कर्तबगारी, त्यांचे गुणावगुण, नीति, राहणी, धर्म, लोकस्थिति इत्यादिकांचें चित्र चांगल्या रीतीने रेखाटलेले आहे तसेंच कोसल व विदेह या दोन भागांत जी राज्यें भरभराटीस आलीं, त्यांचेही सुदर वर्णन रामायणांत पहावयास मिळतें अद्वितीय शौर्य, बंधुप्रेम, सत्याची आवड, स्त्रियांचें पातिव्रत्य हे अप्रतिम गुण रामायणांत पहावयास

---

* भारतीय साम्राज्य ग्रंथ.

सांपडतात सात्विक वृत्तीचें हृदयंगम वर्णन रामायणांत पहावयास मिळतें, अशा गुणांच्या वृद्धीवरच समाजाचें अस्तित्व कायम राहात असल्यामुळें रामायण हें सर्व प्रकारच्या लोकांस जीवश्चकंठश्च असें परमप्रिय झालेले आहे

महाभारत हा ग्रंथ रामायणानतर ७५० वर्षांनीं म्हणजे इ० सनापूर्वी २५०–३०० च्या सुमारास लोमहर्षणाचा पुत्र उग्रश्रवा ऊर्फ सूत यानें लिहिलेला असल्याचें सशोधन-द्वारा स्पष्ट झालेले आहे महाभारत हा ग्रंथ रामायणापेक्षां मोठा असून तो व्यासरचित आहे व्यासलिखित नव्हे रामायण रचणारा वाल्मिक हा जसा कोळी क्षत्रिय होता त्याच प्रमाणे महाभारत रचणारा व्यास हा देखील कोळी क्षत्रियच होता † भारतीय युद्ध म्हणजे कौरव-पांडवांचें जें युद्ध आज सुमारे ३१०० वर्षांपूर्वी झालेले आहे, तत्संबधींचें वर्णन व तो प्रसग भारतग्रथांत वर्णिला आहे

पाडवांचा बाप पडू हा मरण पावल्यावर त्याचा आंधळा बंधु धृतराष्ट्र यानें आपले पुतणे धर्म, भीम, अर्जुन, नकुल व सहदेव या पाच पांडवास वागवून व त्यांचे संगोपन करून त्यास वाढविले पुढे ते वयात आल्यावर अर्ध राज्य त्यांना देऊन बाकीचें अर्धे राज्य स्वतःच्या शभर पुत्रांस म्हणजे कौरवांस दिले धृतराष्ट्राच्या शभर मुलांचीं नांवे हीं श्रवणीय आहेत, म्हणून जिज्ञासूच्या माहितीकरितां पाच पांडवांची जशी नांवें दिलीं तशीच शभर कौरवाचीही देऊ. तीं नांवें अशीः—

[१] दुर्योधन, [२] दु शासन, [३] दु सह, [४] दु शील, [५] जलसध, [६] सम, [७] भीमबळ, [८] सुबाहु, [९] सहिष्ण, [१०] चित्रकुडल, [११] दुर्धर, [१२] दुर्मुख, [१३] बिंदु, [१४] कृप, [१५] चित्र, [१६] दुर्मद, [१७] दुर्मर, [१८] मरुबिंदु, [१९] चित्ताक्ष, [२०] उर्णनाभि, [२१] चित्रबाहु, [२२] सुलोचन, [२३] सुवाभ, [२४] चित्र वर्मा, [२५] अश्वसेन, [२६] महाबाहु, [२७] समदु:ख, [२८] मोचन, [२९] सुवर्मा, [३०] विवसु, [३१] विकट, [३२] चित्रशरासन, [३३] प्रगाह, [३४] सोमवर, [३५] मान, [३६] सत्यसघ, [३७] विवस, [३८] विकर्ण, [३९] उपचित्र, [४०] सेनानी, [४१] भीमबाहु, [४२] सद, [४३] बलकी, [४४] उग्रयुद्धा, [४५] बलावर्ध, [४६] दृढायु, [४७] भीमकर्मा, [४८] उपनद, [४९] अनासिंधु, [५०] सोमकीर्ति, [५१] कुडपाइ, [५२] अघबाहु, [५३] घोर, [५४] रौद्रकर्मा, [५५] वीरबाहु, [५६] कनकध्वज [५७] कुडासि, [५८] दीर्घबाहु, [५९] विट्रूप, [६०] प्रमथ, [६१] प्रमाथि, [६२] वीर्यनाद, [६३] दीर्घताल, [६४] विकटबाहु, [६५] दृढरथ, [६६] दुर्मर्षण, [६७] उग्र-श्रवा, [६८] उग्र, [६९] अभय, [७०] कुडभेरि, [७१] भीमरथ, [७२] अपलाप, [७३] जलसधि, [७४] कनकथा, [७५] दृढसधि, [७६] बृहक, [७७] विशाल, [७८] सुवात,

† कैवतिन्य जनद व्यास । कौशिकश्चैवशूद्रिका: ।
नारदा रजकी पुत्रः कौडण्यो विश्ववासुतः ॥

—मनुस्मृति.

[७९] नागदंत, [८०] सत्यसंध, [८१] अनंतरूप, [८२] अराजित, [८३] बृहत्क्षेत्र, [८४] सुहस्तु, [८५] उग्राहित, [८६] दृढहस्त, [८७] कवचि, [८८] कथकुंड, [८९] अहिकेत, [९०] कुंडधारि, [९१] दुरोदर, [९२] शुभहस्त, [९३] शुभकर्ण, [९४] सर्पाक्ष, [९५] दुःप्राजित, [९६] बहुधासी, [९७] युयुत्सु, [९८] धनुर्धर, [९९] वीर, [१००] हन

याप्रमाणें धृतराष्ट्राच्या पुत्रांचीं म्हणजे कौरवांचीं नांवें होतीं. दुःशिला नामक एक मुलगीही त्यास होती

धृतराष्ट्रानें या आपल्या शंभर पुत्रांस अर्धे राज्य दिलें होतें व अर्धे पांडवास दिलें होते पण कौरवांनी पांडवाचा वडील बंधु धर्मराज यास द्यूतात जिंकून त्याचें सर्व राज्य हरण केलें आणि त्यांना बारा वर्षे वनवास व एक वर्षभर अज्ञातवास करण्यास भाग पाडिलें वनवास व अज्ञातवास पार पाडून पांडव परत आल्यावर ते आपलें राज्य परत मागूं लागले पण कौरव त्यांना राज्य देईनात तेव्हा उभयपक्षाचें तुंबळ युद्ध माजलें. श्रीकृष्ण पांडवातर्फे होता आर्यावर्तातील बहुतेक राजे या युद्धांत दोन्ही पक्षांतर्फे सामील झाले होते त्या युद्धात पुष्कळ सैन्य हनन केलें गेलें पांडवांना विजयश्रीनें माळ घातली कौरवांचा निःपात झाला त्यानंतर धर्मराज गादीवर बसला त्याने राज्यही बरीच वर्षे केलें त्यांनी मोठा राजसूय यज्ञ केला शेवटीं पांच पांडवानीं आपल्या पुत्राच्या नावें राज्य करून देऊन ते सहपत्नि तपश्चर्येकरिता निघून गेले

हा विषय व तदानुषंगिक अनेक विषय महाभारतात विस्तृत रीतीने वर्णिलेले आहेत

क्षत्रियाच्या राजकीय उलाढाली, कलह, पराक्रम ह्यांचेंही वर्णन महाभारतात आहे महाभारतांतील वर्णनावरून तत्कालीन स्थितीचें चांगले ज्ञान होतें राजपुत्रांचें शिक्षण, द्वंद्वयुद्धें, धर्मयुद्धाचे नियम इत्यादि अनेक बोधप्रद गोष्टी ह्या ग्रंथात वर्णिलेल्या आहेत तसेंच धर्म, तत्त्वज्ञान, राज्यव्यवस्था इत्यादि गहन विषयांचें निरूपण शांतिपर्व इत्यादि भागांतून उत्तम रीतीनें केलेलें पहावयास सापडतें

वैदिककालात रामाकरिता जसें रामायण झाले, तसेंच भारतकाळात कौरवपांडवां करितां महाभारत झाले **श्रीरामचंद्रप्रभु सूर्यवंशी क्षत्रिय कुलांतील कोहिनूर असून श्रीकृष्णप्रभु आणि कौरव पांडव हे चंद्रवंशी क्षत्रिय कुलांतील कोहिनूर आहेत. क्षत्रियांकरितांच रामायणाचा जन्म** झाला, आणि **महाभारतही क्षत्रियांनींच जन्मास आणलें** एकूण विचार करतां **आर्यांचा प्राचीन इतिहास क्षत्रियांच्या क्षात्रतेजानेंच** संपूर्ण **डबडबून** गेला आहे हे क्षत्रिय जर त्या काली झाले नसते तर प्राचीन आर्यांच्या इतिहासदिग्दर्शनाचें काम भागविणारें कोणतेंही साधन अस्तित्वांत राहणें शक्य नव्हतें अर्थातच **वैदिककाल** जसा **क्षात्रघटनेनेंच मंडित झाला आहे** तसाच **भारतीय काळही क्षात्रघटनेनेंच मंडित झालेला आहे हें** सिद्ध होतें

५. **पुराणग्रंथ—रामायणाच्या** अनुकरणानें जशीं महाकाव्यें जन्मास आलीं तशीच **महाभारताच्या** अनुकरणानें पुराणें प्रसृत झालीं पुरुषादिकांचे अवतार, व्यासाची तपसबधी अतृप्ति, व्यासनारदसवाद, कृष्णकथा, अश्वत्थाम्याचा निग्रह, कुतिस्तुति व युधिष्ठिरानुलाप धर्मराज राज्यप्राप्ति, श्रीकृष्णाचें द्वारकागमन व द्वारकाप्रवेश, परिक्षितीचा जन्म, धृतराष्ट्रनिर्वाण, युधिष्ठिर तर्कप्रकरण, पांडवस्वर्गारोहण, पृथ्वीधर्मसवाद, कलिनिग्रहकथन, शुकागमनकथन इत्यादि पौराणिक कथाभाग मोठा मनोहर रीतीनें पुराणांतून खुलविला असून त्या योगानेच पुराणश्रवणाची एवढी माधुरी सर्वसामान्य जनसमाजात उत्पन्न झालेली आहे **'सर्गश्च प्रतिसर्गश्च वशविस्तार पवच'** या पुराणव्याख्येवरून वशावळ–कथन हाच पुराणलेखनाचा हेतु असावा असे दिसतें; परतु हल्लींची पुराणे धार्मिक दृष्ट्या आपले अस्तित्व सिद्ध करू पहात आहेत वास्तविक पाहिले असतां पुराणांचा अधिकार धार्मिक बाबीसबधी बिलकूलच पांगळा असा पडतो महाभारत ग्रथाच्या अनुकरणानें जरी पुराणांचा जन्म झालेला असला तरी महाभारतांमधील गाभीर्य आणि तत्त्वविवेचनपद्धतीपुढे पुराणें ही अगदींच अध वाटतात पुराणांमध्ये अजागळपणा इतस्तत प्रसृत झालेला आहे आणि म्हणूनच धर्मनिर्णयाच्या बाबतीत पुराणांवर भिस्त ठेवणें अगदींच भोळसटपणाचें आहे एवढेच नव्हे तर धार्मिकदृष्ट्या विचार करितां पुराणांचा धर्म सत्यधर्मविरोधी आहे असें स्पष्ट म्हणतां येते 'श्रुतिस्मृति पुराणोक्तफलप्राप्त्यर्थ' असा भिक्षुकी सकल्प तर धर्मास अत्यत विघातक असाच आहे

आद्यपुराण हे एकच होतें महाभारतातील विस्तृत विवेचन रगविण्यासाठीं पुढें त्याचे निरनिराळे अठरा विभाग करण्यात आले ते विभागहा पुढे अतिशयच वाढत जाऊन त्याना प्रत्येकीं स्वतत्र स्वरूपच प्राप्त होऊन बसले महाभारत ग्रथास स्मृतिग्रथाचें स्वरूप ज्याप्रमाणे प्राप्त झाले तसेंच स्वरूप पुराणांनाही प्राप्त व्हावें या हेतूनें हा अवास्तव प्रयत्न इ० सनानतर करण्यांत आलेला आहे पुराणातील विषयाच्या माडणीची पद्धत अशी असते कीं, त्यांतील कथाचा विस्तार एखाद्या राजाच्या मूळ कथानकावरून वाढविलेला असतो त्या कथानकात कल्पनेच्याच बहुतेक भराऱ्या मारलेल्या असतात आणि पुढे पुढें तर त्या कल्पनाची एवढी कडेकोट भिंत रचली जाते की, त्या मूळच्या कथानकाच्या स्वरूपांत केवळ दतकथाचीच भरता होते

'गुप्ता भोक्ष्यति मेदिनीम्' असे वाक्य ज्या पुराणांत उदधृत केलेले दिसून येते तें पुराण गुप्त राजाच्यानतर झाल्याबद्दल समज आहे पुराणांतून आन्ध्रभृत्यांची हकीकत सांपडते व त्या वशांतील जे राजे होऊन गेले, त्यापैकीं अमुक राजा अमुक वर्षें राज्य करील असे पुरावेही त्यातून आढळतात भविष्यपुराणांत व्हिक्टोरिया राणीचा उल्लेख आहे असें प्रतिपादन करण्यात येतें यावरून पुराणें अविश्वसनीय आहेत असें म्हणण्यास मुळींच हरकत नाही

पुराणांची रचना भिन्नभिन्न मतांना परिपोषक अशा पद्धतीनें केलेली आहे कांहीं विवक्षित पुराणें कांहीं विशिष्ट मतांचाच पुरस्कार करणारीं अशीं आढळून येतात

**अष्टादश पुराणेषु दशभिर्गीयते शिवः**
**चतुर्भिर्गीयते विष्णुर्द्वाभ्यां शक्तिश्च विघ्नपः**

या श्लोकावरून पुराणे हीं भिन्नभिन्न मतांकरिता भिन्नत्वानें अवतरलीं असल्याचें स्पष्ट होतें महाभारतांतील कांहीं कथाभागही पुराणाच्या नकली रंगानें चित्रित झालेला आहे सर्वसामान्यपणें बहुतेक पुराणांतून गीतेमधील विष्णुरूपदर्शन घुसडून दिलें असल्याचें पुराणनिरीक्षणांतीं प्रत्ययास येते महाभारतातील ज्ञान पुराणांत उद्धृत करण्याचे लालसेनें त्यांतही सांख्य, वेदांत, कर्मज्ञान व त्याबरोबरच ज्योतिषशास्त्र, वैद्यकशास्त्र इत्यादींसबधीं चर्चा केलेली आढळून येते जगाच्या उत्पत्ति, स्थिति, लयासबधींही कित्येक वेळां त्यामधून वर्णन केलेले आढळून येतें

मूळ पुराणाचे जे अठरा भाग पुढे करण्यांत आले त्यांचा विस्तार विक्रमानतर झाला असावा असें तज्ज्ञाचे मत आहे हल्लींच्या पुराणरचनेचा काल इ० स० पूर्वी ३०० वर्षांपासूनचा असल्याचे समजून आले आहे मूळपुराणें अगदींच जुनीं आहेत आणि त्यांचा लोप झाल्यावर नवीं अठरा पुराणे रचलेलीं असून त्यांचीं नांवें क्रमशः खालील श्लोकांत ग्रथित केलेलीं आहेत

**अष्टादश पुराणानि पुराणज्ञः प्रचक्षते ।**
**ब्राह्मं पद्मं वैष्णवञ्च शैवं भागवतं तथा ।**
**तथान्य नारदीयंच मार्कंडेयं च सप्तमम् ।**
**अग्नेयमष्टमंचैव भविष्यं नवमं स्मृतम् ।**
**दशम ब्रह्मवैवर्तं लैगमेकादशं स्मृतम् ।**
**वाराहं द्वादशंचैव स्कांदंचैव त्रयोदशम् ।**
**चतुर्दशं वामनं चैव कौर्मं पंचदशं स्मृतम् ।**
**मात्स्यं च गारुडं चैव ब्रह्मांडंच ततः परम् ।**

याप्रमाणें अठरा पुराणाचीं क्रमशः नावे आहेत अठरा पुराणांचीं नावें दर्शविणारा आणखीही एक सुंदर व गमतीचा श्लोक आहे व त्यावरून पुराणांची यादी तत्काल लक्षांत आणण्यास बरेंच सुलभ जातें तो श्लोक असा.—

**मद्वयं भद्वय चैव ब्रत्रयं वचतुष्टयम् ।**
**अनापलिंग कूस्कानि पुराणानि प्रचक्षते ॥**

**विशदीकरणः**—'म' दोन [१] मत्स्य [२] मार्कंडेय
'भ' दोन [३] भागवत [४] भविष्य
'ब्र' तीन [५] ब्रह्मांड [६] ब्रह्मवैवर्त [७] ब्राह्म.
'व' चार [८] वामन, [९] वाराह, [१०] विष्णु [११] वायु
'अ' [१२] अग्नि
'ना' [१३] नारद

'प' [१४] पद्म
'लिं' [१५] लिंग
'ग' [१६] गरुड
'कू' [१७] कूर्म
'स्क' [१८] स्कद हीं अठरा पुराणें होत.

पुराणलेखनाच्या काळासबंधीं विचार करतां अनेक पुराव्यांवरून त्यांचा काल इ०सनापूर्वी ३०० पासून इ०सन १३०० पर्यंत म्हणजे आजपासून सुमारें २२०० वर्षांपूर्वीपासून तों गेल्या ७०० वर्षांपर्यंतचा आहे असें सिद्ध झालेलें आहे श्रुति, स्मृति आणि पुराणें यांवर हिंदुधर्माची मदार अवलंबून असल्यामुळें हिंदुधर्मास फारच विकृत स्वरूप प्राप्त होत गेलें कारण या पुराणग्रंथांतून वगैरे कांहीं कांहीं प्रक्षिप्त वचनें बावळट पणाचें प्रदर्शन करण्यासाठीच प्रसृत केलेलीं दिसून येतात आणि त्यांचा परिणाम धर्मावर मात्र झाल्याशिवाय राहात नाहीं पुराणापेक्षां धर्मास आधार स्मृतींचा जास्त पकडीचा मानतात आणि स्मृतींपेक्षांही श्रुतींना जास्त महत्त्व देण्यांत येतें परतु अलीकडे छापून प्रसिद्ध झालेले श्रुतिस्मृत्यादि ग्रथ जर नि पक्षपाती दृष्टीनें उघडून पाहिले तर त्यांत धार्मिक ज्ञानापेक्षा ब्राह्मणांचें फाजिल महत्त्वच घुसडून दिल्याचें आढळून येतें आणि म्हणूनच श्रुतिस्मृतिपुराणादिकांवरून हल्लींच्या ज्ञानी लोकांचा विश्वास जवळ जवळ लुप्तप्रायच होत चालला आहे.

पुराणांसबधीं अशी घालघुसड झाली असल्यास त्यांत नवल नाहीं, परतु प्राचीन आर्यांच्या वाङ्मयांतील दोन मुख्य ऐतिहासिक ग्रथ जे रामायण व महाभारत त्यांतही कसा घोंटाळा उपस्थित झाला आहे याचेंही *चित्र पाहण्यासारखें आहे ब्राह्मणी वर्चस्व प्रस्थापित करण्याकरिता मूळ ग्रथांना मोठमोठीं गालबोटें स्वार्थी लोकांनीं लाविलेलीं आहेत

प्रो० डेन्स ॲन्डरसन् नामक एका विद्वान— महर्षींची आणि हिंदी प्रवासी प्रो० चतर्जी यांची एक मुलाखत प्रसिद्ध झालेली असून त्या मुलाखतींत प्रो० ॲन्डरसेन् यांचें असें मत उद्धृत झालेलें आहे कीं—

"महाभारत हा ग्रथ **भिक्षुकी घुसडाघुसडीनें** मनस्वी सडलेला आहे महा

---

* भारताचार्य चिंतामणराव वैद्य यांचे 'Mahabharat–A Criticism', 'Epic India', 'Ramayan–A riddle', "महाभारताचा उपसहार' हे ग्रथ वाचले असतां भिक्षुकी घालघुसड या ग्रंथांतून कशी इतस्तत पसरली आहे हें चांगलें कळून येतें.

— या मुलाखतीची हकीकत इ० रॅ० सोसायटीच्या फेब्रुवारी १९२१ च्या अंकांत प्रसिद्ध झालेली आहे

भारत हा ग्रंथ अनेक **भिक्षुकांच्या** हातीं लागल्यामुळें तो मूळग्रंथापेक्षां **मनस्वी** वाढून फुगला आहे. आणि याबद्दल **पाश्चात्य** आणि **पौर्वात्य संशोधकांचें** अगदीं **एक-मत** आहे इ० सनाच्या नवव्या शतकांत **बौद्धधर्माचा** पाडाव करण्यासाठीं **भिक्षुक-शाहीनें** जेव्हां कंबरा कसल्या, तेव्हांपासूनच महाभारताप्रमाणेंच रामायणादि **इतर सर्व ग्रंथांतल्या क्षत्रियमाहात्म्याला कायमचा फांटा दिला जाऊन** त्या ठिकाणीं **भिक्षुकी माहात्म्याच्या खऱ्या खोट्या गोष्टी घुसडण्याचा धूम-धडाका** सुरू झाला"

**६. पुराणोक्त भिक्षुकी प्रतिपादन**—मूळचीं पुराणे आणि इतिहास यांत आर्यक्षत्रियवंशाचा इतिहास आणि वंशावळ्या यांची सुंदर रचना केलेली असून शिवाय त्यांत बहुजनसमाजाच्या उपयोगीं पडणारी नीति कथन केली आहे मूळचीं अस्सल पुराणें म्हणजे नामांकित क्षत्रियवंशांचीं शौर्यशाली कथानकें दर्शविणारे ग्रंथ होत परंतु वेद व पुराणासारख्या ग्रंथांची रचना करणें आणि राष्ट्रसंवर्धन व राष्ट्रसंरक्षणाची क्षात्रवृत्तीची जबाबदारी सांभाळणें, हीं दोन्ही महत्त्वाचीं कामें प्रामुख्येंकरून क्षत्रिय वर्गाच्याच हातीं असल्यामुळें राष्ट्रसंरक्षणाच्या महत्त्वाच्या कामात क्षत्रिय गुंतले असतां, ग्रंथरक्षणाचे कार्यावर त्याना गुमास्ते उर्फ उपाध्याय नेमणें भागच पडलें याप्रमाणें ग्रंथ-रक्षणाचें काम घरीं बसणाऱ्या उपाध्याय उर्फ ब्राह्मण गुमास्त्यावर क्षत्रियानीं विश्वासानें सोंपविल्यामुळे त्या विश्वासाचा अवास्तव उपयोग करून ब्राह्मणांनीं स्वतःच्या स्वार्थाकडेच निव्वळ लक्ष देऊन त्या दृष्टीनेच त्या ग्रंथातून स्वतःच्या वर्चस्वप्रदर्शनाची नकली घाल-घुसड करून दिली आणि त्या बरोबरच क्षत्रियाची नालस्ती करण्यासही त्यांनीं मागें पुढें पाहिले नाहीं अनेक पुराणग्रंथातून अशा तऱ्हेचींच प्रक्षिप्त कथानके व वृत्तात आढळून येतात आणि वास्तविक रीतीनें त्या कथानकाचा आणि वृत्तांताचा विचार केला असतां त्यांत कांहींही तथ्य आढळून येत नाहीं या गोष्टीचे स्पष्टीकरणार्थ आपण पुराणोक्त अशीं कांहीं वृत्तें व कथानकें उदाहरणार्थ घेऊन त्यावरून तदंतर्गत ब्राह्मणी वर्चस्वाची चिकित्सा करू या

उदाहरणार्थ, परशुरामाचीच कथा घेऊ भार्गव कुळांत पिता जमदग्नि (ब्राह्मण) आणि माता रेणुका (क्षत्रियकन्या) यांच्या पोटी संमिश्र वृत्तीचा असा परशुराम जन्मास आला स्वतःच्या आईचाच त्यानें मोठ्या दुष्ट प्रकारानें खून केला म्हणजे त्यानें आपलें शौर्य स्वतःचे आईवरच प्रथम अजमावून घेतलें ! आणि या मातृहत्त्या करणाऱ्या शूर (?) परशुरामानेंच पुढें एकवीस वेळ पृथ्वी निःक्षत्रिय करून टाकली आणि दुनियेच्या पाठीवर एकही क्षत्रिय ठेवला नाहीं ! अशा या परशुरामाची गणना भिक्षुकांनीं अवतारांत केलेली आहे !

**परित्राणाय साधूनाम् विनाशाय च दुष्कृताम् ।**
**धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगेयुगे ॥ १ ॥**

ही अवताराची व्याख्या असून याप्रमाणे पाहू गेलों असतां परशुरामाची गणती अवतारांत करणे अत्यत धाडसाचेच होणार आहे असे दिसून येतें कारण साधु अगर सत्पुरुषांचे प्रतिपालन, दुष्टांचे निर्दालन आणि सद्धर्मसस्थापन यांपैकी कोणतेंही अवतार-कार्य या परशुरामाने केलेले दिसत नाहीं स्वत च्या आईचा वध मात्र त्याने केला आणि हेच त्याचें शतकृत्य अवतारकार्य असावे असे म्हणावे लागते !

परशुरामानें एकवीस वेळां पृथ्वी नि क्षत्रिय केली अशी भिक्षुकी कथा आहे हीं युद्धे कोणाकोणात झाली याचाही निदेश त्या कथाभागातून केलेला आहे परशुरामानें पहिले युद्ध मायदेवींचा पति मडबाहू याच्याबरोबर केलें मडबाहू हा क्षत्रिय होता दुसरें युद्ध सहस्रार्जुनाबरोबर केले तिसरे युद्ध शखसेन राक्षसाबरोबर केले चवथें दत्तात्रयाशीं केले पांचवें युद्ध कलिंगदेशाचा राजा बलसेनात्मज याच्या बरोबर केले सहावें युद्ध राजा उल्कात्मज याच्या बरोबर केले सातवे युद्ध जलसेन राजाशीं झाले आठवें युद्ध उर्ध्वसेनाबरोबर झाले नववे युद्ध शबराचा पुत्र उग्रसेन याच्याबरोबर झालें दहावें उग्रसेनाच्या मुलाबरोबर झाले अकरावे युद्ध विद्याधर व अतिबळा यांच्याशी झालें बारावें युद्ध जयति नगराच्या राक्षसाबरोबर झाले या युद्धात बारा कोटी राक्षस मृत्युमुखीं पडले ! तेराव्या युद्धांत तेरा कोटी राक्षसांचा परशुरामानें फन्ना उडविला ! चवदावे युद्धांत चौदा कोटी राक्षस परशुरामाने कापून काढले ! पधराव्या युद्धांत छत्तिस कोटी राक्षस परशुरामानें आपल्या पराक्रमाने जमिनीवर लोळविले ! सोळावें युद्ध अनगवीराबरोबर झालें सतरावे व अठरावे युद्धांत कोट्यावधि राक्षसाचा नाश परशुरामाने केला ! एकोणविसावें युद्ध मल्लिकार्जुनाबरोबर झाले विसावे युद्ध बालकेतु राजाबरोबर झालें आणि एकविसावें युद्ध समुद्राबरोबर करून परशुरामाने त्याला चौदा ताल मागें हटविले !! याप्रमाणे परशुराम पराक्रमी व महान् शूर असा योद्धा होता !!!

याप्रमाणें परशुरामाने केलेल्या एकवीस युद्धाची जत्री असून त्यावरून ही कथा कशी घुसडाघुसडीने व थोताडाने भरली गेली आहे याचा तर्क कोणीही सहजच करू शकतो बाराव्या युद्धात बाराकोटी राक्षस मेले, तेराव्यांत तेरा कोटी राक्षस मेले, चवदाव्यांत चवदा कोटी राक्षस मेले या अशा युद्धवर्णनावरून तरी निदान परशुरामानें खरोखरच एकवीस युद्धे केलीं असावा असे वाटत नाहीं दुसरी गोष्ट अशी की, परशुरामानें एकवीसवेळ पृथ्वी नि क्षत्रिय केली हे सभवते तरी कसे याचाही खुलासा होत नाहीं पृथ्वी नि क्षत्रिय करणे म्हणजे एकही क्षत्रिय पृथ्वीतलावर राहू न देणें, असा पृथ्वी नि क्षत्रिय केली या म्हणण्याचा अर्थ होतो यावरून विचार करू गेलों असतां, एकवेळ परशुरामानें पृथ्वी नि.क्षत्रिय केल्यावर दुसऱ्यानें पुन्हां परशुरामानें कोणत्या क्षत्रियाबरोबर युद्ध केलें असावें तेंच समजत नाहीं ! याप्रमाणे परशुरामाने एकवीस वेळ पृथ्वी नि.क्षत्रिय केली असें पुराणांतरीं वर्णन आहे ! अर्थातच ज्या अर्थीं वीस वेळ पृथ्वी नि:क्षत्रिय करूनही एकविसावे वेळीं क्षत्रिय पृथ्वीवर होतेच, तेव्हां एकविसावे युद्धानंतरही पृथ्वीतलावर क्षत्रिय उरले नसतील कशावरून ? अर्थातच परशुरामाने **एकवीस वेळ पृथ्वी निः-**

**क्षत्रिय केली हें विधान, अमुक मनुष्य एकवीस वेळ मरण पावला या वाक्यरचनेप्रमाणें हास्यास्पद आहे**; व त्यांत निव्वळ क्षत्रियांची नालस्ती करून भिक्षुकी बडेजाव वाढविण्याचाच प्रयत्न केला आहे

**क्षत्रियकुलावतंस प्रभुरामचंद्रानें** या परशुरामाचा निःपात केला असल्याचें वृत्त लोकविश्रुतच आहे ! अर्थातच परशुरामाने पृथ्वी निःक्षत्रिय केल्यावर परशुरामाचाच निःपात करणारा **क्षत्रिय रामचंद्र वीर** मग कसा निर्माण झाला ? आणि श्रीरामचंद्र हा **क्षत्रिय** वीर जर पृथ्वीवर होताच तर मग परशुरामानें पृथ्वी निःक्षत्रिय तरी कशी केली होती ? ज्या अर्थी **श्रीरामचंद्र हा क्षत्रिय प्रभाकर** त्यावेळेस होता, त्या अर्थी प्रभुरामचंद्राचें इतर लक्षावधि **क्षत्रिय सैन्य** वगैरे **क्षत्रियगण**ही पृथ्वीवर अस्तित्वात असलाच पाहिजे ! एकदरींत विचार करतां परशुरामाची ही पौराणिक कथा निव्वळ थोताड आहे असेंच नि.पक्षपातीपणानें विचार करणारा कोणीही मनुष्य म्हणेल ही गोष्ट निःसंदेह आहे आणि प्राचीन इतिहासही ही गोष्ट थोतांडात्मकच ठरवीत आहे.

भवभूति हा सुप्रसिद्ध कवि रामचंद्र आणि परशुराम यांचे युद्धवर्णन करतांना मोठी मननीय माहिती देतो परशुरामाच्या उद्दामपणाकडे बघून त्यास **क्षत्रियांनीं केलेलें आव्हान** असें आहे कीं:—

**" दूर-दान्तानाम् दमन विधयः क्षत्रियेष्वायतन्ते ।**

**दूर दान्तस् त्वम् वयम् अपिच ते क्षत्रियाः शासितार. ॥ "**

म्हणजे—" हे परशुरामा ! तू दुष्ट ताठ्याने उभा राहिला आहेस दुष्ट ताठ्याने उभे राहिलेल्यांस **शासन करणें क्षत्रियांच्या** हाती असते **तुला शासन करणारे क्षत्रिय वीर** हे आम्ही येथें आहोंत."

ताठ्याचे प्रकार दोन असतात सत्याग्रहानें व योग्य अभिमानानें जो ताठा उत्पन्न होतो तो सुष्ट ताठा होय आणि दुराग्रहानें व 'स्वपर बलाबल नेणुनि' जो ताठा उत्पन्न होतो तो दुष्ट ताठा होय हा दुष्ट ताठाच परशुरामाच्या ठिकाणीं होता आणि म्हणूनच **क्षत्रिय वीरांनीं त्याला मर्दपणानें आव्हान करून** त्याच्या **फाजिल ताठ्याची ओळख** त्यास करून दिली. **फाजील ताठ्याची ओळख करून देऊन त्याबद्दल योग्य प्रायश्चित्त देणें हा क्षत्रियांचा मुख्य धर्म होय. आणि हें त्रिकालाबाधित तत्त्व लक्षांत ठेवण्यासारखें आहे**

परशुरामास **क्षत्रियकुलावतंस प्रभुरामचंद्रानें** योग्य शासन केले असून त्याचें सुंदर वर्णन भवभूतीनें केलेलें आहे

परशुराम जेव्हां मोठया आढ्यतेने 'कोठे आहे तो राम, कोठे आहे तो राम,' असा उर्मट रीतीनें शब्द करीत रामाकडे आला, तेव्हां **'हा पहा मीच तो राम, मीच तो राम'** असा रोकडा जबाब प्रभुरामचंद्राने परशुरामास दिला व लगेच त्यानें आपलें धनुष्य सज्ज करून परशुरामास युद्धास आव्हान केलें प्रभुरामचंद्र हा क्षत्रिय मर्द वीर होता, विश्वामित्राकडून शस्त्रास्त्रविद्येत तो पारंगत झाला होता, त्याच्यापुढें बिचारा

परशुराम–स्वतःच्या आईचा खून करणारा मर्द योद्धा–कितीसा टिकाव धरणार ? प्रभु-रामचंद्राची ती क्षात्रतेजानें लख लख लख लख तळपणारी भव्य व तेजस्वी अशी दिव्य देहयष्टि पाहून परशुरामास त्याच्याकडे पाहाण्याचेंही धाडस होईना तो धैर्यगलित झाला आपणास आतां प्रभुरामचंद्राकडून कायमचें शासन मिळाल्याशिवाय राहातच नाहीं अशी पक्की गांठ त्यानें आपल्या मनाशींच बांधली आणि अशावेळी प्रभुरामचंद्रास शरण गेल्यास 'शरणागतास मरण न देणें' हा क्षत्रियधर्म असल्यामुळें कदाचित् आपली सुटका होईल असें त्याला वाटूं लागलें या विचाराची अमलबजावणी करण्यासही त्यानें विलंब लावला नाहीं त्यानें प्रभुरामचंद्रास शरण येण्याची आपली इच्छा दर्शविली, परतु रामचद्र उद्गारले, " मिठी मारणे हे शब्द आपण ज्या कामगिरीस आलां आहांत त्या कामगिरीस शोभत नाहींत "

प्रभुरामचद्राचे हें भाषण ऐकून परशुराम आपल्या शौर्याचें प्रदर्शन करू लागला तो उद्गारला, " **क्षत्रियांच्या बायकांचीं पोटें चिरून** त्यातील **गर्भांचे तुकडे करणारा हा मी परशुराम** आहें ! "

प्रभुरामचद्र उद्गारले, " अरे ! **स्त्रियांचे गर्भ छेदणें** हा तर **निव्वळ षंढ-पणा** आहे त्याची तू **मूर्खासारखा** एवढी बढाई कां मारतोस ! "

या वाक्याचा उच्चार होताच परशुराम आपल्या **तामसवृत्तीनें अंध होऊन** त्यानें आपला परशु बाहेर काढला **प्रभुरामचंद्र या क्षत्रिय वीरानेंही** आपल्या **एकबाणी व्रताची** चमक दाखविण्याकरितां आपले धनुष्य तयार केलें दोघांचीही चकमक उडाली पण बिचारा परशुराम क्षात्रतेजापुढे कोठपर्यंत टिकाव धरणार आहे ! प्रभुरामचद्रानें त्याची चांगली रग जिरविली आणि त्यास पचांसमक्ष उभें केले परशु रामाची प्रभुरामचंद्रास दया आल्यामुळें त्यानें विश्वामित्र आदिकरून पच सांगतील त्याप्रमाणेच परशुरामास प्रायश्चित्त देण्याचा आपला विचार पचास कळविला पचांनीं विचार करून असा न्याय दिला कीः—

" अशा दुष्टाला फांशीची शिक्षा अगर शूळाची शिक्षा देणें म्हणजे त्याचे क्लेश एकदम मिटविणें हें ठीक नाहीं त्याचा दुष्टपणा अशा शिक्षेनें जाणार नाहीं पुढें जन्मांतरीं त्यास तो नडणारच नडणार ! सबब त्याला याच जन्मीं आणि याच देहीं ताळ्यावर आणण्यासाठीं एकांतवासाची जन्मठेप काळ्यापाण्याची शिक्षा द्यावी "

याप्रमाणें§ विश्वामित्रादि पचानीं आपला निकाल देतांच त्या **घमेंडखोर परशु-रामास क्षत्रिय रामचंद्रानें** कोंकणपट्टीच्या सह्याद्रि पर्वतापलीकडे समुद्र किनाऱ्याच्या स्मशानवटींत राहण्याची जन्मठेप शिक्षा दिली त्या स्मशानवटींतच त्याचा काळ गेला याप्रमाणें परशुरामाची पूर्ण रग जिरविण्याचा मान क्षत्रियांनींच प्राप्त करून घेतला

---

§ प्रोफेसर राजारामशास्त्री भागवत यांची लेखमाला

असें असतांना पुराणात परशुरामानें पृथ्वी निःक्षत्रिय केल्याची लटकीच कपोल-कल्पित कथा घुसडून देण्यात आलेली आहे यात्रमाणेंच पुराणामध्यें भिक्षुकी कथन घुसडलें गेले आहे, आणि त्यायोगाने पुराणांवरील भक्तीही क्षय पावत चालली आहे पुराणें मुखोद्गत गाणारे प्रथम सूत, मागध, भाट, बंदीजन वगैरे लोक असत क्षत्रियांच्या वंशावळी मुखोद्गत गाणारे भाट अद्यापही आहेत 'पुराणे धर्मनिश्चय' ही व्याख्या पुराणाची नव्हती परतु ब्राह्मणांच्या हातीं ही सूत्रें अनायासे गेल्यापासून त्यांनीं राईचा पर्वत करून आपलेंच महत्त्व प्रस्थापित करण्याची नसती हांव धरली, व त्या योगानें मूळच्या पुराणांचे रूपांतर गलिच्छ स्थितींत अवतरित झाले

पुराणांप्रमाणेंच इतर ग्रंथांतूनही अनेक वचनाची घालघुसड भिक्षुकशाहीनें केलेली आहे, व ते ग्रथ जणू काय फारच प्राचीन ग्रंथ आहेत असें दाखविण्याचा ते नेहमीं प्रयत्न करीत असतात उदाहरणार्थः—

**" आद्यंत स्थिति वर्णानाम् भविष्यति कलौयुगे । "**

म्हणजे ' कलियुगांत ब्राह्मण व शूद्र असे दोनच वर्ण कायम राहतील, ! अर्थात् क्षत्रिय व वैश्य हे वर्ण नष्ट होतील ! या विधानांत काय तथ्य आहे हे कोणासही दिसून आल्यावाचून राहात नाही हें वचन '**शूद्रकमलाकर**' नामक ग्रथांत नमूद केलें असून तो ग्रथ प्राचीन असल्याचे सांगण्यांत येतें परंतु '**शूद्रकमलाकर**' हा ग्रथ भट्ट पेशव्यांच्या काळांत निर्माण झालेला आहे या ग्रथाचा लेखक कमलाकर भट्ट नांवाचा एक द्रविड ब्राह्मण होता तो गागाभट्टाचा बधु होय ग्रथाचा काल पुरातन भासविण्याची भिक्षुकी शैली मोठी अजब आहे हा ग्रथ इ० सन १६८० सालीं कमलाकर भट्टानें द्वेषानें लिहिलेला आहे गागाभट्टाचा सन्मान शिवाजी महाराजानीं जसा केला तसा कमलाकर भट्टाचा केला नाहीं, म्हणून बधुद्वेष आणि राजद्वेष अशा द्वेषी बुद्धीनें संतप्त होऊन कमलाकर भट्टाने हा ग्रथ लिहिला तसेंच ज्या ग्रथावर हिंदूची धार्मिक भिस्त अवलबून आहे तो ' धर्मसिंधु ' नामक ग्रथही पुरातन नसून अगदीं अलीकडील काळातील आहे इ० सन १७९० सालीं म्हणजे १३५ वर्षांपूर्वी रत्नागिरी जिल्ह्यांत सगमेश्वर तालुक्यांत गोळवलि नांवाच्या खेड्यांत राहणाऱ्या काशिनाथ अनत उपाध्याय नामक एका चित्पावनी भिक्षुकानें तो लिहिलेला आहे यावरून प्रथमदर्शनीं हा गोंडस दिसणारा धर्मग्रथ (?) थोडासा सूक्ष्म दृष्टया विचार करतां कसा उतरलेला असेल याची जाणीव तो ग्रथ वाचल्याशिवाय होणें शक्य नाहीं

महाभारताच्या अनुकरणाने जीं अठरापुराणे रचलीं गेलीं, त्यांचे अदाज रचनाकाळ, त्यामधील मुख्य प्रतिपाद्य विषय, श्लोकसख्या वगैरे दर्शविणारा तक्ता पुढें दिलेला आहे त्यावरून पुराणोक्त कथनांतील बरेंच रहस्य समजून येणार आहे

# पुराणांच्या संक्षिप्त माहितीचा तक्ता

| अनु. नंबर. | पुराणाचें नांव. | रचनाकाळाचा सुमार | श्लोक-संख्या | वर्णन |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | ब्रह्मपुराण | इ० सन ७ वें शतक | १०००० | जगन्नाथाचें माहात्म्य वर्णन करणें हा या पुराणाचा मुख्य भाग आहे यावरून हे पुराण इ० सन ६–७ या शतकांत रचलें असावें |
| २ | पद्मपुराण | इ० सन १० वे शतक | ५५००० | यात बौद्ध, जैन, वैष्णवसबधी कथा आहेत यावरून हे आद्य शकराचार्यानतर १०–११ व्या शतकात व शेवटला प्रक्षिप्त भाग सोळाव्या शतकात रचलेला असावा |
| ३ | विष्णुपुराण | इ० सन ११ वे शतक | २३००० | बौद्ध-जैनाचे प्रसग, भविष्य राजवश, कलीच्या ४२४६ वर्षापर्यंतचे वर्णन यांत आहे यावरून ११ वे शतकातील याची रचना दिसते कारण कलियुगास आज ५०२९ वर्षे झाली आहेत |
| ४ | वायुपुराण | इ० सनापूर्वी तिसरे शतक | २४००० | हे सर्व पुराणांत प्राचीन आहे पचलक्षणयुक्त* असे हें आहे |
| ५ | भागवत | इ० सन १२ वे शतक | १८००० | हें बोपदेवकृत आहे देवीभागवत आणि विष्णुभागवत असे यांत दोन भाग आहेत अर्थात हे आधुनिक आहे |
| ६ | नारदपुराण | इ० सन १० वे शतक | २५००० | हा एक आधुनिक फाजील व भिक्षुकी आचार विचारांचा नमुना आहे हें पुराण लोकाना साग़ नये |
| ७ | मार्कंडेयपुराण | इ० सन १२ वे शतक | ९००० | यांत नववे शतकातील गोष्टींचे वर्णन आहे तें पूर्ण नाहीं |

* (१) सृष्टि, (२) प्रतिसृष्टि, (३) राजांच्या व ऋषींच्या वशावळ्या, (४) थोर पुरुषाची चरित्रे व (५) मन्वतरे हीं पाच लक्षणे पुराणाचीं मानिलीं आहेत

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ८ | अग्निपुराण | इ० सन ५ वे शतक | १५४०० | यांत इतिहास, छंद, व्याकरण, तांत्रिक पूजा आणि आधुनिक कवित्वाचा संग्रह आहे |
| ९ | भविष्यपुराण | इ० सन ११ वे शतक | १४५०० | यात प्रारंभी सृष्टीचें तात्त्विक वर्णन असून शेवटीं व्रतपूजा वगैरे आधुनिक प्रकार सांगितले आहेत हें अगदीं अलीकडचें आहे |
| १० | ब्रह्मवैवर्तपुराण | इ० सन १७ वे शतक | १८००० | पंचलक्षणयुक्त असे हे नाही म्हणून हे पुराण नव्हे यात उपपुराणाचें वर्णन आहे |
| ११ | लिंगपुराण | इ० सन १२ वें शतक | ११००० | यात शैवाख्यान आहे शिवलिंगपूजा बारावे शतकाच्या अखेरीस बसवानें सुरू केली |
| १२ | वराहपुराण | इ० सन १३ वें शतक | २४००० | बाराव्या शतकातील प्रसिद्ध वैष्णव रामानुजाचार्यांचा यात आभास आहे. |
| १३ | स्कंदपुराण | इ० सन ८ वे शतक | ८११०० | यांत जगन्नाथाचें वर्णन आहे हे पुराण ब्रह्मपुराणानंतर झाले असावें असें दिसतें |
| १४ | वामनपुराण | इ० सन १७ वें शतक | १०००० | ब्राह्मणी फाजील वर्चस्वाच्याच भाकडकथा यांत आहेत याला पुराण म्हणता येत नाहीं पेशवाईचे काळात हे रचिलें असावें |
| १५ | कूर्मपुराण | इ० सन १७ वे शतक | १७००० | यात भैरव, वामन, यामल, तंत्रशास्त्र याचा उल्लेख आहे यावरून हे वामन पुराणानंतरचें असावें |
| १६ | मत्स्यपुराण | इ० सन १७ वे शतक | १४००० | यात १८ उपपुराणांचा उल्लेख आहे यावरून याची रचना अगदीं अलीकडच्या काळची दिसते |
| १७ | गरुडपुराण | इ० सन १७ वें शतक | १९००० | यात ब्राह्मणी माहात्म्याच्या असंबद्ध कथा आहेत गरुडाचे काहींही वर्णन नाहीं पुराणाच्या लक्षणानी हे युक्त नाही पेशवाईच्या कालात रचिले असावें |
| १८ | ब्रह्माण्डपुराण | इ० सनापूर्वी चवथे शतक | १२८०० | याची भाषा प्राचीन आहे यास व वायुपुराणास व्यासोक्त पुराणे मानतात वायुपुराणाच्या शेवटल्या भागास ब्रह्माण्ड म्हणतात |

**७. भारतीयकालीन रीतिरिवाज**—या कालीं कुरु नांवाचा एक **क्षत्रिय राजवंश** दिल्लीनजीक हस्तिनापुर येथे राज्य करीत होता 'पांचाल' नांवाचें राजघराणें कुरूच्या राज्याच्या दक्षिणेस गंगेच्या कांठीं राज्य करीत होतें त्याचप्रमाणें यादव, मत्स्य, शूरसेन वगैरे दुसरे क्षत्रिय राजवशही आसमतात् प्रस्थापित झालेले होते या क्षत्रिय राजघराण्यांच्या पदरी विद्वान् लोकांचा मोठा जमाव असे निरनिराळ्या ठिकाणांहून विद्वान् लोकांस बोलावून आणून नीति, धर्म, तत्त्वज्ञान इत्यादि विषयांवर राजे लोकांच्या समक्ष वादविवाद होत असत राजे लोकही या वादविवादांत कधीं कधीं अप्रत्यक्षपणें तर कधीं कधीं प्रत्यक्षपणें भाग घेत असत या पद्धतीमुळे विद्येच्या प्रसारास उत्तेजन मिळून बरेच विद्वान् लोक निर्माण होऊ लागले होते विद्याभ्यासाकरितां ठिकठिकाणच्या विद्यार्थ्यांनीं गुरूच्या आश्रमी जाऊन राहाण्याचा प्रघात सुरू होता अशा आश्रमास गुरुकुल असे म्हणत असत गुरुकुलातील अध्यापकांचा, विद्यार्थ्यांचा सर्व खर्च क्षत्रिय राजेच चालवीत असत ही गुरुकुले वस्तीपासून लाब अशा निवांत व पवित्र स्थलीं बांधण्याची व्यवस्था करण्यांत आलेली असे

**'मौंजीबंधन उर्फ उपनयनविधि'** हा गुरुकुलांत विद्या शिकण्यासाठीं जाण्याचा प्रारंभीचा विधि होय हल्लींच्या काळांत मुलाचें नाव शाळेंत घालण्याचा जसा अगदीं प्रथम विधि करावा लागतो, तसाच त्या कालीं वेदविद्या शिकण्यास जाण्याचा प्रारंभींचा विधि **मौंजीबंधन उर्फ उपनयन सस्कार** हा करावा लागे हल्लीं ब्राह्मणादि त्रैवर्णिकांत जी मौंज होते ती पूर्वकालीन उपनयनसस्काराची नक्कल होय हें हल्लीं दिसून येणारें उपनयन म्हणजे खरा उपनयनसस्कार मुळींच नव्हे गुरकुलातील वेदाध्ययनाबरोबरच युद्धोपयोगी शिक्षणही विद्यार्थ्यांच्या आवडीनिवडी प्रमाणे देत असत सर्व दर्जाचे विद्यार्थी त्या कालीं गुरुकुलांत दाखल होऊ शकत असत जो विद्यार्थी आपल्या गुणग्राहकतेप्रमाणे ज्या विद्येत निष्णात होईल, त्या विद्येप्रमाणे त्याची गणना त्या त्या वर्णांत होत असे, म्हणजे विद्येवरून व अगच्या गुणावरून मनुष्याची योग्यता मानली जात असे विद्याभ्यास सपल्यावर विद्यार्थी गृहस्थाश्रमीं येऊन कुटुबी होऊन ससारचक्राचा गाडा चालवीत असत मात्र विद्यार्थी गृहस्थाश्रमीं होण्याकरितां जेव्हा गुरुकुलातून घरीं येण्याकरितां निघत, तेव्हा तत्पूर्वी त्यांची सोडमौंज करण्यांत येई मौंजीबधन होऊन विद्याभ्यास–प्रारभ–कालापासून तों थेट गृहस्थाश्रमी सोडमौंज होऊन येईपावेतों विद्यार्थी नैष्ठिक ब्रह्मचर्यानें राहत असत, आणि त्यामुळेच विद्याभ्यास होईपर्यंत सोडमौंज करण्याचा अधिकार नसे हल्लींचा भिक्षुकी उपनयनसस्कार उर्फ मौंजीबधन हा वेदविद्याध्ययनाचा खरा धार्मिक सस्कार नसून ही उपनयनसंस्काराची थट्टामस्करी आहे कारण मौंजीबधनानतर वेदाध्ययन मुळींच केलें जात नाहीं वेदाध्ययनाकरितां गुरुगृहीं काशीस जाण्याचें सोंग करून बटूला ( ज्याची मौंज करतात त्या मुलाला ) काठीच्या घोड्यावर बसवून मडपांत फिरवितात आणि एका घटकेंतच काशीहून विद्या शिकून आला असें गृहीत धरून त्याच दिवशीं किंवा दुसऱ्या दिवशीं त्याची सोडमौंज करतात! ही खऱ्या उपनयनांची थट्टामस्करी नव्हे तर काय!

लग्नाचे वेळीं होमाचा अग्नि प्रदीप्त करीत तो प्रत्येक धार्मिक क्षत्रिय आपल्या घरांत राखून ठेवी आणि धार्मिक विधीप्रमाणें त्यांत पेय व दुसरीं हव्यें टाकून तो होम करीत असे ऋग्वेदांतील मंत्र या होमाचे वेळी म्हणण्यांत येत असत निरनिराळ्या पाठशाळांत ज्ञानसंबंधीं प्रयुक्त व सात्त्विक स्पर्धा चालत असे तरुण राजपुत्रांना प्रासक्रीडा, सादिक्रीडा वगैरे युद्धकलांत आपलें प्राविण्य दाखविण्यास मोठा उत्साह वाटत असे आपल्या कुटुंबियांचा पराक्रम पाहाण्याकरितां कुलीन व सभ्य स्त्रिया लोकसमाजांत मोकळ्या पद्धतीने येत असत वयांत आल्यानंतरच मुलींची लग्ने होत असत बहुश त्या तरुण मुली पराक्रमसंपन्न असा वर स्वत च पसंत करीत, आणि त्यांच्या तशा करण्यास कोणत्याही प्रकारची आडकाठी येत नसे सोने, रूपे, रत्ने, सुपीक जमिनी, गाड्या, घोडे, गायी, खेचरे, दास, दासी हीं सधन लोकांना प्राप्त झालेलीं ऐश्वर्यसाधने असत सोने, रूपे, जस्त, शिसे आणि लोखंड यांचा उपयोग कसा करावा हें तत्कालीन लोकांना माहीत होतें हत्तीस माणसाळविण्याचे प्रयत्नांत बरेच यश आलें होते तांदूळ, गहूं, जव इत्यादि धान्यांची लोकांना ओळख झाली होती दुधाचे अनेक प्रकारचे पदार्थ तयार करून ते खाण्याकरिता उपयोगांत आणीत असत यज्ञयागादिकांचे वेळीं मद्याचाही उपयोग करण्यांत येई बालविवाह प्रचलित नव्हते विधवा स्त्रियांना पुनर्विवाह करण्यास मोकळीक होती गोत्रीय लोकांत तीन अथवा चार पिढ्यापर्यंत लग्नें करण्याची मनाई होती वेदाध्ययन हे एक मुख्य कर्तव्य मानण्यांत येई खगोलविद्येची वृद्धि या कालांत बरीच झाली वर्षाचे बारा भाग करून त्यांचे बारा चांद्रमास गणण्यांत आले आणि या चांद्रमानाचा सूर्यकालाशीं मेळ घालण्याकरिता प्रत्येक पांचव्या वर्षी तेरावा महिना त्यास जोडला ज्या तारकापुंजांतून चंद्र मार्ग आक्रमण करीत असतो, त्या तारकापुंजांचे आकार लक्षांत घेऊन त्यांस अठ्ठावीस नांवे दिलीं तसेंच विषुववृत्ताच्या दक्षिणोत्तर बाजूस सूर्य किती जातो हे लक्षांत आणून दक्षिणायन व उत्तरायण यांचे काल नक्की करण्यांत आले वेदाच्या एकीकरणाचें काम पुरे झाले तेव्हा सूर्य विषुववृत्तांत कोणत्या ठिकाणीं होता ते लिहिले आहे, आणि त्यावरून कित्येक गणितज्ञ लोकांनीं असे अनुमान काढलें आहे कीं, ही गोष्ट इ० सनापूर्वी अकराशे एक्याशींवे वर्षी घडली

यावेळीं व्याकरणशास्त्र, शब्दव्युत्पत्तिशास्त्र, ध्वनिशास्त्र, छंद शास्त्र या शास्त्रांचाही अभ्यास करण्यांत येई नीतिशास्त्र आणि तर्कशास्त्र यांतही प्रगति झाली होती गणितशास्त्रही या कालीं चांगलेच ऊर्जितावस्थेप्रत आलेले होतें

वैदिक काळांत क्षत्रियांनीं पंजाबांत वसाहती केल्या भारतीय काळांत गंगा–यमुना कांठच्या प्रदेशांत वसाहती केल्या आणि पुढे हिमालयाच्या पायथ्यापासून आग्नेयीस समुद्रापर्यंतचा प्रदेश त्यांना ठाऊक झाला ते जेथे जेथे गेले तेथे तेथे त्यांनीं आपला धर्म, रीतिरिवाज, आचारविचार, व कलाकौशल्य यांची वृद्धि केली अंदाजानें इ० सनापूर्वी एक हजार वर्षांत ह्या गोष्टी पूर्णतेस आल्या होत्या

**८. छप्पन देशके राजा क्षत्रिय बहादूर**—अशा बहुमानदर्शक

पदवीने क्षत्रियांना त्यांचे भाट संबोधीत असत ही छप्पन देशांची घटना सुमारे एक हजार वर्षांपूर्वीची आहे बौद्धधर्माचा मोड होऊन हल्लींच्या रूढिप्रधान भिक्षुकी हिंदुधर्माचा उदय होऊ लागल्यानंतर जी नवीन राज्यघटना झाली, व नवीन धर्माच्या लाटेंत जीं जीं नवीन राज्ये उदयास आली, त्या निरनिराळ्या राज्यांस निरनिराळी स्वतंत्र नावें पडून हे छप्पन्न देश अस्तित्वात आले तत्कालीन रजपूत राजे आणि क्षत्रिय मराठे राजे या देशांवर राज्य करीत होते

पांडवांच्या चालत्या काळात म्हणजे आज सुमारे तीनहजार वर्षांच्या पूर्वी जीं राज्यें अस्तित्वांत होतीं त्यांचीं बरीच नांवे या छप्पन देशांच्या नांवाशीं मिळत आहेत त्याशिवाय काहीं निराळी अशीं हीं नावे आहेत असा फरक असणेही साहजिकच आहे, कारण त्या काळांत व हिंदुधर्माच्या जन्मकाळांत २००० वर्षाचें अंतर आहे पांडवाचे वेळीं म्हणजे भारतीयकाळीं हिंदुस्थानातील निरनिराळ्या विभागास कोणकोणतीं नावें चालू होतीं, हे या छप्पन देशाच्या यादीवरून काहींसे लक्षात येणार असल्यानें व त्या छप्पन देशाची माहिती असणे हे ऐतिहासिक दृष्ट्या प्रयुक्त असल्यानें आता त्या देशाचीं नावें देऊ

[१] कोसल, [२] कुरु, [३] पांचाल, [४] शूरसेन, [५] जांगल, [६] आर्यावर्त [७] यामुन, [८] माथुर, [९] मत्स्य, [१०] सारस्वत, [११] मरुधन्य, [१२] गुर्जर, [१३] आभीर, [१४] मागध, [१५] साविर, [१६] आर्नल, [१७] मलय [१८] विदर्भ, [१९] कीटक, [२०] कान्यकुब्ज, [२१] सुराष्ट्र, [२२] पांडुदेश, [२३] विदेह, [२४] कुशावर्त, [२५] कोंक, [२६] चेक, [२७] सिंधु, [२८] साराष्ट्र, [२९] मैथिल, [३०] कैकेय, [३१] द्विकटूक, [३२] शाल्व, [३३] कर्नाटक, [३४] अवत्य, [३५] निषध, [३६] पौंड्र, [३७] मद्र, [३८] वंग, [३९] अंग, [४०] कलिंग, [४१] कारूष, [४२] संजय, [४३] आंध्र, [४४] त्रिगर्त, [४५] द्रविड, [४६] मालव, [४७] केरल, [४८] कीकल, [४९] उशीर, [५०] कुंतल, [५१] कांबोज, [५२] भोज, [५३] कंक, [५४] मधु, [५५] महाराष्ट्र आणि [५६] आर्ण

ह्या छप्पन देशांवर राज्य करून १ सूर्यवंश, २ चंद्रवंश ऊर्फ सोमवंश, ३ शेषवंश ऊर्फ नागवंश आणि ४ ब्रह्मवंश ऊर्फ यदुवंश या चार वंशांत उत्पन्न झालेल्या ९६ कुळांच्या महाराष्ट्रीय-आर्य-**क्षत्रियांनी** सर्व भरतखंडाचे पालन केले महाराष्ट्र कुल वंशावलीमध्यें यास भरपूर आधारही आहे

**९. जुन्या देशांची नवीं नांवें**— आतां असलेल्या देशासच पूर्वी निराळ्याच नांवानें संबोधीत असत वर जीं छप्पन देशाची नावे दिली आहेत, त्यावरून ही गोष्ट कळून येईल हल्लींच्याच देशांना त्यावेळीं कोणतीं नांवे होतीं व त्यावेळच्याच देशाना हल्लीं कोणत्या नांवानीं संबोधितात याचेही ज्ञान ऐतिहासिक दृष्ट्या असणे अत्यंत आवश्यक असल्यामुळे अनेक देशांची पूर्वीचीं नांवे व आताचीं नांवें येथे अवतरित करावयाचीं आहेत त्यांवरून उपरिनिर्दिष्ट छप्पन देशांच्या नावाचा खुलासा तर होईलच, पण त्या-

शिवायही प्राचीन आणि ऐतिहासिक अशा ब-याच प्रदेशविभागांच्या नांवांची माहिती होईल पूर्वीच्या प्रदेशविभागांची बदललेलीं नामाभिधानें अशीं —

[१] अश्वक्रांत=युरोप, [२] रथक्रांत=आफ्रिका, [३] रमनक=आस्ट्रेलेशिया, [४] स्वर्णप्रस्थद्विप=पालिनेशिया, [५] आवर्तन=ब्रीटन, [६] इंद्रद्वीप=इंग्लंड, [७] भावकच्छ= पोर्तुगाल, [८] सैनिक, कुकुट=हॉलंड, बेल्जियम् [९] अश्वक=आस्ट्रिया, [१०] तामस देश=स्पेन, [११] विष्णुक्रांत=एशिया, [१२] स्वरसाभूमि=अमेरिका खंड, [१३] रोमांत=रूम, [१४] पातिदेश=इटली, [१५] क्रौंच=जर्मनी, [१६] मलिया=फ्रान्स, [१७] मारक=डेन्मार्क, [१८] माठक=स्कँडिनेव्हिया, [१९] तुरस्क=टर्की, [२०] शशिलिना=सिसिली, [२१] मिश्र=मिसर, [२२] बर्बर=बार्बरी, [२३] तिर्वर्त= तिबेट, [२४] खस=इराण, [२५] हौरब=सैबिरिया, [२५] आवर्त=अरब, [२७] पारस्य= पारसिक, [२८] शूद्र यवन=मक्का, [२९] अपरांत=मस्कत, [३०] केकय=हिरात, [३१] सुमित्राद्विप=सुमात्रा, [३२] स्कलावास=लंका, [३३] ब्रह्मोत्तर=ब्रह्मदेश, [३४] भारतवर्ष= हिंदुस्तान, [३५] कास्कार=मदिना, [३६] पल्हव=काबूल, [३७] गांधार=कंदाहार, [३८] मणिद्विप=जपान, [३९] शुर्मांशगदेश=सिंगापूर, [४०] मरु=मारवाड, [४१] स्थल=बिकानेर राज्य, [४२] दरद=भूतान, [४३] दरदलिंग=दार्जिलिंग, [४४] मत्स्यदेश=जयपूर, [४५] पंचनद= पंजाब, [४६] पांचाल=कानपूर, [४७] काम्मिर=काश्मिर, [४८] कोशल=अयोध्या, [४९] उत्तर कोशल=फैजाबाद, [५०] माथुर=मथुरा, [५१] वाराणसी=बनारस, [५२] कुरुजांगल= कुरुक्षेत्र, [५३] इंद्रप्रस्थ=दिल्ली, [५४] गंगाद्वार=बद्रिकाश्रम, [५५] माया=हरिद्वार, [५६] अवंति=उज्जनी, [५७] गुर्जर=गुजराथ, [५८] कांची=कर्नाटक, [५९] माहिर्षिक=म्हैसूर, [६०] किष्किंधा=तुंगभद्रेच्या कांठचा प्रांत, [६१] उत्कल=ओरिसा, [६२] सौराष्ट्र= सोमनाथ, अहमदाबाद [६३] महाराष्ट्र=पुणे प्रांत वगैरे प्रदेश, [६४] द्राविड=पूर्वघाट, [६५] कान्यकुब्ज=लखनौच्या आसमंतातील प्रदेश, [६६] पाटलिपुत्र=पाटणा, [६७] अंग=राजमहाल प्रांत, [६८] कर्णराज=भागलपूर प्रांत, [६९] पौंड्र=मेदिनीपूर, [७०] अवंग=मैमनसिंह प्रदेश, [७१] वंग=कलकत्त्याचा प्रदेश, [७२] गौड=ढाका प्रांत, [७३] प्राग्जोतिष=आसाम, [७४] कुमारद्विप=अमेरिका, [७५] दक्षिण कुमार=दक्षिण अमेरिका, [७६] उत्तर कुमार=उत्तर अमेरिका [७७] तलह=ब्राझिल, ताम्रद्विप=ग्रीनलंड

## १० कैलास, वैकुंठ, स्वर्ग, गंगा व अनेकमुखी देवांच्या कल्पना——

हिमालयाचें अत्यंत उच्च शिखर मौंट एव्हरेस्ट, ऊर्फ गौरीशंकर या नावाचें आहे ते पृथ्वीतील सर्व पर्वतापेक्षां उच्च आहे त्याची उंची समुद्राच्या पृष्ठभागापासून २९००० फूट आहे. दुसऱ्या श्रेणीचें उच्च शिखर काराकोरम पर्वत या नांवाचे आहे. त्याची उंची २८२५० फूट आहे. धवलगिरी २६८२५, नंगापर्वत २६६२९, व नंदादेवीची उंची २५६६१ फूट असून त्यांतील गंगोत्री नांवाच्या तीर्थांतून काशीची पवित्र गंगानदी निघाली आहे कैलास पर्वताच्या हिममय प्रदेशांतून गंगानदीचा मूळचा पाझर

सुरू झाला आहे म्हणून तिला स्वर्गगंगा म्हणतात नंदादेवी शिखराच्या जवळच **वैकुंठ** व **कैलासपर्वत** या नांवांचीं शिखरें आहेत त्यांची उंची समुद्रपृष्ठभागापासून अनुक्रमें २०२२६ आणि २१३९० फूट आहे विष्णूचें **वैकुंठ** आणि शंकराचें **कैलास** म्हणून जें वर्णन पुराणांतरी आहे, तीं हींच शिखरें होत पांडव राज्याअंतीं कैलासास ऊर्फ निजधामास गेले त्यांच्या मार्गाचे वर्णन जे महाभारतांत दिले आहे त्यावरून असें सिद्ध होते की, ते ज्या निजधामास गेले, ते निजधाम हिमालयातील वरील स्थळच होय. निजधाम म्हणजे आपले मूळचे स्थान–जन्मस्थान–वतनीस्थान पांडवांचे पूर्वज ज्या हिमालय पर्वतातून हिंदुस्तानात आले तेच त्यांचें निजधाम होय आता देखील धार्मिक लोक मरणसमयीं आपल्या मूळ भूमीस मोठ्या प्रेमानें जातात पर्वताच्या उतरणीमुळे कैलास पर्वताहून निघालेला गंगेचा प्रवाह फारच वेगाने वाहातो हरिद्वारास गंगेचे पात्रास भगीरथ राजाने फार विस्तीर्ण व रमणीय घाट बांधला आहे भगीरथाचे नांवावरून तिला भागीरथी म्हणतात हरिद्वार हिमालयाच्या पायथ्याशी आहे कैलास, वैकुंठ, बद्रिनारायण, ब्रह्मदेवाचा सत्यलोक इत्यादि पवित्र स्थळे हरिद्वारच्या उत्तरेस उंच पर्वतावर आहेत, म्हणून हरिद्वारच्या पलीकडील हिममय प्रदेशास देवभूमि ऊर्फ स्वर्गभूमि म्हणतात हरिहर म्हणजे शिव विष्णु ह्याच्या दर्शनास जाण्याचे जे महाद्वार ते हरिद्वार यावरून कैलास, वैकुंठ, ब्रह्मलोक, स्वर्ग, स्वर्गद्वार, स्वर्गगंगा इत्यादि स्वर्गीय सर्व स्थळे हिमालयांतच आहेत मेरुपर्वत म्हणजे पृथ्वींतील सर्वात मोठा पर्वत हिमालय पर्वत हाच पृथ्वीत सर्वात मोठा पर्वत आहे यावरून मेरुपर्वत म्हणजे हिमालय पर्वतच होय हरिद्वारच्या वरच्या प्रदेशाची हवा हिममय–अत्यंत थंड असल्यामुळे तिकडचे लोक फार गोरे आणि सुंदर आहेत तेथील सुंदर स्त्रियांना देवांगना, स्वर्गीच्या अप्सरा असें पुराणांत म्हटले आहे हरिद्वारच्या दक्षिणेची हवा समशीतोष्ण आहे म्हणून हरिद्वारच्या अलीकडचे लोक निमगोरे आहेत विंध्याद्रि पर्वताच्या दक्षिणेची हवा उष्ण आहे म्हणून तिकडचे लोक शरीरानें खुजे व सावळे असतात एकूण कैलास, वैकुंठ आणि स्वर्ग इत्यादि पुराणात सांगितलेलीं स्थले आकाशांत मिळणारीं नसून ती या पुण्यमय आर्यभूमीतच आहेत असें दिसून येतें

**अनेकमुखी देवांच्या कल्पना**—पुराणांतरी अनेकमुखी देवांचीं वर्णने दिलेलीं आहेत दत्तात्रयाला तीन तोंडे व सहा हात जोडून त्याला ब्रह्मा–विष्णु–महेश यांचा अवतार म्हणजे विश्व उत्पत्ति–स्थिति–लयकर्ता कल्पितात ब्रह्मदेवानें चार तोंडानी चार वेद रचिले असें खोटेंच भासविण्याकरितां त्याला चार तोंडे मानितात शंकराला पांच तोंडें व दहा हात कल्पिले आहेत कार्तिकस्वामीचे चित्र सहा तोंडांचें व बारा हातांचें दर्शवितात रावणानें ऋग्वेदाचीं दहा कांडे ( खंड ) केले अशी निराधार कविकल्पना जोडून त्याला दहा तोंडें व वीस हात लाविले आहेत खरें पाहिले असता ऋग्वेदाचीं दहा कांडें ऋषींनीं रचलीं आहेत त्यांचीं नांवे याच ग्रंथांत दुसऱ्या प्रकरणांत सप्रमाण दिलीं आहेत देवीला अष्टभुजा कल्पून तिला आठ हात चिकटवून तिचें अचाट

शौर्य दाखवितात श्रीविष्णु व श्रीकृष्ण यांना चार चार हात दाखवून त्यांचे देवपणास पुष्टि देऊ पाहातात ! सहस्रार्जुनास तर हजार हात दर्शवून त्याचें शौर्य दाखविलें आहे ! ! फार काय सांगावें, प. वा. बाळ गंगाधर टिळक यांना सर्वांनीं प्रत्यक्ष पाहिलेच आहे, पण ते निवर्तल्याबरोबर भिक्षुकांनीं प्रसिद्ध केलेले त्याचें **चतुर्भुज चित्र** ब्राह्मणी देव्हाऱ्यात आजही पाहावयास मिळतें ! ! या चतुर्भुज टिळकांचें कल्पित भागवत लिहून, ते श्रीकृष्णाचा अवतार म्हणून ब्राह्मणेतराच्या डोक्यावर बसविण्याचा त्यांचे भगतांनीं जिवतोड प्रयत्न केला, पण धर्मलंड (?) सत्यशोधक ब्राह्मणेतरांनीं एकच हुल्लड उडवून ऐन वेळीं घात केला ! या ब्राह्मणी टिळकानीं 'देशहिताचे' नावाखालीं अनेकदां चतुर्भुज होऊन कारागृहवास भोगला म्हणून तर मेल्यावर त्याना भिक्षुकानीं चतुर्भुज केलें नसेलना !

देवलोकीं गेलेल्या म्हणजे स्वर्गवासी झालेल्या थोर पुरुषाच्या अगीं इतरांपेक्षां कांहीं विशेष गुण-सामर्थ्य होतें म्हणून त्यांना साधारण मनुष्यापेक्षां जास्त तोंडें व जास्त हात लावून त्यांचें वैशिष्ट्य दर्शवावें हाच यांत मुख्य हेतु असतो माणसाचीं अशीं विचित्र वर्णनें म्हणजे रूपकात्मक केवळ कविकल्पनाच होत, पण साधारण बुद्धीच्या लोकांना यांतील सत्यार्थ कळत नाहीं, इतकेंच नव्हे तर पुराणांतील परस्परविरोधी व अशक्य विधानांनी उत्पन्न होणाऱ्या चिकित्सक बुद्धीवर पापाच्या डोंगराचें दडपण घालून किंवा त्या चिकित्सकांना त्यांच्या पितराच्या स्वर्गपतनाच्या भीतीचा बागुलबोवा दाखवून निर्बुद्धांच्या अंधश्रद्धेची जोपासना केली जात आहे हिंदु लोकातील चिकित्सक बुद्धि मारून या अंधश्रद्धेनेंच हिंदुसमाजाचें, हिंदुधर्माचें आणि अखिल हिंदुस्तानाचे अगदीं मातेरें केले आहे

खरें पाहिले असता वरील थोर विभूतीपैकी प्रत्येक पुरुषाला इतरांप्रमाणे एक एकच मुख व दोन दोनच हात होते याचे सप्रमाण पुरावे त्या त्या पुराणातच आहेत

**११. राक्षस-दस्यु**— ज्याप्रमाणें देवाच्या किंवा थोर विभूतीच्या गुण-सामर्थ्यांचीं अतिशयोक्तीची कल्पित कथानकें पुराणांतरीं दिलीं आहेत, त्याचप्रमाणें आर्यांचे शत्रु म्हणजेच हिंदुस्थानचे मूळचे रहिवासी—ज्याना वेदात दस्यु ऊर्फ राक्षस या नांवानें संबोधिले आहे, व जे आर्यांवर वारंवार हल्ले चढवून शत्रुत्वाच्या नात्यानें त्यांच्या यज्ञ-यागांचा विध्वंस करीत,—त्यांच्या भयंकर आकारांचीं, त्यांच्या भव्य शरीरांचीं आणि त्यांच्या पाशवी तोंडांचीही अशींच खोटी विचित्र वर्णनें पुराणांतरीं दिली आहेत व चित्रेंही तशीच भेसूर रेखाटलीं व चितारली आहेत

पेशावर आणि अफगाणिस्तान यांच्यामधील हिमालयाच्या डोंगराळ प्रदेशास **याकिस्तान** म्हणतात त्या मुलुखावर अद्याप कोणाचाच राजकीय अंमल बसलेला नाहीं. या भागांतील पठाण लोक फार भव्य शरीराचे, राक्षसी शक्तीचे, अत्यंत क्रूर स्वभावाचे असून ते आजही नरमांस भक्षक आहेत ते पठाण सरहद्दीवरील लोकांवर वारंवार हल्ले करून सांपडतील त्या स्त्री पुरुषांना धरून नेऊन हालहाल करून ठार

मारतात. मनुष्याचे दोन्ही पाय धरून त्याला झटक्यासरसें लीलेनें चिरून टाकतात ! या लोकांना आधुनिक राक्षस म्हणण्यास कोणती हरकत आहे ? अशांचा क्रूरपणा दर्शविण्याकरितां या लोकांना सिंहाचें तोंड, वीतभर दांत आणि हातभर जीभ दाखविली, तर ती गोष्ट आज कोणीतरी कबूल करील काय ? वरील विवेचनावरून पुराणांतील व्यक्तींचीं अनेक तोंडे व पुष्कळ हात आणि राक्षसी भेसूरपणातील फोलपणा यांचीं खरीं कारणें कळून येतील



# प्रकरण आठवें
# भारतीय कालीन क्षत्रिय पांडवांचा दिग्विजय

[ इसवी सनापूर्वी सुमारें ११००–१२०० वर्षांचा काळ ]



**१. पूर्ववृत्तान्त**—चंद्रवंशी क्षत्रिय हिमालयाच्या पलीकडून गंगेच्या खोऱ्यानें हिंदुस्तानांत उतरले त्यांच्या मूळ प्रदेशास उत्तरकुरु व ईलावर्ष अशीं नांवें होतीं या चंद्रवंशांतील सुप्रसिद्ध अशा विचित्रवीर्य नामक राजास दोन पुत्र झाले त्यांचीं नांवें अनुक्रमें धृतराष्ट्र व पंडु अशीं होतीं तिसरा एक दासीपुत्र असून त्यास विदूर या नांवानें संबोधीत असत धृतराष्ट्र हा आंधळा असून पंडु हा पंडुरोगानें ग्रसित झालेला होता. ह्या दोघांच्याही तर्फे भीष्माचार्य सर्व राज्यव्यवस्था पाहात असे पंडूच्या निधनानंतर कुंती आपल्या पांच मुलांसह कुरूंची मूलभूमि सोडून हस्तिनापुरास धृतराष्ट्राकडे राहावयास गेली होती धृतराष्ट्रानें पांच पांडवांना यमुनेच्या पश्चिम तीरावरील प्रदेश वांटून दिला होता त्या वेळी तो प्रदेश अरण्यमय असा होता पांडवांच्या ताब्यांत तो प्रदेश आल्या-नंतर त्यांनीं ते अरण्य वगैरे तोडून व जाळून तो प्रदेश रम्य असा बनविला आणि त्या प्रदेशात नगरांची रचना केली त्या प्रदेशांत अनेक नगरें निर्माण करून इंद्रप्रस्थ नामक नगरांत म्हणजे ज्याला सध्यां दिल्ली हे नांव आहे त्या नगरांत पांडवांनीं आपली राजधानी प्रस्थापित केली याप्रमाणें व्यवस्था करून पांचही पांडव आनंदानें नांदू लागले होते बारावर्षे वनवास व एकवर्ष अज्ञातवास भोगून आल्यानंतर कौरवांशीं भारतयुद्ध करून त्यानी आपले राज्य परत मिळविलें आणि उत्तरोत्तर पांचही पांडवांनीं आपल्या पराक्रमाचे जोरावर उत्तमप्रकारें राज्यव्यवस्था चालविली व पुढें मयासुराच्या साहाय्यानें एका विस्तृत सभेची स्थापना केली त्यांच्या मनांत राजसूययज्ञ करण्याची महत्त्वाकांक्षा पूर्वीपासून वास करीत होती ती पूर्ण करण्याप्रीत्यर्थ त्यांनीं श्रीकृष्णाची संमति घेतली. व त्याचेकडून मदतही मिळविली राजसूययज्ञासंबंधीं संमति देतांना श्रीकृष्णानें अशा तऱ्हेची संमति दिली कीं, 'राजसूययज्ञप्रसंगीं ज्या अडचणी येणार आहेत त्यांचें निवारण प्रथम झालें पाहिजे'.

धर्मराजास श्रीकृष्णाने अशी समति दिली व त्याबरोबरच प्रथमतः जरासध राजा व त्याची राजसत्ता याचा नायनाट केला पाहिजे असेंही त्यानें धर्मराजास सांगून ठेविलें.

जरासध हा महान् पराक्रमी राजा असून त्याची राज्यसत्ताही बऱ्याच विभागावर चालत होती या जरासधाचे मतानें चेदि देशाचा राजा शिशुपाल, करुष देशाचा राजा दंतवक्र, मुरू व नरक या देशावरील यवन अधिपति व प्राग्जोतिषाचा राजा भगदत्त वगैरे महान् पराक्रमी राजे वागत असत. आणि म्हणूनच जरासधाच्या राज्यसत्तेचा नायनाट झाल्याशिवाय राजसूययज्ञ पार पडणे मुष्किलीचे होऊन बसेल असा सल्ला श्रीकृष्णानें पाडवांना दिला अर्जुनास ही गोष्ट पसत पडून त्याने आपलें अनुमोदन श्रीकृष्णाच्या या योजनेस दिलें धर्मराजानेंही या योजनेस रुकार दिला

याप्रमाणे त्याच्या बैठकींत विचार योजना ठरल्यानतर त्या योजनेची अमलबजावणी करण्याचीच काय ती व्यवस्था राहिली होती तीही अमलात येऊन श्रीकृष्ण, अर्जुन व भीम या तीन क्षत्रियवीरानीं जरासधाच्या गिरिव्रज शहरावर चाल केली भीमानें मर्दपणाने छाती पुढे करून जरासधाशीं सामना दिला व मल्लयुद्धात त्याला ठार करून त्यानें बदींत टाकलेल्या सर्व राजेलोकास मुक्त केले.जरासधाचा—एवढ्या महान् पराक्रमी योद्धयाचा—श्रीकृष्ण, भीम, अर्जुन या क्षत्रियवीरानी नि पात केल्यामुळे जरासधाचे जे साथीदार शिशुपाल, दतवक्र, भीष्मक, पौंड्रक, वासुदेव वगैरे राजे होते त्याचा धीर साहजिकच खचून गेला आणि याच्या तेजापुढें ते दिपून गेले याच्यावर चढाई करून आपण विजय श्री सपादन करू अशी आशा त्याना मुळीच उरली नाही आणि त्या योगानेंच पुढें पांडवांना राजसूययज्ञास सुलभ पडले

जरासधाच्या वधानतर एवढ्या मोठ्या राजसूययज्ञास जे द्रव्यबळ लागणार ते कोठून प्राप्त होईल या विचारांत सर्व पडले असताना श्रीकृष्णाने एक खासगी बैठक भरवून या गोष्टीचा निकाल करून टाकण्याबद्दल सुचविलें त्याप्रमाणे श्रीकृष्णाच्याच अध्यक्षतेखालीं त्यांच्या मत्रिजनांची एक सभा बोलावण्यात आली त्या सभेंत बराच उहापोह झाल्यानंतर अखेर सर्वानुमतें असे ठरले गेले कीं, पाडवानी निरनिराळ्या प्रदेशावर स्वाऱ्या करून राजसूययज्ञाकारिता लागणारी आर्थिक अडचण दूर करण्याचा प्रयत्न करावा हा ठराव बहुमतानें पास झाल्यानतर कोणी कोण्या भागाकडे स्वारी करावी हा प्रश्न पुन्हा पुढें आला तेव्हा त्याचें निरसन अशा रीतीनें करण्यांत आले कीं, उत्तर दिशेला मोठमोठे पर्वत असून त्या विभागांत महान् प्रतापि असे शूरवीर राजे, यवन ( चंद्रवशी यवनाश्वराजाचे वशज ) म्लेच्छादि बलिष्ठ राजे राज्य करीत असल्यामुळें अर्जुनानें त्या विभागाकडे आपला मोर्चा फिरवावा उत्तर दिशेकडे मोठमोठी अरण्यें व विस्तीर्ण पात्रांच्या नद्या ओलांडावयाच्या असल्यामुळें अर्थातच अर्जुनाच्या स्वारीबरोबर रथ व हत्ती यांचा भरपूर भरणा होता

पूर्व दिशा जिंकण्याचें कामही उत्तर दिशा जिंकण्याच्या कामाइतकेंच कठिण व धाडसाचें काम होतें तिकडे भीमानें स्वारी करावी असें बहुमतानें ठरलें गेले पूर्वे-

कडील अनेक देशांमध्यें,विशेषेंकरून प्रयागापासून गंगासागर संगमापर्यंत गंगेच्या दोन्ही तीरां-वरील लोकांना मल्लविद्येचा अत्यंत नाद होता भीमाला करभार गोळा करण्यासाठीं किरात, चीन, म्लेंच्छादि योद्ध्याबरोबर झगडावें लागणार होतें !

पश्चिम दिशेस नकुळानें स्वारी करावी असें बहुमतानें ठरलें या दिशेस पांडवांचे आप्त व इष्टमित्र अशाच नात्याचे बहुतेक राजे राज्य करीत होते अर्थातच ती दिशा जिंकण्याचें नकुळास बरेंच सुलभ जाणार होतें आणि म्हणूनच पश्चिम दिशेस नकुलानें जावें असें ठरलें

दक्षिणेस युद्धविद्या पोंचावी तशी उन्नतावस्थेस पोंचल्यामुळें सहदेवानें दक्षिणेस जावें असें ठरले या दिशेस महिमतीच्या बळीराजाव्यतिरिक्त सहदेवास अडथळा करण्यासारखा इतर कोणताही मोठा पराक्रमी राजा नव्हता आणि म्हणूनच दक्षिण दिशेस सहदेवाची योजना करण्यात आली

धर्मराजाने आपणाकडे कोणतें काम घ्यावें असा प्रश्न उद्भवला असतां बहुमतानें असें ठरले गेलें की, बाहेरदेशीं पाठविलेल्या सैनिकांना वेळोवेळीं कुमक पाठविणे, राज-धानीचें संरक्षण करणें, आपल्या भावाकडून वरचेवर येईल त्या करभाराची जतन करणे, राजसूय यज्ञाची सामुग्री जमा करणे व राजसूययज्ञप्रसंगीं येणाऱ्या परदेशस्थ पाहुण्याची व राजे लोकाची व्यवस्था करणें इत्यादि कामें धर्मराजानें करावींत

याप्रमाणे सर्व प्रश्नाचा निकाल लागल्यावर ज्या ज्या दिशेकडे ज्याची ज्यांची योजना करण्यात आली होती त्याची त्यांची सर्व व्यवस्थेसहित तयारी करून देण्यांत आली सर्वांबरोबर चतुरंगसेना, म्हणजे रथ, हत्ती, घोडे व पायदळ हे सैन्य दिले गेले आणि त्याशिवाय विष्टि म्हणजे सैन्याच्या वाहतुकीस साहाय्य करणारे लोक व सामानाच्या गाड्या, नाविक लोक, गुप्त हेर व देशिक याचाही भरणा सर्वांबरोबर भरपूर दिला गेला होता सैन्यात 'देशिक सैन्य' म्हणून सैन्याचा एक प्रकार असे या 'देशिक' शब्दाचा खुलासा असा की, भारतकालीं कांहीं विशिष्ट बुद्धिमत्तेचे लोक आजूबाजूच्या प्रदेशांत जाऊन निरनिराळ्या कला व कुशलता याचें संपादन करीत असत ज्या वेळी हे लोक निरनिराळ्या देशात जात तेव्हां अर्थातच त्या देशासंबधीं अनेक दिवसांच्या सहवासामुळें त्याना बरीच सूक्ष्म माहिती मिळत असे आणि असे हे आसमंतांतील देशासंबधींची माहिती असणारे लोक युद्धप्रसंगीं आपल्या मूळ प्रदेशाच्या राजास मदत देत असत आणि या मदतीपासून राजास बराच फायदा मिळत असे अखेर स्वदेशाच्या राजासच मदत करण्याचा या लोकांचा धर्म असल्यामुळे त्यांस देशिक असें म्हणत असत.

याप्रमाणे सर्व सैन्य वगैरे बरोबर जमल्यावर सर्वांची तयारी करून देण्यांत आली. या स्वाऱ्यांमध्यें दुसऱ्या राज्यांचा अपहार करण्याचा उद्देश मुळींच नव्हता या स्वाऱ्या-च्या वेळीं खंडणी व करभार वसूल करणें, राजांचा पराभव करणें, आणि धर्मराजाचें आधिपत्य कबूल करवून घेणें याशिवाय दुसरी कोणतीही आगळीक करण्याचे फंदांत पांडव पडले नाहींत शक्य तोंपर्यंत त्यांनी सामाचाच उपयोग करून पाहिला. होता

होईलतों रक्तपात टाळण्याचीच त्यांची मनोभावना होती त्यांचें बहुतेक कर्तव्य मल्लयुद्धानेच पार पाडून घेण्याचे त्यांनीं ठरविलें होतें कोठें कोठें कुटिल नीतीचाही उपयोग करण्यास कमी केलें नाहीं आणि हें सर्व रक्तपात होऊ नये या एकाच कारणा-करतां होतें

धर्मराजाची आज्ञा घेऊन अर्जुन, भीम, नकुल आणि सहदेव हे आपापल्या सैन्या-सह जय्यत तयार झाले धर्मराजाच्या पायावर सर्वांनी मस्तक ठेवून त्याचा आशीर्वाद मागितला, तद्वतच तत्पूर्वी ईश्वराचे ध्यान करून त्यानी आपला आत्मविश्वास बळकट केला आणि अशा तऱ्हेनें युद्धकलाविशारद असे ते क्षत्रिय पांडव आपल्या ठिकाणा-वरून आपापल्या नियोजित दिशेकडे कूच करते झाले

**२. अर्जुनाचा दिग्विजय**—अर्जुनाने इंद्रप्रस्थ सोडल्यानतर प्रथम कुलिंद देशातील राजे हस्तगत करून घेतले कुलिंद देश म्हणजे दिल्लीच्या उत्तरेस असलेला सहारणपूर जिल्हा होय नतर त्यानें आनर्त व कालकूट हे देश काबीज केले हे देश कुलिंद सोडल्यावर सतलज नदीच्या तीरावर ईशान्य दिशेने जातांना त्यास वाटेंत लागले तदनतर सुमडल राजाचा पूर्ण पराभव करून त्यास बरोबर घेऊन शाकलद्वीप व प्रतिविंध्य यांच्यावर स्वारी केली शाकलद्वीप व सप्तद्वीपांतील राजांबरोबर अर्जुनाचा घोर सग्राम झाला त्यानाही अर्जुनानें पादाक्रांत केले आणि त्याच्यासह प्राग्जोतिषाचा राजा भगदत्त याच्यावर स्वारी केली भगदत्ताच्या अमलाखालीं किरात, चीन आणि दुसरे पुष्कळ सागरतीरवासी योद्धे होते मद्रदेशाची राजधानी शाकलनगरी यावरून शाकलद्वीप हे नाव पडले अर्थातच या द्वीपावर मद्रदेशाच्या राजाचा अधिकार चालत होता सिंधुनदी मानस सरोवराच्या उत्तरेस उगम पावून उत्तराभिमुखी होऊन कालकूट देशाला वळसा घालून पश्चिमेकडे वळते तेव्हां कालकूट व सिंधूच्या पलीकडे असलेल्या पर्वताच्या पलीकडे शाकलद्वीपें होती व त्यांच्या पूर्वेस व दक्षिणेस प्रतिविंध्य राजाचा प्रदेश व सप्तद्वीपें असावीं अशी धारणा बांधल्यास त्यात बरेंच स्वारस्य येण्याचा सभव आहे या सर्व प्रदेशांना द्वीपे म्हणण्याचे कारण काय असावें हा महत्त्वाचा प्रश्न उद्भवतो सिंधुनद ओलांडून मानस सरोवराच्या ईशान्येस गेल्यानतर शभर दीडशे मैलांच्या पलीकडे ३० अक्षांशापासून जवळजवळ ३७ अक्षांशापर्यंत व ८५ रेखांशापासून सुमारें ९० रेखांशापर्यंत उत्तरेस रागला पर्वत व दक्षिणेस ल्हासाच्या उत्तरेकडील पर्वतांच्या रांगाच्या दरम्यान बराच मोठा जलप्रदेश असावा व त्या प्रदेशासच अश्वान्वेषासाठीं गेलेल्या सागरपुत्रावरूनच सागर असें नांव पडलें असावें म्हणून सागरानुपवासी हे योद्धे या समुद्राच्या पश्चिम किनाऱ्यावरील रहिवासी असावेत तिबेटच्या नकाशांत पाहिलें असतां हल्लीं देखील फार मोठीं सरोवरें जागजागीं उपरिनिर्दिष्ट केलेल्या प्रदेशांत आढळून येतात

भगदत्ताच्या सैन्याबरोबर अर्जुनानें मोठया वीरश्रीनें सतत आठ दिवस युद्ध केलें त्याचा पराक्रम पाहून भगदत्त प्रसन्न झाला व अर्जुनास 'काय इच्छा आहे?' असा त्यानें

प्रश्न केला भगदत्तास अर्जुनानें राजसूय यज्ञासाठीं करभार पाहिजे असें सांगतांच आदर-पूर्वक रीतीनें भगदत्तानें अर्जुनास भरपूर करभार अर्पण केला भगदत्ताचें राज्य मानस सरोवराच्या उत्तरेस हिमालयाच्या उत्तरेकडील पायथ्यावर ब्रह्मपुत्रेच्या उत्तरेकडे पसर-लेला अफाट प्राग्जोतिष देश होय

याप्रमाणें भगदत्तास आधीन करून घेतल्यानंतर कुंतीपुत्र धनंजय प्राग्जोतिष देशांतून उत्तरेकडे कुबेर देशांत प्रवेश करिता झाला मानस सरोवराच्या उत्तरेस Gangri and Darchin यांच्या पलीकडे कैलास पर्वत आहे या पर्वताच्या दक्षिणेकडील बाजूस कुबेर प्रदेश पसरलेला होता अतर्गिरि, बहिर्गिरि व उपगिरि हीं प्रदेशाचीं नांवें सिंधुनदीच्या प्रवाहापासून पर्वतांच्या रांगाच्या समीप व दूर स्थितीशीं अनुलक्षून वर्णन केलेलीं आहेत या देशांतील व बाकी सर्व प्रदेशांतील डोंगरांच्या सान्निध्या-नें राहाणाऱ्या राजाना हस्तगत करून व खंडणी वसूल करून अर्जुन उलूक देशाच्या बृहन्त राजावर चाल करून गेला त्या राजाने अर्जुनाशीं भयंकर सग्राम केला परंतु अखेर पराजय पदरीं पडल्यामुळे तो अर्जुनास शरण गेला व त्यानें करभारही दिला हा उलूक देश कुलूत अथवा कुलू होय हा कुलूत प्रदेश जालंदराच्या उत्तरेस बियास नदी-च्या खिंडीतील प्रदेश होय हा प्रदेश Cangra Vally या नांवानें प्रसिद्ध असून तेथूनच उत्तम चहाची निपज होते या दरींत सोनें व रुपें सांपडतें असें ह्यूएनसॅगानें आपल्या प्रवासवर्णनांत लिहून ठेविले आहे याचप्रमाणे श बा दीक्षित व इतर अनेक विद्वानाची मते आहेत

बृहन्तराजास बरोबर घेऊन अर्जुनानें सेनाबिंदूवर स्वारी केली व त्याचा पराभव करून त्याला नामोहरम केले मोहापूर, वामदेव, सुदामा व उत्तर उलूक या देशांच्या राजांना एके ठिकाणीं बोलावून त्यांच्याकडून धर्मराजाचें आधिपत्य कबूल करवून करभार वसूल केला व अर्जुन सेनाबिंदूचे राजधानींतच राहिला तेथें तो असतांना धर्मराजाचें आज्ञापत्र आल्यावरून एका हुषार सेनापतीच्या आधिपत्याखालीं सैन्य पाठवून पचगण-देश जिंकिला नंतर पचगणदेशाच्या राजांना बरोबर घेऊन सेनाबिंदूच्या देवप्रस्थ नामक राजधानीकडे अर्जुन वळला मोहापूर या ठिकाणाविषयीं श्री० दीक्षितानीं पश्चिम रोहिल-खडांतील मतिपूरल किंवा मदावर असावे अशी कल्पना नमूद केली असून ती चूक आहे असें वरील वर्णनावरून दिसून येईल मोहापूर, वामदेव आणि सुदामा हे तीनही प्रांत आज आम्हांस निश्चित प्रकारें सांगतां येत नाहींत तथापि, ते Cangra खिंडीच्या वायव्य बाजूस रावी आणि बियास यांमधील दुआब व रावी आणि चद्रभागा (चिनाब) या दुआबा-मधील अत्यंत सुपीक प्रदेश असले पाहिजेत यांत संशय नाहीं सेनाबिंदू राजाचें राज्य चंद्रभागा नदीच्या दोनही तीरांवर पूर्वपश्चिम किस्तवार शहरापासून गुजराथ शहरापर्यंत पसरलेले असावे, आणि त्याची देवप्रस्थ नामक राजधानी चंद्रभागा नदीच्या तीरावरील किस्तवार अगर जम्मू या दोहोंपैकीं एक असावी असें वाटतें विशेषें-करून डॅा० अविनाशचंद्र बोस यांच्या 'ऋग्वेदिक इंडिया' मधील पजाबविषयीं दिलेल्या

माहितीवरून व देवप्रस्थ या नांवावरून या दोन शहरांमध्यें चतुरंग दलासह अर्जुनानें कांहीं काळ विश्रांति घेतली असावी असें वाटतें. अर्जुनानें व भीमानें मध्येंच विश्रांति घेण्याचें कारण पावसाळ्यानें नदीनाले ओलांडण्यास मार्ग न सांपडणे हेंच असावें उत्तर उलूक हा प्रदेश हल्लींचें चपा हें संस्थान असावें पचगण देश ही लहान सस्थानें चंद्र-भागेच्या उगमापासून किस्तवार शहरापर्यंत चद्रभागेच्या उत्तर तीरावरील पर्वतावरील उतरणीचा प्रदेश होय

पचगणातील शूर योद्ध्यांना बरोबर घेऊन अर्जुनानें पौरव कुलातील विश्वगश्व राजावर स्वारी केली त्याच्या हाताखालील महायोद्धयाना युद्धात जिंकून विश्वगश्व राजाची राजधानी पाडवाच्या हस्तगत झाली हा प्रदेश हल्लींचा रक्षु प्रांत होय

रक्षु प्रांताजवळ सिंधुनदीच्या तीरावर मोरीरी सरोवराच्या आसपास उत्सवसकेत नावाचीं सात प्रजासत्ताक राज्यें होतीं तेथेंच दक्षिणेकडील पर्वतांत दस्यु राहात होते त्या सर्वांना अर्जुनानें जिकलें विश्वगश्वाची राजधानी ही हल्लींची गया असावी अगर पदम् असावी विशेषेकरून पदम् हें शहर प्राचीनतम असल्यामुळे तीच विश्वगश्वाची राजधानी असणे सभवनीय वाटतें

तदनतर अर्जुन काश्मिराकडे वळला व त्या प्रांतात त्याच्याशी युद्धास आलेल्या वीरास पादाक्रात करून त्याने लोहित देशाच्या राजास त्याच्या दहा माडलिकांसह जिंकून घेतलें लोहित प्रदेश व दहा माडलिक राजांचे राज्य ( हल्लींच्या स्कार्डो शहरापासून लेह शहरापर्यंत ) सिंधूच्या दोन्ही तीरावरील प्रदेश होय या प्रदेशास हल्लीं लढक व बालति-स्तान असें म्हणतात लोहित प्रांतात असतांना अर्जुनास त्रिगर्त, दार्व्ह आणि कोकनद या समृद्ध राष्ट्रांतील वीरानीं विपुल करभार आणून दिला त्रिगर्त हा पामीरजवळचा प्रदेश होय या प्रदेशास तीनही बाजूनी अमुदारिया किंवा आक्सस नदीनें वेढलेलें आहे दार्व्ह प्रांत प्रसिद्धच आहे त्याला Darwaz असें म्हणतात कोकनद हा प्रदेश सरदा रिया नदीच्या उत्तर तीरावरील Kokan खोखद हा प्रांत होय

तदनतर अर्जुनाने रमणीय अशी अभिसरी नगरी जिंकून उरगवासि रोचसान राजाचा पाडाव केला मग चित्रायुध राजाच्या अमलाखालील सिंहपूर नांवाचें रमणीय नगर उध्वस्त करून टाकलें अभिसारी नगरी अलेक्झांडरच्या स्वारीचे वेळीं सुप्रसिद्ध होती व तिला Abisaris असें म्हणत असत ही नगरी हजारा प्रांतात होती उरगा म्हणजे उरसा असें प्राचीन भूगोलकारांचे मत आहे हें नगर झेलम नदीच्या उत्तर तीरावर मुझफराबाद नगराजवळ असावें तेथून सिंहपूर खालीं दक्षिणेस मिठाच्या डोंगराच्या उत्तर पायथ्यावर पिंडिदादतखानपासून सोळा मैलांवर असलेलें कटास किंवा कटाक्ष हें नगर होय

अर्जुनानें पुढें सुह्मव, चित्राव ऊर्फ चोल या प्रांतावर स्वारी केली येथील लोक कडवे असल्यामुळें अर्जुनास आपले सैन्य त्यांच्यावर घालावें लागलें. तेथील पुढाऱ्यांस पराजित करून पुढें अर्जुन बाल्हिक देशांत शिरला बाल्हिक हा देश हल्लींचा Balkh देश होय

या बाल्हिक देशांत भयंकर रणसंग्राम माजून मोठा संहार झाला. अखेर अर्जुनानें सर्व राजांस जेरीस आणलें. आपल्या सैन्यापैकीं निवडक योद्धे बरोबर घेऊन कांबोज व दरद प्रांतावर तो चाल करून गेला व तेथील राजांना पराभूत करून त्यांना हस्तगत करून घेतलें. कांबोज हा हिंदुकुश पर्वताच्या दक्षिण पायथ्यावरील डोंगराळ प्रदेश होय, व दरद हा प्रदेश अलेक्झांडरच्या स्वारीचे वेळीं प्रसिद्ध होता. त्याला Dardoe असे म्हणत असत. दरद हा हल्लींचा Frontier tribes ऊर्फ डोंगराळ प्रदेश होय. दरदांतून ईशान्येस मोर्चा फिरवून यासिन शहराजवळील जंगलांत राहणाऱ्या चोरट्या लोकांचा अर्जुनाने पराभव केला. मग लोह्‌ किंवा अफगाणिस्तान हा देश त्यानें जिंकला. मि० फेरारी या भूगर्भशास्त्रज्ञ पंडितानें नुकतीच अफगाणिस्तानची पहाणी करून या देशांत इतर धातूंबरोबर लोखंड पुष्कळ सांपडण्याचा संभव आहे, असा शोध लावला आहे. यावरून 'लोह्' म्हणजे अफगाणिस्तान हा न्यायमूर्ति नंदलाल यांचा शोध बरोबर ठरतो.

लोहदेश जिंकल्यावर अर्जुनाने परमकांबोज व उत्तर ऋषीक या देशावर हल्ला केला. ऋषीक देशांत आसपासच्या बऱ्याच राजांस एकत्र जमवून तेथील राजा अर्जुनास युद्धास पाचारण करू लागला. तेव्हा त्या दोन पक्षांत भयंकर संग्राम झाला. परमकांबोज हा देश बालतिस्तानामध्ये सिंधूस मिळणाऱ्या शायोक नदीच्या पूर्वेकडील बाजूस असलेला हल्लींचा Nubra हा प्रांत होय. तेथील रानटी लोक अद्याप आपणास कांबोज टोळी म्हणवून घेतात. उत्तर ऋषिक हा प्रदेश त्याच्या लगतच दक्षिणेस असावा. या उत्तर ऋषिक प्रांतातच पंचमसरोवर आहे. तेथून अर्जुनाने पुढे जाऊन ऋषिकाच्या दक्षिणेकडे असलेल्या निष्कुट पर्वतावरील अनार्य लोकांचा पराभव केला. नंतर तेथून तो श्वेत पर्वतावर गेला. या पर्वताचे उल्लंघन करून त्याने किम्पुरुषवासच्या द्रुमपुत्रावर स्वारी केली. त्याजबरोबर झालेल्या युद्धांत अर्जुनाकडीलही कांही वीर पडले. तरीपण अखेरीस द्रुमपुत्रास जिंकून अर्जुन हाटक देशावर चाल करून गेला. हा गुह्यकांचा देश होय. पुढे मानस सरोवरास जाऊन ऋषींनीं मुद्दाम कालवे काढून वसाहतीस लायक असा जो प्रदेश बनविला होता, तेथील ऋषींचे दर्शन घेतलें. निष्कुट पर्वत हे दोन्ही कैलास पर्वताच्या जवळील हिमालयाचे फांटे होत. हाटक हा मानस सरोवराच्या आसपासचा बहुधा उत्तरेकडील प्रदेश असावा. या देशाजवळील गंधर्वरक्षित प्रदेश जिंकून तेथून हा दिग्विजयी वीर हरिवर्षांत शिरला. त्या देशाच्या राजधानीजवळ गेल्यावर तेथील भव्य द्वारपालांनीं त्याची निर्भर्त्सना केली. पण पुढें तेथील राजाने त्यास भरपूर करभार आनंदानें दिला. हरिवर्ष व त्यांतील उत्तरकुरु म्हणजे Kuen Luen पर्वताच्या दक्षिण पायथ्याचा प्रदेश असावा. तेथून अर्जुनास नेमलेली कामगिरी संपल्यामुळें इंद्रप्रस्थास नेमलेल्या वेळीं येण्यासाठीं त्याने आपल्या सैन्यास तसा हुकूम केला आणि याप्रमाणें अर्जुन हा क्षत्रिय वीर अनेक योद्ध्यांना पराभूत करून आपल्या निवासस्थानाकडे निघाला.

**३. भीमाचा दिग्विजय**—चतुरंग सेनेनिशीं भीम हा पूर्वेकडे करभार वसूल करण्यास निघाला असतां तो प्रथम पांचाल राजाच्या विस्तीर्ण अशा अहि

च्छत्र नामक राजधानीस गेला अहिच्छत्र म्हणजे बरेलीच्या पश्चिमेस वीस मैलांवर असलेलें रोमनगर होय अमलपूरकोट व नसरतगज या प्रदेशांत असलेल्या किल्ल्यास हल्ली देखील अहिच्छत्रगड म्हणतात या किल्ल्याचे हल्ली बत्तीस बुरूज शिल्लक आहेत ह्यूएनत्संगच्या प्रवासवर्णनांत या शहराचे बरेंच वर्णन दिलें आहे तेथून पुढे थोड्याच काळांत भीमाने गडकीच्या तीरावरील गंडक देश व त्याच्या पलीकडील विदेह देश हे देश जिंकले नतर तेथून दक्षिणेकडे जाऊन दशार्ण देशाच्या सुधर्मा राजास भीमान पादाक्रांत केले त्याला भीमाने बरोबर घेतलें दशार्ण देश धासन नदीच्या तीरावरील यमुनेच्या दक्षिणेकडील प्रदेश होय भीम दशार्ण देशास येण्यापूर्वी गडक व विदेह या उत्तरेकडील दूरच्या प्रदेशांत होता तेथून तो एकदम दक्षिणेकडे आला ही सकृद्दर्शनीं बरीच आश्चर्यकारक गोष्ट वाटते. परतु, सुधर्मा राजास आपल्या बाहुबलाची मोठी घमेंड असल्यामुळे भीमसेनास त्यानें मल्लयुद्धास आव्हान केलें होतें म्हणून भीम आपल्या वीरासमवेत दशार्ण देशास प्रथम गेला होता तेथें त्याला करभारही बराच मिळाला

दशार्ण देशातून भीम पूर्वेकडे वळला व अश्वमेध देशाच्या रोचमान राजास जिंकून तत्समीप असलेले दुसरे अनेक राजे भीमानें जिंकून घेतले दशार्ण देशाची राजधानी विदिशा होती याला हल्ली भिलसा असे म्हणतात दक्षिण दिशेकडे पुलिंद देश असून तेथील सुकुमार राजाला भीमाने तदनतर सहज वश करून घेतले

युधिष्ठिराचे आज्ञेप्रमाणे महाबलाढ्य चेदिराज शिशुपालावर भीमाने तदनतर स्वारी केली परतु भीमाबरोबर त्याने युद्ध न करता प्रेमानेच भीमास करभार दिला धर्म राजाचे अधिराज्यही प्रेमानेच कबूल केले भीमान चेदि राजधानींत तेरा दिवस मुक्काम केला होता

अश्वमेध देश गगानदीच्या दक्षिण तीरावर प्रयागच्या आजूबाजूच्या शक्तिमान् पर्वताजवळील प्रदेश असावा अश्वमेधच्या राजास जिकल्यावर त्याच्या पूर्वेकडील देश जिकून दक्षिणेकडे वळून भीम पुलिंद देशाकडे गेला पुलिंद देश बुदेलखडांतील पश्चिमभाग व सागर जिल्हा होय शिशुपालाच्या चेदि देशाच्या राजधानीसबधी विद्वानांत मतभेद आहे कर्नल टॉडसाहेबाच्या मतें माळव्यांतील चदेरीगाव हीच शिशुपालाची राजधानी असावी कांहीच्या मते बुदेलखडाच्या दक्षिणेकडील जबलपूरच्या उत्तरेकडील भाग मिळून चेदिदेश होय या प्रांतात रेवा सस्थानही येतें चेदीला प्राचीनकाळीं त्रिपूरही म्हणत असत त्रिपूरनगर म्हणजे जबलपूरपासून सहा मैलावर असलेले तेऊर हे खेडें असावे असें एकमत आहे, परतु सहदेवाच्या दक्षिण दिग्विजयात पुलिंद देश व त्रिपुर देश म्हणजे तेऊर जवळचा प्रदेश सहदेवानें जिंकला असें वर्णन आहे त्यावरून पाहाता पाडवां-च्या वेळीं शिशुपालाची राजधानी तेऊर नसावी

चेदिदेश जिकल्यावर कुमार देशाच्या श्रेणिमान् राजास आणि कोसल देशाच्या बृहद्बल राजास जिंकून भीम अयोध्येस आला याच बृहद्बल राजास भारतीय युद्धांत अभिमन्यूने पुढे ठार केलें त्याचे अमलाखालीं असलेला प्रदेश दक्षिणकोशल होय दक्षिण

कोशल हा शरयू नदीच्या तीरावरील गोमती नदीच्या तीरापर्यंतचा प्रदेश होय. कुमार देश हा बहुधा गगानदीच्या उत्तर तीरावरील व गोमति आणि साई (स्यदिका) नदीपर्यंतचा प्रदेश असावा

तदनतर अयोध्येत दीर्घयज्ञ राजाला भीमानें पादाक्रात केलें नतर गोपालकक्षदेश जिंकून उत्तर कोशलदेश भीमानें हस्तगत केला त्याची राजधानी श्रावस्ती होती श्रावस्ती हें हल्लींचे साहेटमाहेट खेडें होय पुढे उत्तरेस नेपाळात जाऊन मल्लांच्या अधिपतीस भीमानें पादाक्रात केलें गोपालकक्ष हा हल्लीचा गोरखपूर जिल्हा असावा नतर हिमालयाच्या पायथ्याजवळील पानथळीचा प्रदेश थोडक्याच श्रमानी जिंकून काशीकडे येऊन भल्लाटदेश व शुक्तिमान पर्वत याचा त्यानें आश्रय केला आणि काशिराज व सुबाहु यांचा पाडाव केला शुक्तिमान पर्वत हा शोणनदीचे उत्तरेस पूर्व पश्चिम पसरलेला पर्वत होय पुढें सुपार्श्व देशाच्या क्रथनामक राजावर स्वारी केली व त्यास पादाक्रात करून मत्स्य, मलद, अनघ, अभय व पशुभूमि हे प्रदेश जिंकून भीम मदधार पर्वताकडे परत आला व तेथें राहणाऱ्या सोमधार वीराचा पराभव करून उत्तरेस वत्स देशावर चालून गेला काशीच्या पूर्वेस तमसा (बाहुदा), शरयू व गडकी याचा गगानदीच्या सगमावरील पूर्व पश्चिम प्रदेश म्हणजे सुपार्श्व देश असावा मलद देश हा हल्लींच्या शहाबाद जिल्ह्यांतील पश्चिमेकडील भाग होय आणि तेथून पश्चिमेकडे शुक्तिमान पर्वताच्या दक्षिण पायथ्यावर अनघ व अभय हे देश मेलगिरीपर्यंतचा भाग होय त्याच्या पूर्वबाजूस मत्स्य देश असावा हा मत्स्यदेश रेवा सस्थानातील दक्षिण भाग होय या भागात सोहागपूर नामक एक खेडें आहे हे गाव सध्या जरी लहान दिसते तरी प्राचीनकाळीं ते विराटपूर या नावानें प्रसिद्ध होते पाडव अज्ञातवासात असताना याच ठिकाणीं विराट राजाच्या आश्रयास गुप्तवेषानें राहिले होते मत्स्य देश जिकून पुन्हा परत मदधार पर्वताकडे भीम आला हा पर्वत शुक्तिमान पर्वताच्या व विंध्य पर्वताच्या दरम्यान शोणनदी पूर्ववाहिनी होते, तेथील पर्वत होय तेथे जाऊन उत्तरेस वत्स देशाकडे भीम चाल करून गेला वत्स देश यमुनेच्या तीरावर असून त्याची राजधानी कौशाबि आहे तेथून नंतर भीमानें भर्ग व निषादाचे राजे मणिमत् वगैरेंना जिंकून घेतले भर्ग व निषाद हीं राज्ये वत्सदेशाच्या पश्चिमेस यमुनेच्या तीरास होती दक्षिण मल्ल म्हणजे पारसनाथ टेकडीच्या आजूबाजूचा प्रदेश यामध्यें हजारा व मानभूम या जिल्ह्यांचा बराच भाग येतो भीमानें दक्षिण मल्ल जिकल्यावर भोगवान पर्वत जिकला पारसनाथ टेकडीला अजूनही मल्लपर्वत म्हणतात मल्ल देशाच्या नैर्ऋत्येस भोगवान् पर्वत होता या पर्वतांतून वैतरणी व सुवर्णरेखा या नद्या निघालेल्या आहेत पुढे शर्मक व वर्मक देश घेऊन जनक राजाच्या प्रदेशावर भीमानें स्वारी केली शर्मक व वर्मक हे देश मुझफरपूर व दरभगा यांतील दक्षिणेकडील प्रदेश असावा

जनक राजाच्या प्रदेशास विदेह असें नांव होतें शक, बर्बर व इद्र पर्वताजवळचे सात किराताधिपति भीमानें जिंकले शक, बर्बर व किरात हीं राज्यें अनुक्रमें सिकीम, दार्जिलिंग आणि जलपायगुरी भूतानच्या भागांत असावींत कांचनगंगा व गौरिशकर हीं

शिखरें असलेल्या पर्वतास इद्रपर्वत हे नांव असावें सुह्म व प्रसुह्म देश म्हणजे भूतानच्या आग्नेयीस व ब्रह्मपुत्राच्या उत्तर तीरावरील प्रदेश भीमानें तदनतर जिंकले नतर मगध देशावर हल्ला करून जरासधपुत्रास म्हणजे सहदेवास करभार मागितला तो त्यानें दिला तसेंच शोण नदीच्या पूर्वतीरावरील व फल्गु नदीच्या तीरावरील दड व दडधार ही राज्यें जिंकून भीम मागधाची राजधानी गिरिव्रज येथे गेला या सर्व प्रदेशास प्राचीनकाळापासून धर्मारण्य असें नांव आहे. मागध राजांना बरोबर घेऊन भीमसेनाने कर्णाच्या अंमलाखालील अगदेशावर स्वारी केली कर्णाचे राज्य देवगड, राजमहाल, भागलपूर व कौशिकच्या गगासगमाच्या पश्चिमेच्या बऱ्याच भागावर पसरले होते त्याची राजधानी चंपानगरी भागलपूरच्या पश्चिमेस जवळच होती हल्लीही तेथें चपानगरी व चपापूर अशीं दोन खेडीं आहेत भीमाचा कर्णाबरोबर सग्राम होऊन त्यात कर्ण पराभूत झाला भीमानें भागीरथीच्या पश्चिम तीरावरील राजमहालपासून मुर्शिदाबादपर्यंतच्या प्रांतांतील पर्वतवासी राजांना जिकले तदनतर पश्चिमेकडे पुन फिरून त्यानें मोहागिरी नामक पर्वतावर असणाऱ्या राजावर चाल केली व त्यास पराभूत केले या पर्वतास हिरण्यपर्वत असेंही म्हणतात हल्लीचें मोंगिर शहर हेंच मोहागिरी होय तदनतर पौड्र देशाच्या वासुदेव राजावर भीमानें स्वारी केली या राजाचे राज्य गगेच्या पूर्वतीरावर राजशाही, दिनाजपूर, रगपूर, नडियाद पबना, जगल महाल वगैरे भागांत पसरले होते पौड्रवर्धन नगरासबधी विद्वानाचे निरनिराळे शोध आहेत परतु सूक्ष्म दृष्ट्या विचार करिता पबना हेंच पौड्रवर्धन आहे असे कळून येते कौशिकी कच्छ म्हणजे हल्लीचा पूर्णिया जिल्हा भीमाने तदनतर जिकला आणि पुढे वग देशातील समुद्रसेन व चद्रसेन याच्यावर चाल केली वगदेश पौड्रदेशाच्या दक्षिणेकडील गंगा व ब्रह्मपुत्रा या नद्याच्या मधील जेसोर, बरद्वान, व कलकत्ता यांच्या उत्तरेकडील प्रदेश होय तदनतर भीमाने ताम्रलिप्त म्हणजे हल्लीचे तुमलक, कर्वटाधिपति म्हणजे बरद्वान, व मिदनापूर हे जिल्हे आणि सुम्ह व हुबळी हे प्रात जिकले तदनतर सागरवासी म्लेंच्छ म्हणजे गगेच्या मुखाजवळील प्रदेशात राहणारे म्लेच्छ लोक जिकून लोहित्य देशाकडे म्हणजे ब्रह्मपुत्रा नदीच्या पूर्वतीरावरील कोमिल्ला, डाकापासून गोहट्टी शहरापर्यंतचा भाग भीमाने जिंकला नतर परत दक्षिणेस येऊन सागरानुपवासी म्हणजे चितगांग जिल्ह्यातील समुद्रकांठावरील म्लेंच्छ लोकांना शेवटी जिकले याप्रमाणें पूर्वदिशेस दिग्विजय मिळवून भीमसेन या क्षत्रिय वीराची स्वारी इद्रप्रस्थाकडे कूच करती झाली

**४. सहदेवाचा दिग्विजय** —धर्माज्ञेनुसार सहदेव दक्षिण दिशा जिंकण्याकरितां ससैन्य निघाला तो प्रथम शूरसेन देशावर म्हणजे आग्रा शहराच्या आसमतांतील प्रदेशावर स्वारी करूं लागला त्याने तो प्रदेश आपल्या ताब्यांत घेऊन पुढें मोठया पराक्रमानें मत्स्य देशाच्या राजावर चाल केली हा मत्स्य देश आलवार प्रांत व जयपूरपैकीं उत्तरेकडील भाग होय मत्स्य देशाची राजधानी विराटनगर हें जयपूरच्या उत्तरेस ४१ मैलांवर आहे यास सध्यां वैराट म्हणतात याच्या आजुबाजूच्या टेंकडयांत तांबें सांपडतें विराट राज्याच्या समीप अधिराज देशाच्या दतवक्रावर सहदेवानें

स्वारी केली व त्याचा पराभव करून करभार घेतला अधिराज देश ग्वाल्हेर संस्थानांतील दतिया जिल्हा होय नतर सुकुमार सुमित्र राजास जिंकलें या सुमित्र राजाचें दुसरें एक छोटेंसें राज्य पूर्वेकडेस होतें सुमित्राचें राज्य धोलपूर व करवली या भागांत असावें. नंतर त्यानें अपरमत्स्य म्हणजे जयपूरचा पश्चिमभाग व अजमीर हा प्रांत घेतला आणि चोर देश, विषादभूमि, श्रेष्ठगिरी, गोश्रृग हा सर्व प्रदेश हस्तगत करून त्याचा अधिपति श्रेणिमान राजास जिंकले हा सर्व प्रदेश बुंदी जिल्ह्यापासून धोलपूर शहारापर्यंत असलेला डोंगराळ प्रदेश होय हा प्रदेश जिंकण्यासाठीं त्याला बरेंच शौर्य दाखवावे लागलें नतर तो नरराष्ट्रावर चाल करून गेला. नरराष्ट्र हे यमुनेस मिळणाऱ्या सिंध नदीच्या तीरावरील ग्वाल्हेरच्या नैर्ऋत्य दिशेचा प्रदेश होय ग्वाल्हेरच्या नैर्ऋत्येस चाळीस मैलांवर सिंध नदीवर हल्लीं नरवार नांवाचें खेडें आहे तीच नरराष्ट्राची राजधानी असावी तेथून सहदेव कुतिभोज राजाकडे गेला त्याने सहदेवास आनदाने करभार दिला तदनतर सहदेव चर्मण्वतीच्या तीरावर चभकपुत्र राजावर चाल करून गेला कुतिभोज देशाची राजधानी चंबळा नदीस मिळणाऱ्या अश्वरथा नामक एका लहान नदीच्या तीरावर होती ग्वाल्हेर-च्या उत्तरेस २० मैलावर असलेलें कुतीपूर अथवा कोतवाला हीच कुतिभोज राज्याची राजधानी असावी तेथून जभक पुत्राचें राज्य पश्चिमेकडे चबळा नदीच्या तीरावर पसर-लेलें होते जभकपुत्रास सहदेवानें जिंकून नतर दक्षिणेकडे सेक व अपरसेक यांच्यावर चाल केली सेक चबळानदीच्या दक्षिणेकडील व उज्जनीच्या उत्तरेकडील प्रदेश होय सेक देशात हल्लीचा कोटा सस्थानचा बराच भाग येतो व अपरसेकमध्यें चंबळेच्या पश्चिमतीरावरील कोटा सस्थानचा भाग, बुंदी व उदेपूरचा पूर्वभाग यांचा समावेश होतो तेथून सेकवीरांना बरोबर घेऊन सहदेव नर्मदा नदीच्या आसमतात् वळता झाला. वाटेंत अवतीच्या विंद व अनुविंद राजावर सहदेवानें चाल केली व त्याचा पराभव करून त्यानें तदनंतर आपला मोर्चा भीष्मक राजाच्या भोजकट नगराकडे वळविला अवंतीचें राज्य फारच विस्तृत असें होतें या राज्याच्या पश्चिमेस सालेश्वर पर्वत, दक्षिणेस विंध्य-पर्वत, पूर्वेस दशार्ण देश व उत्तरेस सेक व अपरसेक हे देश होते

भोजकट हें विदर्भ देशांत रुक्मीनें स्थापलेलें शहर होतें कुडिनपूर अमरावतीच्या पूर्वेस ४० मैलावर असलेलें कुडागर हें खेडे होय याला हरिवंशांत विदर्भपूर असें नाव आहे भीष्मकाबरोबर सहदेवाचें दोन दिवस युद्ध होऊन अखेरीस सहदेव विजयी झाला भोजकट वऱ्हाडमधील सर्पिण नदीवरील एलिचपूर हें नगर असावे सहदेव दिग्विजयार्थ तेथें गेला असतां रुक्मि हा अर्थात् राजपदारूढ नव्हता त्याचा पिता भीष्मक हाच राज्य करीत होता. अर्थात् पितापुत्र या दोघांनीं सहदेवावर भोजकट नगराजवळ गावलगड डोंगराच्या दक्षिण पायथ्यावर युद्ध केले असावें पुढें तो पराक्रमी सहदेव कोशल देशावर स्वारी करण्याकरितां गेला हा हल्लींच्या छत्तिसगड प्रांताचा उत्तर भाग होय याची राजधानी बिलासपूर असावी. श्रीरामचंद्र वनवासांत असतांना या प्रांतांत बरेच दिवस राहिले होते. व त्यांनींच तेथील हवापाणी स्वतःच्या कोसल देशासारखें असल्यामुळें त्यास दक्षिणकोसल असें नांव दिलें होतें.

तदनंतर सहदेवानें वेण्या नदीच्या तीरावरील राजाचा पराभव केला ही नदी सध्यां वाइनगंगा या नांवानें ओळखली जाते नंतर कांतारक, पूर्वकोसल, नाटकेय, हेरंबक या देशांच्या राजांबरोबर सहदेवानें युद्ध करून त्यांना पराभूत केलें कांतारक हा प्रदेश बुऱ्हा शहराच्या आसपासचा प्रदेश असावा प्राक्कोटक कोसलास लागून महानदीच्या तीरावरील प्रदेश असावा महानदीवरील कटक ही प्राक्कोटकाची राजधानी असावी नाटकेय व हेरंबक ही दोन राज्यें सोनपूर व तेल नदीच्या काठावरील भाग असावा पुढें मारुध, रम्यग्राम, नाचिन, अर्बुक या देशाच्या राजाचा पराभव करून अरण्यवासी सर्व राजांना त्यानें पादाक्रांत केले तदनतर वाताधिप राजास त्यानें हस्तगत करून घेतलें पुलिंद योद्धयांशीं युद्ध करून सहदेव दक्षिणेस पांडय राजाच्या राज्याकडे वळला त्याच्याबरोबर एक दिवस युद्ध करून त्याला जिंकून तो दक्षिणापथांत शिरला मारुध, रम्यग्राम वगैरे ठिकाणापासून दक्षिणापथापर्यंत वर्णन केलेले देश व राज्ये हल्लींच्या जुनागड व बस्तार प्रांतापासून पश्चिमेकडे वर्धा व वैनगंगा या नद्यांच्या खोऱ्यानें प्रसृत झालेले असावेत पुलिंद जातीचे लोक व पांडयपुत्र राजाची देखील,वसाहत वैनगगेच्या तीरावर असावी तसेंच गोदावरीच्या दक्षिण तीरापासून हिंदुस्तानच्या खालील भागास दक्षिणापथ हें नाव वापरीत होते किष्किंधा प्रदेशावर तदनतर सहदेवानें चाल केली किष्किंधा गुहा ही वाली सुग्रीव यांच्या सुप्रसिद्ध किष्किंधा प्रदेशातील नव्हे या किष्किंधाच्या सबंधानें विचारार्तीं असें मत देतां येतें की, तापीच्या उत्तरेकडे सातपुडा डोंगरांत ती असावी या गुहेंत व आसपास मैंद व द्विविद या वानराची भारतीय कालीं मोठी वसाहत असावी या प्रदेशांतील वीराबरोबर सहदेवास सात दिवस युद्ध करावे लागलें नतर त्यानीं करभार दिला तेथून सहदेव नीलराजाच्या अधिपत्याखालील महिष्मतीस गेला ही नगरी इदूरच्या दक्षिणेस ४० मैलांवर नर्मदेच्या काठीं असलेले महेश्वर गाव होय या नीलराजाबरोबर युद्ध करताना सहदेवाच्या सैन्याचा चागलाच फन्ना उडाला परतु यशाचें पारडें सहदेवाकडेच झुकतेंसे दिसल्याने नीलराजानें त्यास आनदानें करभार देऊन टाकला पुढें दक्षिणेकडे वळून सहदेव त्रैपूर राज्यांत शिरला ही चेदि राज्याची नर्मदेच्या दक्षिणेकडची वसाहत असावी तेथील पौरव कुलांतील राजास जिंकून सहदेव सुराष्ट्र देशांतील कौशिकाचार्याकृति राजावर चाल करून गेला तो राजा पादाक्रांत झाल्यामुळे सहदेवानें त्यास हस्तगत करून घेतलें सुराष्ट्र हें हल्लींचें सुरत होय हल्लींच्या काठेवाड प्रातास भारतकालीं आनर्त अशी सज्ञा होती सुराष्ट्र देशांत असतानाच भोजकट देशाच्या रुक्मि या राजाकडे करभार मागण्यास सहदेवाचे दूत गेले हा रुक्मि रुक्मिणीचा भाऊ नव्हे रुक्मिणीचा भाऊ रुक्मि निश्चळ राजपुत्र होता भोजकट देश महीनदीच्या कांठावरील प्रदेश होय तदनतर सहदेव दक्षिणेकडे वळला त्यानें तिकडील शूर्पारक देश जिंकला हा वसईजवळील सुपारा गांवाजवळ प्रदेश होय. तेथून दडक म्हणजे गोदावरी तीरावरील पैठण (प्रतिष्ठान) प्रांत घेऊन दक्षिणेकडे जाऊन तालिकोट (तालिकट) घेतला. हा भीमा नदीच्या तीरावरील प्रांत होय यांतील तालिकोट गांव त्याच नांवानें विजापूर जिल्ह्यांत हल्लींही आहे. तदनंतर समुद्रकांठीं

राहाणारे म्लेंच्छ, कर्णप्रावर्ण, निषाद, पुरुषाद, कालमुख वगैरे रानटी लोक शूर्पारकापासून रत्नागिरीपर्यंत राहात होते, त्यांना जिंकून घेतलें. पुढें सहदेवानें कोल्लगिरीकडे चाल केली. कोल्लगिरी हल्लीं प्रसिद्ध असलेल्या कोल्हापूर शहरापासून ६ मैलांवरील कात्यायनीचा डोंगर होय या डोंगराच्या दोन्ही पायथ्यांवर भारतकालीं वसती होती. 'करवीरमाहात्म्य' खंड बावीसमध्यें कोल्लगिरीसबधीं बरेंच वर्णन आहे प्राचीनकाळीं या प्रदेशीं कोल्लासूर राजा राज्य करीत होता त्याच्या नांवावरून या पर्वताला कोल्लगिरी असें व प्रदेशाला कोल्लापूर असें नांव पडलें असावें प्राचीन कोल्लापूर शहर कात्यायनी डोंगराच्या पायथ्याशीं असावें नंतर कोल्लासुराचा मुलगा करवीर यानें हल्लींचें करवीरपूर वसाविलें असावें या कोल्लासुराच्या मेहुण्याचें राज्य कऱ्हाटक प्रांतावर चालत होतें कोल्लासुराचा नातू देविल हा शिराळें गांवाजवळील डोंगराळ प्रदेशांत राज्य करीत होता कोल्लगिरी जिंकल्यावर सुरभीपट्टण, ताम्राव्हयदीप, रामकपर्वत व तिमिंगल यांवर स्वारी करून तेथें सहदेवानें विजय प्राप्त करून घेतला हे देश अनुक्रमें गोवा, कारवार आणि सह्याद्री पर्वताच्या पश्चिम पायथ्यावरील कोंकणचा प्रदेश होय तिमिंगलचें राज्य मलबार किनाऱ्यावरील मगरूळ-जवळील भाग असावा. तदनतर सहदेवाने वनवासी, केरल, सजयंति नगरि, पाषड, कऱ्हाटक या भागीं दूत पाठवून करभार बोलाविला

वनवासी हा म्हैसूर सस्थानचा उत्तरेकडील भाग होय सध्या कारवार जिल्ह्यांत बन-वासी म्हणून एक क्षेत्र आहे, तीच या प्रांताची राजधानी होती केरल प्रांत हा कोचिन संस्थानापासून मगरूळपर्यंतचा भाग होय पाषड व कऱ्हाटक हे कृष्णातीरा-वरील कऱ्हाड (कऱ्हाटक), आणि पाषड हा वाई, धौम्य, महाबळेश्वर इकडील प्रदेश होय तेथून सहदेवानें लकाधीश बिभीषणाकडे सलगीच्या नात्यानें दूत पाठविले. बिभीषणानेंही प्रेमाने भरपूर करभार सहदेवाकडे पाठवून दिला तसेंच पाडय देश, द्रविड देश (कारोमांडल किनारा), गोदावरी व कृष्णा यांच्या मुखाजवळील आंध्र देश, ताल वन, म्हणजे गोदावरीच्या उत्तरेकडील जयपूर जिल्हा, व कलिंग म्हणजे गोदावरीच्या मुखापासून महानदीचे मुखापर्यंतचा प्रदेश, उड्रकेरल, उष्ट्रकर्णिक, आटवीपुरी, यवनपूर ही सर्व ठिकाणें दूतांकडून वसूल मागविण्यात यशदायी झालीं या सर्वांनीं मोठ्या आनंदानें सहदेवाकडे करभार पाठवून दिला.

याप्रमाणें सहदेवाची मर्यादा सपतांच तो दिग्विजयी वीर आपल्या विजयी सैन्यास इद्रप्रस्थाकडे कूच करण्यास आज्ञा देता झाला, व ते सर्व इद्रप्रस्थाकडे परतले.

**५. नकुलाचा दिग्विजय**—नकुल या वीरानें पश्चिमेस जावें असें ठरलें होतें. त्याप्रमाणें नकुल सर्व तयारीसह आपल्या कर्तव्यास निघाला पश्चिमेस नकुलानें विजय मिळविण्यापूर्वीच श्रीकृष्णानें पश्चिमदिग्विजय केला होता नकुलानें प्रथम रोहितक पर्वतावर राहाणाऱ्या मत्तमयूरावर चाल करून त्यास जिंकलें. रोहि-तक हा पर्वत हल्ली दिल्लीच्या वायव्येस ४२ मैलांवर असलेला रोहटक नांवाचा डोंगर

होय पुढें मरुभूमि, बहुधान्यक देश, शैरीषक, महत्थ हे देश नकुलानें जिंकून घेतले. मरुभूमि, सरस्वती व घग्गर या नद्यांच्या दक्षिणेकडील वाळवटाचा विस्तीर्ण प्रदेश होय शैरीषक हा प्रदेश हल्लीच्या सिरसा शहरच्या आसपासचा भाग होय महत्थ देश सरस्वती नदीच्या उत्तर तीरावर हल्लींच्या पतियाला संस्थानाचा पश्चिमेचा भाग असावा तदनतर त्यानें दशार्ण देश जिंकला. भागलपूरच्या पश्चिमेकडील भागांत पांडवांच्या वेळी सरस्वती नदी अनेक प्रवाहांनीं वाहात असावी त्या भागाला दशार्ण असें नांव दिलें असावें हल्लीं भाटनेर या गांवापुढें सुमारें २० मैलापर्यंत सरस्वती नदीचा प्रवाह दिसतो पुढें ती वाळवटांत गुप्त झाली असून सिंधप्रांतातील खैरपूर संस्थानांत प्रकट झाली आहे तदनतर नकुलानें दशार्ण देशांतून सिंधु नदीच्या पश्चिमतीरावर असलेल्या शिबि राष्ट्रावर चाल केली हे सिंधु नदीच्या पश्चिम तीरावरील सेहवान नामक शहरापासून क्वेटा शहरापर्यंत व क्वेटापासून थेट शिकारपूर जिल्ह्याची सिंधुपर्यंतची सर्व हद्द यात येत असावी शिबि देशाची राजधानी हल्ली प्रसिद्ध असलेले शिबि हे गाव असावे शिबि राजा फार पराक्रमी होता व भारतीय युद्धाच्यापूर्वी तीस पिढ्या हे राज्य सुप्रसिद्ध होतें तदनतर नकुलाने त्रिगर्त, अबष्ठ, मालव आणि पचकर्पेठ हे देश जिंकले त्रिगर्त हा भाग हल्लींचा जालदर जिल्हा होय अबष्ठ व मालव हे देश हल्लींचे सुलतान व मॉटगॉमेरि आणि लाहोर हे तिन्ही जिल्हे मिळून बनलेले देश होत अबष्ठ प्राताची पूर्व सरहद्द हल्लींच्या अबाला प्रातापर्यत पसरली असावी, व अबाला शहराजवळच माध्यमकेय आणि सिमल्याच्या दक्षिणेकडील भागांत वाटधान हे देश असावेत पचकर्पट हा देश लुधियाना व त्याच्या पूर्वेकडील सिमल्यापर्यंतचा प्रदेश असावा

तदनतर नकूल अजमीरच्या उत्तरेस असणाऱ्या पुष्कर सरोवराच्या पश्चिमेकडील अरण्यात शिरला तेथील रानटी टोळ्याचा पराभव करून पुन्हा सरस्वतीतीर त्याने गांठले या नदीच्या तीरावरील शूद्र वगैरेना जिंकून तेथून पचनद देशावर त्याने स्वारी केली व त्या देशास हस्तगत केले हा देश उच्चनामक गावच्या आसपासच्या पचनद या नांवानें प्रसिद्ध असलेल्या नदीच्या तीरावरील प्रदेश होय यात खानपूर नामक भावलपूर संस्थानातील मोठें शहर येतें तदनंतर पचनद देशांतून सिंधु ओलाडून पलीकडे अमरपर्वत ( हल्लींचा सुलेमान पर्वत ) उत्तर ज्योतिष, दिव्यकटकपूर व द्वारपाल प्रदेशातील सर्व राजे लोकास नकुलानें जिंकून घेतलें अमरपर्वताच्या पूर्वेच्या पायथ्यावरील प्रदेशांत असताना नकुलानें श्रीकृष्णाकडेही करभार मागण्याकरिता दूत पाठविले श्रीकृष्ण व इतर यादवांनीं सत्कारपूर्वक करभार पाठवून दिला श्रीकृष्ण व यादव यांचें राज्यही फार विस्तृत होतें या राज्यांत सिंधमधील कराची, हैद्राबाद व थरपारकर हे प्रांत, शिरोही, डीसा, पालनपूर, कच्छ, सबंध काठेवाड, अहमदाबाद यांची घटना होत असे उत्तर ज्योतिष, दिव्यकटकपूर व द्वारपाल हे अनुक्रमें डेरागाजिखानपासून एडवर्ड साबाद उर्फ पाणिनीचे वर्णु शहरापर्यंतचा भाग असावा तदनतर नकुलानें मद्र देशांत जाऊन शाकल नगरींतील आपल्या मातुलास म्हणजे

शल्यास धर्माचा निरोप कळविला मद्रदेश म्हणजे रावी व चिनाब यांच्या संगमापासून अमृतसर व सियालकोटपर्यंतचा भाग होय मद्र देशाची राजधानी शाकल उर्फ सियालकोट शहर ही होय तदनंतर नकुल समुद्रतीरवासी पल्हव, बर्बर, किरात, शक, यवन, म्लेंच्छ याच्यावर चाल करून गेला व त्यांच्या जवळूनही करभार वसूल करून घेतला

यात्रमाणे त्या क्षत्रिय नकुलानें आपली मोहीम परिपूर्ण केली नकुलानें इतका द्रव्यसग्रह या मोहिमेंत केला होता कीं, दहा हजार उंटांना सुद्धां तो वाहून आणणें जड झालें होतें यात्रमाणें द्रव्यकोश सग्रहीं झाल्यावर नकुलही आपल्या विजयी सेनेसह मोठ्या हर्षातिरेकानें इद्रप्रस्थाकडे परतला

यात्रमाणे चारही पांडवांनीं धर्मराजाचें आधिपत्य भरतखडांत त्यावेळीं राज्य करीत असलेल्या सर्व राजांवर प्रस्थापित केलें होतें आणि सर्व भरतखड क्षात्रतेजानें तळपत होता भारतीयकालीन पांडवांचा हा दिग्विजय क्षात्रतेजाची मानब्बरी सर्व जगास पटवून देत आहे. हा काल म्हणजे क्षात्रछत्राखालीं आनदानें घाटित होत असलेला क्षात्रतेजात्मक काल होय



## प्रकरण नववें

# बौद्धकाल आणि क्षात्रघटना

[ इसवी सनापूर्वी सुमारें ६०० ते इसवी सन ३०० पर्यंत ]

१ मगधोत्कर्ष.
२ शिकंदर बादशहाची स्वारी.
३ सार्वभौम चंद्रगुप्त क्षत्रिय राजा
४ बौद्धकालीन क्षत्रियांचा प्रसार
५ बौद्धकालीन क्षत्रियांमधील रीतीरिवाज

**१. मगधोत्कर्ष**—आर्यक्षत्रियांनीं वैदिककाळी पंजाबांतील मूळच्या लोकांस जिंकून सिंधु व तीस मिळणाऱ्या नद्यांच्या तीरावर आपल्या वसाहती प्रस्थापित केल्या तद्वतच भारतीय कालापर्यंत गंगाथडी प्रदेशांत बहारपर्यंत त्यांनीं आपल्या वसाहती वाढवीत वाढवीत आणून प्रस्थापित केल्या आणि त्यापुढील कालात म्हणजे बौद्धकाळाच्या सुमारास तर आर्यक्षत्रियांचा प्रसार सर्व भरतखंडांत विस्तृत रीतीनें प्रसृत झाला होता त्यावेळीं दक्षिण बहार प्रांतांत क्षत्रियांच्या वसाहती प्रस्थापित होत होत्या बहार प्रांतात वसाहती प्रस्थापित करणारे क्षत्रिय आपली सर्वांगीण उन्नति करून घेण्याच्या प्रयत्नांत गुंग होते आणि म्हणूनच मगधाचा उत्कर्ष पुढें पुढें एवढा उन्नतावस्थेस पोंचला होता भारतीय युद्धाच्या वेळीं या मगध देशावर जरासंध नामक राजा राज्य करीत असल्याचें वर्णन मागें येऊन गेलेंच आहे मगध देश म्हणजे हल्लींचा बहार प्रांत होय जरासंधानंतर त्याच्या वंशांतील बावीस पुरुषांनीं राज्य केल्यानंतर इ० सनापूर्वी ६०० चे सुमारास मगध देशाचें राज्य प्रद्योत नामक **क्षत्रियकुलांतील वंशाकडे** आले या वेळीं मगधाचें आधिपत्य **शिशुनाग नामक क्षत्रिय राजाकडे** असून त्याचा मगध देश सर्व हिंदुस्तानांत सार्वभौमत्व पदास पोंचला होता शिशुनागापासून चवथा राजा **बिंबिसार क्षत्रिय** हा झाला तोही मोठा अनुकरणीय स्वभावाचा असून त्याचें औदार्य जाहीर होतें त्यानें इ० सनापूर्वी ५३७ पासून इ० सनापूर्वी ४८५ पर्यंत राज्य केले त्या वेळीं मगध देशाची राजधानी पाटलिपुत्र नामक नगर होतें त्याला हल्लीं पाटणा म्हणतात बिंबिसारानंतर त्याचा पुत्र अजातशत्रु यानें इ० सनापूर्वी ४८५ पासून इ० सनापूर्वी ४५३ पर्यंत राज्य केलें हा अजातशत्रु मोठा पराक्रमी क्षत्रिय राजा होऊन गेला. त्याचा पराक्रम सार्वत्रिक आणि भारतविख्यात होता अजातशत्रूनें आपला राज्यविस्तार बराच वाढविला त्यानें आपलें राज्य पश्चिमेस व उत्तरेस विशेषत्वानें प्रसृत केलें होतें आणि

अंग देश, कोशल वगैरेवरही त्याचे आधिपत्य चालत होतें त्याच्यावेळीं उत्तर बहार प्रांतांत तुराणी लोक आपल्या वसाहती करू लागले होते. परंतु अजातशत्रूस तें सहन न होऊन त्यानें त्या लोकांना हुसकून लावण्याचे उद्देशानें पाटलिपुत्र शहर सुंदर तऱ्हेनें वसविलें. या अजातशत्रूच्या मागें या प्रद्योतवंशांतील चार राजांची कारकीर्द होऊन अखेर इ० सनापूर्वी ३७० च्या सुमारास हें राजघराणें शेवटास पोंचलें तदनतर नंद घराण्यानें मगध देशाचें राज्य सुमारें पन्नास वर्षांपर्यंत केले या अवधींत राजा नंद आणि त्याचे आठ मुलगे मगधाच्या राज्यावर आपले आधिपत्य प्रस्थापित करून राहिले होते मगध देशाची सत्ता ह्या वेळेस उत्तर हिंदुस्तानाकडेही बरीच वाढली होती या नंद घराण्याच्या शेवटल्या राजाच्या कारकीर्दींत ग्रीस देशचा राजा शिकंदर ( अलेक्झांडर दि ग्रेट ) यानें स्वारी केली

**२. शिकंदर बादशहाची स्वारी**—मिसर देशचा राजा व आसिरियाची राणी सेमिरामिस यानीं प्राचीन काळीं पजाब प्रांतावर स्वारी केल्याबद्दलचा अस्पष्ट वृत्तान्त ऐकण्यांत येतो इराणचा बादशहा दारियस याने सिंधु नदीच्या पश्चिमेकडील भाग आपल्या राज्यात सामील केला होता हा भाग पूर्वीपासून भारतवर्षात मोडत असे इ० सनापूर्वी ५१५ या वर्षी दारियसचा मुलगा झर्क्सिस याने ग्रीस देशावर स्वारी केली तेव्हां त्याच्याबरोबर हिंदुस्तानचे पराक्रमी वीर होते त्यानंतर ग्रीसचा बादशहा शिकदर याने हिंदुस्थानावर स्वारी केली ग्रकि लोक त्यावेळेस फार सुधारलेले व प्रबल होते मध्य आशियांतून पश्चिमेस गेलेल्या क्षत्रियांचे ते वशज होते इ० सनापूर्वी चवथ्या शतकांत ग्रीस देशावर प्रथम फिलिप व नतर त्याचा मुलगा अलेक्झांडर हे दोन पराक्रमी बादशहा राज्य करीत होते 'अलेक्झांडर' या शब्दाचा मुसलमानांनीं पुढे 'अस्कदर' असा संक्षिप्त अशुद्ध वाक्प्रयोग सुरू केला आणि पुढें पुढें तर या 'अस्कदर'वरही 'शिकंदर' या वाक्यप्रयोगाने चिरस्थायित्व प्रस्थापित केले ! म्हणजे मूळचे अलेक्झांडर हें नांव अपभ्रश रूप पावता पावतां अखेर शिकदर या नावानें रूपांतरित झालें शिकदरचें मूळचें नाव अलेक्झांडर हे होतें

हा शिकदर ऊर्फ अलेक्झांडर वयाच्या विसाव्या वर्षाच्या सुमारास राज्य करू लागला होता त्याने इराणावर स्वारी केली, त्यावेळेस त्याचें वय तीस वर्षांचें असून त्याचेबरोबर पस्तीस हजार ग्रीक सैन्य होतें त्यानें पश्चिम आशिया खड जिंकून इराणच्या राजाचा अनेक वेळां पराभव केला. हा शिकदर मोठा पराक्रमी व राज्यलोभाची मोठी हांव बाळगणारा होता.

इराण व अफगाणिस्तान जिंकल्यावर तो खैबर घाटांतून अटक शहराच्यावर सुमारें सोळा मैलांवर ओहिंद ( सध्याचें उद ) येथे सिंधु नदीवर होड्यांचा पूल बांधून ती सिंधु नदी उतरून हिंदुस्तानांत आला हा काल इ० सनापूर्वीच्या ३२६ वर्षाच्या जानेवारी महिन्यांतील होता. या वेळीं पंजाबांत अनेक लहान लहान राज्यें होतीं. रावळ-

पिंडीच्या उत्तरेस सुमारें दहा मैलावर तक्षशीला नामक प्रासिद्ध नगर असून तेथील विद्या-पीठ जगविख्यात होतें तक्षशीलाधिपति शिकदरास वशीभूत झाल्यामुळें शिकंदरचा मुक्काम तेथें कांहीं दिवस झाला झेलमच्या पलीकडील पोरस, अभिसार वगैरे राजाना त्यानें शरण येण्यास सांगितलें अभिसाराचा राजा त्यास शरण गेला. परतु पोरसानें त्यास युद्धाकरितां आव्हान केल्यामुळें त्यानें त्याच्यावर चाल केली झेलम नदीच्या कांठीं त्या दोघांची चकमक झडून पोरस पराभूत होऊन शिकदरच्या हातीं लागला शिकदरानें त्यास विचारलें, " मीं तुम्हास कशा रीतीनें वागवावें ? " तेव्हां त्यानें उत्तर दिलें कीं, " मला आपण राजाप्रमाणे वागवावें " पोरसाच्या या उत्तरानें शिकदर खूष झाला आणि त्यानें त्यास पुन्हा त्याच्या राज्यावर कायम केले

या आक्रमणकालीं सर्व हिंदुस्तानदेश जिंकून घेण्याचा शिकदरचा मनोदय होता, परंतु त्याची फौज पुष्कळ दिवसापासून परदेशीं राहून राहून कटाळून गेल्यामुळें आणि त्या योगानेंच त्याच्या फौजेंत पुढे आक्रमण करण्यास निरुत्साह दिसून आल्यामुळेच त्याला आपला पुढील आक्रमणाचा विचार बदलावा लागला त्याचें सैन्य स्वदेशीं जाण्यास त्या वेळीं उत्सुक झालेलें होतें शिकदरास आपल्या सैन्याचे हें बहुमत झुगारतां आलें नाहीं, आणि म्हणूनच तो पुढें मुलूख आक्रमण करण्याच्या नादात न पडता तसाच सिंधु नदीच्या भागांतून खालीं उतरून स्वदेशीं जाण्यास परत फिरला हा काळ इ० सना-पूर्वीच्या ३२५ वर्षाच्या आक्टोबरचा होय

शिकदर याप्रमाणे आपल्या सैन्याच्या मतास मान देऊन परत फिरला, परतु ग्रीस देशास पोंचण्यापूर्वीच आशिया मायनर प्रांतात बाबिलोन येथे भयंकर ज्वर येऊन तो आपल्या वयाच्या ३२ व्या वर्षी मरण पावला हा काल इ०सनापूर्वीच्या ३२३ वर्षाच्या जूनचा होय

ग्रिक लोकाची ही स्वारी भारतवर्षाच्या इतिहासात अत्यत महत्त्वाची आहे शिकदरानें या स्वारींत ठिकठिकाणीं ग्रीक फौजेचीं ठाणे बसविली होतीं बहुतेक राजांशीं तह करून ठेवले होते, यावरून व आणखीही तत्कालीन इतर घटनांवरून शिकंदराचा विचार पुन्हा हिंदुस्तानवर स्वारी करण्याचा होता, असें अनुमान बाधता येतें शिकदराबरोबर ग्रीस देशाचे पुष्कळ विद्वान् त्यावेळीं इकडे आले होते त्यानीं तत्कालीन हिंदुस्तानच्या स्थितीचीं वर्णनें लिहून ठेविलीं आहेत त्याबरोबरच शिकदरानें हिंदुस्तानांतून अनेक विद्वान् पंडित व मोठमोठे ग्रंथ आपल्याबरोबर नेले होते त्यामुळें युरोपच्या लोकांस हिंदुस्तान देश माहीत होऊन कांहीं दिवस उभयताचें दळणवळण वाढलें

शिकंदरच्या मृत्यूनतर त्याचें राज्य त्याच्या सेनापतींनीं वांटून घेतलें त्यांत आशिया खंडांतील प्रदेश सेल्युकस निकेटर याच्या वाट्यास आला सेल्युकसनें इ० सनापूर्वी ३१२ ते २८० पर्यंत राज्य केलें मगध देशाचा क्षत्रिय राजा चंद्रगुप्त मौर्य हा त्याचा समकालीन होता चद्रगुप्तानें यापूर्वीच पजाब व सिंधुनदापलीकडील भाग जिंकून घेतला होता सेल्युकसनें तो प्रांत काबीज करण्यासाठीं चंद्रगुप्तावर स्वारी

केली. या स्वारीचा काळ इ० सनापूर्वी ३०५ वर्षांचा होय. त्यानें चंद्रगुप्तावर स्वारी केली खरी, परंतु क्षत्रियवीर चंद्रगुप्तापुढें त्याची डाळ न शिजल्यामुळें चंद्रगुप्ताशीं तह करून त्यास **सेल्यूकसनें आपली मुलगी अर्पण केली!** ग्रीक लोक हे मूळचे आर्यक्षत्रिय असल्यामुळें हा विवाह आक्षेपार्ह झाला नाहीं. अर्थातच आज २२०० वर्षांपूर्वी युरोपियन आणि इंडियन यांचा **रोटीबेटी व्यवहार** राजरोसपणें चालत होता त्या वेळेसही सध्यांच्या प्रमाणें समाजविघातक धर्मभावना वर्णभेद व जातिभेद इतक्या नीच स्थितीस पोंचलेले नव्हते

तदनंतर क्षत्रिय राजा चंद्रगुप्त आणि सेल्यूकस यांचा अर्थातच स्नेहभाव वाढू लागला. त्यांचीं राज्येंही एकमेकास लागलेलीं असून हिंदुकुश पर्वत ही त्यांजमधील सीमा होती. चंद्रगुप्ताच्या दरबारीं सेल्यूकसनें मेगास्थेनीस नांवाचा आपला वकील ठेवला होता सेल्यूकसपासून पुढें दोनशें वर्षेपर्यंत ग्रीक लोकाचें हिंदुस्तानाशीं बरेंच दळणवळण चालू होतें

**३. सार्वभौम चंद्रगुप्त क्षत्रियराजा**—नंद घराण्यातील राज्याधिकार मगधावर चालत असता चंद्रगुप्त यास बंडखोर म्हणून नंदांनीं काढून लावलें होतें तेव्हां चंद्रगुप्त हा शिकंदराचा आश्रय करून राहात होता चंद्रगुप्त जरी शिकंदराजवळ आश्रयास म्हणून राहत होता तरी त्याची तडफदार क्षात्रवृत्ति मुरली नव्हती अनेक वेळां खास शिकंदरवर तो सिंहाप्रमाणें उसळत असे त्याची वृत्तीच तशी होती परंतु शिकंदरास त्याचा हा स्वभाव व त्याची ही वृत्ति न मानवल्यामुळें त्या दोघांची आपसांतच तेढ उत्पन्न झाली आणि त्याचा परिणाम अखेर शिकंदर आणि चंद्रगुप्त याच्या विरहांत झाला चंद्रगुप्त आणि शिकंदर यांचे पटेनासें होताच चंद्रगुप्तानें त्याचा आश्रय झुगारून दिला

चंद्रगुप्त हा क्षत्रिय राजा अत्यंत जाज्वल्य पराक्रमसंपन्न असा होता शिकंदर ज्या वेळेस हिंदुस्तानवर स्वारी करून परत गेला, त्या वेळीं चंद्रगुप्तानें पंजाबच्या लोकांचें आपल्या चातुर्यानें सख्य संपादन केले, व त्यांना आपलेंसें करून घेतले नंतर त्या शूर लोकांनिशीं त्यानें नंदाच्या मगध देशावर स्वारी केली व नंदाचा पाडाव करून आपले राज्य त्या शूर क्षत्रियानें मगधावर प्रस्थापित केलें हा काल इ० सनापूर्वी ३२२ वर्षांचा होय चंद्रगुप्तास शिकंदराच्या आश्रयास असतांना युद्धकलेची, अतिशय महत्त्वाच्या बाबींतील उच्च दर्जाची माहिती झाली होती त्या माहितीचा उपयोग त्याला या वेळीं उत्तम रीतीनें घेतां आला. याप्रमाणें पाटलीपुत्र येथें चंद्रगुप्तानें आपलें राज्य प्रस्थापित केलें. याच वेळीं उत्तर हिंदुस्तान देश एकछत्री अमलाखालीं आला होता. चंद्रगुप्तानें पंजाब व उत्तरेकडील सर्व प्रांत जिंकून आपल्या राज्यास जोडले आणि सार्वभौम राज्य स्थापन केलें चंद्रगुप्ताचे दरबारीं सेल्यूकस राजानें जो मेगास्थिनीस नामक वकील ठेवला होता, तो चंद्रगुप्ताचे दरबारीं पांच वर्षेपर्यंत राहिला होता हा मेगास्थिनीस जेव्हां हिंदुस्तानांत आला तेव्हां उत्तर हिंदुस्तानांत मागधांचें राज्य होतें आणि त्या

राज्याचा विस्तार पजाबपासून बहारपर्यंत होता मागधाचा राजा जो क्षत्रिय चंद्रगुप्त म्हणून वर वर्णिलेला आहे, त्यानें आपली राज्यघटना पुढें पुढें अतिशय उन्नतावस्थेप्रत नेली त्याचा हा उत्कर्ष कित्येकांस अगदींच असह्य होऊन त्याच्याविषयीं कांहीं निरर्गल प्रलापही स्वार्थबुद्धिपरायण लोकात ऐकूं येऊ लागले

या चंद्रगुप्त राजाजवळ नेहर्मीचें त्याचें सैन्य म्हटलें म्हणजे सहा लक्ष पायदळ, तीन लक्ष घोडेस्वार आणि नऊहजार हत्ती एवढें होतें पूर्वेस बंगाल आणि ओरिसा या भागांतही त्याचीं अनेक लहान लहान राज्यें होती कलिंगाच्या राजाजवळ साठ हजार पायदळ, एकहजार घोडेस्वार आणि सातशें हत्ती होते दक्षिणेकडे आध्र राज्यात तटबंदी केलेलीं अशीं मोठमोठीं तीस शहरें होतीं आणि त्यांच्याजवळ एक लाख पायदळ, दोन हजार घोडेस्वार, आणि एक हजार हत्ती होते पश्चिमेस सौराष्ट्र राज्यात एक लक्ष पन्नास हजार पायदळ, पांच हजार घोडेस्वार आणि सोळाशें हत्ती होते अशी त्यावेळच्या राज्यांची स्थिति होती हा सार्वभौम चंद्रगुप्त इ०सनापूर्वी.२९८ ह्या वर्षी इहलोक सोडून गेला पुढें चद्रगुप्ताचा पुत्र बिंदुसार याने पचवीस वर्षे राज्य केले या बिंदुसारास दोन मुलगे होते त्यांपैकी मोठ्या मुलाचे नाव सुशीमा व लहानाचें नांव अशोक असे होतें बिंदु-साराच्या मागे अशोक हा राज्यकारभार पाहू लागला होता हा काळ इ०सनापूर्वी २७२ वर्षांचा होय येथपर्यंत चद्रगुप्ताची विस्तृत राज्यघटना लोकाच्या स्मरणांतून गेली नव्हती परतु अशोकाने पुढे त्यावरही ताण केली अशोकासबधींचें वर्णन 'क्षत्रिय आणि बौद्धधर्म' या चवथ्या प्रकरणातच येऊन गेल्यानें येथे द्विरुक्ति नको याप्रमाणें घटना घडून येत येत अखेर इ०सनापूर्वी १८४ मध्ये मौर्य घराण्याचा शेवट झाला हें मौर्य उर्फ मोरे घराणें चंद्रगुप्त मौर्यापासून प्रसिद्धीस येत येत गेले या घराण्यातील राजांच्या नांवापुढें गुप्त हे उपपद लावण्याची रीत होती जसे चद्रगुप्त, मित्रगुप्त इ० . बिंदुसारासच मित्रगुप्त असेंही एक नाव होते या 'गुप्त' उपपदापासून या मोरे घराण्यासच कोणी गुप्तवंशी असेंही म्हणतात

**४. बौद्धकालीन क्षत्रियांचा प्रसार**—क्षत्रियांचा प्रसार पुढें पुढें आणखी विस्तृत होत गेला इ० सनापूर्वी चवथ्या शतकांत गुजराथेंतील सौराष्ट्र प्रांत हा एक मोठें राज्य बनला होता पुढें माळव्यांतही थोड्याच काळांत वसाहती झाल्या. उज्जनीचे राजे हे फार मानामरातबानें सत्कारले जात असत पुढें पुढें देश जिंकून आपल्या राज्याची मर्यादा वाढविण्याचा खूपच सपाटा सुरू झाला या राज्या-च्या विस्ताराची मर्यादा विंध्याद्रीचेही पार गेली कृष्णा व नर्मदा यांमधलि प्रदेशांत आंध्र राज्य स्थापन झाले या राज्यांत आर्यक्षत्रियांची सर्वच बाबतींत सुधारणा झाली या वेळीं मोठमोठा विद्यापीठें स्थापिलीं गेलीं होतीं या वेळेस दक्षिणेस आप-स्तंब हा मोठा पंडित उदयास आला कृष्णा नदीच्या पलीकडेही पुढें क्षत्रियांच्या राज्यांचा विस्तार होऊ लागला. पांड्य, चोल, चोर हीं राज्येंही स्थापन झालीं.

इ० सनापूर्वी पांचव्या शतकांत मागधांच्या सिंहबाहु नांवाच्या राजाचा मुलगा विजय, यानें सिंहलद्वीपींही आपलें राज्य प्रस्थापित केलें. वैदिक काळीं आणि भारतीय काळीं क्षत्रियांचा सर्व भागात प्रसार झालेला होता असें म्हणण्यास जरी प्रत्यवाय नव्हता, तरी बौद्धकालीं हा प्रसार सर्रास झाला होता ही गोष्ट त्याहीपेक्षां विशेष महत्त्वाची होय हिंदुस्तानचे जे प्रदेश अज्ञात आणि अशोधित असे पडले होते, त्यांचा त्यांचा तपास लावून त्या सर्व ठिकाणीं क्षत्रियांनीं आपलें छत्र उभारलें हिंदुस्तानच्या कांहीं काहीं विभागांत त्यावेळेपर्यंत इतके अडाणी आणि विचित्र घटनेचे कांहीं लोक राहात होते कीं, त्यांना तत्कालिन कवींनीं आपल्या कल्पनाशक्तीच्या ओघाप्रमाणें माकडें, राक्षस, अस्वल वगैरे उपमा दिलेल्या आपणांस अद्यापिही आढळून येतात या सर्व प्रकारच्या लोकांना तत्कालीन आर्य क्षत्रियांनीं सुधारून आपला धर्म, नीति, वर्तन, रीति शौर्य इत्यादि गुणांचीही त्यांच्या ठिकाणीं उत्तम प्रकारची वृद्धि करून दिली क्षत्रियांनीं ह्या कालपावेतों निरनिराळे देश जिंकून आपली सत्ता प्रस्थापित करण्याचा उपक्रम तर चालूच ठेविला होता, परतु त्याबरोबरच आपल्या राज्यांतील निरनिराळ्या सुधारणा करण्याबद्दलचें त्यांचें कौशल्य अभिनदनीय होतें आणि क्षत्रियांचा हा तत्कालिन कित्ताच सर्वांच्या समोर होता पूर्वींच्या आर्य क्षत्रियांनीं भारतवर्षातील मूळच्या रहिवाशांना हुसकून लावून तेथे आपलीं राज्यें प्रस्थापित करण्याचा उपक्रम चालविला होता परंतु या कालांतील क्षत्रियांनीं मूळच्या रहिवाशांना हुसकून लावण्याचा उपक्रम न करितां त्यांना हिंदु करून घेण्याचा उपक्रम सुरू केला होता म्हणजे हिंदु संघटनेचें काम त्या काली शौर्य वीर्यपूर्ण वृत्तीच्या क्षत्रियांनींच सुरू केल होतें आणि म्हणूनच हिंदुसघटनेचा आग्रमानही क्षत्रियांसच असणे साहजिकच आहे एवढेंच नव्हे तर तेंच इष्ट आहे

बौद्धायनाच्या ग्रंथांतील एक उतारा या गोष्टींचें ऐतिहासिक दृष्ट्या सुंदर विवेचन करणारा आहे हा बौद्धायन इ० सनापूर्वी सहावे शतकांत प्रसिद्धीस आला होता. ही गोष्ट जगविख्यातच आहे

" आवती, अग, मगध, सौराष्ट्र, दक्षिण, उपान्नित सिंध व साविरास या ठिकाणचे लोक मिश्र जातीचे आहेत."

याप्रमाणें या कालांतील क्षत्रियांनीं आपला प्रसार करून आपलें वर्चस्व भरतखंडावर प्रस्थापित केलें होतें यापूर्वींच श्रीकृष्ण हा इ० सनापूर्वी १२०० च्या सुमारास म्हणजे आज सुमारें ३२०० वर्षांपूर्वी आपल्या हजारों अनुयायांसह मथुरेहून गुजराथेंत आला होता व त्यानें तेथें आपलें राज्य प्रस्थापित करून द्वारका ही आपली राजधानी केली होती इ० सनापूर्वी ५०० च्या अगोदर द्वारका हें मोठें भरभराटीचें शहर असून तेथें समुद्रमार्गानें मोठा व्यापार चालत असे. सर्व ठिकाणीं आर्यक्षत्रियांचा धर्म, त्यांचे ग्रंथ, भाषा इत्यादिकांचा प्रसार होत होत तो ओघ थेट दक्षिणेपर्यंत येऊन थडकला. दक्षिणेंत

आर्यक्षत्रियांनीं प्रथम विदर्भात आपली वसति केली दक्षिण हिंदुस्थानांतील सर्वांत जुना प्रदेश* वऱ्हाडप्रांत ऊर्फ विदर्भ देश हाच होय †

९. **बौद्धकालीन क्षत्रियांमधील रीतीरिवाज**—बौद्धकालीं ज्ञानसंवर्धनाचा पाया चांगलाच स्थायिक झाला बौद्धकालीं सूत्रकथनाची पद्धति विशिष्ट रीतीनें अमलांत आली गेली मोठमोठे गहन विषय सूत्ररूपानें प्रतिपादन करण्यांत येऊं लागले. सूत्रें हीं मूळ विषयास संक्षिप्तरूप देऊन रचलेलीं असत यासंबंधीचा उल्लेख मागील एका प्रकरणीं येऊन गेलेलाच आहे पाठांतरास विशेष त्रास पडूं नये म्हणून पाल्हाळिक विवेचनाचें थोडक्यांत सारांशरूप ग्रथित करून सूत्राची रचना करीत असत मात्र हें संक्षिप्त रूप एवढ्या संक्षेपात आणीत असत की,त्यावर भाष्य केल्याशिवाय त्या सूत्रांचा खुलासा कळणेंही मुष्किलीचें असे श्रौतसूत्रें, गृह्यसूत्रें आणि धर्मसूत्रें असे सूत्रप्रकार होते. श्रौत्रसूत्रांत जे वैदिकविधि कथन केलेले आहेत त्याचे गौतम नामक तत्कालिन ग्रंथकारानें चौदा विभाग केले यांत अग्न्याधानक्रिया, दुग्धहवन हीं तत्कालिन क्षत्रियांत प्रचलित होतीं गृह्यसूत्रांत जे विधि कथन केलेले आहेत त्याचे गौतमानें सात भाग केले श्राद्धविधीचा समावेश यांत आहे हा एक मुख्य यज्ञ त्यावेळीं करीत असत आणखी जे गृह्यज्ञ होते ते ऋतुसंबंधीं होते जसे, पौर्णिमेचा यज्ञ, चंद्रदर्शनाचा यज्ञ, सर्पपूजनाचा यज्ञ, धान्य कापणीचे प्रसंगींचा यज्ञ, धान्य स्वगृहीं आणण्याचे वेळीं करावयाचा यज्ञ इत्यादि लहान लहान यज्ञप्रकार प्रचलित होते या यज्ञांचे वेळीं क्षत्रिय स्त्रिया पोळ्या तयार करून लोकांना वांटीत असत आणि त्या पोळ्यांचा साभार स्वीकार तत्कालिन लोकाकडून करण्यात येई या गृह्यज्ञांखेरीज आणखी कांहीं आचार तत्कालिन क्षत्रिय लोक पाळीत असत स्वस्त्रीस गर्भ राहिल्याचीं चिन्हें दिसून येतांच निरनिराळ्या काळीं तीन संस्कार करीत असत मुलाच्या जन्मकालापासून ते अन्न खाऊं लागतें त्या कालापर्यंत आणखी तीन संस्कार करीत पुढें चौल संस्कारानंतर उपनयन संस्कार करण्यांत येई उपनयन संस्कारानंतर विद्याभ्यास करविला जाई आणि या विद्याभ्यासकालांतच चार संस्कार होत असत तदनंतर अवभृतस्नान व विवाह करण्यांत येई यानंतर गृहस्थाश्रमी होण्याचा अधिकार प्राप्त होत असे.

प्रत्येक गृहस्थाश्रमी माणसास देवयज्ञ, पितृयज्ञ, अतिथिपूजन, पिशाचयज्ञ आणि ब्रह्मयज्ञ हे पांच विधि भोजनापूर्वी उरकून घ्यावे लागत असत चौदा वैदिकयज्ञ, सात गृह्यकर्मे व एकोणवीस घरगुती विधि हे चाळीस संस्कार त्यावेळीं आर्यक्षत्रिय आचरीत असत

धर्मसूत्रांत मुलकी आणि फौजदारीसंबंधीं निर्बंध आहेत अपराध्यांस शिक्षा देण्याचे नियमही त्यावेळीं ठरले होते गुन्हेगार मनुष्य जर चोरी करतांना प्रत्यक्ष पकडला गेला तर त्याला देहांत शासनाची शिक्षा भोगावी लागे कधीं कधीं शेतकऱ्यांच्या जमीनी-

---

* "The first or oldest Aryan province in the Southern Country must have been the Vidarbha or the Berars."
—Ancient history of the deccan [ Dr. Bhandarkar ].

† पुढील म्हणजे दहाव्या प्रकरणांत यासंबंधींचा विस्तृत इतिहास दिला आहे.

विरुद्ध अगर शिल्पकलाभिज्ञांच्या कलाकौशल्याविरुद्ध कोणी कारवाई करीत असत; आणि कायद्यानें त्यास जबर शिक्षा भोगावी लागे तत्कालिन लोकांत जमिनी करारानें दुसऱ्यास वाहण्यास देणें, पिकाचें नुकसान ज्यांच्या जनावरांनीं केले असेल त्यानें नुकसानीबद्दल पैशांची भरपाई करून देणें, व्याजानें रकमा देणे वगैरे प्रकार प्रचलित होते मालमत्ता आठ प्रकारांनीं मिळवितां येई दायांच्या हक्कानें, विकत घेऊन, नवऱ्याच्या आश्रयानें, दुसऱ्याच्या देणगीनें, तारणानें, यज्ञयागादिकांच्या मोबदल्यानें, भागीदारीनें आणि अंग मेहनतीनें, याप्रमाणें ते प्रकार प्रचलित होते कर्जावरील व्याजाचा दर पधरा टक्के असे दामदुप्पट झाल्यावर व्याज बद होई जामीनाची विशेष आवश्यकता असे व तसे करणें कर्जदारास विशेष सोयीचें असे

पुत्रजन्म होणे ही गोष्ट अत्यत महत्त्वाची मानली जाई पुत्र नसल्यावर मरणानंतर पिंड देण्यास कोणीही वारस राहाणार नाही म्हणून पुत्रप्राप्ति विशेष महत्त्वाची मानीत असत पुत्रप्राप्ति झाली नाहीच तर इतर कोणत्याही तऱ्हेनें वारस तयार करण्यांत येई

पुत्र नसल्यास दत्तक घेऊन त्यास वारसाहक्क देण्यांत येई विधवा स्त्रीसही दत्तक पुत्र घेण्याचा अधिकार असे बहुधा मुलीचा मुलगा दत्तक पुत्र म्हणून घेत

विवाहप्रसगी पित्यानें आपली मुलगी वस्त्राभरणांनीं भूषित करून बहुल्यावर घेऊन जावें, तदनतर होमहवन होई, नतर कांहीं वेळानें वराबरोबर वधूचें लग्न लावण्यांत येई या विवाहप्रकाराशिवाय प्रीतिविवाह, कन्येबद्दल कांही मोबदला घेऊन तिचे वराशीं लग्न लावून देणे, इत्यादि विवाहप्रकारही प्रचलित होते

सपिंडामध्यें लग्नें होत नसत मुलगी उपवर झाल्यानतरच तिचा विवाह करण्यांत येई ऋतुप्राप्तीनतर तीन वर्षेपर्यंत विवाहविधीचा काळ मुलींच्या बाबतींत गणला गेला होता

मनूचें शास्त्र काव्यात्मक रूपानें पुढे येऊ लागलें त्यास मनूचें धर्मशास्त्र असें म्हणत राजाचे स्वामित्व ज्या जमिनीवर असेल त्यापासून राजास उत्पन्न असें हें उत्पन्न कराच स्वरूपाचे होतें गुराढोराची वाढ व सोन्याच्या व्यापारावर शेकडा दोन टक्के कर बसत असे जमिनीच्या उत्पन्नाचा सहावा, आठवा अगर बारावा हिस्सा कराचे रूपानें द्यावा लागत असे त्या वेळीं उत्पन्नाच्या मानानें बहुतेक मोठमोठ्या कारखान्यांवर निरनिराळे कर बसत असत ग्रामपंचायती प्रत्येक ठिकाणी स्थापन झाल्या होत्या, त्या पचायतींकडे गांवांतील लोकांच्या तंट्याबखेड्याचा निकाल देण्याचा अधिकार असे. हा निकाल आरोपी आणि फिर्यादी हे दोन्ही पक्ष मान्य करीत असत. शिल्पकलेस अत्यंत मान होता व त्या कलेची वृद्धि करण्याकडे काळजीपूर्वक लक्ष दिले जाई शेतीकडेही अत्यंत काळजीनें लक्ष पुरविण्यांत येत असे व कृषिकर्मविद्येकडे जनसमाजाचा चांगलाच ओढा होता.

पराशरतंत्र नांवाचा ग्रंथ या काळींच लिहिला गेला असून त्यांत भूगोलासंबंधीं सुंदर माहिती आहे. बौद्धकाळांत ज्योतिषशास्त्रावर ग्रंथरचना करण्यांत येऊन पूर्वी-

पेक्षां त्याची जास्त वाढ झाली ज्योतिष शास्त्रावर जी ही ग्रंथरचना झाली, त्या बहुतेक ग्रथाचे कर्ते क्षत्रियच होते हा एक त्यामधील विशेष आहे. वैद्यकशास्त्रांतही तत्कालीन क्षत्रियांची बरीच प्रगति झाली होती ग्रीक लोकांना सर्पदंश होत असत त्या वेळीं क्षत्रियांकडून ते औषध घेत चरक व सुश्रुत यांनीं त्या काळीं वैद्यकशास्त्रावरील ग्रंथ रचना केली त्या वेळीं Oxcide of copper, oxcide of iron, Oxcide of tin, Oxcide of zinc, Oxcide of lead, Sulphuret of iron, Sulphuret of copper, Sulphuret of antimany, Sulphuret of arsenic, Sulphate of copper, Sulphate of zinc, Sulphate of iron, Diacetate of copper, Carbonates of lead and Carbonates of iron यांचा उपयोग औषधी प्रकारांत सर्रास करीत असत त्या वेळीं शस्त्रक्रिया ही अत्यंत उन्नतावस्थेप्रत पोंचली होती त्या वेळीं शस्त्रक्रिया करून मुतखडा (अश्मरी) याचें निरसन करीत व प्रसंग पडल्यास त्याच क्रियेनें गर्भाशयांतून गर्भ बाहेर काढीत यावरून Surgery ही त्या काळीं केवढी सर्रास सुरू होती हें दिसून येतें. शस्त्रक्रियेकरितां वापरण्यांत येणाऱ्या हत्यारांची एकशेंसत्तावीस प्रकारानें विभागणी केलेली तत्कालीन ग्रंथांतून आढळून येते

त्या वेळीं बौद्धधर्माची प्रगति वर्धिष्ण्वावस्थेस जात होती हें त्या कालास बौद्धकाल हें नांव पडल्यावरूनच ध्यानांत आल्यावांचून राहात नाहीं बौद्ध धर्माविषयीं विवेचन मधल्या प्रकरणांतच केलेलें आहे



प्रकरण दहावें

# विदर्भदेश आणि क्षत्रिय राजघराणीं



**१. विदर्भांत क्षत्रियांचें आगमन**—दक्षिणभागीं आर्यक्षत्रियांनीं प्रथम विदर्भ प्रांतातच आपली वसति केली दक्षिण हिंदुस्तानात सर्वांत जुना देश म्हटला म्हणजे विदर्भ देश हा होय दक्षिणभागीं क्षत्रियाची वसति होण्यापूर्वी विंध्य पर्वताचे योगानें त्यांचे आगमनाची गति कुंठित झाली होती तेव्हां अगस्ति ऋषीनें तो मार्ग मोकळा करून देऊन विंध्य पर्वत ओलांडून दंडकारण्यांत वसतीचा प्रारंभ केला. विदर्भ देश त्या वेळी दंडकारण्यांतच गणला जात असे. अजूनही "दण्डकारण्ये देशे गोदावर्याः उत्तरे तीरे" असा उच्चार धार्मिक नित्यकृत्यांचे वेळीं करण्याची रूढि प्रचलित आहे. विदर्भांत चांगली वसति झाल्यावर मात्र पश्चिमेकडील भागास विशिष्ट प्रकारच्या दंडकारण्य या नांवानें सबोधीत असत या वेळीं विदर्भास देशाचें स्वरूप आले होतें वऱ्हाडांत एक मोठें राजकुल नांदत असतांना व देशाची अत्यत भरभराट झाली असतांना सुद्धां पश्चिमेकडील भाग रामायणभारतकालींही अरण्यमयच होता. विदर्भ देश व दंडकारण्य शब्द एकाच वेळीं उपयोगांत आणलेले पोथ्यापुराणांतून आढळून येतात. यावरून दंडकारण्य हा भाग अरण्यमय असतांना विदर्भांत क्षत्रियांचें आगमन झालेले असावें.

वऱ्हाडांत क्षत्रियांचें आगमन सातपुड्याचे पूर्वेकडून झाल असावें. सातपुड्यास पूर्वी पुष्कळ ठिकाणीं विंध्य म्हटलें आहे. हल्लींच्या विंध्यास* परियात्र असें नांव होतें.

विदर्भाची राजधानी कुंडिनपूर ही पूर्व बाजूस आहे. व पयोष्णीच्या कांठचीं तीर्थेंही

---

* भारतवर्ष भूवर्णन, पान ५१०.

त्याच विभागाकडे आहेत सालबर्डी, देऊरवाडा, मार्कंडेय, भांदक, भोजकट वगैरे प्राचीन अशीं पवित्र मानलेलीं स्थलेंही त्याच विभागीं आहेत वर्धा नदीचे पूर्वेस विदर्भाचें अर्धे राज्य होतें अगस्तीनें कुजर पर्वतावर आपला आश्रम बांधला तेव्हां क्षत्रियांनीं तेथील लोकांस आपल्या धर्माची दीक्षा दिली, त्यांना आपलें अंकित केले व त्यांच्यावर स्वामित्व मिळविलें त्या वेळी क्षत्रियांनी विदर्भी राज्यस्थापनाही केली अगस्ति हा क्षत्रियांच्या क्षात्रतेजावर बहाल खूष होऊन त्याच्या आश्रयानें दक्षिणेत आला होता अगस्तीची पत्नी लोपामुद्रा ही विदर्भीय राजाची मुलगी असल्यामुळें अर्थातच तिची सर्व व्यवस्था आणि रीतिरिवाज राजाश्रयामुळें राजशाही थाटाचे असत हें सांगावयास नकोच

**२. विदर्भ देशाचीं नांवें**—विदर्भास कैशिक, क्रथकैशिक, भोज, भोजकट, महाराष्ट्र, वर्धातट इत्यादि नावांनी निरनिराळ्या काळीं संबोधण्यांत येई * हीं नांवे पडण्याची कारणें काय असावींत याचें दिग्दर्शन पुढें करावयाचें आहे, पण तत्पूर्वी एवढी गोष्ट मात्र लक्षात ठेवली पाहिजे की, या सर्व नांवापेक्षा विदर्भ हे या प्रदेशाचें नांवच जास्त प्रचलित असून शिष्टसंमत आहे

विदर्भ राजाने येथें प्रथम राज्यसंस्थापनकार्य केलें या प्रदेशास म्हणून त्या राजाच्या नांवाने संबोधितात असें एकमत आहे पुढे कैशिक नावाच्या राजानें राज्य केले म्हणून त्यासच कैशिक असे नाव पडलें असल्याचे सांगतात तदनतर क्रथ आणि कैशिक या दोन भावानीं आपला अमल चालविला म्हणून त्यासच क्रथकैशिक असे नांव पडलें अशी आख्यायिका आहे भोज या वंशातील राजानें राज्य केलें तेव्हा त्यासच भोज असे नांव पडले म्हणतात आणि भोजकट असें नाव विदर्भास पडण्याचे कारण रुक्मी राजानें विदर्भात भोजकट हे शहर वसविले होतें व त्यास आपल्या भोज घराण्याचें त्यानें अन्वर्थक असे ‡भोज+कटक=भोजाची राजधानी, हे नांव दिलें होतें असे म्हणतात महाराष्ट्रदेश हें नाव पूर्वी विदर्भासच लावीत असत हल्लीं महाराष्ट्र या नांवाच्या कक्षेंत जास्त विस्तृत विभाग येतो तसा तो पूर्वी विदर्भाच्या कक्षेतच येत असे विदर्भ हा देशच जेव्हा विशेष विस्तृत झाला तेव्हां त्यास अन्वर्थक असें महा+राष्ट्र=† मोठें राष्ट्र, असें नांव देण्यांत आले महाराष्ट्र आणि विदर्भ ही दोन्ही नांवें एकाच स्थलाचीं वाचक आहेत

---

* काळेकृत वऱ्हाडचा इतिहास

‡ भोज+कटक—भोजकट (?) असा ओढून अर्थ लावीत बसण्यापेक्षां भोज+कट= भोजकट, म्हणजे **भोज** राजाची **हद्द** जेथपर्यंत होती तो विभाग, अशी अन्वर्थक व्युत्पत्ति भोजकट या शब्दप्रयोगाची असणें संभाव्य आहे **कट** म्हणजे **हद्द** असा शब्दप्रयोग शेंकडों शब्दप्रकारांत आढळून येतो उदाहरणार्थ—चौ+कट='चौकट' इ०

**† On account of its great size the Country (विदर्भ) was also called Maharashtra. (आपटे संस्कृत कोश, पान ११९६.)**

बालरामायण* नामक नाटक जें राजशेखर कवीनें लिहिले आहे, त्या नाटकांतून विदर्भ आणि महाराष्ट्र हे शब्द समानार्थानेंच जागजागी वापरलेले आहेत रामचंद्र, सीता आणि सुग्रीव हे जेव्हां लंकेवरून अयोध्येस गेले असा भाग दाखविण्यांत येतो, तेव्हां राम आणि सुग्रीव यांचें संभाषणांत विदर्भ ऊर्फ महाराष्ट्र याचे नाव अनेक वेळां वापरलेले दिसून येतें सुग्रीव जेव्हा रामास सांगतो की,

**" भरताग्रजायमग्रे महाराष्ट्रविषयः । "**

म्हणजे, " भरताग्रजा रामा ! पाहा आता पुढे महाराष्ट्र देश लागला ! "

सुग्रीवाचें हे सागणे मनावर घेऊन रामचद्र त्याचीच विशेष स्पष्टीकरणानें सीतेजवळ पुनरुक्ति करू लागले ते म्हणाले.—

**" सोऽयं सुभ्रु परो विदर्भविषयः सारस्वती-जन्मभूः । "**

म्हणजे, " सीते ! हा पाहा, विद्येचे माहेरघर असा विदर्भ ! "

श्रीरामचद्राचे हे सांगणे लक्षांत घेऊन सीता म्हणू लागली —

**" यत्रोत्पन्ना मे पितामहश्वशुरस्य गृहिणीन्दुमति ? "**

म्हणजे, " जेथे माझ्या आजे सासूबाई इंदुमती यांचा जन्म झाला तो ( देश ) ? "

यावरून विदर्भ तोच महाराष्ट्र देश अशी महाराष्ट्राची स्पष्ट घटना दिसून येते

मुरारि कवीच्या ‡अनर्घराघवातही महाराष्ट्राचे वर्णन अशाच एका प्रसगी केले आहे त्या वर्णनात असा उल्लेख आहे का,—

**" इदमग्रे महाराष्ट्रमण्डलैकमण्डन कुंडिनं नाम नगरम् । "**

म्हणजे, " आता पुढे **महाराष्ट्राची राजधानी** जे **कुडिननगर** म्हणजे **कुंडिनपूर** ते आहे "

यावरूनही **कुडिनपूर** ज्या महाराष्ट्राची राजधानी होते ते महाराष्ट्र **विदर्भ देशच** होय असे स्पष्ट होते कुडिनपूर ही राजधानी विदर्भाचीच होती हें इतिहासविख्यातच आहे

दुसरे असे की, महाभारतामध्ये 'महाराष्ट्र' हा शब्दप्रयोग आढळून न येता विदर्भ हा शब्दप्रयोग मात्र अनेक ठिकाणी आढळून येतो यावरून त्या काळी महाराष्ट्र हा देशविस्तारदर्शक शब्दप्रयोग रूढ नव्हता असे वाटते कारण आसपासच्या प्रदेशांचा म्हणजे दडकारण्य, अजिठयाचा पश्चिमभाग अश्मक, कलिंग, अपरान्त म्हणजे कोंकण, यांचा उल्लेख महाभारतांतून आढळून येतो तसाच विदर्भासबधाने उल्लेख महाभारतांत केलेला आहे, परंतु महाराष्ट्र ही सज्ञा मात्र त्यावेळीं विदर्भास दिली गेली नसावी त्यानंतर ती संज्ञा विदर्भास दिली गेली विदर्भ आणि महाराष्ट्र हे जर भिन्नभिन्न देश असते तर ती दोन्ही नावें तत्कालीन वाङ्मयांत निरनिराळ्या प्रदेशासबधीं वापरलेलीं दिसून यावयास पाहिजे

---

* बालरामायण, १०—७४

‡ अनर्घ—अक ४ व ५ वि० ज्ञा० वि०, पुस्तक ४९, पान ६३

होतीं, परंतु तसेंही आढळून येत नाहीं, आणि म्हणूनच विदर्भ देश तोच महाराष्ट्र देश असें पुन्हाही ध्वनित होतें

काही काळपर्यंत हीं दोन्ही नावें प्रचारात चालतां चालतां पुढे महाराष्ट्र हे देशाच्या गधिष्ठ्यावस्थेचे द्योतक नावच प्रयुक्त असल्याने तेंच चिरपरिचित झालें त्याच्यांतच पुढे पश्चिमभागाच्या समुद्रापर्यंतच्या लहान लहान देशविभागाचा अंतर्भाव झाला अलंकार-शास्त्रामध्यें ज्या रीति उल्लेखिलेल्या आहेत त्यांपैकीं एका पद्धतीचें नांव " वैदर्भी **ऊर्फ** महाराष्ट्री " असें दिलेलें आहे त्या नावातील **ऊर्फ** या शब्दाच्या योजनेवरून विदर्भ तोच महाराष्ट्र हे अगदींच स्पष्ट होतें

विदर्भाची भाषा व संस्कृति ज्या भागापर्यंत पसरलेली असेल त्या भागापर्यंत महाराष्ट्र देश विस्तारला गेला होता हे उघडच आहे वऱ्हाडातील बुलढाणा जिल्ह्यातील शिंदखेडच्या लखुजी **जाधवांची कन्या जिजाबाई–स्वराज्यसंस्थापक शिवाजीमहाराजांची आई**–इचा जन्म वऱ्हाडातच झाला शहाजी राजे हे मूळचे वेरूळचे जहागीरदार, दादोजी कोंडदेव म्हणजे शिवाजीला लिहिणें शिकविण्याकरितां ठेवलेला पंतोजी ऊर्फ मास्तर याचें मूळचें गाव बुलढाणा जिल्ह्यांतील देऊळगांवराजा हें होय शिवाजीचे आईबाप आणि पंतोजी हे सर्वच वऱ्हाडात जन्मास आले आणि म्हणूनच अफाट अशा महाराष्ट्राचें म्हणजे **मराठा-क्षत्रियांच्या राज्याचें बीज** वैदर्भांत आहे ही गोष्ट निःसंदेह आहे

आता वर्धातट या विदर्भाच्या प्रतिनामासंबधानें विचार करावयाचा म्हणजे वर्धा तट हे नांव विदर्भास दिलेलें कोणत्याही महत्त्वाच्या वाङ्मयात आढळून येत नाही वर्धातट या नावाचा उल्लेख ऐनेअकबरींत फक्त आढळून येतो अबुलफजल यानें वऱ्हाड सुभ्याचें वर्णन देताना वऱ्हाडचें जुनें नाव वर्धातट होतें असें उल्लेखिलेलें आहे याशिवाय इतर कोठेंही वर्धातट हे नाव आढळून येत नाहीं आणि म्हणूनच या नावास वाङ्मयदृष्ट्या काही किंमत प्राप्त होऊ शकत नाही नाही म्हणायला एके ठिकाणीं वर्धा नदीस विदर्भा असें नाव दिलेलें मात्र आढळून येतें तो प्रकार असा—

" **वीरपुरुषं* तदेतद्वरदातटनामकं महाराष्ट्रम् ।**
**दक्षिणसरस्वती सा वहति विदर्भा नदी यत्र ॥** "

अर्थातच, विदर्भा ऊर्फ वर्धा हीं जर एकमेकाचीं पर्यायनावेंच असली, तर वर्धातट असा शब्दप्रयोग केला काय, आणि विदर्भतट असा शब्दप्रयोग केला काय, तो समानार्थी म्हणून क्षम्य करता येईल परंतु उच्च वाङ्मयदृष्ट्या विचार करतां मात्र वर्धातट हा शब्द भाषाशास्त्रास साजेसा दिसत नाहीं अबुलफजलचीच ती योजना !

'विदर्भ' शब्दाची व्युत्पत्ति प० तारानाथ तर्कवाचस्पति यांनीं आपल्या " वाचस्पत्यम् " ग्रंथांत निराळ्याच प्रकारानें लाविलेली आहे ते म्हणतातः " विगता दर्भा,

* नलचंपू, ६–६६

कुशा यतः " म्हणजे जेथून दर्भ म्हणजे गवत नाहीसें झालें होते तो देश विदर्भ होय. विदर्भ देशाची अशी व्याख्या करण्यात विदर्भ देश हा लागवडीस तयार असणारा देश अशा पर्यायार्थाने या व्युत्पत्तिकारानें ही व्युत्पत्ति लाविली आहे ‡.

विदर्भ देशासच हल्लीचें प्रचलित व सर्वसामान्य असें नाव वऱ्हाड प्रांत असें आहे हे नाव विदर्भास का पडले असावें याबद्दल निरनिराळ्या प्रकारांनी तर्क करतात

श्रीकृष्णाचे लग्नाचे वेळी विदर्भात जी वऱ्हाडी मंडळी म्हणजे लग्नाचे वऱ्हाड आले होतें ते येथेच स्थित झालें आणि म्हणून विदर्भास वऱ्हाड असें नाव प्राप्त झाले असावें असा एक तर्क आहे हा निव्वळ तर्कच म्हणून चालणार नाही, तर या तर्कात भाषाशास्त्र-दृष्ट्या अस्तिपक्षाचा मुद्दाही विशेष स्पष्ट प्रकारे ध्वनित होत आहे लग्नप्रसंगीं वराकडून जो **बाजारबुणग्यांचा** समुदाय येत असतो त्यास 'वऱ्हाट' असे म्हणतात हे सर्व-विश्रुतच आहे या 'वऱ्हाड' शब्दाची व्युत्पत्ति अशी लावितात की, वऱ्हाड म्हणजे **वराच्या** हाडामासाची अर्थातच वराची आप्तस्वकीय जी मंडळी, ती वर+हाडी= वऱ्हाडी मंडळी होय म्हटलेलेही आहे की,—

वऱ्हाड* नोहे वरहाड आहे ।
अत्यादरा सर्वचि पात्र आहे ।।

'वऱ्हाड' शब्दाची ही व्युत्पत्ति एक प्रकारची झाली दुसरी एक व्युत्पत्ति 'वऱ्हाड' शब्दाची अशी लावतात की, **वर+हाट**=वऱ्हाड, म्हणजे **वराकडून** जो **हाट** लग्न प्रसंगी येतो तें 'वऱ्हाट' होय वर म्हणजे नवरा मुलगा, आणि त्याच्याकडून लग्नप्रसंगी जो **हाट** म्हणजे **बाजार**बुणग्याचा समुदाय येतो तो, अशा अर्थानें 'वऱ्हाड' शब्दाची व्युत्पत्ति लावितात **'हाट'** हा शब्द समुदायवाचक असून तसा तो व्यवहारात वापरला जातो जसें 'बाजार**हाट** झाला' ! " दामूशेटी **हाटा** गेला, नैवेद्य पाठविला नामासंगें।।" इ० .. 'वऱ्हाड' शब्दाचा अपभ्रंश 'वऱ्हाड' सहज होतो.

---

* रुक्मिणीस्वयंवर

‡ विदर्भ हे नाव राजाच्या नावावरून पडल्याचे स्पष्ट आहे परंतु 'विदर्भ' शब्दाची व्युत्पत्तीच जर लावावयाची असेल तर 'वि' म्हणजे विशेष, आणि दर्भ म्हणजे हरळी; अर्थातच **वि+दर्भ** म्हणजे विशेष हरळी आहे जेथे तें ठिकाण, म्हणजेच **सुपीक प्रदेश** अशी 'विदर्भ' शब्दाची स्पष्ट व्युत्पत्ति लावतां येते वि+वाद=विवाद, वि+पाक= विपाक, वि+नय=विनय, वि+नम्र=विनम्र, इत्यादि शब्दप्रयोग भाषेंत रूढ असून 'वि' म्हणजे विशेष असा अर्थ त्यांत अभिप्रेत आहे पं० तारानाथ तर्कवाचस्पति यांनीं **'वि'** या शब्दाचा अर्थ **'नष्टत्व'** असा सिद्ध करून दाखविण्याकरितां " विगता दर्भा. कुशा. " असा भला लांबलचक'न्याय' गृहित धरला आहे, तो आमचे मतें निरर्थक होय. सुपीक जमिनींतच विशेष दर्भ उगवत असल्याचा सिद्धान्त कृषिकर्मशास्त्राने मान्य केला आहे, इकडे विशेष लक्ष देण्यासारखें आहे —ग्रंथकर्ता.

वऱ्हाड्यांवरून 'वऱ्हाड' हा देशवाचक शब्द बनलेला असावा अगर 'वऱ्हाड' या देशावरून लग्नमंडळीस ते नांव पडले असावें असा सशयात्मक हा प्रश्न आहे परंतु थोड्या सूक्ष्म दृष्टीने विचार करतां, लग्नमडळीवरूनच 'वऱ्हाड' हा शब्द अमलांत आला असला पाहिजे असा अस्तिपक्ष उद्भवतो आणि म्हणूनच विदर्भ देशास वऱ्हाड हे नांव पडले असावें

**३. विदर्भ राज्याचा विस्तार**—विदर्भ देशाच्या विस्ताराचा ठोकळ मानाने विचार केला असता असे म्हणावे लागतें की, उत्तर दिशेस नर्मदेपासून तों दक्षिणेस कृष्णेपर्यंत म्हणजे कुतल देशास हा विदर्भ प्रदेश लागून होता

" विदर्भ* The modern Berar, a great kingdom in ancient times lying to the north of Kuntala and extending from the banks of the Krishna to about the banks of the Narmada On account of its great size the country was also called Maharashtra "

गोदावरीचे दोन्ही तीरावरील लोक स्वत.स विदर्भीय असे म्हणवून घेत असत मालविकाग्निमित्रातील कथानकात वर्धेच्या पूर्वेकडील अर्ध राज्य एका भावास व पश्चिमेकडील अर्ध राज्य एका भावास याप्रमाणे वाटणी केलेली आहे. यावरून पूर्वेस नागपुरा पलिकडे म्हणजे जेथपर्यंत मराठी भाषा बोलण्यात येते, तेथपर्यंत विदर्भाची मर्यादा होती असे सिद्ध होते ( घटोत्कच लेणे Arch survey W I VoIX ) वऱ्हाडातील वाकाटकाचे राज्याची पश्चिमसीमा अजिंठ्याच्या पश्चिमेस होती असे अजिठ्याच्या लेण्यापैका एका शिलालेखावरून सिद्ध होते ( गुप्तकालीन शिलालेख शिवणी न० ५६ आणि गुप्तकालीन शिलालेख चमक, ता० एलिचपूर न० ५६ ) यावरून वऱ्हाडाची पश्चिम मर्यादा अजिठ्यापर्यंत म्हणजे हल्लीच्या हद्दीच्या थोडी पश्चिमेस गेली होती त्या पलिकडे अश्मक देश होता खानदेशातील काही भाग वऱ्हाडात येत होता यानतर वऱ्हाडच्या राज्याचे दोन विभाग झाले उत्तरेस अमरावती व दक्षिणेस प्रतिष्ठान ( पैठण ) ह्या राजधान्या झाल्या तदनतर वऱ्हाडचे केंद्र देवगिरी ( दौलताबाद ) हे बनले हल्ली देवगिरी वऱ्हाडच्या दक्षिणहद्दीजवळ आहे, पण पूर्वी मध्यवर्ती राजधानीचे शहर होतें आणि त्या राज्याची सीमा उत्तरेस सातपुड्यापर्यंत होती

**४. विदर्भाचें राजकुल**— वऱ्हाडातील हे राजघराणे यदुवशीय अर्थात् सोमवशी होतें यदुवशाच्या अनेक शाखा होत्या. त्यांत भोज नांवाची एक शाखा होती या भोज शाखेचे क्षत्रिय अवति मध्यदेशापर्यंत आले होते महाभोज, कुतिभोज वगैरे घराणी तर प्रसिद्धच होती. अवति व मध्यदेशाच्या भोजांनीं श्रीकृष्णाच्या वृष्णिकुलास हटवून पश्चिमेकडेस द्वारकेपर्यंत पिटाळले होते भोज, महाभोज व श्रीकृष्ण हे सर्व चंद्रवशी† यादव होते

---

* cf B. R. 10—74 Apte's Sanskrit Dictionary p. 1195.

† महाभारताचा उपसहार, पृष्ठें ३७३–७४

याच भोजांपैकीं एका शाखेनें विंध्य पर्वताचे दक्षिणेस राज्य स्थापिलें या यादव वंशांत विदर्भ नांवाचा राजा होता. तोच विदर्भाचा मूळचा सस्थापक होता त्याचे नावावरून या प्रांतास विदर्भ हें नांव पडले. विदर्भाच्या बापाचेंच नांव यादव* असें होतें विदर्भाच्या बायकोचे नांवही भोजा असें आढळतें त्यानें विदर्भा नांवाची नगरी वसवून ती आपली राजधानी केली. विदर्भा नगरीचें दुसरे नाव कुडिनपूर अथवा कौंडण्यपूर असें आहे. हल्लीं हें गांव याच नांवानें प्रसिद्ध असून चांदूर तालुक्यांत वर्धेच्या कांठीं आहे कुडिन अथवा कौंडिण्य‡ ऋषीच्या नावावरून या नगरास हें नाव दिलेले असावें बृहदारण्यकोपनिषदात विदर्भी कौंडिण्य म्हणून एका ऋषीचे नाव आहे तोच हा असावा कौंडिण्य हें चंदवशापैकीं नागवशाचें एक गोत्र आहे कौंडिण्यऋषि हा क्षत्रिय राजऋषि होता.

दुसऱ्या एका आधारावरून ऋषभदेव नामक भरतखडाच्या राजानें अजनाभवर्ष म्हणजे भरतखड याचे नऊ भाग करून ते आपल्या नऊ पुत्रास वाटून दिले त्या पुत्रांच्या नांवावरून देशांस नांवें पडली कुशावर्त, ब्रह्मावर्त, इलावर्त, हीं अशींच नांवें आहेत त्यांतच विदर्भ नामक एक पुत्र होता त्यास जो देश मिळाला त्याचें नांव विदर्भ असें पडलें याला 'नऊ¶ खड पृथ्वी आणि दहावे खड काशी' असें पुराणातरीं वर्णितात.

विदर्भाच्या राजघराण्याची वशावळ जमविणे कठिण आहे, परतु त्यांतील प्रसिद्ध व उपलब्ध नावे खालीं दिली आहेत यांत कालानुक्रम साधण्याचा प्रयत्न केला आहे; परतु वशावळ त्रोटक आहे

विदर्भानतर काही पिढ्यांनीं भीमराजा झाला. त्याचा पुत्र दक्ष, त्याचा वशज बृहद्भानु, हलधर, सुशील, पद्माकर, रिपुमर्दन, चित्रसेन, भीम, रुक्मागद...भीम (दमयतीचा पिता), दम (भाऊ दांत, दमन), भोज (पहिला म्हणजे इंदुमतीचा भाऊ) वगैरे झाले.

त्याच वशात पुढें कांहीं पिढ्यानी क्रथ आणि कैशिक हे दोघे भाऊ झाले क्रथाचा पुत्र अशुमान, कैशिकाचा भीष्मक, भीष्मकाचा प्रसिद्ध रुक्मि (रुक्मिणीचा भाऊ) रुक्मीच्या पुढील पिढ्या प्रसिद्ध नाहींत चपूरामायणाचा कर्ता भोज§ याच वशांत होऊन गेला असावा.

**५. विदर्भीय राजकुलाचे शरीरसंबंध**—विदर्भांतील राजकुलाशीं भरतखडांतील अत्यत सुप्रसिद्ध राजकुलांचे सबध झालेले आहेत. या राजकुलाशी शरीरसंबंध होणें ही गोष्ट× श्लाघ्य समजली जात असे. विदर्भांतील राजकन्या, वीरपत्नी व वीरमाता या नात्यानें विशेषत्वाने दृष्टीस पडतात उदाहरणार्थ, लोपामुद्रा† ही विदर्भ

---

* हरिवश–विष्णुपर्व, अ. ५९

‡ बृह., अ २ ब्रा ३, काणेकृत वि०ज्ञा०वि०, पुस्तक ४३, पृष्ठ ४८२.

¶ भागवत, स्कंद ५, अ २-२०; भारतवर्ष भूवर्णन, पान ६

§ हरिवंश-विष्णुपर्व, अ. ५९, गणेशपुराण–उत्तरखंड, अ. १९–२१.

× तं श्लाघ्यसंबधमसौ विचिन्त्य। रघुवश, ५–४०

† भांडारकरकृत दक्षिणचा प्राचीन इतिहास, पान ३.

देशच्या राजाची मुलगी व अगस्ति ऋषीची पत्नी होती त्या राजास ही कन्या अगस्ति ऋषीच्या वरप्रसादाने झालेली होती ती उपवर होतांच अगस्तीने तिजविषयी मागणी घातली राजानेही ती त्यास दिली यावरून लोपामुद्रा हिला रुक्मिणी, दमयती, याच-प्रमाणे† वैदर्भी, विदर्भजा, विदर्भराजकुमरी असे ठिकठिकाणी म्हटलेले आहे केशिनी§ हीही विदर्भराजकन्या होती रघुकुलाचा मूळ पुरुष सगर याची ती पत्नी होती दमयती ही भीम राजाची मुलगी होती म्हणून तिला भैमी असेही म्हटलेले आहे भीम-राजास अपत्य नसल्यामुळे त्याने दमन नामक ऋषीची सेवा केली त्याच्या कृपेने त्यास दम, दात, दमन हे तिघे पुत्र व दमयती ही कन्या झाली या ऋषीच्या नांवावरूनच त्यांची नावे ठविलेलीं आहेत दमयतीने स्वयवरात निषध देशाच्या नलराजास वरिलें, याचे कथानक नलचम्पू, नलोपाख्यान वगैरे ग्रथास आधारभूत झाले आहे इदुमति† ही कुडिनपूरच्या भोज राजाची बहिण होती हिने स्वयवरात अयोध्येच्या रघुकुलातील राजपुत्र अज यास वरिले हिचा पुत्र श्रीरामचद्राचा पिता जो दशरथ राजा तो होय स्वर्गातून फुलांचा हार अगावर पडल्यामुळे ही मरण पावली म्हणतात हिचे स्वयंवराचा, मृत्यूचा व अजविलापाचा प्रकार अत्यत हृदयगम व करुणारसपूर्ण रीतीने कालिदासानें रघुवंशात वर्णिला आहे¶ रुक्मिणी देवी ही कैशिक राजाची नात व भीष्मक राजाची कन्य होती हिला प्रत्यक्ष लक्ष्मीचा अवतार म्हणत असत तिचें स्वयवर करण्याचे ठरविल्यानतर श्रीकृष्ण कुडिनपुरास आले श्रीकृष्णास स्वत.चें राज्य नसल्यामुळे स्वयवराचे वेळीं राज-मडळांत त्यांचा अपमान होईल, म्हणून क्रथ–कैशिकांनी आपले सर्व राज्य देऊन त्यास राज्याभिषेक केला अशी कथा हरिवशांत आहे‡

भीष्मक राजाचा पुत्र रुक्मि हा फार बलाढय व पराक्रमी होता द्रुम नामक ऋषी-पासून दिव्यास्त्रांची व परशुरामापासून ब्रह्मास्त्राची त्यानें प्राप्ति करून घेतली होती परतु स्वभावानें हा अत्यत उर्मट असून खुद्द भीष्मक राजा त्यास भीत असे त्यानें आपली बहिण रुक्मिणी हिला चेदि देशाचा ( जबलपुराजवळील प्रदेशाचा ) राजा शिशुपाल यास देण्याचें ठरविले होतें परतु खुद्द रुक्मिणीची इच्छा श्रीकृष्णास वरण्याची होती तिनें आपल्या जासुदाच्या हातानें श्रीकृष्णास पत्रिका पाठविली कीं, "मीं मनोभावे तुम्हांस वरिलें आहे. तरी तुम्हीं येऊन मला घेऊन जावें" रुक्मिणी ही कुडिनपूरच्या नगरा-बाहेरच्या अबेच्या दर्शनास कुलनेमाप्रमाणे गेली असता, श्रीकृष्णाने सैन्यासह येऊन तिला रथांत घालून तिचें हरण केले ही देवी म्हणजे उमरावतीच्या तटाबाहेरची देवी होय असें म्हणतात

रुक्मिणीस श्रीकृष्णानें नेल्याबद्दल रुक्मीस अत्यत क्रोध चढला त्यानें अशी

---

† आपट्यांचा संस्कृत कोश, पान ९७४

§ रामायण बालकाण्ड, सर्ग ३८

‡ हरिवश–वि प., अ० ५०

¶ रघुवंश, सर्ग ६.

प्रतिज्ञा केली कीं, "श्रीकृष्णास पराभूत करून रुक्मिणीस घेऊन येईन तरच कुंडिनपुरास परत येईन"

अशी प्रतिज्ञा करून तो सैन्यासह श्रीकृष्णाचा पाठलाग करीत गेला, व त्यास गांठलें त्यांची लढाई होऊन श्रीकृष्णानें त्याचा पराभव करून त्याची दाढी मिशी काढून विरूप करून सोडून दिले 'ही लढाई* नर्मदेपार झाली' असे वर्णन आहे, परंतु उमरावती जिल्ह्यांत दाढी नदी व दाढी गांव आहे, तेथें ही लढाई झाली व त्यावरूनच हीं नांवें पडली अशी आख्यायिका असून तिच्यात सत्यांश दिसतो

आपली प्रतिज्ञा पूर्ण करून घेण्याचा डाव साधला नाहीं म्हणून मानी स्वभावाचा रुक्मि कुंडिनपुरास गेला नाही अलीकडेच भोजकट नावाचें नवीन नगर वसवून तेथेंच तो राहिला पुढे हीच विदर्भाची राजधानी झाली भीष्मक मात्र कुंडिनपुरासच राहिला परतु पुढे कुंडिनपूरचे महत्त्वच कमी होत गेले विदर्भाचा वंश भोजशाखेपकीं होता हें मागें आलेच आहे यावरून भोजकट हे नाव कसे पडलें याचाही खुलासा मागें झालेलाच आहे वऱ्हाडात सुप्रसिद्ध भोज घराण्यांचीं राज्ये होतीं मथुरा, मगध व विदर्भ येथील कंस, जरासंध, भीमक हे भोजकुलातील प्रसिद्ध राजे होत कदंब करवीरचे शिलाहर हे भोजकुलातीलच होते. या भोजकुलाचाच पुढें अपभ्रंश होता होता भोजाचे–भोजले–भोसले असा शब्दविपर्यास झाला तेच कुळ हल्लीचे भोसले कुळ होय

उमरावती जिल्ह्यातील भातकुली हे गाव पूर्वीचे भोजकट होते असे मानण्यात येते येथें रुक्मीचें एक देऊळ आहे त्यावरून या गोष्टीस पुष्टि येते पुढे विदर्भास भोजकट हें देशवाचक नाव पुष्कळ दिवस चालू होते

कृष्णानें रुक्मीचा पराभव केल्यानतर त्याने गंधमादन पर्वतावर जाऊन तपश्चर्या केली तपश्चर्येनंतर महेंद्र नामक शिवाचे अस्त्र त्यानें मिळविले तो फार बलाढ्य होऊन त्यानें पुष्कळ राजास जिंकून आपले राज्य वाढविले पांडव-कौरव युद्धात¶ हा पांडवांतर्फे लढत होता

पांडवदिग्विजयाचे वेळी दक्षिणेस सहदेव आला होता रुक्मि व भीष्मक यांच्याशीं सहदेवाचे दोन दिवस युद्ध झाले त्यांस जिंकून सहदेव वेणातटाच्या राजावर गेला ही वेणा म्हणजे हल्लीची वाइनगगा होय कृष्णवेण्णा मात्र निराळी आहे

या सहदेवाच्या युद्धासबंधीं महाभारतात असा उल्लेख आहे की,—

**‡ ततोरत्नान्युपादाय पुरं भोजकटं ययौ ।**
**तत्र युद्धमभूद्राजन् दिवसद्वयमद्भुतम् ॥ ११ ॥**
**स विजित्य दुराधर्षं भीष्मकं माद्रिनंदनः ।**
**कोसलाधिपतिंचैव तथा वेणातटाधिपम् ॥ १२ ॥**

---

* हरिवंश–विष्णु०, अ० ५९ ६०
¶ महाभारत–उद्योगपर्व, अ १५८, वैद्यकृत महाभारताचा उपसंहार, पान ३७४.
‡ सभापर्व, अ० ३१

**सुराष्ट्रविषयस्थश्च प्रेषयामास रुक्मिणे ॥**
**राज्ञे भोजकटस्थाय महामात्राय धीमते ।**
**भीष्म काय स धर्मात्मा साक्षादिंद्र सखाय वै ॥**
**स चास्य प्रतिजग्राह ससुतः शासनं तदा ।**
**प्रीतिपूर्वं महाराज वासुदेवमवेक्ष च ॥**

याचा तात्पर्यार्थ असा आहे कीं, सहदेव पुढें भोजकटास येऊन त्यानें भीष्मक व रुक्मि यांच्याशी दोन दिवसपर्यंत घोर सग्राम केला आणि तेथें विजय प्राप्त झाल्यावर पुढें वेणातटाच्या राजाकडे वळला तो सुराष्ट्र ( गुजराथ ) देशात असता त्यानें भीष्मक व रुक्मि याना निरोप पाठवून बोलावून घेतले आणि त्याच्याजवळून करभार घेऊन त्यांना प्रीतिपूर्वक रीतीनें निरोप दिला आतां आपण पुढील शरीरसबधांचा विचार करू

शुभांगि, ही रुक्मीची कन्या होती तिचें स्वयवरप्रसगीं कृष्ण व रुक्मिणीचा पुत्र प्रद्युम्न हेही आले होते या स्वयवरप्रसगीं शुभांगीनें प्रद्युम्नासच माळ घातली, आणि प्रद्युम्न हा रुक्मीचा जावई झाला श्रीकृष्ण आणि रुक्मि याचे वैरत्व पुढें नाहींसें होऊन ते व्याही झाले मामाच्या मुलीशी लग्न करण्याची वहिवाट विदर्भात अजूनही आहे रुक्मि हा प्रद्युम्नाचा मामा होता कारण प्रद्युम्नाची आई रुक्मिणी आणि रुक्मिणीचा भाऊ रुक्मि होय

रुक्मावती ही रुक्मीच्या मुलाची मुलगी होती म्हणजे ती रुक्मीची नात लागत होती तिला प्रद्युम्नाचा पुत्र अनिरुद्ध यास दिली होती रुक्मावती ही अनिरुद्धास देण्याबद्दल आपल्या भावाजवळ म्हणजे रुक्मीजवळ रुक्मिणीने मुद्दाम मागणी घातली होती रुक्मीनेंही आपल्या बहिणीचे म्हणणे मोडलें नाहीं, व अनिरुद्धास आपली नात खुषीनें दिली याप्रमाणें पुढे पुढे त्यांचीं नाती दृढसबधित होत गेल्यामुळें त्याच्यामधील पूर्वीचा द्वेष नाहींसा झाला अनिरुद्धाचें लग्न मोठें कडाक्याचें झालें श्रीकृष्ण, रुक्मिणी, बलराम व आणखी अनेक पाहुणेमडळी यांना रुक्मीनें पुष्कळ दिवसपर्यंत मोठया आग्रहानें ठेवून घेतलें होतें

एकदां बलरामाशीं रुक्मि द्यूत खेळत असता, अनभिज्ञ बलरामदादा नेहमीं हरत असत आणि रुक्मि व त्याच्या गोटातील मडळी बलरामाचा उपहास करून मोठमोठयानें हंसत असत या प्रकारामुळें बलरामदादा भयकर चिडून गेले होते अखेर बलरामदादाला मोठया प्रयासानें एक डाव जिंकण्यास मिळाला परंतु त्या वेळींही रुक्मीनें मध्येंच गडबड करण्यास सुरुवात केली, व 'हाही डाव मींच जिंकला' असें तो प्रतिपादन करू लागला या वेळीं बलरामास अनावर क्रोध येऊन तो रुक्मीस पकडण्याकरिता धांवला त्यानें रुक्मीस धरल्यावर आपापसांत बरीच बाचाबाची होतां होतां अखेर प्रकरण माराठोकीवर गेलें आणि या मारामारींत रुक्मि ठार झाला

हें प्रकरण जेव्हां श्रीकृष्ण, रुक्मिणी इत्यादिकांना माहीत झालें, तेव्हां त्यांना मनस्वी दुःख झालें बलरामदादांसही कृतकर्माबद्दल भयंकर पश्चात्ताप झाला, परंतु कोणाचाच

झाल्या प्रकारास इलाज नसल्यानें अखेर सर्व स्थिरस्थावर झालें. रुक्मीनंतर हा वंश विदर्भांत पुढें बरेच दिवस राज्य करीत होता परंतु पुढील राजवशावळ उपलब्ध नाहीं. तदनंतर बऱ्याच दिवसांनीं भोज नावाचा क्षत्रिय राजकवि मात्र या वशांत होऊन गेला

**६. शिलालेख व ताम्रपट**— वऱ्हाडसबधीं जास्त महत्त्वाचे लेख म्हटले म्हणजे चमक व शिवणी येथील ताम्रपट हे होत एलिचपूरच्या दक्षिणेस सात मैलावर चमक म्हणून एक गांव आहे तेथें इ० सन १८६८ मध्ये एका शेताची जमीन नागरण्याचें काम चालू असता एका शेतकऱ्यास एक ताम्रपट सांपडला तो ताब्याच्या जाड पत्र्यावर कोरलेला असून प्रत्येक तुकडा साडेसात इच लांब आणि साडेतीन इच रुद असा होता असे सात तुकडे एका जाड कडीत अडकवून कडी मजबूत केलेली होती हा ताम्रपट त्यावेळच्या एलिचपूर जिल्ह्याचे डेप्युटी कमिशनरसाहेब मे० स्पॅन्स्की यांनीं मिळवून मुंबईचे डॉ० वुइल्सन् याच्याकडे पाठविला त्यातील मजकूर खालीलप्रमाणे आहे

"‡ ॐ स्वति प्रवर पुरात वाकाटकनाम् परम माहेश्वर महाराज श्रीप्रवरसेनस्यः वचनात् भोजकट राज्ये मधुनदीतटे चर्माक नामग्राम· राजमाणिक भूमिसहस्रैरष्टाभि ( ८००० ) शत्रुघ्न राजपुत्र कोंडराज विज्ञा"त्या नाना गोत्र चरणेभ्यो ब्राह्मणेभ्यः सहस्राय दत्तः"

अर्थः—"प्रवर पुराहून हुकूम देण्यांत येतो कीं, वाकाटक कुळातील प्रवरसेन यांच्या हुकुमावरून शत्रुघ्नराज याचे पुत्र कोंडराज याचे विनतीवरून भोजकट प्रातातील मधुनदीच्या काठचे चर्माक नावाचें गाव त्याखालील सरकारी मापाने ८००० मापें जमिनीसह निरनिराळ्या गोत्रांच्या पुढील एक हजार ब्राह्मणास दान दिले आहे"

**७. देवगिरीचें राज्य**—देवगिरीचे यादव घराण्यापैकीं रामदेवराव यादव इ० सन १३०९ मध्ये मरण पावला त्याचा मुलगा शकरदेव यास काफूर यानें इ० सन १३१२ मध्यें मारून त्याचे राज्य आपल्या राज्यास जोडले त्यानतर बऱ्याच कालानें लुकजी ऊर्फ लखुजी जाधव उदयास आले यमुनेच्या काठी करौलि नांवाचें गाव आहे तेथें यदुवशीय रजपुत राजा अजून आहे हें सस्थान पाच लक्षाचें आहे त्या राजघराण्यापैकीं लुकजीचे पूर्वज भूतोजी हे होत भूतोजी हे पित्यावर रुसून निजामशाह पादशहाचे वेळीं दक्षिणेंत आले या जाधव घराण्याचा व भोसले घराण्याचा सुप्रसिद्ध इतिहास जगजाहीर आहे

**८. वऱ्हाडचे राजवंश**— वऱ्हाडच्या राजवशासबंधीं विचार करतां स्थूल मानानें असें प्रत्ययास येतें कीं, इ० सनाच्या पहिल्या दोन तीन शतकांत वऱ्हाड प्रांत प्रथम मौर्य व नतर शातवाहन—शालिवाहन या आंध्रवंशीय राजांच्या ताब्यांत होता, तिसऱ्या शतकापासून सहाव्या शतकापर्यंत वाकाटक नावाचे सेनवंशीय राजे वऱ्हाडांत

---

‡ चमक, जि० उमरावती येथें सांपडलेला ताम्रपट.
हा ताम्रपट इ०सनाच्या ४३० वर्षाचे सुमारास लिहिला आहे.

आले त्यानतर पहिल्या चालुक्य राजाचे ताब्यांत वऱ्हाड प्रांत गेला त्यापुढे राष्ट्रकूट राठोड, महाराष्ट्र ऊर्फ मराठे, दुसरे चालुक्य आणि यादव याच्या ताब्यांत वऱ्हाड गेले

वऱ्हाडावर कोणत्या वेळी कोणत्या राजघराण्यांनी आपली सत्ता प्रस्थापित केली होती, हे स्थूल मानानें खालील कोष्टकांत दिलेले आहे

## वऱ्हाडचें राजवंशदर्शक कोष्टक

| नं क्र | सुरू काल | अखेर काल. | राजवंशाचे नांव. |
|---|---|---|---|
| १ | रामायण काल इ० सनापूर्वी ३००० पासून | महाभारत काल प० इ० सना पूर्वी १२८० | सूर्य व चद्रवशी राजे दमयतीचा बाप भीमक राजाचे कारकीर्दीपर्यंत |
| २ | भारत काल इ० सनापूर्वी १२०० पासून | बौद्धकालापर्यंत इ० सनापूर्वी ५१० | महाभोज, भोज इत्यादि चद्रवशी राजे |
| ३ | बौद्धकाल इ० सनापूर्वी ५०० | मध्यकाल इ० सनाच्या प्रारभापर्यंत | वल्लभी, अशोक, पवार, प्रतिहार, चव्हाण इ० क्षत्रिय राजवश |
| ४ | १ ले शतक | ४ थे शतक | आंध्र, चालुक्य हे क्षत्रिय राजवश |
| ५ | ४ थें शतक | ५ वे शतक | गुप्तवश, बलवश इ० क्षत्रिय राजवश |
| ६ | ५ वे शतक | ६ वे शतक | वल्लभीवश मौर्य, कदब इ० क्षत्रिय राजवश, |
| ७ | ६ वे शतक | इ० सन १०५८ | चालुक्य कुल |
| ८ | इ० सन १०५९ | ,, ,, ११९३ | जैनराजा इल व त्याचे वशज एलिचपूर |
| ९ | ,, ,, ११९४ | ,, ,, १३१२ | देवगिरीचे जाधव, क्षत्रिय चद्रवशी |
| १० | ,, ,, १३१३ | ,, ,, १३५१ | खिलजी घराणे |
| ११ | ,, ,, १३५२ | ,, ,, १४८२ | ब्राम्हणी मुसलमानी राज्यें |
| १२ | ,, ,, १४८३ | ,, ,, १५७२ | इमादशाही |
| १३ | ,, ,, १५७३ | ,, ,, १५९६ | अहमदनगरची निजामशाही |
| १४ | ,, ,, १५९७ | ,, ,, १७१७ | दिल्लीचे मोगल व सातारचे भोसले क्षत्रिय |
| १५ | ,, ,, १७१८ | ,, ,, १८०४ | नागपूरचे भोसले ६० व हैद्राबादचे निजाम ४० या दोघाचा अमल ( दो अमली साठ चाळशी राज्य). |
| १६ | ,, ,, १८०५ | ,, ,, १८५३ | हैद्राबादचे निजाम |
| १७ | ,, ,, १८५३ | हल्लीं चालू | इंग्रज सरकार |

**९. हल्लींचा वऱ्हाड प्रांत**—हल्ली हा प्रांत नागपूर प्रांतास इ० सन १९०५ चे सप्टेंबर महिन्यापासून जोडला आहे Central province & Berar अशा सयुक्त नांवानें हल्लीं त्याचा राज्यकारभार चालू आहे शंभर वर्षांचे करारानें निजाम

सरकारकडून इंग्रज सरकारनें वऱ्हाडचा पट्टा इ० सन १९०५ मध्यें करून घेतला. त्याचे मालकीबद्दल दरसाल निजाम सरकारास उक्त पंचवीस लाख रुपये देण्याचें ठरविलें आहे. याचा राज्यकारभार गव्हर्नरचे मुख्य अमलाखालीं चालतो. इ० सन १९२१ पासून वऱ्हाडला स्वराज्याचे हक्क मिळाले असून कायदेकौन्सील नेमण्यांत आलें आहे. उमरावती अकोला, बुलढाणा व यवतमाळ हे चार जिल्हे वऱ्हाडमध्यें आहेत. वऱ्हाड, नागपूर प्रांतास जोडण्यापूर्वी वरील चार जिल्ह्यांशिवाय एलिचपूर आणि वाशीम मिळून एकंदर सहा जिल्हे होते.

वऱ्हाडची एकंदर लोकसंख्या अठ्ठावीस लाख असून क्षेत्रफळ सत्तावीस हजार पांचशें चौरस मैल आहे. अठ्ठावीस लाख लोकसंख्येपैकीं सुमारें चोवीस लाख हिंदु आहेत. त्यांत ऱ्याह्यात्तर हजार ब्राह्मण असून सात लक्ष एक्याण्णव हजार क्षत्रिय मराठा समाज आहे.



# प्रकरण अकरावें

# दक्षिणेकडील द्रविड देशांतील क्षत्रियांचा विस्तार आणि शककर्ते क्षत्रिय

**१. दख्खनची सीमा**—नर्मदेच्या दक्षिणतीरापासून महानद समुद्रापर्यंतच्या भागास पुराणांत दक्षिण देश ऊर्फ दख्खन म्हणत असत त्यात १ द्रविड देश, २ कर्नाटक ऊर्फ कानडा, ३ तैलंगण ऊर्फ आंध्र देश, ४ गोंडवण, ५ महाराष्ट्र असे पांच भाग आहेत त्यांची मर्यादा अनुक्रमवार खालीलप्रमाणे

## मर्यादा

**१ द्रवीड देश**—रामेश्वरापासून मद्रासचे उत्तरेकडील प्रांतापावेतोंचा प्रदेश

**२ कर्नाटक देश**—विंध्याद्रीच्या पूर्वेपासून सह्याद्रिपर्वताच्या पश्चिमपर्यंत मध्यभागीं वसती आहे, तोच कर्नाटक

**३ तैलंगण ऊर्फ आंध्र देश**—विंध्याद्रीचे उत्तरेकडील महाराष्ट्र देश व माजरा नदी या दोहोंच्या मध्यभागाचा प्रदेश—द्रविडदेशच्या उत्तरेपासून ओरिसा प्रांतापर्यंतचा प्रदेश.

**४ गोंडवण**—तैलंगणापासून महानदीपर्यंत नागपूर प्रांतासुद्धां गोंडवण होय

**५ महाराष्ट्र**—चांदोराजवळ कोलिंवणपासून बागलाण, खानदेश, वऱ्हाड ऊर्फ विदर्भ, गंगातीर, कृष्णातीर, भीमरथीतीर, पंचगंगातीर, सातपुडा व महाराष्ट्री ऊर्फ मराठी भाषा जेथपर्यंत चालते तेथपर्यंतचा प्रदेश

वरील पांच भाग मिळून दक्षिण देश ऊर्फ दख्खन होय, असा पुराणांतरीं दाखला सांपडतो यांपैकीं नं० २।३।४।५ या चार भागांत **क्षत्रियांचीं राज्यें** सुमारें २५०० वर्षांपूर्वी होतीं पण अगदीं थेट दक्षिणेंत म्हणजे रामेश्वराजवळच्या द्रवीड देशांत त्यांचा प्रसार झाला होता किंवा नाहीं, याचा निर्णय करणें अत्यावश्यक आहे

भाषेच्या दृष्टीनें पाहिलें तर महाराष्ट्रांत मुख्यत. मराठी ऊर्फ महाराष्ट्रीय भाषा चालते दोन अपवाद खेरीज करून आग्नेयीच्या आंध्र प्रांतांत हल्लीं तेलगु भाषा चालते, नैर्ऋत्य भागांत कानडी भाषा चालते द्रविड देशात द्राविडी भाषा म्हणजे तामील, मल्याळी व म्हैसुरी आणि कानडी ह्या भाषा चालतात महाराष्ट्र पूर्वी अरण्यमय असून तेथें मूळच्या रहिवाशांची वसती तुरळक होती यालाच पुराणांतरीं जनस्थान असें म्हटलेलें आहे. तेथें आर्यांनीं प्रथम वसाहत केली आणि मूळच्या थोड्या रहिवाशांवर आपला अमल व आपली भाषा प्रस्थापित केली यापुढें असे प्रश्न उपस्थित होतात कीं, [१] आंध्रप्रांतात व दक्षिण महाराष्ट्रांत म्हणजे कानडी प्रांतांत आर्यक्षत्रियांचा प्रसार झाला

किंवा नाहीं ? [२] झाला असल्यास ते थोडे होते कीं काय, व त्यामुळेंच त्यांच्या भाषेचा अमल बसला नाहीं काय ! [३] याचेही दक्षिणेकडे म्हणजे खुद्द द्रविड देशांत ते गेले किंवा नाही आणि गेले असल्यास केव्हां गेले व किती गेले ? या प्रश्नांचा उलगडा आतां करूं.

भारतीय ग्रथांत दक्षिणतम् अशा पांडवांचा वारवार उल्लेख येतो त्यांचा महाभारतांत आणि कात्यायनाच्या वार्तिकांत प्रामुख्यानें उल्लेख आहे मेगॅस्थनीस याने त्यांचा जो उल्लेख केला आहे त्यावरून असें दिसतें की, त्यांचा संबध मथुरा व श्रीकृष्ण यांच्याशीं आहे म्हणजे मेगस्थनीसच्या व महाभारताच्या पूर्वीच §क्षत्रियांचा प्रसार थेट कन्याकुमारीपर्यंत झाला होता त्यामुळेंच आर्यधर्म आणि आर्यसस्कृति यांची छाप कायमपणे द्रविड देशावर बसली होती परतु थेट दक्षिणेस हे क्षत्रिय थोडे असल्याने त्यांचा पगडा भाषेवर बसला नाहीं महाराष्ट्रांत वसाहत करून राहिलेल्या अनेक रट्ट राजांना चद्रगुप्ताचा पुत्र बिंबिसार यान जिंकून आपले राज्य कृष्णेच्याही दक्षिणेकडे वाढविले त्याचा पुत्र अशोक याने बाकी राहिलेला कलिंग देश जिंकला, आणि अशोकाचें राज्य याप्रमाणे सर्व हिंदुस्तानभर पसरले पण द्रविड देशाचा दक्षिणभाग त्यांतून वाचला होता दक्षिणमहाराष्ट्र ( कानडी महाराष्ट्र ) म्हणजे कुतल आणि आंध्र देश क्षत्रियांनी मौर्यापूर्वीच व्यापिले होते असें दिसते कारण हे दोन्ही देश उत्तरेकडील आर्यक्षत्रिय व मिश्रआर्य याच्या यादीत महाभारतात आहेत. मौर्यांनीं म्हणजे क्षत्रियाच्या दुसऱ्या टोळीने या पलीकडेही प्रसार करून आपलें साम्राज्य स्थापिले नतर तेथे लहान लहान क्षत्रिय–माडलिक राज्ये निर्माण करण्यात आली त्यांची मर्यादा पूर्वेकडे पेन्नार नदीपर्यंत आणि पश्चिमेस हल्लींच्या म्हैसूरपर्यंत होती एस् कृष्णस्वामी अयगार यांनी नुकतेच 'दक्षिणेच्या इतिहासाचा प्रारभ' या नांवाचें एक पुस्तक इग्रजींतून प्रसिद्ध केलेलें असून त्यात ते सर व्हिन्सेट् स्मिथ् यांचे मत मान्य करून म्हणतात, "अशोकाच्या साम्राज्याची दक्षिण सीमा पूर्वेकडील पेन्नार नदीच्या मुखापासून म्हणजे नेलोरच्या जरा उत्तरेपासून पश्चिमेकडच्या समुद्रकिनाऱ्यावर कल्याण-पुरी नदीच्या मुखापर्यंत वाढली एकूण सुमारें उत्तर अक्षांश १४° पर्यंत हल्लींच्या तुलुव म्हणजे प्राचीन सत्तियपुत्त लोकाच्या उत्तर मर्यादेपर्यंतची ओळ मानता येते" ही मर्यादा प्राचीन लेखाच्या पुराव्यानें सिद्ध होते, एवढेच नव्हे तर प्राचीन तामील कवीच्या ग्रथांच्या परिशीलनानेही हीच अशोकसाम्राज्यसीमा निश्चित होते किंबहुना पूर्वेस थोडीशी हिच्याही दक्षिणेस जाते, असे कृष्णस्वामी लिहितात, कारण तामीलसघम् कवि तामील देशाची मर्यादा पुलिकतपर्यंतच म्हणजे नेलोरच्या दक्षिणेसही दाखवितात. याप्रमाणे हा क्षत्रियांचा प्रसार इ० सनापूर्वी ६०० पासून इ० सनापूर्वी २५० पर्यंत म्हणजे अशोकाच्या साम्राज्याच्या वेळेपर्यंत होऊन मौर्यानतर हेंच साम्राज्य शुग, काण्व

§ महाभारत व कात्यायनाचे वार्तिक

आणि आंध्रभृत्य शातवाहनाकडे गेले त्याचेही इ० स०च्या पहिल्या शतकापर्यंत एवढ्या मुलुखावर साम्राज्य राहिलें या नतर क्षत्रियांनीं आणखीही दक्षिणेस इ० सनाच्या पहिल्या शतकात, बहुतेक तामीलसघम कवीच्याच काळांत चालू केली असे त्याच्या ग्रथावरून दिसून येतें असें कृष्णस्वामी अयगार आपल्या पुस्तकांत लिहितात पूर्वेस पांडवाच्या राज्यात "पोडियरहिल "पर्यंत प्रसार होऊन तेथे एका प्रसिद्ध पाड्य राजानें आर्यांचा पराभव केला, असे सदर कवीने वर्णन केलें आहे पश्चिमेस कोशर नामक लोकांनीं तुलुवांत घुसून तन्नव राजाचा पराभव केला याप्रमाणें कोंकणामध्यें घाटावर व घाटाखालीं क्षत्रियांचा प्रवेश इ० सनाच्या पहिल्या शतकात झाला असें दिसतें कोंकण नाव महाभारताचे यादींत दक्षिणेकडच्या लोकांत आहे अर्थात् कोंकणात क्षत्रियाची सत्ता त्या वेळी नव्हती ती यावेळी झाली

याप्रमाणे इसवी सनाच्या पहिल्या शतकापर्यंत क्षत्रियांच्या दक्षिणेकडील द्रविड देशातील प्रसाराचा त्रोटक इतिहास असून आश्चर्याची गोष्ट त्यात दिसते ती ही की, पेन्नार किंवा तिरुपतीपर्यंत पूर्वेस व सुमारे भटकलपर्यंत पश्चिमेस द्रविड मुलुखात क्षत्रिया चा अमल बसला, इतकेच नव्हे तर आर्यभाषेचाही पगडा त्या मुलुखावर बसला होता म्हणजे आर्यक्षत्रियाची वसती सख्येनें इतकी मोठी होती कीं, त्यानीं आपली भाषा तेथें कायम ठेवली कृष्णस्वामी अयगार आपल्या पुस्तकात लिहितात की, या प्रदेशास तामील कवीनीं 'वडकर मुने' असे नाव दिलें होते इतकेच नव्हें, तर त्या प्रदेशास 'मोळी पेयरतम' असेंही म्हटले आहे अयगारांच्या पुस्तकांत 'वडकर मुने' याचा अर्थ 'उत्तरे च्या लोकाच्या राज्याची मर्यादा' असा केलेला आहे आणि 'मोळी मेयरतम्' याचा अर्थ 'जेथें बोललेली भाषा बदलते' असा केलेला आहे अर्थात् पेन्नारच्या उत्तरस क्षत्रियांचें राज्य लागतें, इतकेंच नव्हें तर तामील भाषा बदलून आर्यभाषा किंवा अन्य-भाषा लागते, असें इसवी सनाच्या पहिल्या शतकांतील तामील कवींनीं लिहून ठेवलेलें आहे कोसर लोकास वड, वडुकर=उत्तरेचे उत्तर लोक, वब वडुकर=नवीन औदिच्य लोक, असें नांव याच्या काव्यातून दिले आहे हे वडुकर म्हणजे आर्यक्षत्रियच असेंही त्या ग्रंथांत स्पष्ट म्हटलेलें आहे पोडियर हिल्जवळ पांड्यांनीं आर्यांचा पराभव केला असें म्हटलें आहे, अर्थात् हे वडुकर म्हणजे औदिच्य लोक क्षत्रिय आर्यच होत ही गोष्ट नि सदेह स्पष्ट आहे

'द्रविड देशावरील आर्यांच्या स्वाऱ्या' या भागाच्या उपसहारांत एस् कृष्णस्वामी अयंगार आणखी पुढें म्हणतात, "ह्या स्वाऱ्या पश्चिम घाटाच्या बाजूनें बऱ्हाणपूर अशिर-गडावरून नेहमींच्या रस्त्यानें दडकारण्यास वळसा घालून झाल्या या अनुमानाला पोषक प्रमाणें दोन आहेत तीं हीं कीं, [१] तामील कवींनीं पुलिकतच्या उत्तरेकडील प्रदेशास परभाषेचा मुलुख असें म्हटलें आहे, आणि [२] दंडकारण्य हा तामील कवीचा शब्द आहे. हा आर्यांचा प्रदेश आहे असें त्यांनीं मान्य केलेलें आहे

'इ० सनाचा प्रारभ' यांत अयंगार म्हणतात, "तामील देशाची उत्तर सीमा पश्चिमेकडे

तुलु देशांतील तन्नव राजा आणि पूर्वेकडे वेंगाडम् (तिरुपति) येथील पुली यांनीं सांभाळली होती याच्या उत्तरेस आर्यांचा (वडुकरांचा) देश आणि पलीकडे दडकारण्य तात्पर्य, प्राचीन तामील वाङ्मयावरून असें दिसतें कीं,—इ० सनापूर्वी २५० पासून इसवी सनाच्या पहिल्या शतकापर्यंत दक्षिण देशापैकीं पुलिकत पूर्वेस व भटकल पश्चिमेस येथ-पर्यंतचा प्रदेश आर्यक्षत्रियाच्या सत्तेखालीं असून येथें आर्यभाषा प्रचलित होती

एस् कृष्णस्वामी अयगार यानी 'साउथ इडियाच्या इतिहासाचा प्रारभ' हा ग्रथ लिहिला आहे याच्या सिद्धान्ताला प्राचीन लेखावरून पुष्टि मिळते. या प्रदेशांत सांपडलेल्या प्राचीन लेखांवरून असे दिसते की, इसवी सनाच्या पहिल्या शतकापासून चवथ्या–पाचव्या शतकापर्यंत येथील लेखाची भाषा महाराष्ट्री–मराठी प्राकृत आहे, आणि या प्रदेशावर वैदिकधर्मा मराठा क्षत्रिय राजे राज्य करीत होते डुब्रल नामक फ्रेंच शोधकानें नुकताच प्रसिद्ध केलेला 'दख्खनचा प्राचीन इतिहास' या ग्रथात या प्राचीन राजांची माहिती दिलेली आहे प्रथम लेख जगण्यापेठ (कृष्णा जिल्हा) येथील स्तूपावरील होय. इक्ष्वाकु कुळाचा म्हणजे सूर्यवशी श्रीरामचद्राच्या कुळाचा माढरीपुत्र श्रीवीर पुरुष-दत्त या राजाचा उल्लेख आहे हा लेख* प्राकृत म्हणजे मराठींत—महाराष्ट्रीत आहे यातील अक्षरें इ० सनाच्या तिसऱ्या शतकातील दिसतात. जर †ते लोक मराठी भाषा वापरीत नसते तर हा स्तूपावरील शिलालेख मराठींत लिहिला गेला नसता हें उघडच आहे

दावणगेरी येथील शिलालेखात× केकय लोकाचा उल्लेख असून हे लोक इक्ष्वाकूशीं विवाहसबध करीत होते असें दिसते जयवर्म्याचाही एक लेख सापडलेला आहे त्या-वरून कुडूर (कृष्णा जिल्हा) येथें बृहत्फलायन+ गोत्री राजे राज्य करीत होते असें दिसतें हे अर्थातच आर्यक्षत्रिय होते याचा हा लेख पुराणप्राकृत असून याची भाषा आणि लिपी गौतमीपुत्र शातकर्णी व वसिष्ठीपुत्र पुलुमायी यांच्या नाशिक येथील शिलालेखाशीं इतकी जुळती आहे कीं, या दोन आध्र राजांच्या कालानतर लवकरच हा लेख लिहिला गेला असावा.§

बृहत्फलायन हें गोत्र असून त्या प्राचीन काळीं क्षत्रियांचीं कुलनामें उत्पन्न झालीं नव्हतीं ते गोत्रनामानेंच ओळखले जात होते

यानतरचा लेख प्राकृत साळकायनांचा होय हेही गोत्रनामच होय पेडुवोंगि येथें यांचा ताम्रलेख सांपडला असून वीरदेववर्मन् साळकायन यानें केलेलें हें दान आहे रामतीर्थम् येथे सांपडलेल्या दानपत्रांतऽ व इतर दोन तीन लेखांत विष्णुकुडिन राजांचा उल्लेख आहे.

---

* इंडिया आंटि० ११, पृष्ठ २५६.

† डुंब्रेल-फ्रेंचसंशोधक यांचा दख्खनचा प्राचीन इतिहास, पृष्ठ ८३.

× Ep Curn XI P. 161. दावणगेरीचा शिलालेख.

\+ जयवर्माचा लेख व नाशिकचा शिलालेख.

§ एपि० इंडिया ७, पान ३१५.

ऽ एपि० इंडिया ११, पान १३४.

हे अनेक वैदिक यज्ञ करणारे होते, असें त्यांच्या मराठी लेखात वर्णिलें आहे विष्णुकुंडिन या नांवासबंधानें डुब्रेल यांना गूढ पडलें आहे आमच्या मतें साळंकायनाप्रमाणे हेंही गोत्रनाम असावें 'गोत्रप्रवर मजरी' ग्रंथात दिलेल्या गोत्रांच्या अकार विल्हेच्या यादींत हें नांव सांपडत नाहीं, परतु गोत्रनामें अनंत आहेत आणि कित्येक लुप्त झालीं आहेत असें धर्मशास्त्र ग्रथात लिहिलें आहे

पल्लवाचे जुने लेख मराठींत आहेत हे प्रसिद्धच आहे शेवटीं वनवासीचे कदब यांचेही प्राचीन लेख मराठींत आहेत या पल्लवाचे गोत्र भारद्वाज व कदबाचें गोत्र मानव्य असें याच्या शिलालेखात दिलेलें आहे याप्रमाणे द्रविड देशाच्या उत्तर प्रांतात जेथे हल्लीं कानडी व तेलगु भाषा चालतात तेथे इ० सनाच्या पहिल्या शतकात ७ क्षत्रिय राजांचीं राज्यें असून त्यांचे महाराष्ट्रीत असलेले लेख उपलब्ध आहेत ते बहुतेक लेख वैदिक धर्माभिमान्याचे आहेत, (प्रथम तेवढा एक बौद्धाचा लेख आहे) तेव्हा ते सस्कृतात असावयास पाहिजे होते, परतु ज्या अर्थी ते प्राकृतात आहेत त्या अर्थी या वेळी बहुजन-भाषा प्राकृत–महाराष्ट्री–असावी असे अनुमान निघते हीच गोष्ट त्या वेळच्या तामील कवींच्या ग्रथातही स्पष्टपणे नमूद करून ठेवलेली आहे या प्राकृत लेखावरून विचार करता हे लेख क्षत्रियाचे आहेत असे स्पष्ट होते जग्गय्या पेठेतील प्राकृत लेखांत कमकाहे असा शब्द आहे म्हणजे कमकराष्ट्र याअथा तो शब्द आहे, आणि देशवाचक राष्ट्र हा शब्द महाराष्ट्रीयाचाच आहे तेच बहुधा देशास या राष्ट्र नामाने सबोधीत असत महाराष्ट्र, मल्लराष्ट्र, गोपराष्ट्र, पाडुराष्ट्र अशी नावे प्रसिद्ध आहेत देवराष्ट्र हे नांव समुद्र-गुप्ताच्या लेखात नाशिकच्या आसमतातील भागास उद्देशून योजिलेले आहे तसेच कमकठ हेंही नांव आहे

दुसरे असे की, या लेखात अत्तपो या शब्दाबद्दल मराठी शब्द वापरलेला आहे बृहत्फलायनाच्या लेखात 'बृहत्फलायन सगोतो' असा शब्द आहे 'अम्हे पाणि अम्हे' असेही शब्द आहेत शिवाय 'स्कद स्द्रार्यस्य' या सस्कृत शब्दाबद्दल 'खड रुड्जस' हा मराठी शब्द आहे मराठींतील खडोबा हा स्कद देवतेचा मराठी आकार आहे हे प्रसिद्धच आहे पण आर्याबद्दल अज्ज–आजा असा आकार मराठींत आहे हा लेख तैलंगणांतील असून तेथे हल्ली आर्याबद्दल अय्य, अय्या असा आकार होतो हेंही प्रसिद्धच आहे साळकायनांच्या लेखांत अश्वमेधादि यज्ञ केल्याचा उल्लेख स्पष्ट आहे यातून 'बप्प' शब्द आलेला आहे हा शब्द मुख्यत महाराष्ट्रीयांचा आहे याचेंच रूप 'बाप' असें आहे याप्रमाण या लेखाच्या भाषेवरून अनुमान निघते कदब म्हणजे कदम, पल्लव म्हणजे पालवे, नल याचे नलवाडींतील नलवडे हे मराठे शहाण्णव कुळीत आहेतच

याप्रमाणे महाराष्ट्रातील क्षत्रियाचे हल्लींचे वशज मराठे क्षत्रिय, व तैलंगणातील व कानड्यांतील क्षत्रियांचे वशज हे एकच आहेत असे ठरते येथे इ० सनाच्या पहिल्या ते तिसऱ्या शतकापर्यंत महाराष्ट्रीय–प्राकृत भाषा बोलली जात होती पांचव्या शतकांत पल्लवांनीं तामील देशांत चाल करून कांची येथे पल्लवराज्य स्थापित केले तेथें पल्लवांच्या

अमलांत सातव्या शतकांत मध्य हिंदुस्तानची भाषा बोलत असत. यावरून विचार करतां द्रविड देशाच्या उत्तर भागांत इ० सनाच्या पहिल्या शतकापासून क्षत्रिय राज्यें प्रस्थापित झालेलीं असून मराठी भाषेचीही तेथें ओळख झालेली होती असें दिसून येतें. या सिद्धान्ताचें समर्थन एकंदर हिंदुस्तानाच्या प्राचीन इतिहासाच्या पर्यालोचनानें होण्यासारखें आहे विशेषत· कर्नाटक प्रातासंबधाने चांगले पुरावे मिळतात यावरून मराठ्यांचे प्राचीन पूर्वज आणि कर्नाटक्यांचे प्राचीन पूर्वज एकच ठरतात

जरासधाने अठराव्यानें मथुरेवर चाल केली, तेव्हां विवादूच्या सांगण्यावरून श्रीकृष्ण दक्षिणेकडे यादवांकडे निघून गेला होता दक्षिणेकडच्यीं चार राज्यें चार* नागकन्यांपासून यदूला झालेल्या चार पुत्रांनीं वसविलीं होतीं, असे सांगितलेले आहे † हे चार पुत्र मुचकुद, पद्मवर्ण, सारस व हरित हे होत बापाच्या आज्ञेने त्यांनीं चार राज्यें विंध्याच्या दक्षिणेकडे स्थापिली मुचकुदानें नर्मदातीरावर माहिष्मति व पूरिका ही शहरे वसविलीं पद्मवर्णानें सह्याद्रीच्या पृष्ठभागावर वेणानदीच्या काठीं करवीर नगर स्थापिले या राजास पद्मवत म्हणतात सारसानें त्याच्याही दक्षिणेस वनांत क्रौंचपूर नगर वसविलें याच्या भोवतालचा प्रदेश ताबडया मातीचा असून सुपीक आहे या तांबडया मातीच्या देशास वनवासी असें म्हणतात हरितानें समुद्रकिनाऱ्यावर नवीन राज्य स्थापिलें तेथें समुद्रांतून मोत्यें काढतात. व्यापारी लोक तेथून रत्नांची ने आण करीत असतात म्हणून त्या राज्यास रत्नद्वीपही म्हणतात वनवासी प्रांतातील वरिष्ठ लोक क्षत्रिय यदुवशाचे होते हा वनवासी देश मौर्यांच्या अंमलाखाली होता त्या वेळींही अर्थातच अनेक क्षत्रिय घराणी वनवासी देशांत येऊन राहिलीं होतीं 'म्हैसूर आणि कुर्ग' ग्रथात राइस यांनीं दक्षिण महाराष्ट्र व म्हैसूरचा उत्तरभाग याला कुतल अशीं सज्ञा दिली ही सज्ञा विजयानगरचे राजेही आपल्या लेखांत वापरीत या कुतलात मौर्यांचा अमल होता, इतकेंच नव्हें तर नदांचाही तेथें अमल होता असे शिलालेखाधारें स्पष्ट होतें दुसऱ्या शिलालेखाच्या आधारें भद्रबाहू, जैन आचार्य आणि चंद्रगुप्त या प्रांतांत शेवटीं येऊन राहिले होते असें स्पष्ट होतें यासबधींचे शिलालेख श्रवण बेळगोळ येथें प्रसिद्धच आहेत

मौर्यानतर शुगादि राजांची सत्ता कुतलावर अथवा वनवासीवर राहिली यात नवल नाही शेवटचे सार्वभौम आंध्रभृत्य, शातवाहन यांचीही येथें सत्ता होती असें दिसतें म्हैसूरचे हल्लींचे राजे आपणांस शालिवाहनाचे वंशज म्हणवून घेतात शातवाहनांचें साम्राज्य त्यांच्या नाशिक येथील शिलालेखावरून इ० सनाच्या दुसऱ्या शतकाच्या अखेरपर्यंत राहिलें असें मानतां येईल शातवाहनांच्या साम्राज्यानतर त्याचे निरनिराळे मांडलिक राजे स्वतंत्र झाले तिसऱ्या व चवथ्या शतकांत येथें कदब राजे राज्य करीत होते त्यांचे जे अनेक शिलालेख सांपडलेले आहेत ते या प्रांतांतीलच आहेत मळवली येथील स्तभाच्या दोन्ही

---

* नाग म्हणजे सर्प असा अर्थ नव्हे शिशुनाग, वीरनाग असिनाग ही पदवी नांवापुढें जोडणाऱ्या राजे लोकांना नागवंशी असें म्हटलें आहे

† हरिवंश, वि. अ. ३७–३८.

बाजूवर दोन लेख आहेत. हे दोन्ही लेख मराठीत आहेत, ही गोष्ट विशे
ठेवण्यासारखी आहे. या दोन्ही लेखांत मिति बौद्ध तऱ्हेची आहे त्या वेळेस मौ
होता. म्हणूनच हा बौद्धप्रचार सुरू झाला. तो दोन शतकें राहिल्यानतर शातव
काळांत आणखीं दोन शतके राहिला तेव्हां तोच लोकांच्या अगवळणी होता
वाहन बौद्धधर्मानुयायी होते शातवाहनानंतर जीं राज्यें झालीं, ती आर्यवै
झालीं यांत शका नाहीं तरीपण मागील परिपाठ पुढें चालू राहिला

याशिवाय भारतीय ज्योतिषाची पुनर्घटना इ० सनाच्या पांचव्या शतका
तेव्हापासून पुढे महिने आणि शुद्ध-कृष्णपक्ष पुढे साहजिकच चालू झाले संस्कृ
लेखाकरितां उपयोगात येऊ लागली, परतु तोंपर्यंत महाराष्ट्री–मराठी–भाषा व
हीं बौद्धक्रमानुसार सर्वत्र प्रसृत होतीं. लेखाची भाषा प्राकृत व मिति ऋतुदर्श
म्हणजे बहुधा लेख इ० सनाच्या पहिल्या तीन शतकांतील असावा असें म्हणण्य
अस्तिपक्षाचा पुरावा असतो मळवली येथील स्तभाच्या दोन भागावरील
प्राचीन आहेत त्यापैकीं एक शातवाहनाचा व एक कदबाचा असावा असा अ
भ्यास बरीच जागा आहे

कदब हे उत्तरेकडून महाराष्ट्रांत आलेले **सूर्यवंशी क्षत्रिय** होते
स्वगोत्राचा व वेदाचा अभिमान होता ते मराठी भाषा वापरीत होते. ते स्वतांस
म्हणवून घेत असत. **चितलदुर्ग** (म्हैसूरचा उत्तर भाग) जवळ सन १८८८ म
नाणीं सापडलीं आहेत त्यांपैकी कित्येकावर '**सड्कणकळलीय महारठ**
शब्द आढळतात यावरून ही नाणीं त्याच काळचीं असून त्यावेळीं या प्रांतात
महारथींचें–†**मराठा क्षत्रियांचें राज्य** होतें ही गोष्ट सिद्ध होते

दक्षिणेंतील क्षत्रियाची अतिप्राचीन काळापासून नावाजलेली राजधानी
ऊर्फ पैठण ही होय. पैठण हा गाव गोदावरीच्या तीरीं असून महाराष्ट्र व तै
दोहोंच्या मध्यभागीं आहे गोदे म्हणजे मर्यादा या तेलगू शब्दावरून मर्यादा
जी नदी ती गोदावरी असें नांव पडले

पैठणास शालिवाहन नावाच्या वशाचे राज्य इ० सनापूर्वी चवथ्या शत
जैसलमीरचे राजे, म्हैसूरचे राजे, भावनगरचे राजे हे आपणास शालिवाहनाचे वश
घेतात तेराव्या शतकांत म्हणजे आज सुमारें सातशें वर्षांपूर्वी काश्मिरांत देखील शा
च्या वशाचें राज्य होतें नाशिक वगैरे ठिकाणीं जे शिलालेख आहेत, त्यांवरून श
हें वशाचें नाव आहे, असें ठरतें **शालिवाहन** हा शब्द कोठें कोठें **शा**
**शातवाह, शालिवाह** असाही वापरण्यात येत असलेला आढळून येतो हल्ली
ऊर्फ सुर्वे किंवा साळुंके हे जे मराठा क्षत्रिय आहेत, ते या शालिवाहन वशापैकं
शालिवाहन शकाच्या चवथ्या शतकात राष्ट्रकूट नांवाच्या **क्षत्रियांनीं** पै

**शालिवाहन राज्याची** समाप्ति केली. त्यावेळीं नल, मौर्य आणि कदंब हीं क्षत्रिय कुळें महाराष्ट्र देशाच्या बऱ्याच भागावर ठिकठिकाणीं राज्य करीत होतीं असें शिलालेखां-वरून सिद्ध होतें नलाचा मुलुख नलदुर्गाच्या आसपास होता नलोडे ऊर्फ नलावडे या उपनांवाचे क्षत्रिय हल्लीं आहेत तेच नलवंशी, मोरे या उपनांवाचे आहेत ते मौर्य, आणि कदम तेच कदंब, याप्रमाणें क्षत्रिय राजकुलें आणि क्षत्रिय राज्यें होतीं

शालिवाहनांची स्मृति शकरूपानें अजून जशीच्या तशीच आहे शालिवाहन या **क्षत्रियांचा शक** अद्यापि भारतपूज्य आहे ज्या अर्थी शालिवाहन क्षत्रियांचा शक सुविख्यात आहे त्या अर्थी यासबधींची ऐतिहासिक माहिती असणेंही अत्यावश्यक आहे

हिंदुस्तानच्या पलीकडे वायव्य दिशेस मध्य आशियाखडांत ग्रीक लोकांचें जें राज्य होतें, त्या प्रांतास त्यांनीं बॅक्ट्रिया अशी सज्ञा दिली होती तें राज्य पुढें सिथियन लोकांनीं काबीज केलें त्याच लोकांनीं पुढें हिंदुस्तानावरही पुष्कळ स्वाऱ्या केल्या हिंदुस्तानांत ज्या शक नांवाच्या लोकांनीं राज्य स्थापन करून आपली वर्षगणना चालू केली, त्याच लोकांपैकीं 'कुषन'वशी कनिष्क राजा इ० सनाच्या पहिल्या शतकांत काश्मिर व त्याच्या आसपासचा प्रदेश या भागावर राज्य करीत होता हाही अशोकाप्रमाणें नामांकित राज्यकर्ता होऊन गेला त्याच्या राज्याचा विस्तार दक्षिणेस आग्र्यापासून तों सिंधगुजराथ-पर्यंत आणि उत्तरेस यार्कंद व खोकद पर्यंत होता इ० सन ४० चे सुमारास त्यानें बौद्धांची चवथी सभा भरवून त्या धर्माचीं पुस्तकें तपासविलीं आणि त्यांचें भाषांतर करविले. अशोकानें तयार केलेलें धर्म पुस्तक सिलोन, ब्रह्मदेश व पूर्वेकडील बेटांत प्रमाणभूत समजतात

कनिष्काची राजधानी पुरुषपूर (पेशावर) येथे होती तेथें त्यानें बुद्धाचे मोठें देऊळ बाधलें होते त्याच्या कोसळलेल्या इमारतीच्या पायातून थोड्या वर्षांपूर्वी बुद्धावशेष निघाले

या कनिष्काच्या पुत्रानेंच शालिवाहन शक सुरू केला हा **क्षत्रिय** होता हा शक सुरू केला तेव्हा इ० सन ७८ हा होता तोच ‡ **क्षत्रियनिर्मित शालिवाहन शक** अद्यापही सर्वमान्य आहे याच शाखेने पश्चिमेकडून काठेवाड प्रातातून येऊन उज्जनी येथें तत्पूर्वीच राज्य स्थापन केले होतें त्याच्या नहपान राजाने महाराष्ट्रावर स्वारी केली होती दक्षिणेंत § शकाचा अमल थोडाच म्हणजे सन १२४-१३२ पावेतों होता तो आंध्र-भृत्य राजा पुलुमायी याने उठवून दिला उज्जनीस काठेवाडच्या शकाचें राज्य इ० सन

---

‡ मुख्य **शककर्ते क्षत्रियच** होऊन गेले हे क्षात्रवैशिष्ट्य विशेष लक्षात ठेवण्या-सारखें आहे याबद्दल पुरावा म्हटला म्हणजे भारतवीख्यात कालजत्रातील—

" आदौ इद्रप्रस्थे युधिष्ठिर शक. द्वितीयोज्जयिन्यां विक्रमस्तस्य शकः तृतीय. शालिवाहनस्तस्य शक· चतुर्थो वैतरिण्या विजयाभिनदनस्तस्य शक· पचमो नागार्जुनस्तस्य शकः .." हा होय

§ शालिवाहन शक प्रस्थापित करणारें घराणें, शाक्य घराणें, आणि साळुंके ऊर्फ चालुक्य घराणे हीं एकच क्षत्रिय घराणीं आहेत असें विद्वान् सशोधकाचे मत आहे

३९५ पर्यंत होतें त्यांचा उच्छेद गुप्तांनीं केला इ० सनापूर्वी ५६ च्या सुमारास गुप्त घराण्यांत विक्रमादित्य नांवाचा राजा राज्य करीत होता. त्यानेंही आपल्या राज्यप्रारंभाचा संवत् प्रचलित केला त्याला ¶ विक्रमसंवत् म्हणतात. त्याशिवाय इ०सनाच्या सहावे शतकांत एक विक्रमादित्य उज्जनीस होऊन गेला हा **क्षत्रिय विक्रमादित्य** राजाही मोठा विद्वान् होता विद्वज्जनांचा तो अतिशय चाहता असे आणि त्याचे दरबारांत मोठमोठे विद्वान पडित असत त्याच्या दरबारांतील नऊ विद्वद्रनें सुविख्यात आहेत. यानाच 'विक्रमाचीं नउरत्नें' म्हणतात

**नउरत्नें:—**[१] सुप्रसिद्ध कालिदास हा सिद्धवचनी व शीघ्र कवि होता याचीं संस्कृत भाषेतील नाटकें अद्भुत नाट्यशैलीनें ओथबलेलीं आहेत [२] अमरनाथ हा अत्यत विद्वान् व भाषाशास्त्रकोविद होता याने अमरकोश नांवाचा ग्रथ सस्कृतमध्यें लिहिलेला सुविख्यात आहे [३] क्षपणक हा एक ज्योतिषशास्त्रज्ञ होता फलज्योतिष शास्त्रांत त्याची अद्भुत प्रगति झालेली सर्वसमत आहे [४] धन्वतरी हा वैद्यकशास्त्रात अत्यत निष्णात होता. याला एका एका रोगावर चारशे चारशे निरनिराळी औषधें माहीत होतीं, आणि देशकाल परिस्थिति पाहून तो विशिष्ट प्रकारच्या औषधाचा उपयोग करीत असल्यामुळें त्यानें अत्यत प्रसिद्धि मिळविली होती [५] वररुचि हा भाषाशास्त्रज्ञ होता सुप्रसिद्ध वैय्याकरणी म्हणून त्याची ख्याति आहे [६] वराहमिहिर हा सिद्धान्त, सहिता व होरा ह्या ज्योतिष प्रकाराचा चागला मार्मिक तज्ज्ञ होता याचा बृहत्सहिता हा ग्रथ विख्यात आहे [७] घटखर्पर हा शिल्पकलेत अत्यत निष्णात होता [८] शकु हा भूमापनशास्त्रांत पारगत होता याच्या शकु या नांवावरूनच स्मृतिचिन्ह म्हणून अजूनही शेत वगैरेंच्या मोजणीच्या वेळीं ज्या साधनाचा उपयोग करितात त्या साधनास 'शकु' अशी सज्ञा आहे 'शकु' हे भूमापन यत्र म्हणून सध्यां गणले जाते या 'शकू'चा सबध त्या भूमापनशास्त्रज्ञ शंकूशीं आहे ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे [९] वेतालभद्र हा मत्रशास्त्रांत व जारण–मारण–मोहन–उच्चाटणादि कलेत निष्णात होता

याप्रमाणे **क्षात्रिय विक्रमाच्या पदरी** हीं **नवरत्नें** शोभत होती असा हा शक शाखीय क्षत्रिय भूपतीचा ऐतिहासिक परिचय आहे या विक्रमादित्याने हूण लोकांचा पूर्ण पाडाव करून त्याना हिमालयाच्या पलीकडे त्यांच्या मूळच्या मुलुखांत हांकून दिलें होते तदनतर सुमारें एकहजार वर्षेपर्यंत अत्यत बलाढ्य असा शत्रू कोणीही निर्माण झाला नाहीं.

---

¶ इ० सन १९२८ मध्यें विक्रमसंवत् १९८४ हा येतो इ० सनांत ५६ मिळविले म्हणजे विक्रमसवत्, आणि इ० सनांतून ७८ वजा केले म्हणजे शालिवाहन शक तयार होतो. हा विक्रमसवत् सुरू करणारा विक्रमादित्य निराळा, आणि इ० सनाच्या सहाव्या शतकांतील उज्जनीचा विक्रमादित्य निराळा आहे यासंबंधी विशेष वर्णन बारावें प्रकरणांत केलेलें आहे.

## प्रकरण बारावें

# पौराणिक काल आणि क्षत्रिय

[ इसवी सनापूर्वी सुमारें ३०० ते इसवी सन १००० ]

१ पौराणिक कालीन क्षत्रिय राजघराणीं
२ पौराणिक कालीन रीतिरिवाज.
३ पौराणिक कालीन धर्म.
४ पौराणिक कालीन शास्त्रकलाभिवृद्धि.

**१. पौराणिक कालीन क्षत्रिय राजघराणीं** —या कालात कनोज चे **क्षत्रिय गुप्त राजघराणें** प्रबल झाले होतें इ० सनाच्या चवथ्या शतकांत चंद्रगुप्ताचा बोलबाला चागला होता चंद्रगुप्ताचा मुलगा समुद्रदत्त यानेंही आपले राज्य चांगलेच वाढविलें होते उत्तर हिंदुस्तानातील बहुतेक राजाना त्यानें पादाक्रांत केलें होतें आसाम, बगाल, नेपाळ इत्यादि आसमतातील राजाकडून तो करभार वसूल करीत असे. समुद्रगुप्तानतर चद्रगुप्त गादीवर बसल्यावर त्यानेंही इ० सनाच्या पांचव्या शतकाच्या सुरवातीपर्यंत राज्य केले त्याच्यानतर कुमारगुप्त हा राज्य करू लागला होता ह्या कुमारगुप्तानें इ० सन ४१३ ते इ० सन ४५५ पर्यंत राज्य केलें त्याला श्वेत हूणांनीं पश्चिमेकडून फारच त्रास देण्याचा क्रम आरभिला होता कुमारगुप्तानतर स्कदगुप्त हा राज्यकारभार पाहूं लागला त्यानें आपल्या राज्याची मर्यादा बरीच विस्तृत केली होती त्यानें इ० सन ४६० ते ४८० पर्यंत राज्य केले तदनतर बुद्धगुप्त व भानुगुप्त यांच्याकडे राज्यकारभार आला, परंतु तेव्हांपासून त्या राजघराण्याचा मोडच होऊन गेला जे आपल्या नांवापुढें गुप्त ही पदवी लावीत असत त्यांना गुप्तवशी राजे म्हणत श्वेत हूण लोकांनीं त्याच्या राज्यावर स्वाऱ्या करून गुप्तराज्य मोडून टाकलें पुढें सुमारें पन्नास वर्षे पावेतों ह्या हूणांचें प्रचंड राज्य इराणापासून उत्तर हिंदुस्तानभर पसरलें होते त्यांचा बादशहा मिहीरकुल हा असून तो फारच दुष्ट स्वभावाचा होता. इ० सन ५२८ मध्यें गुप्तराजा बालादित्य व माळव्याचा राजा यशोधर्म ह्यांनी त्याचा पाडाव करून त्यास काश्मिरांत पिटाळून लावलें

गुप्तवशामध्यें इतिहासविख्यात असा प्रमुख राजा पुढें विक्रमादित्य हा झाला हा उज्जनीस राज्य करीत असे विक्रमादित्याचें गुणवर्णन निरनिराळ्या तऱ्हेनें अद्यापही ऐकूं येतें. ज्या विक्रमादित्याच्या नांवावरून विक्रमसंवत सुरू झाला तोच हा विक्रमादित्य आणि त्याचेच पदरीं नवरत्नें होतीं, असें उल्लेखिलेलें कोठें कोठें आढळतें. परंतु खरी

गोष्ट तशी नाही ऐतिहासिक दृष्ट्या विचार करतां हा घोटाळा सहजच ध्यानांत येतो. एका पक्षाचें जें म्हणणें आहे कीं, ज्यानें विक्रमसवत् सुरू केला त्या इ० सनापूर्वी ५६ वर्षांच्या वेळच्या विक्रमादित्याच्या पदरींच नऊ विद्वान् होते, तें वस्तुस्थितीशीं कसें विसगत आहे तें अगोदर पाहावयाचें आहे त्याचा विचार झाल्यावर संवत्कर्ता विक्रमादित्य निराळा असून त्याच्या पदरी नऊ विद्वानूही नव्हते असें कबूल करावें लागेल

उज्जनीच्या विक्रमादित्याच्या पदरीं जे नऊ विद्वान् होते, त्यांतच वराहमिहिर हाही एक होता असें ऐतिहासिक सत्य असून या वराहमिहिरकृत ग्रथाचा काळ इ० सन ५०५ ते ५८७ या मधील होता हें त्याच्या ग्रथावरूनच स्पष्ट सिद्ध झाले आहे अर्थातच वराहमिहिराचा काळही इ० सन ५०५ ते ५८७ याच्या आसपासचाच असणार हें उघडच आहे हा वराहमिहिर उज्जनीच्या विक्रमादित्याच्या-ज्यानें विक्रम सवत् इ० सनापूर्वी ५६ व्या वर्षी सुरू केला त्याच्या-पदरीं होता, अर्थातच त्याच्या समकालीन होता, असें जर गृहीत धरले तर ते केव्हांही शक्य होणार नाही कारण विक्रमसवताचा काळ इ० सनापूर्वी ५६ वर्षांचा; आणि वराहमिहिराचा काळ इ० सन ५०५ ते ५८७ चा आहे अर्थातच हा वराहमिहिर सवतकर्त्या विक्रमाच्या पदरीं नव्हता, तो विक्रम दुसराच होय हें सिद्ध झाले इ० सनाच्या सहाव्या शतकांत उज्जनीस जो विक्रमादित्य झाला त्या राजाच्या पदरीं हा वराहमिहिर होता

दुसरी गोष्ट अशी कीं, शीघ्रकवि कालिदास हाही विक्रमादित्याच्या पदरी होता, आणि त्याच्या ग्रथांचा काळही इ० सनाच्या सहावे शतकातीलच आहे अर्थातच सवत्कर्त्या विक्रमाचा आणि कालिदासाचाही कोणत्याच प्रकारचा सबध असणे सभवत नाहीं. हाही इ० सनाच्या सहाव्या शतकांतील उज्जनीच्या विक्रमादित्याच्याच पदरीं होता

तिसरी गोष्ट अशी की, कनिष्क राजा व विक्रमादित्य याच्यामध्यें तीस राजे होऊन गेल्याचे ऐतिहासिक सत्य आहे कनिष्क राजाने इ० सन ७८ मध्ये राज्यप्रारभ केला ही गोष्ट मागील प्रकरणात स्पष्ट केलेलीच आहे. या कनिष्क राजाच्या राज्यकालाच्या दृष्टीनें विचार करतां त्याच्यानंतर तीस राजांनीं राज्य करीत गेल्याचा अखेरचा काळ बरोबर सहाव्या शतकांतच येतो आणि तोच काळ उज्जनीच्या विक्रमादित्याचा होय

चवथें एक प्रमाण असे की, इ० सनाच्या सातव्या शतकांत हिंदुस्तानमध्यें जो चिनी प्रवासी ह्युएनसग आला होता, त्याने आपल्या प्रवासवर्णनामध्यें असें लिहून ठेवलें आहे कीं, 'पहिला शिलादित्य राजा इ० सन ५८०च्या सुमारास राज्य करीत होता, व त्याच्यानंतर लागलाच विक्रमादित्य झाला'. यावरूनही विक्रमादित्य हा सहाव्या शतकांतच झाला असें ध्वनित होतें

विक्रमसवताशीं आणि ज्याच्या पदरीं नवरत्नें होतीं त्या उज्जनीच्या **क्षत्रिय विक्रमादित्याशीं** परस्पर संबध कांहींही नव्हता, अर्थातच हा सहाव्या शतकांतील गुप्त घराण्यांतील विक्रमादित्य राजा आपल्या या पौराणिक काळच्या इतिहासांतील पात्र होय हें स्पष्ट केल्यावर तत्संबंधीं उपलब्ध अशी ऐतिहासिक माहिती काय आहे ती पाहूं.

परकीय लोकांच्या स्वाऱ्या वेळोवेळीं हटवून त्यानें आपल्या राज्यांत शांति आणि सौख्य यांची समृद्धि केली विक्रमादित्याची प्रजा त्याच्या कृपाछत्राखालीं आनंदानें नांदत होती विक्रमादित्यानें नाट्यकला, काव्य, शास्त्रें आणि विद्या यांचीही चांगलीच वाढ केली याच्या छत्राखालीं उत्तरहिंदुस्तान आनंदानें काल व्यतीत करीत होतें

सातव्या शतकाच्या आरंभीं स्थानेश्वरचा राजा हर्ष हाही मोठा पराक्रमी राजा होऊन गेला हर्ष हा इ० सन ६०६ मध्यें राज्यकारभार पाहू लागला होता हर्ष राजा हा मोठा शूर, विद्वान् आणि प्रेमळ स्वभावाचा होता इ० सन ६१२ पावेतों हिंदुस्तानचा बहुतेक भाग जिंकून त्यानें कनोज येथें राजधानी केली त्याच वेळीं दक्षिणेंत शूरवीर चालुक्य राजा पुलकेशि ( इ० सन ६०८–४२ ) हाही राज्य करीत असल्यामुळें हर्षाला दक्षिण देश जिंकतां आला नाहीं हा राजा हर्षवर्धन या नांवाने सुप्रसिद्ध आहे त्यानें इ० सन ६०६ पासून इ० सन ६४८ पावेतों राज्य केलें सुप्रसिद्ध संस्कृत वाङमयाचा भक्त-प्रख्यात कादंबरीकार–बाणकवि हा या हर्षवर्धनाच्याच दरबारीं होता

हर्षाचा ओढा बौद्ध धर्माकडे होता तरी इतर पंथावर त्याची कृपादृष्टि असे त्या काळीं हिंदुस्तानात पुष्कळ राजे बौद्धधर्मीय होते हर्षानंतर त्याचे राज्य टिकलें नाहीं कनोज येथें यशोवर्मा नांवाचा एक राजा त्याच्यापुढें झाला इ० सनाचें ७ वें शतक हा त्याचा काल होय सुप्रसिद्ध संस्कृत कवि भवभूति हा त्याच्या दरबारीं होता या यशोवर्म्यानंतर वज्रायुध राजाने राज्य केले कनोजच्या गादीवर वज्रायुध हा इ० सन ७५१ च्या सुमारास बसला असावा याच्या संबधानें राजशेखराच्या कर्पूरमंजरीमध्यें कनोज येथे राज्य करणारा पांचालाचा राजा असा उल्लेख आहे, तो हाच वज्रायुध होय मग पुढे या कुलातील राजा चक्रायुध हा झाला या चक्रायुध राजासबधींचा उल्लेख एका ताम्रपटावरील लेखांत केलेला असून तो लेख बंगाल्यांतील भागलपूर येथे सांपडलेल्या ताम्रपटावर आहे तो ताम्रपटावरील लेख* असा—

" जितेंद्रराज प्रभृती नरातीन् ।
उपार्जिता येन महोदयश्री ॥
दत्ता पुन सा बलिनार्थयित्रे ।
चक्रायुधायानति वामनाय ॥ "

भावार्थ—इंद्रराजादिकांचा पराभव करून मिळविलेली राज्यलक्ष्मी शरणागत चक्रायुधास परत दिली

इ० सन ८०० मधील हा लेख आहे हें घराणें पुढे इ० सन ८१६ मध्यें लयास गेलें तें लयास नेण्याचा प्रयत्न प्रतिहार राजानें करून त्यांत यश संपादन केलें. या प्रतिहार राजाचें नांव नागभट्ट असें होतें. नागभट्ट हा वत्स राजाचा मुलगा होता तो महान् पराक्रमी, शूर, मुत्सद्दी व मानी होता कनोजच्या साम्राज्यसंस्थापनाचा हक्क यानेंच प्राप्त करून

* इंडियन अँटिक्वेरी, पु. १५ पान ३०४—बंगाल्यांतील भागलपूर येथील ताम्रपट.

घेतला. यानें पहिल्यानें कनोजच्या सामन्तांचा पराभव करून नंतर कनोजवर स्वारी केली. आंध्र, सैंधव, कलिंग, विदर्भ आदि राजे कनोजचे सामंत असल्यामुळें प्रथम त्यांना पादाक्रांत करून त्यानें त्याना आपले अंकित करून घेतलें होतें. तो त्याच्या जवळून खंडणी घेत असे याप्रमाणें कनोजच्या सामन्तांचा पराभव करण्याचें त्याचें कार्य झाल्यावर त्यानें पुढें चक्रायुधावर स्वारी केली. चक्रायुधावर नागभट्टानें एवढ्या निकरानें स्वारी करण्याचें कारण म्हटलें म्हणजे, चक्रायुधानें बगालाधिपतीचा आश्रय घेतला होता हेंच होय बगालाधिपतीचा नागभट्टानें पराभव केला होता, आणि त्याच्या आश्रयास गेलेल्या चक्रायुधाचाही याच धोरणानें त्याने धुव्वा उडविला नागभट्टाने चक्रायुधास जिंकून घेतलें; पण सिंहासनच्युत मात्र केले नाहीं हा त्या वेळच्या योद्धयांचा धर्मच होता चक्रायुधास सामन्त या नात्यानें बाळगून तो कनोजचा राज्यकारभार पाहू लागला होता नागभट्टानें इ० सन ८१० च्या सुमारास कनोज ‡ येथे आपली गादी स्थापिली नागभट्टानें कनोज जिंकल्यावर अनेक देशांवर आपलें राज्य पसरविलें उत्तर गुजराथ, विंध्य प्रात, अलाहाबाद, जयपूर इत्यादि देशाचे किल्ले त्यानें आपल्या ताब्यांत घेतले, आणि उत्तरेस हिमालयापासून दक्षिणेस काठेवाडपावेतों, व पूर्वेस अलाहाबादपासून पश्चिमेस पंजाबपावेतों आपलें साम्राज्य प्रस्थापित केले या नागभट्टानें इ० सन ८२५ पर्यंत राज्यकारभार पाहिला नागभट्टानंतर सात आठ पिढ्यांपर्यंत कनोजची गादी त्याच्याच वंशजांकडे होती

नागभट्टाच्या नतर त्याचा मुलगा रामचंद्र हा राज्यावर बसला त्याची कारकीर्द इ० सन ८२५ ते ८४० पर्यंत चागल्या रीतीनें चालल्यावर † मिहिर नामक राजा राज्य पदारूढ झाला त्याची कारकीर्द इ० सन ८४० ते इ० सन ८९० पर्यंत होती हा राजा अत्यंत पराक्रमी असा होता त्याची राज्यसत्ता पश्चिम ते पूर्वसमुद्रापर्यंत आणि कनोज ते विंध्यपर्वतापर्यंत होती अलमसउदी नामक आरबी प्रवाशानें आपलें जें प्रवासवर्णन इ० सन ८५१ मध्यें लिहिलें आहे त्यात त्यानें अशा अर्थाचा मजकूर लिहिलेला आहे कीं, या §राजाच्या ताब्यात मोठें प्रतापी सैन्य आहे अश्वदळ तर त्याच्याजवळ अद्वितीय असें आहे. उंटाचें सैन्यही त्याच्याजवळ भरपूर आहे तो अपरिमित श्रीमान् असून चोरांची भीति त्याच्या राज्यांत बिलकूल नाहीं

या मिहिर राजानतर त्याचा पुत्र निर्भयराज हा राज्यपदारूढ झाला त्याने इ० सन ८९० ते इ० सन ९०८ पर्यंत राज्य केलें सौराष्ट्र, अवध, कर्नाळ हे त्याच्या राज्यांत मोडूं लागले होते. याला 'महाराजाधिराज परम भट्टारक परमेश्वर' असा बहुमानाचा किताब होता.

त्याच्यानंतर त्याचा मोठा मुलगा द्वितीयभोज हा गादीवर बसला याची कारकीर्द इ० सन ९०८ ते इ० सन ९१० पर्यंत होती. द्वितीय भोजनानंतर त्याचा लहान भाऊ

---

‡ कर्नल स्मिथचा इतिहास पाहा.

† अलमसउदी--आरबी प्रवाशी याचें प्रवासवर्णन.

§ इलियड ग्रीक पुराण, भाग १.

महीपाल हा राज्यपदारूढ झाला त्याची कारकीर्द इ० सन ९१० ते ९४० ही होती याच्या कारकीर्दीत कनोजवर शत्रूच्या स्वाऱ्या सुरू झाल्या होत्या काठेवाड प्रांत या महीपालाच्या राज्यांत मोडत असे हा राजाही नाट्यकलेचा मोठा चाहाता होता राजशेखरकृत संस्कृत बालभारत नाटकाचा पहिला प्रयोग याच्याच दरबारांत झाला होता महीपालानंतर त्याचा पुत्र देवपाल हा राज्यपदारूढ झाला त्याची कारकीर्द इ० सन ९४० पासून इ० सन ९५५ पर्यंत होती त्याच्यानंतर देवपालाचा सावत्र भाऊ विजयपाल हा राज्यावर बसला त्याची कारकीर्द इ० सन ९५५ ते ९९० पर्यंतची आहे याला 'अधिराज' असा किताब होता याच्या कारकीर्दीत कनोजच्या राज्यसत्तेला बरीच ओहोटी लागलेली होती मूलराज सोलंखी याने त्याच्याजवळून गुजराथ प्रांत घेतला होता तसेंच माळवा प्रांत मुंज राजानें, जज्होटीचे राज्य चंदेल्लानें, याप्रमाणे कनोजची सत्ता मागें मागें येऊ लागून कनोजचे मांडलिक राजे कनोजला जुमानीनासे झाले सबक्तगीन आणि जयपाळ यांचा इ० सन ९९० मध्यें जो भयकर रणसग्राम झाला, त्यात पजाबाच्या जयपाळास विजयपाळानें शक्य ती मदत दिली होती

या विजयपाळानतर राजपाल हा राज्यावर आला याच्या कारकीर्दीतच कनोजचें साम्राज्य मोडले गेले याच्या राज्याची कारकीर्द इ० सन ९९० पासून इ० सन १०२० पावेतों होती याच्या कारकीर्दीतच गिजनीच्या महमदाने कनोजवर स्वारी करून तें शहर लुटलें आणि पुढें तेव्हापासून या राजघराण्याचा शेवट झाला

**२. पौराणिक कालीन रीतिरिवाज**— स्त्रियाना या कालीं स्वतंत्रता होती हिंदू-लोक परतंत्र झाल्यावर हिंदू स्त्रियाची स्वतंत्रता साहजिकच नष्ट झाली स्त्रियांना बुरखा वगैरे न घेतां समाजांत वावरतां येत असे परका मनुष्य आपल्या घरीं आला असतां, विचारपूस करून त्याचें स्वागत स्त्रियांना करिता येत असे नवरा घरीं नसतां कोणी पाहुणा आल्यास त्यास पाहुणचार वगैरे करून स्त्रिया त्याची रवानगी करीत असत युरोपात ज्याप्रमाणें आज स्त्रीस्वातंत्र्य आहे, तितकें अमर्याद स्त्रीस्वातंत्र्य मात्र या काळीही आर्यस्त्रियांना नव्हतें त्याचप्रमाणें स्त्रियांना तत्कालीन लिहिण्यावाचण्याचें शिक्षणही देत असत गाणीं म्हणतां येणे हा एक उत्तम गुण समजला जात असे चित्रें काढणें आणि वाद्यें वाजविणे हेही गुण अभिनंदनीय मानीत लग्न जुळविण्याचें कार्य वराचा पिता व वधूचा पिता या परस्पराच्या संमतीनें होत असे. **विधवांना पुनर्विवाह करण्यास मोकळीक होती** याज्ञवल्क्याच्या ग्रंथांत म्हणजे जो इ० सनाच्या चवथ्या पांचव्या शतकांत तयार झाला, त्यांतूनही सती जाण्याची सर्रास आज्ञा दिलेली आढळून येत नाहीं घरगुती चाकराचा क्रयविक्रय गुलामाप्रमाणें हिंदुस्तानांत करीत असत ठरलेली रक्कम देऊन मात्र गुलाम स्वतःस स्वतंत्र करून घेऊ शकत असे द्यूतशाळा आणि मद्यपानगृहें यांनीं प्रत्येक मोठे शहर युक्त असे. नगरांना कोट व दरवाजे असत. रस्ते वांकडेतिकडे असत. रस्त्याच्या दोन्ही बाजूस दुकानें लावीत असून ज्यांच्या दुकानावर नांवाची पाटी लावलेली नाहीं, अशीं दुकानें क्वचित् दृष्टोत्पत्तीस

येत. खाटीक, कोळी, नाचे, मांग, भगी, चांभार यांचीं घरें नगराबाहेर असत. तांदूळ व गहूं ही धान्यें खाण्याकरितां वापरीत असत. धान्याच्या पोळ्या व दुधाचीं पक्वान्नें करण्याची चाल त्या वेळीं होती. मासे, हरिण, शेळ्या यांचा उपयोग खाण्याकरितां करीत सोनें, चांदी, तांबें, मोतीं यांची निपज या देशांतच होत असे व रत्नें आणि हिऱ्यांचीही निपज होई क्रयविक्रय जिनसांच्या मोबदल्यानें चालत असे; म्हणजे एखाद्याला पायांत घालण्याकरितां जोडा लागत असला तर त्यानें जोडे विकणारास धान्य देऊन जोडा घ्यावा, जोडे विकणारास लोण्याची गरज लागली तर त्यानें जोडा देऊन लोणी घ्यावें, याप्रमाणें क्रयविक्रय चालत असे. तत्कालीन लोकाना नीति व अब्रू यांची विशेष चाड होती न्यायनिवाडे समतोलबुद्धीनें व निप.क्षपातीपणाने होत असत पुढील जन्मात भोगण्यांत यावयाच्या फलाना ते भिऊन वागत असत. पारलौकिक घटनांच्या संबधीं त्याना जितका वचक असे, तितका इहलोकासबधानेंही नसे परस्परानीं घेतलेल्या शपथा व दिलेलीं वचने यांची पाळणूक अगदीं इमानेंइतबारें होई

ह्युएनत्संग § प्रवासवर्णनांत म्हणतो, " या देशांत चार भिन्न जाती आहेत. त्यांच्यांत धार्मिक, सामाजिक इत्यादि विधि चांगल्या रीतीनें पार पडतात (१) **क्षत्रियांमध्यें** राजे लोकांचा अतर्भाव होतो त्याचें राज्य येथें पिढ्यान्‌पिढया चाललें असून **परोपकार** व **भूतदया** हीं त्याच्या राज्यपद्धतीचीं **मुख्य तत्त्वें** आहेत ! ( २ ) **ब्राह्मणांचे** बौद्धिक कौशल्यही चांगलें आहे ( ३ ) **वैश्य** लोक व्यापारात वाकबगार असून ते द्रव्यसचयही चागलाच करितात (४) चवथा एक वर्ग शूद्राचा असून तो वर्ग मेहनतीचीं कामें करितो "

ग्रीक लेखक मेगॅस्थेनिस याने म्हटलें आहे कीं, '**ब्राह्मणांना खालच्या जातींतील स्त्रीशीं विवाह करतां येतो***' **मनूनेंही** तसेंच सागितलें आहे तो म्हणतोः–

" **स्त्रीष्वनंतर जातासु द्विजैरुत्पादितान्सुतान् ।**
**सदृशानेव तानाहुर्मातृदोषविगर्हितान् ॥** "—मनु० १०–६

भावार्थः—द्विजाने खालच्या जातीची स्त्री केल्यास होणारी संतति त्याच्याच जातीची होते

पौराणिक कालीं जातिबधनें हीं शिथिलच होती पुढील पुढील काळांत तीं दृढतर होत गेलीं

रेशीम, लोंकर, कापूस यांचीं अत्यत नाजुक वस्त्रें तयार करण्याची कला त्या वेळीं अस्तित्वांत होती, एवढेंच नव्हे, तर ती उन्नतावस्थेप्रत पोंचलेली होती सध्याच्या विलायती तलम कापडापेक्षांही नाजूक कापड त्या वेळीं हिंदुस्तानात निर्माण होत असे वस्त्रांना निरनिराळे आकर्षक रगही देत असत स्त्रिया बहुधा रगीत वस्त्रेंच वापरीत, आणि विधवा स्त्रियांना मात्र शुभ्र वस्त्रें परिधान करावीं लागत दागदागिन्यांची आवड त्या काळीं स्त्रियांना तशीच पुरुषांनाही होती

---

§ वाटर्सकृत ह्युएनत्संगाचे लेख
* मॅक्रिंडलकृत मेगॅस्थेनिस व अरायनचे लेख, पान ८६.

बालविवाहाची पद्धति या काळीं चालू नव्हती अधिकाऱ्यांकडून लोकांना त्रास होत नसे फक्त जे लोक राजाच्या जमिनीची लागवड करीत त्यांनाच नफ्याचा कांहीं भाग राजास द्यावा लागत असे अपराधाच्या मानानें कैदी लोकांस कमीजास्त दंड करीत. पुनःपुन्हा बंड करणाराचा उजवा हात तोडून त्यांना सोडून देण्यांत येई

**३. पौराणिक कालीन धर्म**—अनेक शतकेंपर्यंत या कालात बौद्ध धर्माचीच वाढती कला होती तदनंतर आद्यशंकराचार्यांनीं हिंदु धर्म स्थापन करण्याचा प्रयत्न केला या दोन्ही धर्मासंबधाचें विस्तृत वर्णन ‡मागें येऊन गेलेच असल्यानें येथे पुन्हा द्विरुक्ति नको

या कालात पुराणें रचण्याचें काम बऱ्याच गडबडीनें उरकून घेण्यांत आलें सूक्ष्म दृष्टीनें विचार केला असता मूळची पुराणें हीं फारच जुनीं आहेत आणि मूळच्या अस्सल पुराणात राजवंशावळ वगैरे ऐतिहासिक माहिती दिलेली आहे परंतु इ० सनाच्या पांचव्या शतकांत बौद्धधर्माचा पाडाव करण्याच्या हेतूनें हिंदुधर्मास चालना दिली गेली आणि त्यावेळीं पूर्वीच्या पुराणांचें सत्यस्वरूप नष्ट होऊन त्यास भाकडकथांचें भलतेंच गलिच्छ स्वरूप प्राप्त झाले हें नवीन ¶पुराणरचनेचें काम या कालांत चाललें असल्यामुळेंच या काळास 'पौराणिक काळ' असे सार्थ नांव पडले

या कालची धार्मिक स्थितींतील अत्यंत महत्त्वाची बाब म्हटली म्हणजे, ज्या दोन किंवा तीन धर्मांमध्यें सर्व देशांतील प्रजा वाटली गेली होती, त्या धर्मांत आढळून येणारी पराकाष्ठेची परस्पर सहिष्णुता ही होय बौद्धधर्म, जैनधर्म व गीताप्रणित हिंदुधर्म अगदीं निकटत्वाने वास करीत होते एकाच राज्यांत किंवा एकाच शहरात किंबहुना एका कुटुंबांतदेखील हिंदु, बौद्ध व जैन या धर्मांचे अनुयायी नांदत असत, व धार्मिक तत्त्वा संबधीं परस्परांमध्यें वादविवाद करीत असत या वेळीं असा चमत्कार पाहावयास सांपडे कीं, एकाच कुटुंबांत बाप शैव, तर मुलगा बौद्ध असून तोही पुढील आयुष्यांत मत पालटल्यास धर्मांतर करीत असे, व असें हें त्याचें धर्मांतर त्याच्या कौटुंबिक किंवा सामाजिक नात्याच्या आड येत नसे, अशा प्रकारच्या धार्मिक सहिष्णुतेचे कारण बहुश: असें होतें कीं, या धर्मांचे अनुयायी लोक प्राय: एकाच वंशाचे असल्यामुळे त्यांचे सामाजिक आचारविचार सारखेच असून अन्नोदक व्यवहारसुद्धां एकाच प्रकारचा होता. शिवाय जातिबांधवांना चिकटून राहाण्याची येथील लोकांची जी उपजत प्रवृत्ति दिसून येते, ती या नव्या धर्मानें हाणून पाडली नाहीं बौद्धधर्मांतील मठवासी व भिक्षु हे मात्र जातिबंधनें झुगारून देत असत या वेळच्या धर्मविस्ताराचा विचार करितां असें दिसून येतें कीं, अगदीं वायव्य सरहद्दीवरील कपिश किंवा काफिरिस्तान या मुलुखांत केवळ बौद्धधर्मांचीच सरशी होती ईशान्येकडील प्रांतांत हिंदुधर्मियांचा भरणा होता आणि इतर

‡ प्रकरण चवथें आणि पांचवें पहा

¶ प्रकरण सातवें पहा.

प्रांतांत या दोन्ही धर्मांच्या अनुयायांची संख्या सामान्य लोकांपासून तो राजेरजवाड्यां-पर्यंत होती.

सहाव्या शतकाच्या सुमारास मूर्तिपूजेचें बंड तर सर्रहा चालू होतें अटलांटिक महासागराच्या पश्चिमकिनाऱ्यापासून तों थेट पूर्वेस पॅसिफिक महासागरापर्यंत जगाचा सर्व भाग–मग त्यात ख्रिस्ती धर्म असो, सेमिटिक धर्म असो, बौद्ध धर्म असो, हिंदु धर्म असो–मूर्तिपूजेंत मग्न झालेला होता या वेळीं सर्व हिंदुस्तानांत हजारों देवळें व स्तूप यांची गर्दी झाली होती

मूलस्थानपूर म्हणजे हल्लींचें मुलतान येथे एक सूर्याचें प्रचड व भव्य मदिर होतें त्यांतील मूर्ति सुवर्णाची असून तिजवर रत्नजडित अलकार होते तिचें सामर्थ्य अद्भुत होतें. मूर्तीसमोर गाणाऱ्या स्त्रियाचे ताफे एकामागून एक येऊन गायन करीत मदिरात नित्य नदादीप पेटत असून धूप व फुले यांचा उपयोग मूर्तीकरतां करण्यात येई त्या मदिरास हिंदुस्तानातील सर्व ठिकाणच्या राजेरजवाड्यानीं मोठमोठ्या मूल्यवान् देणग्या दिलेल्या असून गरीब लोकांची जेथें औषधपाण्याची व अन्नवस्त्राची व्यवस्था होईल अशा धर्मशाळा बांधून ठेवल्या होत्या त्या मदिरांत नित्यश दूरदूरच्या ठिकाणाहून आलेले हजारो भक्त तरी स्तोत्रपाठ करीत असलेले आढळून येत मदिराच्या सभोंवार पाण्याच्या टांक्या व फुलाचे बगीचे असून त्यामुळे ते स्थान एकदरींत फार रमणीय झालें होतें

काशीलाही§ मोठें विस्तृत शिवमदिर होते या मदिरात दररोज दहा हजार शिवभक्त दर्शनास येत असून त्यांतील शिवाची पुरुषाकार मूर्ति जवळ जवळ सत्तर हात उंचीची असून फार सुबक व भव्य असल्यामुळें हुबेहुब सजीव माणसासारखी वाटे

बौद्धधर्माची प्रगति खुटण्याचा प्रसग येऊन हिंदुधर्माची चढती कमान पुढे सुरू झाली. कुमारिलभट्ट हा प्रसाराच्या कामीं पुढाकार घेणारा एक प्रसारक होता हा धर्मोपदेशक बहार प्रांतांत राहाणारा होता हा सातव्या शतकाच्या अखेरीस होता हिंदूच्या शास्त्रांचे मुख्य सहा भाग आहेत त्यांस षडदर्शनें म्हणतात त्यापैकीं शेवटचे दोन पूर्व-मीमांसा व उत्तरमीमासा यांचा बौद्धधर्माच्या भरभराटींत लोप झाला होता, परंतु पुढें पूर्वमीमांसेवर कुमारिलभट्टानें विस्तृत टीका लिहून यज्ञयागादि कृत्यांचें उत्तम रीतीनें समर्थन केले कुमारिलभट्टाचे ग्रंथांत कर्मप्रधानतत्त्वें प्रतिपादिलेलीं आहेत निवृत्तिमार्ग त्याला पसत नव्हता

पुढें नवव्या शतकांत उत्तरमीमांसेचें समर्थन करून शकराचार्यानें भगवद्गीतेच्या पायावर वेदान्ताचें प्रतिपादन केलें ही **भगवद्गीता** श्रीकृष्ण या **क्षत्रियानें** अर्जुन या **क्षत्रियास** सांगितली होती या ग्रंथाची महती उत्तरोत्तर वाढतच गेली शकराचार्यानें निवृत्तिमार्गाचें प्रतिपादन केलें जो हिंदुधर्म हल्लीं विकृत घटनेंत चालू आहे त्या हिंदु-धर्माचा मूळ पाया अगदींच अव्यवहार्य असा याच कालीं घालण्यात आला शकराचार्या-चा जन्म इ०सन७८८ मध्यें केरल ऊर्फ मलबार प्रांतांत कालदी नगरींत नबुद्री जातीच्या

§ वाटर्सकृत पु० २, पान २५४–म० भारत.

ब्राह्मणकुलांत झाला होता वैदिक धर्मांतील निराकार निर्गुण पंचमहाभूतात्मक परमेश्वराची आराधना जाऊन या कालीं शिव, विष्णु, आदित्य, गणेश व देवी या पंचदेवतांच्या आराधना सपाटून सुरू होत्या

दक्षिणटोंकापासून उत्तरेस हिमालयापर्यंत व द्वारकेपासून पूर्वसमुद्रापर्यंत फिरून शंकराचार्यांने चारही दिशांस शृंगेरी, द्वारका, बदरीनाथ व जगन्नाथपुरी या ठिकाणीं मठ-स्थापना केली शंकराचार्यांच्या धर्मतत्त्वांचा प्रसार निरनिराळ्या पुरुषानीं सर्व देशभर केला त्यापासून अनेक पंथही निर्माण झाले रामानुज इ० सन ११५०, मध्वाचार्य इ० सन ११९९, रामानन्द इ० सन १३००–१४००, चैतन्य सन १४८५–१५३३, हे वैष्णव-पंथाचे मोठे साधु झाले वल्लभस्वामी इ० सन १५२०, यांनीं कृष्णभक्तीचा विशेष प्रसार केला इ०सन ११८० च्या सुमारास कानडा देशांत कलादगी जिल्ह्यात कलचुरि वंशाचें राज्य होते त्या राजाचा प्रधान बसव नांवाचा होता त्यानें लिंगायत धर्म स्थापन करून नंदी व महादेवाच्या लिंगाची पूजा प्रचलित केली त्यास लिंगायत धर्म म्हणतात फक्त महादेवाच्या लिंगाची पूजा करणें, सुतक, वृद्धि न पाळणे, भस्म लावून शुद्ध होणे वगैरे लिंगायत धर्माचीं तत्त्वें आहेत

देवगिरी येथील यादववंशी राजे कृष्ण आणि महादेव यांनीं इ० सन १२०७ ते १२७१ पर्यंत राज्य केले त्याच्या वेळीं चक्रधर नावाच्या ब्राह्मणाने महानुभाव पंथ स्थापन केला पुढें नागदेवभट्टानें त्याचा प्रसार केला लीलाचरित व चक्रधरचरित हे त्याचे मुख्य ग्रंथ आहेत महानुभाव वेदास मानीत नाहींत, जातिभेद पाळीत नाहींत, संन्यासवृत्ति योग्य मानतात शूद्रालाही महंत होता येतें त्यांचे सुमारें तीनशे ग्रंथ मराठींत आहेत व कांही देवनागरींत आहेत

त्याचप्रमाणे शंकराचार्यानंतर शंकराचार्यांच्या **भिक्षुकी वर्चस्वप्रधान** धर्मास त्रासून पुढे अनेक पंथ समाजात निर्माण होऊ लागले, व प्रत्येक पंथ स्वतःस सर्वश्रेष्ठ गणूं लागला अर्थातच त्या योगाने सर्वत्र धार्मिक बाबतींत अंदाधुंदी माजली आद्य शंकराचार्यांचा मृत्यु हिमालयावर केदारनाथ येथें वयाच्या बत्तिसाव्या वर्षी इ० सन ८२० मध्यें झाला.

**४. पौराणिक कालीन शास्त्रकलाभिवृद्धि**—इ० सनाचे सहावे व सातवे शतकांत जी देवळें वगैरे बांधिलीं आहेत, त्यावरून तत्कालीन शिल्पकलेची कल्पना करता येते ओरिसा प्रांतांतील महादेवालय फारच उत्तम आहे त्याचें शिखर ७० फूट चौरस ओट्यावर बांधलेलें असून १८० फूट उंचीपर्यंत गेलेलें आहे त्यावरील नक्षी फारच सुंदर आहे बुंदेलखंडांत खजूराहो या गांवीं तीस चाळीस देवालयें असून तीं इ० सन १००० च्या कालांतच बांधलेली आहेत. या देवळांवरील नक्षीचें काम अत्यंत चित्ताकर्षक आहे

एलोरा येथील कोरीव लेणीं तर पौराणिक कालीन शिल्पकलेचा नमुना आहे. एका खडकांत एक विस्तृत विवर २७० फूट लांब आणि १५० फूट रुंद खोदण्यांत आलेलें

आहे हें समकोण असून त्याच्या मध्यभागीं देवालय आहे त्याचें शिखर ८० ते ९० फूट उच्च आहे एक मोठा द्वारमंडप १६ स्तंभावर उभा आहे हें सर्व काम कोरीव आहे.

दक्षिण हिंदुस्तानांत कावेरी नदीच्या मुखाजवळील चिलंबरम् येथील देवालयही शिल्पकलेचा उत्तम नमुना दाखविणारें आहे.

कलावृद्धीबरोबर पौराणिक कालांत शास्त्रवृद्धि झाली ज्योतिष शास्त्राची प्रगति या कालीं चांगलीच झाली महाविद्वान् आर्यभट्ट हा इ० सन ४७६ मध्यें मागधाची प्राचीन राजधानी जी पाटलीपुत्र नगरी तेथें जन्मला आणि त्यानें आर्यभट्ट नामक ग्रंथ सहावे शतकाचे प्रारंभीं लिहिला या ग्रंथात त्यानें सूर्यचंद्राची वास्तवस्थिति, पृथ्वीची वास्तवस्थिति व इतर ग्रहस्थिति यासंबंधीं निरनिराळीं प्रमाणें प्रतिपादन केलेलीं आहेत वराहमिहिर हाही एक सुप्रसिद्ध ज्योतिषशास्त्रज्ञ इ० सन ५०५ च्या सुमारास उज्जनीस होऊन गेला तो विक्रमादित्याच्या पदरीं नवरत्नांपैकीं 'एक रत्न' होता त्यानें पंचसिद्धांत बृहत्संहिता हे ग्रंथ लिहिले असून खस्थ ज्योतींसंबंधीं अत्यंत महत्त्वाचीं अशीं प्रमाणें त्यांत दिलेलीं आहेत याशिवाय त्याच्या ग्रंथांत आणखीही कित्येक शास्त्रीय विषयांचा विचार केलेला आढळून येतो वराहमिहिरानंतर पुढें ब्रह्मगुप्त हा ज्योतिषज्ञ झाला यानें ब्रह्मगुप्तसिद्धांत नामक ग्रंथ इ० सन ६२८ मध्यें लिहिला.

तत्कालीन आर्योची प्रगति बीजगणित व अंकगणित यातही अत्यंत झाली होती आरब लोकांनीं हिंदूच्या बीजगणिताच्या ग्रंथाचीं भाषांतरें इ० सनाच्या आठव्या शतकांत केलीं, आणि पिसा येथील लिओनार्ड यानें आरब लोकांपासून तें शास्त्र शिकून अर्वाचीन युरोपांत नेलें

त्या कालीं काव्यशक्ति उत्फुल्ल रीतीनें लोकांत वावरत होती सुप्रसिद्ध कविश्रेष्ठ कालिदास याचे शाकुंतल नाटकाचें भाषांतर सर वुइल्यम् जोन्स यानें इंग्रजींत केलें त्याचीच विक्रमोर्वशी वगैरे संस्कृत नाटकें प्रसिद्ध आहेत रघुवंश, कुमारसंभव इत्यादि काव्येंही त्यानेंच लिहिलीं. हा कालिदास इ० सनाच्या सहाव्या शतकांत झाला.

भारवी हाही एक उत्तम संस्कृत कवि त्या कालीं होऊन गेला किरातार्जुनीयम् हें त्याचें काव्य सुप्रसिद्ध आहे त्याचप्रमाणे दशकुमारकर्ता दंडिन् कवि, कादंबरीकर्ता बाणभट्ट, मालतीमाधवकर्ता विदर्भी भवभूति इत्यादि ग्रंथकर्तेही त्या कालीं सुप्रसिद्ध असे होऊन गेले

याप्रमाणें पौराणिक कालीन स्थितीची माहिती उपलब्ध आहे



# प्रकरण तेरावें

## (ऐतिहासिक काळ)

# क्षत्रिय व मुसलमान यांची मिश्र रियासत

**[ इसवी सन १००० ते इसवी सन १८६० पर्यंत ]**

**१ मुसलमानी धर्माचा उदय.**
**२ हिंदुस्तानांत मुसलमानांचें आगमन.**
**३ हिंदुपदपादशाहीचा शेवट.**
**४ मुसलमानांची धामधूम**
**५ दुर्गादेवीचा दुष्काळ.**
**६ दक्षिणेंतील दुर्गाडीचा दुष्काळ.**
**७ भोसले घराण्याची उत्पत्ति.**
**८ प्राचीन राजगाद्या.**
**९ मराठेशाहीचा खून**

**१. मुसलमानी धर्माचा उदय**—मुसलमानी धर्माचा मूळ सस्थापक महमद पैगबर याचा जन्म अरबस्तानातील मक्का येथे इ० सन ५७० मध्ये झाला यानेंच मुसलमानी धर्म प्रसृत केला. यानें जो हा मुसलमानी ऊर्फ महंमदी धर्म प्रस्थापित केला, त्यांतील मुख्य मुख्य तत्त्वें अशीं आहेत कीं, [१] ईश्वर एक असून तो सर्वांस पाप-पुण्याचीं फले सारखीं देतों [२] एकवेळ शरीरातून प्राण निघून गेल्यानतर पुनर्जन्म मिळत नाहीं [३] मेलेल्या माणसांचे आत्मे तसेच पडून राहातात आणि जगाच्या अतीं त्या सर्वाचा न्याय करून ज्याच्या त्याच्या पापपुण्याच्या हिश्शाप्रमाणे ईश्वर त्यास स्वर्गवास अगर नरकवास देतो [४] दररोज नियमाने तीन वेळा शुचिर्भूत होऊन नमाज पढलेच पाहिजे [५] गोरगरिबास दानधर्म अवश्य करावा [६] न्याय-अन्यायाची भीति बाळगून व्यवहार करावा [७] मद्यास अगदी स्पर्श सुद्धां करू नये. [८] मूर्ति-पूजेपासून अलिप्त असावें. [९] दरवर्षी मक्का येथे जाऊन यात्रा करून यावे आणि [१०] मुस्लीम उद्धाराकरिता स्वतःचा प्राण खर्ची घालण्यासही मागेपुढे पाहू नये मुस्लीम कार्याप्रीत्यर्थ प्राण खर्ची पडला तरी तो सद्गतीप्रत पावतो आणि मुस्लीम कार्याची टाळा-टाळी केली असतां नरकवास भोगावा लागतो

याप्रमाणें महमदी धर्माचीं मुख्य मुख्य तत्त्वे आहेत.

**२. हिंदुस्तानांत मुसलमानांचें आगमन**—महलब नामक अगदीं पहिला मुसलमान सरदार इ० सन ६६४ त मुलतानपर्यंत येऊन गेला होता तदनंतर इ० सन ७११ मध्ये महंमद कासीम नामक सरदारानें सिंध प्रांतावर स्वारी केली होती या स्वारीमध्यें विशेष फलप्राप्ति निष्पन्न न झाल्यामुळें पुन्हा अलप्तगीन व सबक्तगीन यांनीं दहावे शतकाच्या चतुर्थ चरणांत हिंदुस्तानवर चढाई केली सबक्तगीनचा पुत्र सुलतान महंमद यानें इ० सन १००१ पासून १०२४ पावेतो लहानमोठ्या मिळून सतरा स्वाऱ्या हिंदुस्तानवर केल्या त्या स्वाऱ्यांपैकीं बारा स्वाऱ्यांना ऐतिहासिक महत्त्व प्राप्त झालेलें आहे बाकीच्या स्वाऱ्यास असावें तेवढे महत्त्व नाहीं इ० सन १०२४ मध्यें महमदाची शेवटची स्वारी काठेवाड मध्यें झाली त्याच्या दक्षिण टोकास समुद्रांत सोमनाथाचे देवालय होते त्यास सोरटी सोमनाथ असे म्हणत असत कोणी सौराष्ट्र असेही म्हणत असत हे प्रसिद्ध देवालय संपत्तीच्या आशेनें महमदानें शेवटच्या स्वारींत लुटले. त्याने त्यातील शिवाचें लिंग जेव्हा फोडलें, तेव्हां त्यांतून हिऱ्यामाणकांच्या इतक्या राशीच्या राशी त्यास सापडल्या की, त्याजबद्दल त्याला प्रथम एवढी कल्पनाही नव्हती त्या वेळीं या लुटींत हस्तगत झालेली संपत्ति, देवाच्या मूर्तींचीं शकले, चंदनाचे मोठमोठे सुंदर दरवाजे वगैरे त्याने गजनीस नेले होते हिंदुस्तानमधून सुप्रसिद्ध शिल्पज्ञ, पंडित, कैदी यांनाही तो गजनीस घेऊन गेला ही स्वारी मुसलमानी रियासतीत फारच विख्यात झालेली आहे या स्वारीनेंच महमदाचें नांव इतिहासांत प्रामुख्याने नोंदले गेलें मुसलमानी रियासतींत यासच पहिला पराक्रमी मुसलमान सरदार सुलतान महमद असें म्हणतात

**३ हिंदुपदपादशाहीचा शेवट**—दिल्लीचा तुवरवंशी राजा अनंगपाळ तुवर हा चंद्रवंशी असून दिल्लीस राज्य करीत होता अशा स्थितींत इ० सन ११४३ मध्यें उत्तरेकडून गजनी वगैरे भागातील घोरी घराण्याचे मुसलमान राजाचे जासूद, सौदागर, फकीर इत्यादि लोक नानातऱ्हेच्या वेषांतरानीं हिंदुस्तानमध्यें फिरत असत आणि इकडील वर्तमान तिकडे पोंचवीत असत

राजा अनंगपाळ यास दोन मुली होत्या वडील मुलीचें नांव कमलादेवी असें होतें आणि ती अजमीर उर्फ द्रोणागिरी येथील सोमेश्वर चव्हाण राजास दिली होती या मुलीस म्हणजे कमलादेवीस पृथ्वीराज चव्हाण हा मुलगा होता अनंगपाळाची धाकटी कन्या कनोजचा राजा विजयपाळ राठोड यास दिली होती या मुलीस जयचंद नामक मुलगा होता पुढें अनंगपाळ राजाचा जेव्हां वृद्धापकाळ आला, तेव्हां त्यानें वानप्रस्थाश्रम स्वीकारण्याचें मनांत आणलें वानप्रस्थाश्रम स्वीकारून बद्रिकाश्रमीं जाण्याचा अनंगपाळ तुंवर याचा विचार ठाम झाला, आणि स्वतःच्या दौहित्रास म्हणजे मुलीच्या मुलास—पृथ्वीराजास—गादीवर बसवून त्यानें आपल्या विचाराची परिपूर्ति केली याप्रमाणें अजमीरच्या चव्हाण वंशास दिल्लीचें राज्य लाभलें होतें हेंच राज्य पृथ्वीराजानंतर मुसलमानांच्या आधिपत्याखालीं गेलें. इ० सन ११९३ सालीं महमद घोरी आणि पृथ्वीराज यांची

स्थानेश्वर येथें सातवी लढाई झाली होती या युद्धांत महमद घोरी विजयी झाला आणि त्यानें पृथ्वीराजास कैद केलें होतें या वेळेपासूनच दिल्लीच्या तक्तावर महमदी पादस्पर्श होऊ लागला होता

दिल्लीच्या गादीवरील अखेरचा हिंदु पादशहा म्हटला म्हणजे पृथ्वीराज चव्हाण हाच होय हा पृथ्वीराज चव्हाण स्वरभेदी होता म्हणजे आवाजाच्या अदाजानें तो बरोबर निशाण मारीत असे लोखंडी तव्यावर कसल्या तरी प्रकारचा आघात करविण्यास लावून तो त्या आवाजाच्या अनुरोधानें लक्ष्य साधून बाण मारीत असे आणि आश्चर्य हें कीं, त्याच्या बाणाच्या टणत्कारासरसा लोखडी तवा ताड्‌दिशीं फुटून जात असे

याप्रमाणें अनेक तवे पृथ्वीराजाने निरनिराळ्या प्रसगीं फोडलेले होते, म्हणून त्याच्या पराक्रमाची चिरस्मृति राहाण्याकरिता त्याच्या पुढील वशास तावडे असें अन्वर्थक उपनांव दिले गेलें या तावडे शब्दाचीं पुढे तायडे वगैरे प्रकारांनीं रूपातरें झालीं स्वर भेदी पृथ्वीराज चव्हाणापासून हिंदुपदपादशाहीचा शेवट झाला पृथ्वीराज चव्हाण यास महमद घोरीनें कैद करून गिझनीस नेलें त्याच्या हातापायात कित्येक मण वजनाच्या लोखडी बेड्या घालून व त्याचे डोळे फोडून त्याला किल्ल्यात ठेवले पुढें कांहीं दिवसांनीं पृथ्वी-राजाचे दरबारचा चंदभाट फकिराचे वेषानें गिझनीस गेला पृथ्वीराज विपत्तींत असलेला त्याने पाहिला, आणि पृथ्वीराजाच्या छळाबद्दल महमद घोरीचा सूड घेण्याचे त्यानें ठरविलें 'पृथ्वीराज स्वरभेदी आहे तो आंधळा झाला असला तरी नुसता आवाज ऐकून त्या आवाजावर नेमका बाण सोडून बाणानें तवे फोडू शकतो, म्हणून अशा वीर पुरुषाचें अलौकिक शरसधान जगास दाखवावें, म्हणजे अशा वीर पुरुषाला जिंकल्याबद्दल तुमच्या पराक्रमाचा लौकिक वाढेल', अशी सल्ला फकिरीवेषानें त्यानें महमद घोरीस दिली त्यानें पृथ्वीराजाच्या शरसधानाचे प्रदर्शन राजवाड्याजवळच सुरू केलें तेथें पृथ्वीराजानें बाणानें तवे फोडले महमद घोरी राजवाड्यावरच्या मजल्यावरून पाहात होता तेव्हां चंदभाटानें खालील दोहा म्हटला·--

"चार वश, चोवीस गज, अष्टउगल प्रमाण । ते पर बैठे सुलतान है मत चूके चव्हाण ॥१॥" हा दोहा ऐकतांच महमद घोरी कोठे बसला आहे याची जाणीव आंधळ्या पृथ्वीराजास झाली

पृथ्वीराजाचें शरसधान पाहून महंमद घोरीनें '**शाबास**' असें म्हटलें त्या आवाजावर पृथ्वीराजाने नेमका बाण मारला तो महमद घोरीच्या मस्तकास लागून तो गतप्राण झाला धन्य धन्य पृथ्वीराज !

**४. मुसलमानांची धामधूम**—या कालानतर गुलाम, लोदी, खिलजी, तघलख, मोगल, पठाण वगैरे मुसलमान घराण्यांतील सरदारांनीं हिंदुस्तानच्या निर-निराळ्या भागांवर स्वाऱ्या करून राजपूत राजांना त्रस्त करण्याचा सपाटा सुरू केला. महंमदानंतर तीनशें वर्षांच्या अवधींत नर्मदेच्या उत्तरेकडील प्रदेशांत त्यांनीं आपली सत्ता

कायम केली राजपूत राजाच्या मनोभावना दुखविण्याचाही सपाटा मुसलमान घराण्यांतील सरदारानी खूपच जोरानें चालू केला होता. अनेक मोठमोठी पवित्र देवस्थानें चक्काचूर करून टाकली, देवालयांतील मूर्तींचे तुकडे तुकडे करून टाकले, हिंदूस मुसलमानी धर्माची दीक्षा जबरदस्तीनें देणे सुरू केले, हिंदु सस्कृतीचा नायनाट करण्याचे प्रयत्न चालविले, आणि सत्तेच्या व अनुकूल परिस्थितीच्या आधाराने ते त्याचे सर्व उपक्रम पार पडू लागले अर्थातच दुसऱ्या बाजूचा म्हणजे हिंदूच्या राज्यव्यवस्थेचा गाडा यथास्थित रीतीने चालणे शक्य झाले नाही हिंदूची राज्यव्यवस्था हळूहळू मोडत चालली होती त्यानतर ज्या स्वाऱ्या मुसलमानानी केल्या, त्यात तमुरलगाच्या स्वाऱ्या विशेष उग्र स्वरूपाच्या होत्या आणि त्याना ऐतिहासिक महत्त्वही आहे तैमुरलंगाच्या स्वाऱ्यात मुलखाची जाळपोळ करणे, लूटपाट करणे, घातपातादि क्रिया आचरणे, जिवत माणसाच्या कत्तली करणे, इत्यादि उग्र प्रकारच फार होत असत याच्या बेदर्द अत करणाचा कयासच जर ऐतिहासिक प्रमाणानें लावावयाचा असला तर दिल्लीस आल्यानतर त्याच्या जवळ जे कदी लोक सग्रहित झाले होते, त्याची जी सभावना त्याने केली ती विचारात घेतली म्हणजे पुरे आहे तो जेव्हा दिल्लीला आला, त्या वेळी त्याच्याजवळ कैदी लोकाचा एवढा मोठा भरणा झाला होता की, त्याचे काय करावे हेच त्याला समजेना ! तेव्हां विचारार्ती (?) त्याने पधरा वर्षावरील सर्व लोकाना रागेने उभे करून चरचरा कापून काटले !! असा उपयोग त्या लोकाचा केल्यावर त्या बिचाऱ्या दीन लोकाची निर्जीव शिरे त्याने एकत्रित करविली आणि त्याचा एक मला अजस्र ढीग रचला !! याप्रमाणें ऐंशी हजार मानवी शिराचा अजस्र ढीग रचून त्यावर एक मोठा चिरेबदी बुरूज तैमुर लगाने बाधला, त्याला **कुतुबमिनार** म्हणतात तो बुरूज हल्ली दिल्ली येथे आहे नादान हिंदू लोक मोठ्या हौसेने दिल्लीस 'कुतुबमिनार' पाहाण्याकरिता जाऊन अजूनही अनेक वेळा आपल्या बेशरमपणाची परमावधि सिद्ध करतात हे एक मोठे आश्चर्य आहे ! अरे ! तेथे तुमचे मुडदे गाडलेले आहेत हे तुम्हास माहीत नाही काय ?

तैमुरलगाचे अत करण हे हृदयद्रावक अनुचित कर्म आचरतांना किंचितही कळवळलें नाही या कत्तलीच्या वेळीं मोठमोठ्या शहरातील रस्ते प्रेतांनीं भरगच्च भरलेले दिसून येत होते रक्ताचे पाट एखाद्या नदीप्रमाणें वाहू लागले होते आणि सर्वत्र स्मशानभीषणता व उद्वेग याचे साम्राज्य पसरलेले होते तेराव्या शतकाच्या अखेर अखेर तैमुरलंगानें हा हाहाकार माजवून दिला यानें कुशल शिल्पज्ञ आणि जाडे विद्वान् समरकद येथें नेले होते असा हा तैमुरलग त्या गरीब बिचाऱ्या कैद्यांच्या कत्तलीनतरच त्यांच्या आर्तस्वरानें शापित होत्साता इ० सन १४०५ सालीं मरण पावला

यानतर काहीं काळ 'बळी तो कान पिळी' असा अदाधुंद कारभार सर्रास चालू होता चहूकडे लुटी, दंगेधोपे, बडें सपाटून चालू होतीं राज्यावर येतांच राजकुटुबांतील पुरुषाची कत्तल करणें अथवा त्यांना जन्माध करून बदिखान्यांत टाकणे वगैरे अनन्वित प्रकार चालू होते. रक्तपात, राज्यकर्त्या यांनाही खळ पडला नव्हता प्रजा अमदी

अस्वस्थावस्थेप्रत पोचली होती लोक बेचैन झाले होते सौख्याचा लेशही प्रजेच्या वाट्यास येत नव्हता

अकबर बादशहाच्या कारकीर्दीपर्यंत एकछत्री बादशहात कोणाचीच गणना न झाल्यामुळे अकबरापर्यंत असे प्रकार सर्रहा चालू होते

**५. दुर्गादेवीचा* दुष्काळ**—इ० सन १३९६ पासून इ० सन १४०८ पर्यंत उत्तर हिंदुस्तानांत भीषण स्वरूपाचा बारा वर्षें दुष्काळ पडला होता हा दुष्काळ दुर्गादेवीचा दुष्काळ म्हणून विख्यात आहे एकसारखे बारा वर्षेपर्यंत अवर्षण झाल्यामुळें अगदी हाहा कार माजून गेला होता लोकाचे इतके हाल झाले की, ते डोळ्यांनीं देखील पहावेनात खाण्याकरितां अन्नाची गोष्ट तर दूरच राहिली, परतु पाण्यावाचून तडफडून लोक पटापट मरू लागले होते तलाव, नद्या विहिरी वगैरे अगदी आटून गेल्यामुळे पाण्याची अमृतापेक्षाही जास्त किमत भासू लागली होती पाण्याचा एक थेंबही मिळणे दुरापास्त झाले होते अन्नावाचून लाखो लोक उपाशी अवस्थेत तडफडून मरण पावले पाणी ! पाणी ! असे आर्तस्वर चहूकडून कानी येत असत रस्त्याने जनावरे लोळतात त्या प्रमाणे लोकाच्या झुंडीच्या झुंडी तडफडताना व गटबडा लोळताना दृष्टोत्पत्तीस येत अशी अनेक प्रेते आढळून येत कीं, ज्याच्या कमरेला रुपयाच्या कसन्या बांधलेल्या असत यावरून त्या वेळीं वाटेल तितका पैसा ओतला तरी अन्नपाणी मिळत नसावे असे अनुमान करता येते मरणसमयीं आणि शुद्धावस्थेत असतानाच मृत्यूच्या भीतीमुळें वाटेल तितका पैसा देण्याची तयारी दाखवून थोडेसे अन्नपाणी मिळविण्याचा प्रयत्न लोक करीत असत व तो अर्थातच निष्फळ झाल्यावर कमरेला कसन्या बांधलेल्या आहेत अशा अवस्थेतच बिचाऱ्याचें देहावसान होई अशा भयकर दुष्काळातच रोगाची भयकर साथही उद्भवली होती लाखों प्रेते सडून गेल्यामुळे वातावरण अशुद्ध होऊन बिघडून गेले होते, आणि त्याचाच परिणाम रोगाची साथ उत्पन्न होण्यात अनुभवास आला असा कहर झाला की, त्याचे वर्णन केले असता अगावर रोमाच उभे राहातात लहान लहान सुकुमार, गोंडस मुले भुकेनें विव्हळत आईच्या तोंडाकडे चिमणीच्या पिलाप्रमाणे पाहून प्राण सोडून देत त्या वेळी त्या मुलाच्या तोंडात टाकण्याकरिता अन्नाचा एखादा कण तर दूरच राहिला, पण पाण्याच्या एका थेंबाचीही व्यवस्था होत नव्हती अखेर अन्नपाण्यावांचून त्या जीवाचा अत होई भुकेने लोक इतके खवखवून जात की, बिचारे मेलेल्या मुर्द्यांचे मास खाऊनच सतुष्ट होत बहुतेक प्रेतांजवळ एकेक, दोन दोन माणसे ते प्रेत तोडून खाताना दृष्टोत्पत्तीस येत फार काय पण देहभान विसरून अनेक मातांनी आपल्या मृत सुकुमार बालाच्या मांसाने आपली क्षुधा शमन करून घेतल्याचेही अनेक प्रसग या दुष्काळात घडून आले. माणसानाच अन्नपाण्याची व्यवस्था करणे दुष्प्राप्य होई मग जनावरांची स्थिति काय वर्णावी ! हात पाय घासून अनेक दुभत्या गाईंनी, गोंडस पोळानीं आणि इतर जनावरानी

---

* या दुष्काळाची माहिती इतिहाससशोधक रा० राजवाडे यांच्या इतिहासांत दिलेली आहे

कर्णकटु व भीषण हबरडे फोडीत आपले प्राण सोडले  लहान लहान मुलें कौवडीच्या पिलांच्या किंमतीस विकावयास काढलीं, पण तरीहि तीं कोणी घेईनात  माताकन्या, पितापुत्र, पतिपत्नी, माताअपत्यें, भाऊभावडें, इष्टमित्र यांचा विरह एकमेकांस असह्य पोळूं लागला  तरी पण कुणीही कुणाला आश्रय देण्याची व्यवस्था करणे शक्य नव्हतें सारा मुलुख वैराण व भयाण होऊन गेला होता  काळाचें अक्राळविक्राळ स्वरूप आ पसरून मानवी आणि पाशवी प्राण्याना गिळण्याचा इषारा करीत होतें यांप्रमाणें भयंकर स्थिति या दुष्काळाचे वेळीं घडून आली

अगोदरच मुसलमानांचा असह्य जुलूम आणि त्यांत हा भयानक व बहुकालीन दुष्काळ, मग काय पाहावयाचें आहे ! सारी प्रजा अगदींच त्रस्त आणि ग्रस्त होऊन गेली ईश्वरीसत्तेनें आणून सोडलेले दुष्काळाचें अस्मानी संकट आणि महमदी सत्तेनें उपस्थित केलेले सुलतानी संकट या दोहोंच्या एकसमयावच्छेदामुळे प्रजा अगदीं जर्जर होणें साहाजिकच होतें

या कठिण काळीं उत्तरेकडील मांडलिक, संस्थानिक, सरदार,जहागिरदार, दरकदार, देशमुख वगैरे थोर थोर घराणीं सुद्धा त्या भयंकर जाचाने पीडित व व्यथित होत्सातीं दक्षिणेत वास्तव्य करिती झाली पुढें पुढे काळ जसा जसा अनुकूल होत गेला, तसतसा स्व-पराक्रम गाजवून दक्षिणेंतही त्यानी आपले जहागिरदारी, सरदारी, देशमुखी, पाटिलकी वगैरे हक्क प्रस्थापित केले आणि संस्थानेही स्थापन केलीं  या दुष्काळाच्या वेळीं प्राणसंरक्षणार्थ यांप्रमाणे जो तो जिकडे तिकडे भटकला गेल्यामुळे आपापल्या आप्त स्वकीयांचीच ओळख नाहींशी झाली होती, आणि होणे साहजिकच होतें  या दुष्काळाने दक्षिणेंतील वसती बऱ्याच प्रमाणांत वाढविली  उत्तरभाग अर्थातच तितक्याच जास्त प्रमाणांत ओस पडला होता हे सांगावयास नकोच

भविष्योत्तर पुराणात सह्याद्रिखंडामध्यें या दुष्काळासंबंधीं असे वर्णन आहे कीं:—

> गुर्जरे विषये रम्यं ब्रह्मखेटक संज्ञकं ।
> पुरमस्ति महद्दिव्यं दक्षिणेचार्बुदाचलात् ॥ १३३ ॥
> कृते ब्रह्मपुरं नामं त्रेतायां त्र्यंबकं तथा ।
> तदेव द्वापारे ख्यातं कलौ वै ब्रह्मखेटकम् ॥ १३४ ॥
> अस्मिन् देशे नरपतिः क्षत्रियो वेणुवत्सकः ।
> इल्वदुर्गे राजधानि तस्य भूपस्य चाभवत् ॥ १३५ ॥
> वयं सर्वे क्षत्रियाश्च लाटदेश समुद्भवाः ।
> कालयोगाद्धर्मभ्रष्टाः जाताः सर्वे मुनीश्वराः ॥ १३६ ॥
> पौरोहित्यंच तेषाम् वै कर्तव्यमविशंकितम् ।
> येऽवमानं करिष्यन्ति तेहि दंड्याः न संशय ॥ १३७ ॥

भावार्थः—गुजराथमध्यें अबूपर्वताचे दक्षिणभागीं ब्रह्मखेटक नांवाचे एक नगर आहे. त्यास कृतयुगीं ब्रह्मपूर असें म्हणत, त्रेतायुगीं त्र्यबकपूर म्हणत, द्वापारीं त्र्यंबकपूरच म्हणत आणि कलियुगीं त्यासच ब्रह्मखेटक या सज्ञेनें सबोधीत असत तेथील वेणुवत्स नामक क्षत्रिय राजा इल्वदुर्ग (इडर)मध्यें वास्तव्य करून आपल्या राज्याची व्यवस्था पाहात होता त्याच्यावर या दुष्काळाचा सपाटून कहर उडून तो धर्मकर्मभ्रष्ट झाला त्यानें एका मुनीला ही हकीकत निवेदन केली तो म्हणाला, 'हे मुनिवर्य! आम्ही सर्व क्षत्रिय आहोंत आम्ही पूर्वी लाट म्हणजे गुजराथमध्यें राज्य करीत होतों दुष्काळामुळें व मुसलमानी जुलमामुळे आम्ही राज्यत्याग केल्यानें क्षात्रधर्मच्युत झालों आहोत तरी आपण कोणतेही कल्पविकल्प मनांत न बाळगता आम्हा सर्व क्षत्रियाचें पौरोहित्य पूर्ववत् क्षात्रधर्मास अनुसरून करा या बाबतींत जो आपलें म्हणणें अवमानील तो दडास पात्र होईल"

याप्रमाणे हे वर्णन असून यावरून या दुष्काळाचे वेळीं मोठमोठ्या राजाची देखील कशी शोचनीय स्थिति झाली होती याचे चित्र डोळ्यासमोर उभें राहाते बहुतेक राजे-रजवाडे या कालीं दक्षिणेंत आले.

**६. दक्षिणेतील दुर्गाडीचा दुष्काळ**— उपरिनिदिष्ट उत्तरभागांतील दुष्काळानतर महाराष्ट्रांत व दक्षिणभागीं इ० सन १४६८ पासून इ० सन १४७५ पयत पुन्हा भयकर दुष्काळ पडला या दुष्काळास 'दुर्गाडीचा दुष्काळ' अशी सज्ञा आहे या दुष्काळाचें स्वरूपही अत्यत भयानक असें होते या वेळीं दक्षिण देश बहुश वैराण झाला होता या वेळीं दक्षिण देश सोडून माडलिक, सस्थानिक, सरदार, जहागिरदार, पडित, कवि, विद्वान, शिल्पज्ञ वगैरे पुन्हा प्राणभयाने उत्तरेस भटकू लागले गागाभट्टाचें घराणे या वेळींच दक्षिणेतून उत्तरेकडे आले होते काशीस या घराण्याने पुढें वास्तव्य केलें या वेळीं दक्षिणेत बहामनी नामक पाच मुसलमानी राजांचा अंमल बसलेला होता त्यांपैकी बेदरचें बुरीदशाही नांवाचें एक राज्य होतें त्याचा सुभेदार दामाजीपत या नांवाचा होता हा दामाजीपंत जगविख्यात ईश्वरभक्त म्हणून प्रसिद्ध आहेच या दुष्काळामुळें होणारे लोकांचे हाल त्याला न पाहवले गेल्यामुळे त्यानें सरकारी धान्यांचीं हजारों खडींचीं कोठारें सरकारी परवानगीवांचून गोरगरिबाना वांटून दिलीं या त्याच्या माहात्म्यास साजेशा कृतीमुळें त्याचा लौकिक पुढे सर्वत्र पसरला त्याच्यासबधीं कांहीं कल्पित तर कांहीं खऱ्या अशा अनेक लहानमोठया आख्यायिका रचल्या गेल्या, परतु त्याच्यावर या कृत्यामुळें सरकारचा असीम रोष झाला आणि त्यानें दामाजीपंतांचा बराच छळ आरभिला परंतु तो हरिभक्तपरायण दामाजी त्या संकटातूनही ईश्वरकृपेमुळें शीरसलामत बाहेर पडला. आणि पुढें पुढें तर त्याचें सरकार त्याला परमेश्वर मानूं लागलें

याप्रमाणें या दुर्गाडीच्या दुष्काळाची त्रोटक हकीकत असून एका पाठीमागें दुसरा असे हे भीषण स्वरूपाचे दुष्काळ हिंदुस्तानांत पडल्यामुळें आणि त्यांतही मुसलमानी

जाचामुळे, वारवार घडून येणाऱ्या राज्यक्रांतीच्या काळांत उत्तर हिंदुस्तानांतील स्त्री पुरुषाचें जीवित पाण्यावरील बुडबुड्याप्रमाणें क्षणभंगुर झाल्यामुळे उत्तरेंतील अनेक क्षत्रिय राजघराण्यांतील तेजस्वी व राजकार्यधुरंधर लोकांनी स्थानत्याग करून मुसलमानी जुलमाचा सपाटा ज्या विभागी कमी प्रमाणांत होता त्या विभागाचा निरुपायानें आश्रय केला त्या वेळीं जीं अनेक राजघराणी दक्षिणेत आली होतीं, त्यांतील प्रमुख घराणें म्हणजे उदेपूरच्या सिसोदिया घराण्यापैकी सतराव्या शतकांत स्वराज्याची प्राणप्रतिष्ठा करणाऱ्या श्रीशिवाजीचे भोसले घराणे हे होय

**७. भोसले घराण्याची उत्पत्ति**— उदेपूरच्या गादीवर राणा भीमसिंह असताना त्याची स्वरूपखनी पत्नी राणी पद्मिनी हिला प्राप्त करून घेण्याकरिता दिल्लीच्या अल्लाउद्दीन खिलजीने चितोडवर इ० सन १३०३ मध्ये स्वारी केली होती त्या वेळीं पद्मिनीबरोबर हजारो क्षत्रिय स्त्रियानी अग्निकुंडात आपल्या प्राणाच्या आहुत्या देऊन क्षात्रधर्मांतील पातिव्रत्याचा प्रभाव जगाचे निदर्शनास आणून दिला राणा भीमसिंह या चकमकीत मारला गेला त्याचा पुत्र जयसिंह राणा शत्रूचा सूड घेण्याच्या इरादाने कांही विशिष्ट योजना योजण्याकरिता निवात अशा वनात गेला त्याने पुढे मुसलमानांशी अनेक टकरा दिल्या होत्या जयसिंह राण्याच्या मुलाचे नाव लक्ष्मणसिंह राणा असे होते त्या लक्ष्मण सिंहाचा मुलगा अजयसिंह राणा होता या अजयसिंहाने आपला धाकटा पुत्र हमीरसिंह याच्या-कडेच राज्यकारभाराचें काम सोपविले होते या कारणामुळे अर्थातच त्याचा वडील मुलगा सज्जनसिंह हा रागें भरून दक्षिणेत निघून गेला हा पुष्कळ दिवस दक्षिणेत राहिल्यानतर मग पुन्हा आपल्या वडिलाच्या राज्यांत गेला होता सज्जनसिंहाचा पुत्र दिलीपसिंह राणा हा होता त्या दिलीपसिंहाचा मुलगा सिंहाजी राणा हा होय या सिंहाजी राण्याचा पुत्र भोसाजी राणा हा होय भोसाजी राण्याचा मुलगा देवराजजी राणा होय हे देवराजजी राणेच दहावे शतकात पुन्हा दक्षिणेंत आले हे भोसाजी राण्याचे पुत्र म्हणून दक्षिणेत वडिलांचे नावावरून स्वत.चे कुळास भोसावत ऊर्फ भोसले म्हणवू लागले याना दोन पुत्र होते एक प्रतापसिंह राणा आणि दुसरे इंद्रसेन राणा प्रतापसिंह राणा यानीं हिंगणी, बरडी, वेरूळ, खानवट, देऊळगाव, या गावाची पाटीलकी व देशमुखी साभाळली होती दुसरे जे इंद्रसेन राणा म्हणून होते, त्याचेपासून सातारचे गादीचे वारस पुढे उत्पन्न झाले इंद्रसेन राण्याचे शुभकृष्णराणा, त्याचे रूपसिंहराणा, त्यांचे भूमिंद्रसिंह राणा, त्यांचे धापजी राणा, त्याचे बरहटजी राणा, त्यांचे व्यंकोजी राणा, त्याचे बाबाजी राणा, बाबाजी राण्याचे मालोजी राणा, मालोजीराण्यांचे शहाजी राणा आणि त्या शहाजीराण्यांचे पुत्र भारतसूर्य गोब्रह्मप्रतिपालक श्रीरामचंद्रावतार श्रीमच्छत्रपति शिवाजी राणा महाराज हे होत याप्रमाणें दक्षिणेत येऊन कायम राहिलेले देवराजजी राणा भोसावत यांचेपासून सोळावें पिढींत श्रीशिवरायाचा अवतार झाला ही वशावळ फार प्राचीन अशी उपलब्ध आहे ती सातारचे शेवटले राणा प्रतापसिंह यांना इंग्रजांनीं इ०सन १८३९ सालीं पदच्युत केल्यावर यांनीं कंपनी सरकारकडे स्वतःच्या राज्याच्या अपिलांत इ०सन१८४०मध्यें दाखल

केली होती या वशावळीचे नऊ सुटे बद असून प्रत्येक बदावर कंपनी सरकारचा शिक्का आहे त्यांत श्रीविष्णूपासून २०५ वे पिढींत श्रीशिवरायाचा अवतार दर्शविला आहे ही वशावळ इ० सन १८३९ त उदेपूरच्या राण्यांनीं मान्य करून स्वत च्या वंशावळींत सामील करून घेतली दक्षिणेतील सातारचे प्रतापसिंह व आम्ही एकाच घराण्याचे आहोत असें मान्यता-पत्र लिहून त्यानीं तें साताऱ्यास प्रतापसिंह महाराजास पाठविलें होतें

**८. प्राचीन राजगाथा**—चितोडचा राणा विक्रमाजित याच्या वधानतर चितोडच्या गादीवर पृथ्वीराजाचा पुत्र बनबीर यास तात्पुरतें बसविण्यात आलें या सधीचा फायदा मात्र बनबीराने अगदी पूर्णपणे साधून घेतला त्यानें राजघराण्यांतलि स्त्री पुरुषाचा वध करून तो स्वत मालक बनला विक्रमाजिताचा सहा वर्षांचा पुत्र उदय सिंह यास पन्ना नावाच्या दाईने त्याच्याऐवजी आपल्या पोटच्या गोऱ्याचा बळी देऊन वांचविले होते ही गोष्ट विख्यातच आहे हा उदयसिंग वयात आल्यावर सर्व माड लिकांनी त्याचें आधिपत्य कबूल केले तो चितोडच्या गादीवर स्थानापन्न झाला आणि बनबीर मग दक्षिणेत भटकला बनबीराचा सबध नागपूरच्या भोसले घराण्याचा मूळ पुरुष म्हणून येतो असा अदाज आहे ही गोष्ट इ० सन १५४१ मध्यें घडली

शालिवाहनाच्या आठव्या शतकात म्हणजे आज सुमारे अकराशे वर्षांपूर्वी दंतिदुर्ग नामक जाधव वशातील पुरुषाने निजामहैद्राबादेजवळच्या मानखेड येथे नवें राज्य प्रस्थापित केले होते पुढे काही काळाने देवगिरीचा भिल्लम म्हणून एक राजा झाला, तो यादववशीच असून त्यानें सर्व महाराष्ट्र पादाक्रात करून गोव्यापर्यंत आपल्या राज्याची सरहद्द नेऊन भिडविली होती

शालिवाहन शके ११९४ आणि शके १२१२ म्हणजे अनुक्रमें इ० सन १२७२ आणि इ० सन १२९० मधील ताम्रलेख उपलब्ध झालेले आहेत ते रामचद्रराव ऊर्फ रामदेवराव जाधव नांवाने इतिहासांत प्रसिद्ध असलेल्या देवगिरीच्या जाधव घराण्याच्या राजांचे आहेत हेमाद्रि ऊर्फ हेमाडपत या नांवाचा ब्राह्मण याच रामदेवराव जाधव राजाचा प्रधान होता त्यानेच मोडी लिपि आणि हेमाडपती देवळाचा नमुना ह्या दोन नवीन गोष्टी दक्षिणेकडून म्हणजे सिलोन ऊर्फ लका या मुलखातून आपले राज्यात म्हणजे महाराष्ट्रात आणल्या असें म्हणतात या रामदेवराव राजाच्या काळातच ज्ञानेश्वराने ज्ञानेश्वरी केली याबद्दल ज्ञानेश्वरीतच शेवटच्या अध्यायात उल्लेख आहे तो असा की·—

ऐसे युगी परीकाळीं । आणि महाराष्ट्र मडळी । श्रीगोदावरीच्या कुळीं । दक्षिणीला ॥१८०३॥ त्रिभुवनेक पवित्र । अनादि पचक्रोश क्षेत्र । जेथे जगाचें जीवन सूत्र । श्रीमहालया असे ॥१८०४॥ तेथे यदुवश विलासू । जो सकळ निवासू । न्यायानें पाळी क्षितिषु । श्रीरामचद्र ॥१८०५॥ शके बाराशें बारोत्तरे । तैं टीका केली ज्ञानेश्वरें । सच्चिदानद बाबा आदरें । लेखक जाहला ॥१८११॥ बहुतकाळ पर्वणी गोमटी । भाद्रपदमास कपिलाषष्ठी । प्रतिष्ठाणी गोदातटी । लेखनकामाठी संपूर्ण जाली ॥१८१२॥ ओ०

यावरून या राजाच्या कालींच ज्ञानेश्वरी लिहिली गेली हे स्पष्ट होतें शके १२३४ म्हणजे इ० सन १३१२ या वर्षी रामदेवराव जाधव मरण पावला, असें अर्विधाचे इतिहासात आहे. या देवगिरीच्या जाधव घराण्याच्या राज्याची परिसमाप्ति दिल्लीचा सुलतान अल्लाउद्दीन खिलजी यानें इ० सन १२४० मध्ये केली

याशिवाय शिलार वशाच्या तीन गाद्या कोकणांत होत्या एक ठाण्याजवळ होती, दुसरी खारेपाटणाजवळ होती, तिसरी कोल्हापुराजवळ होती या शिलार वशास देवगिरीच्या यादववशाने बुडविले होतें यादववशाची आणखी एक स्वतंत्र गादी द्वारावती येथे भिल्लम राजाचे पूर्वी स्थापन झाली होती द्वारावती म्हैसूर प्रांतात असून तिला आतां हलबिडु म्हणतात द्वारावतीसच धूरसमुद्र असेंही नांव आहे

नल आणि मौर्य यांनी स्थापिलेल्या गाद्या शभर वर्षांच्या आतच चालुक्यांनीं नामशेष केल्या पुढें कदंब यांनीं गोमातकात गोवें येथे नवीन गादी स्थापन केली, ती शेवटीं देवगिरीच्या यादववशानें बुडविली.

राष्ट्रकूट ऊर्फ राठोड आणि मानखेडचे यादव यांच्या गाद्या बरींच वर्षेपर्यंत चालल्या होत्या त्या अखेरीस देवगिरीच्या जाधव ऊर्फ यादव घराण्यास मिळाल्या चालुक्य ऊर्फ साळुके किंवा शिर्के यांची आणि शिलार ऊर्फ शेलार यांची गादी देवगिरीच्या यादववशानें बुडविली द्वारावती येथील जाधववशाची गादी काफूर यानें बुडविली देवगिरीचा यादववशाही पुढें लवकरच नामशेष झाला याप्रमाणे शालिवाहन शकाच्या द्वितीय चरणातच ठिकठिकाणच्या यादववशाच्या बहुतेक गाद्या बुडाल्या

शालिवाहन शके १२५० चे सुमारास कावेरी नदीचे कांठीं विजयनगर येथें जाधव वशातील सगम नामक पुरुषानें पुन्हा गादी स्थापिली त्या ठिकाणीं त्याचा मुलगा हरिहर यानें राज्य केले शके १२७६ या वर्षीं हरिहराचा पुत्र बुकराज हा गादीवर होता पुढें शके १४८६ मध्ये आदिलशाही, निजामशाही आणि कुतुबशाही या तीन राज्यांचे संस्थापक आदिलशहा, निजामशहा व कुतुबशहा या तिघानीं मिळून विजयनगरची गादी बुडविली यादव मौर्य, प्रमार ऊर्फ पवार, यादव ऊर्फ जाधव, कदम ऊर्फ कदब, चालुक्य ऊर्फ साळुंके अथवा शिर्के, राष्ट्रकूट ऊर्फ राठोड, भोसले ऊर्फ शिसोदे, नल ऊर्फ नलावडे किंवा नलोडे वगैरे क्षत्रियानीं नर्मदेच्या उत्तरेस म्हणजे महाराष्ट्र व तैलंगण या मुलखांत इ० सनाच्या अकराव्या शतकापासून सोळावे शतकापर्यंत म्हणजे पांच सहाशें वर्षे राज्य केलें.

राजपुताना ऊर्फ राजस्थानांतील प्राचीन गादी म्हटली म्हणजे जेसलमीरची गादी होय. हा जेसलमीरचा राजवंश स्वत.स भट्टी म्हणवून घेऊन शालिवाहनाच्या वशाशीं आपला संबध लावतो जोधपूरचे राठोड हे कनोजचे राठोडाचे वंशज होत कारण कनोजचें राज्य मुसलमानांनीं बुडविल्यावर तेथील राजवंशानें मारवाडांत जोधपूर येथें स्थिर होऊन पुढील व्यवस्था केली राजघराण्यांची दक्षिण व उत्तर हिंदुस्तानची एकच

सांखळी असून हीं सर्व घराणीं प्राचीन क्षत्रियांचीं आहेत हें नव्यानें सांगावयास नकोच या सर्व राजघराण्यांचा व त्यांच्या देशविभागांचा विचार केला तर जेसलमीरचे शालिवाहन ऊर्फ साळुके, जोधपूर व कनोजचे राष्ट्रकूट ऊर्फ राठोड, जयपूरचे नल ऊर्फ नलोडे, उदेपूरचे शिसोदे ऊर्फ भोसले, कुतल देशातील मोरबनचे मोरे ऊर्फ मौर्य, पूर्व महाराष्ट्राचे पांड्य, पश्चिम महाराष्ट्र व द्रविड देशचे केशर ऊर्फ वडुकर, वनवासी ऊर्फ कर्नाटकचे कदंब, तामील देशांतील कांची नगरीचे पल्लव ऊर्फ पालव, आणि, दक्षिण महाराष्ट्रांतील कुंतल देशचे नंद याप्रमाणें क्षत्रिय राजघराण्याचा इतिहास दृष्टोत्पत्तीस येतो

राजवंशप्रणालीचाच जर ऐतिहासिक दृष्टीनें कालसाधन करून विचार करावयाचा असला तर तो असा निष्पन्न होतो —

इ० सनापूर्वी ७०० पर्यंत आर्यांचे दक्षिण महाराष्ट्रात राज्य नव्हतें

इ० सनापूर्वी ७०० ते इ० सनापूर्वी ३५० दक्षिण महाराष्ट्रात आर्यांच्या वसाहती

इ० सनापूर्वी ३५० ते इ० सनापूर्वी ७३ महाराष्ट्रात आर्यांचीं राज्यें.

इ० सनापूर्वी ७३ ते इ० सन २१८ शालिवाहन किंवा आंध्रभृत्य

इ० सन २१८ ते इ० सन ५५० अभीर उर्फ अहीर, राष्ट्रकूट वगैरे

इ० सन ५५० ते इ० सन ७५३ पूर्व चालुक्य

इ० मन ७५३ ते इ० सन ११८९ उत्तर चालुक्य

इ० सन ११८९ ते इ० सन १३१८ जाधव ऊर्फ यादववंश

इ० सन १३१८ ते इ० सन १३४७ दिल्लीच्या सुलतानाचा वंश

इ० सन १३४७ ते इ० सन १६५० बहामनी राज्ये

इ० सन १६५० ते इ० सन १८६० मराठेशाही

यानंतर पुढे इंग्रजशाही सुरू झाली सातारचे शेवटचे छत्रपति शहाजी महाराज ऊर्फ अप्पासाहेब ( प्रतापसिंह महाराज यास पुण्याच्या नातूच्या कारस्थानामुळें इ० सन १८३९ मध्ये सातारच्या गादीवरून पदच्युत करून त्याचेच बंधु शहाजी महाराज ऊर्फ अप्पासाहेब यांस गादीवर बसविले होतें ते ) हे इ० सन १८५७ सालच्या बंडांत सामील होते, असा त्याच्यावर पुण्याच्या चित्पावन ब्राह्मणांच्या साह्यानें आरोप ठेवून इंग्रजांनी सातारचें राज्य इ० सन १८६० सालीं खालसा केलें तेव्हां मराठेशाहीची सातारची एक शाखा बुडाली. परंतु शिवाजी महाराज यांचे नातू संभाजी महाराज ( राजाराम महाराजांचे पुत्र ) हे कोल्हापूरच्या छत्रपतीच्या गादीचे मूळ संस्थापक होते त्या छत्रपतीची कोल्हापूरची मुख्य गादी आजतागायत चालू आहे इ० सन १८१८ सालीं पेशवाई बुडाली

याप्रमाणे राजगाथांसंबधींचें ऐतिहासिक विवेचन आहे त्यांतल्या त्यांत सातारची मराठ्यांची गादी नातू प्रभृति पुणेरी ब्राह्मणी टोळीने अंगावर रोमांच उभे राहातील अशीं कपटकारस्थानें व निमकहरामपणाचीं भलभलतीं कृत्यें आचरून लयास नेली. या कारस्थानाची हकीकत हृदयविदारक आहे.

**९. मराठेशाहीचा खून**—सुमारे अडीचशे वर्षांपूर्वी महाराष्ट्राची स्थिति मोठी विचित्र होती रावणासारख्या मदोन्मत्त व धर्मवेड्या औरंगजेबाच्या तापत्रयामुळे महाराष्ट्राचा कंठी प्राण आलेला होता हिंदूंच्या शिखासूत्रांची होळी व हिंदुधर्माची राख-रांगोळी होऊन आपल्या मायबहिणींच्या व लेकीसुनांच्या इज्जत अब्रूची भर चव्हाट्यावर धुळधाण उडू पाहात होती आणि सर्व महाराष्ट्रभर जुलुमाचें बंड कहर करून सोडीत होतें मुसलमानांचा दरारा प्रत्यक्ष यमराजापेक्षाही अधिक तीव्रतम असा बसला होता हिंदूंची अवस्था खाटकाच्या मेंढ्या–बकऱ्याप्रमाणे **'अजापुत्रं बलिं दद्यात्'** अशी अत्यंत हलाखीची झालेली होती अशा अनुपमेय अनाचाराच्या अंधकारमय साम्राज्यांत शिवरायरूपी रवीचा उदय जर झाला नसता तर आज हिंदुधर्म आणि हिंदु संस्कृति हे दोन्ही शब्द नामशेष होऊन हिंदुस्तानचें नांव यवनस्तान पडलें असतें **'जो न होत शिवाजी तो सुन्नत होत सबोंकी'** या वचनांत बरेंच तथ्य आहे परंतु अशा आणीबाणीच्या वेळी महाराष्ट्राचा प्रखर भानु श्रीमच्छत्रपति शिवराय उदयाचलावर दृग्गोचर झाला आणि त्याने आपल्या अलौकिक तेजाने अंधकारमय बनलेला महाराष्ट्र स्वातंत्र्याच्या लख्ख प्रकाशाने पुनीत केला या गोब्राह्मप्रतिपालक शिवरायाने प्रस्थापित केलेल्या मराठेशाहीचा मुडदा कोणी आणि कसा पाडला याचाच ऐतिहासिक दृष्ट्या छडा लावणें कर्तव्य आहे

श्रीशिवरायांनीं स्थापिलेल्या स्वराज्याच्या सातारच्या गादीवरील शेवटले राजे छत्रपति प्रतापसिंह महाराज हे होते इ० सन १८१८ साली पुण्यातील पेशवाईचे उच्चाटण बाळाजीपंत नातूनीं केल्यानंतर ईस्ट इंडिया कंपनीने प्रतापसिंह महाराजांना त्यांच्या पूर्वजांच्या सिंहासनावर बसविलें होतें गादीवर बसण्यापूर्वी त्यांना स्वामीद्रोही पेशव्यांनी सहकुटुंब सहपरिवार सातान्यान्या अजिंक्यतारा नावाच्या किल्ल्यात अनेक वर्षे कैदेत ठेवलें होते

प्रतापसिंह महाराज सिंहासनाधिष्ठित होतांच त्यांनी राजकारणाची घडी नीट बसविली आणि मग ब्राह्मणेतर समाजाच्या सामाजिक, धार्मिक उन्नतीकडे त्यांनीं लक्ष पुरविलें अर्थातच हें त्यांचे करणें ब्राह्मणांना आवडलें नाहीं कारण ब्राह्मणेतर समाज सामाजिक व धार्मिक बाबतींत शाहाणा होणं म्हणजे पर्यायानें ब्राह्मणाचा पोटमारा होण्यासारखें होतें सामाजिक व धार्मिक पडद्याच्या आडून ब्राह्मणांना जो यथेच्छ मलिदा सतत मिळत होता त्यास खंड पडणार या हिनक व स्वार्थी भावनेने ब्राह्मणांचीं डोकीं महाराजांविरुद्ध निरनिराळे घातकी डाव निर्माण करूं लागलीं बाळाजीपंत नातु या नांवाच्या एका ब्राह्मणानें प्रतापसिंहावर किटाळे आणण्यास प्रामुख्यानें पुढाकार घेतला होता इंग्रजांकडून मिळणाऱ्या जहागिरीच्या लचक्याला चटकलेल्या ज्या नराधमानें शनवारवाड्यावर 'इंग्रजी झेंडा' फडकविण्यास मागें पुढें पाहिलें नाहीं, तो प्रतापसिंहाला गाडण्यास मागें पुढें पाहाणार थोडाच होता !

या नातूला आणखी चिंतामणराव सांगलीकर, बाळाजी किबे, बाळंभट जोशी,

बाळकोबा केळकर, नागो देवराव, भोरचे पतसचीव, कृष्णाजी सदाशिव भिडे, सखाराम बल्लाळ, महाजनी, महादेव सप्रे, भाऊ लेले इत्यादि ब्राह्मणभ्रुव येऊन मिळाले, व बेइमानीचा डाव खेळण्यास या ब्राह्मणवीरांनींही नातूजवळ कबुली दिली एवढेंच नव्हे तर कुऱ्हाडीचा दांडा अप्पासाहेब भोसले (प्रतापसिंहाचा खास धाकटा भाऊ) हाही या कपूस येऊन मिळाला या योगानें या त्यांच्या कारवाईस अतिशयच ऊत आला आणि त्यांना अस्मान् ठेंगणे झाल्याप्रमाणें वाटू लागलें अप्पासाहेब भोसल्यास ते वाटेल तशा मायावी मानमरातबांनीं खूष ठेवूं लागले तसतसा हा भोळा मराठा वीर फुगून जाऊन आपल्या खास भावाचा नायनाट करण्यास सज्ज होऊं लागला या त्याच्या कारस्थानांत एक दोन शंकराचार्यही गुरफटलेले होते या सर्व कपूनें कंपनीसरकारच्या गव्हर्नरापासून तों थेट साताराच्या रेसिडेंटापर्यंतच्या सर्व पात्रांना आपल्या कपटी मंत्रप्रयोगानें भारून टाकलें होतें आणि म्हणूनच सर जेम्स कारनाक पासून तों थेट रेसिडेंट कर्नल ओव्हान्सपर्यंत सर्वजण मंत्रमुग्ध सापाप्रमाणें नातूच्या कपटी कारस्थानाम बळी पडलेले होते घरभेद्या अप्पासाहेब भोसल्याला ता २४ मार्च १८३९ रोजी नातूने रेसिडेंट ओव्हान्सच्या चरणावर नेऊन घातलें कंपनीसरकारच्या गव्हर्नरापर्यंत सर्वांना प्रतापसिंहाविरुद्ध चिथावून देऊन आणि हा राजा इंग्रजाचे राज्य उलथून पाडण्याचा गुप्त कट करीत आहे, आम्ही याबद्दल सर्व पुरावे मायबाप सरकारचरणीं रुजू करितों, असा मंत्र फुंकून नातूकपूने रेसिडेंट ओव्हान्सला आपले तोंड बनविले याप्रमाणे ओव्हान्सद्वारे राजकीय भडका प्रतापसिंहाविरुद्ध उठवून देऊन लगेच तिकडे चिंतामणराव सांगलीकरांनी वेदोक्त–पुराणोक्त तंटा उपस्थित करून छत्रपतींच्या विरुद्ध कंपनीसरकारकडे धार्मिक जुलुमाबद्दल फिर्यादीच्या अर्जाची भेंडोळीं बनवून तीं रवाना करून दिलीं या अर्जांवरच हे धर्मवीर थांबले नाहींत, तर कंपनीसरकारच्या मोठमोठ्या अधिकाऱ्यांच्या छावण्यापुढे उभे राहून त्यांनीं धार्मिक भ्रष्टतेबद्दल प्रतापसिंहाविरुद्ध प्रत्यक्ष रीतीनेही खूपच बेगडी आकांडतांडव व कोल्हेकुई केली चिंतामणरावानें तर नातूचे व्याही नीळकंठशास्त्री थत्ते याच्या अध्यक्षतेखालीं क्षत्रिय मराठ्यांना व कायस्थ प्रभूंना शूद्राधम चांडाळ ठरविणारे नकली ग्रंथ प्रसिद्ध करण्याची एक मोठी गिरणीच सांगलीस काढली होती चिंतामणराव सांगलीकरानें तर आपल्या अधम हृदयाची भरपूर पारख जनतेस करून दिली त्यानें 'प्रतापसिंह छत्रपती हा हिंदूच नव्हे, हा हिंदुधर्माचा वैरी आहे' अशा अर्थाचे मोठमोठे जाहीरनामे काढून ते शहरोशहरीं व खेडोपाडी भिंतींना लावून दिले आणि लोकसमुदायांत वांटले ज्या छत्रपति शिवाजी महाराजानीं या कृतघ्न ब्राह्मणांच्या बापजाद्यांच्या शेंड्या व जानवीं सलामत राखलीं, त्याच शिवाजी महाराजांच्या अस्सल वंशजाविरुद्ध हे ब्राह्मण असले अनुचित व अमानुषत्वदर्शक प्रलाप काढू लागले हें एक दुनियेंतील नवेंच आश्चर्य झालें पण तें कर्म आचरतांना ब्राह्मणांना मात्र तिळमात्रही दिक्कत वाटली नाहीं तसें करण्यांत त्यांना पुरुषार्थच वाटत होता स्वतःच्या हरामखोरपणाची त्यांना कल्पना होती कीं नाहीं कुणास ठाऊक !

एवढे सर्व झालें तरी नातूकपूच्या मार्गांतील एक कांटा मात्र निघू शकेना तो कांटा म्हटला म्हणजे ज्याला आद्यछत्रपति शिवाजीमहाराज 'बाळाजी माझा प्राण आहे' असें म्हणत असत त्या बाजी प्रभु चिटणिसाचा अस्सल वशज बळवतराव मल्हार चिटणीस हा होय हा कांहीं केल्या वशीभूत होईना व त्याच्या कारस्थानासही मदत देईना तेव्हां नातूकंपूने जनरल ओव्हान्सकडून त्याला बिनचौकशीने अचानक पकडून पुणे येथील जेलांत टाकले अशा रीतीनें हा कांटा निघून गेल्यावर नातूने वाटेल तसे खोटेनाटे दस्त-ऐवजी पुरावे बनविले आणि रेसिडेंटासमोर प्रतापसिंहाविरुद्ध खोट्यानाट्या जबान्या देवविल्या बाळकोबा केळकराने बनावट सह्या व शिक्के तयार करण्याचा मक्ता आपणां कडे घेतला चिंतामणराव सागलीकरांनीं शकराचार्यांजवळून खोटीं आज्ञापत्रे लिहवून घेतलीं प्रतापसिंहानें गुप्त कट उभारला आहे या लटक्याच सोंगाची झडती कपनी-सरकारासमोर देण्याचा चग खुद्द नातूनें बाधला हैबतराव व आत्माराम लक्ष्मण या ब्राह्मणेतर पात्राना हाताशीं धरून बाळाजी काशी किबे हा बनावट राजद्रोही पत्रें, खलिते, अर्ज्या वगैरे तयार करण्याच्या उद्योगात गुंतला होता अशा रीतीनें प्रतापसिंह महाराजांना गाडण्याच्या दुष्ट नाटकाची सर्व रगीत तालीम जय्यत तयार झाल्यावर त्यांचें बरेंच कारस्थान शिजत आले प्रतापसिंहावर राजद्रोहाचें किटाळ आणण्यात त्यांच्या हेतूची बरीच सफलता झाली गोव्याच्या पोर्तुगीज सरकारशी सधान बांधून इग्रजाना हुसकून लावण्याचा प्रतापसिंहाचा नसलेला मनोदय कर्मफेऱ्यानें सत्यत्वास पोंचला ही गोष्ट महाराजांना कळली नव्हती असें नाहीं, परतु आपण जर कपनीसरकारशी अशा रीतीने वागतच नाहीं तर आपलें काय होणार आहे, या भावनेने ते स्वस्थच राहिले होते

असें होता होतां ता २२ ऑगस्ट १८३९ रोजीं मुबईचे गव्हर्नर सर जेम्स कारनॅक आपल्या लवाजम्यानिशीं नातूकंपूनें शिजवून ठेवलेली गुप्त कटाची हडी फोडण्यासाठीं साताऱ्यास येऊन दाखल झाले महाराजाना निमत्रण जातांच दुपारी तीन वाजतां ते त्यांच्या भेटीस गेले त्या वेळीं त्याच्यामध्ये जे भाषण झालें त्याचा मतलब थोडक्यांत खालीलप्रमाणें होता

**सर जेम्स**—तुम्हीं आमच्याविरुद्ध गुप्त कट चालविला आहे आणि त्याबद्दलचा सर्व पुरावा मजजवळ आहे

**प्रतापसिंह**—मी आपणांविरुद्ध कोणता गुप्त कट केलेला आहे ? ही गोष्ट अगदींच बनावट आहे या बाबतींत आपण माझी उघड चौकशी करावी.

**सर जेम्स**—खऱ्या खऱ्या सर्व गोष्टी मला माहीत झाल्या आहेत आतां पुन्हा उघड चौकशी कशासाठीं करावयाची ? चौकशी वगैरेंच्या भानगडींत पडण्याकरितां मला आतां वेळ नाहीं मी सांगतों त्या जबानीपत्रकावर तुम्ही मुकाट्यानें सही करून द्या

**प्रतापसिंह**— आपल्याला वेळ नसेल तर मी सर्व कागदपत्र ओव्हान्स साहेबांस दाखवून त्यांची खात्री पटवून देईन. माझ्यावरील या किटाळाचा योग्य न्याय व्हावा एवढीच इच्छा आहे कंपनीसरकारशीं मी केव्हांही दुजाभाव ठेवून वागलों नाहीं.

इंग्रजसरकारच्या मैत्रीसाठीं मी प्रसगीं विहिरींत उडी सुद्धां घेईन. परंतु असल्या भलत्याच किटाळावर कबूलीजबाब देण्यास माझा प्राण गेला तरी मी तयार होणार नाहीं. सत्यासाठीं प्राण गेला तरी पर्वा नाहीं !

**सर जेम्स**—महाराज ! मी म्हणतों तसें मुकाटयानें करा तुमचा त्यांत फायदाच आहे नाहीं तर तुमचें हें राज्य राहाणार नाहीं हें लक्षांत ठेवा

**प्रतापसिंह**—मी राज्याची अपेक्षा कधींच केलेली नाहीं इंग्रजसरकारची मैत्री मला पाहिजे बिनचौकशीनें बनावट आरोप कबूल करून राज्यावर राहाण्याची इच्छा मी केव्हांही धरणार नाहीं तुमची इच्छा असेल तर आतांच माझे राज्यकारभार हिसकावून घ्या ! खुशाल भीक मागून मी आपलें पोट भरीन. माझ्या चिटणीसाप्रमाणें मला तुरुगात डांबावयाचें असेल तर तसेंही करा ! त्यास माझी ना नाहीं आतां मी तुमच्या बंगल्यावरच आहे, तेव्हा माझें काय वाटेल तें करण्यास तुम्हास मुभा आहे आपल्या मर्जीप्रमाणें माझें कांहींही करा, मी येथून परत घरीच जात नाहीं, म्हणजे तर झाले ना ?

**सर जेम्स**—अहो ! असे करू नका मी सांगतों त्याप्रमाणे गुपचुप सही करून द्या आणि मोकळे व्हा नाहीं तर मला वेगळीच तजवीज करावी लागेल

**प्रतापसिंह**—तुम्हाला काय वाटेल तें तुम्ही करा पण खोट्या गोष्टींबद्दल मी लेखी जबानी देणार नाहीं

प्रतापसिंहाच्या या सत्यप्रिय वर्तनाबद्दल व त्याच्या स्पष्टोक्तीबद्दल स्पष्टीकरण करतांना पार्लमेंटपुढील व्याख्यानात मेजर जनरल रॉबर्टसन् यांनीं असे उद्गार काढलेले आहेत कीं —

" The conduct of the Raja of Satara would do honour to the best days of ancient Rome and is in my opinion in it self a sufficient reputation of all that has been urged against him "

म्हणजे, प्राचीन रोमन साम्राज्याच्या नैतिक सुवर्णयुगाला साजेसेंच वर्तन महाराजानीं केलेलें आहे त्यांच्या सत्याग्रही तडफींतच त्यांच्या विरुद्ध रचलेल्या बनावट किटाळाचा फोलकटपणा सिद्ध होत आहे

यावरून असें दिसते कीं, रॉबर्टसनला सुद्धां प्रतापसिंहावर नसतें किटाळ उपस्थित करणे कसेंसेंच वाटत होतें व त्यांनाही महाराजांच्या बाणेदारपणाबद्दल आदर वाटत होता.

अखेर हें प्रकरण भडकतां भडकतां फारच भडकलें आणि तोफखाना, घोडेस्वार इत्यादीसह ता. ३१ ऑगस्ट १८३९ रोजीं एक पलटण पुण्याहून निघून ता ४ सप्टेंबर रोजीं दुपारीं दोन वाजतां साताऱ्यास येऊन थडकली प्रतापसिंह महाराजांनीं निःशस्त्र सत्याग्रह करण्याचें ठरविलें होतें त्यांनीं स्वतः सैनिकांचीं शस्त्रें काढून घेतलीं. बाळासाहेब सेनापतीचे कमरेची समशेर काढून घेऊन त्यासही निःशस्त्र केलें राजवाड्यांतील

पटांगणाच्या सर्व तोफातील दारू काढून घेऊन त्या पाण्याने धुवून रिकाम्या करविल्या आणि अशा रीतीने सर्व सातारा शहरभर निःशस्त्र सत्याग्रह पुकारला

ता ४ सप्टेंबर १८३९ ची सध्याकाळ येऊन ठेपली स्वराज्यद्रोही आप्पासाहेब भोसला आणि महाराष्ट्राच्या मानेवर सुरी फिरविणारा कसाब बाळाजीपत नातू या दोघाच्या अधिपत्याखालीं गोऱ्या सोजिरांच्या पलटणी सातारा शहरची सर्व नाकीं अडवून उभ्या राहिल्या रेसिडेंट ओव्हान्स हे इकडे तिकडे पाहाणी करू लागले प्रतापसिंहाने नि शस्त्र सत्याग्रह पुकारला असेल अशी त्याची खात्री प्रथम दर्शन ठामपणे होऊ शकली नाही पण पुढें मात्र त्यांना या गोष्टीत सत्याचा सोळा आणे अश दिसू लागला सातार च्या सर्व प्रजाजनानी आपापली भोजने उरकून निद्रेची तयारी केली खुद्द प्रतापसिंह महाराज भोजनोत्तर आपल्या महालात खुशाल झोपी गेले

सरासरी मध्यरात्रीचे सुमारास नातूच्या कानघुसणीस यश येऊन प्रतापसिंहाच्या राजवाड्यामध्ये गराडा पडला घरभेदा अप्पासाहेब पुढे, त्याच्यामागे रेसिडेंट ओव्हन्स आणि बरोबर चार पाच गोरे सोजीर अशी टोळी महाराजाच्या वाड्यांत घुसली. राज वाड्यातील पवित्र स्थलाची, जनानखान्याची वगैरे पर्वा न करता ही चांडाळचौकडी एकदम महाराज निजले होते तेथे येऊन ठेपली कुऱ्हाडीचा दाडा अप्पासाहेब याने 'हे आमचे दादा' असे बोटाने दाखवून देताच कर्नल ओव्हान्सन खसकन महाराजांना निद्रा वस्थेतूनही पलगावरून खाली ओढलें, आणि 'आमच्याबरोबर चला' असें म्हणत महाराजाच्या मनगटास धरून खेंचाखेची सुरू केली छत्रपतींनी सत्याग्रह पुकारला असल्यानें काहीही जबाब न देता ते मुकाट्याने चालू लागले या वेळीं ते फक्त एक माडचोळणा नेसलेले होते त्याशिवाय अगावर दुसरे काहीही वस्त्र नव्हते छत्रपतींची अशा उघड्या बोडक्या स्थितीत उचलबांगडी झालेली बघून जनानखान्यात कहर उडाला चाकर नोकर भयभीत होत्साते हातात दिवट्या घेऊन सैरावैरा धावपळ करू लागले अगदी सर्वत्र एकच आकात उडाला ओव्हान्सनें महाराजाना राजवाड्याबाहेर आणल्यावर त्याना एक पालखींत टाबले एक मिनिटाचे आत गोऱ्या सोजिरांच्या देखरेखीखालीं व पलटणीसह पालखी चालू झाली तो सुमार अगदीं निद्रांतर्गत शाततेचा म्हणजे सरासरी मध्यरात्रीचा होता, तरी सर्व नगरवासी नरनारींनी साताऱ्याचे सर्व रस्ते भरगच्च भरले होते आपला बाप–प्रतापसिंह छत्रपति—अशा उघड्या बोडक्या स्थितींत धरून नेत आहेत हें हृदयविदारक दृश्य बघून ते ढसढसां रडू लागले रामवनवासाची या वेळी पुनरावृत्ति झाली, . ही एकच गोष्ट त्या वेळची स्थिति दर्शविण्यास उपयोगी व साम्यत्वदर्शक आहे

क्रिस्टॉल नामक गोऱ्या साजिराच्या आधिपत्याखालीं पालखी साताऱ्याच्या हद्दपार झाली इतक्यात अप्पासाहेब भोसल्याच्या चिथावणीवरून सेनापति बाळासाहेब भोसल्यांना पकडून कांहीं सोजिरानी धावत धावत छत्रपतींच्या पालखीजवळ नेलें. आणि त्यांनाही त्याच–महाराजांना ज्या पालखींत डाबले होते त्याच–पालखींत कोंबले. बाळासाहेबांनीं ताड्कन् पालखीच्या बाहेर उडी मारली आणि ते आवेशयुक्त स्वरानें म्हणाले,

"खबरदार! ज्या छत्रपतींच्या पायाला स्पर्श करण्याची आजपर्यंत कोणाचीही ताकद झाली नाहीं, त्याच्या बरोबरीस बसून मी छत्रपतीच्या तक्ताची अवहेलना करूं काय? मी जरी निःशस्त्र असलों तरी अशाही स्थितींत पन्नासाला लोळविण्यास समर्थ आहे हें लक्षांत ठेवा!"

या बाळासाहेबांच्या उत्तराने सर्वांचा बराच नक्षा उतरला महाराजाची पालखी पहिल्या दिवशीं आठ मैल नेण्यांत येऊन निंबगांव येथें सर्वांचा पहिला मुक्काम झाला त्या ठिकाणी गाई म्हशी बांधण्याच्या गोठ्यात, जेथे शेण आणि मूत्र सर्वत्र पसरलेले होते, उंदीर, झुरळे, पिसवा, डास इत्यादिकांचा सुळसुळाट होता अशा गलिच्छ जागीं, छत्रपतीना आणून बसविले दुसऱ्या दिवशी मागोमाग महाराजाचा कबिलाही येऊन दाखल झाला गाई-म्हशींच्या गोठ्यात हिंदूचा बादशहा हरामखोर ब्राह्मणाच्या कपटामुळें पडलेला पाहून राज्यवैभवात लोळणाऱ्या स्त्रियांचे अंतःकरण शतशः विदीर्ण झालें आपला प्रियकर बाप, साताऱ्याचा छत्रपति, हिंदी स्वराज्याचा हिंदू बादशहा, गाई-म्हशींच्या गोठ्यात वस्त्राशिवाय बसलेला पाहून गोजिराबाईने एक आर्त स्वरात किंकाळी फोडली व ती तत्काळ बेशुद्ध पडली गोजिराबाई या वेळा आठ महिन्याची गरोदर होती बेशुद्ध पडताच तिचा गर्भपात झाला चहूकडे जंगल, वैऱ्याच्या कैदेत माणसें सापडलेलीं, अशा स्थितीत त्या बिचारीच्या औषधपाण्याची कशी दाद लागणार! तिचे दैव बलवत्तर म्हणून या प्रसंगातून ती वाचली

नातूने बाळासाहेबाच्या धाकामुळे टरकून जाऊन ओव्हान्स साहेबाच्या कानात फुसकी मारली व बाळासाहेब सेनापतीस पकडण्याचें वारंट त्याच्याकडून सोडविले. वारंटातील मजकूर असा होता कीं, "साताऱ्यास तुम्हास लाखो रुपयाचे देणे आहे, तें फेडल्याशिवाय साताऱ्याच्या बाहेर तुम्हास जाता येत नाही"

हा आरोप पोकळ निर्माण केलेला होता हें सांगावयास नकोच कसेंही करून महाराजाचा व सेनापतीचा संबंध तोडण्याचे ते एक कपटी कारस्थान होतें तरी पण दुसऱ्या मुक्कामावर वारंटाची टोळी येताच आपल्या व सेवकाच्या अंगावरील दागिने सेनापतीने देऊन त्या शिपायाना परत रवाना करून दिले वाटेत बाळासाहेब सेनापतीस आमांशाचा आजार उद्भवला रक्त पडूं लागलें ओव्हान्सजवळ त्यांनी-खुद्द छत्रपतींनी- औषधोपचारासाठी मुक्काम करा म्हणून विनंति केली परंतु हृदयविदारक दृश्य बघूनही त्या गृहस्थाला किंचितही दया उत्पन्न न होतां त्यानें ती विनवणी अमान्य करून आपली नियमित घोडदौड चालूच ठेवली बाळासाहेबांच्या अन्नपाण्याचीही व्यवस्था होत नव्हती. अखेर एका मुक्कामावर क्रिस्टॉल साहेबाची सहज लहर लागली म्हणून मेणा उघडून पाहातात तो बाळासाहेबांचे प्रेत कुजून त्याला घाण सुटलेली होती बाळासाहेबाच्या मृत्यूची बातमी समजल्यानंतर दोन दिवसांनीच त्यांच्या पत्नीनें प्राणत्याग केला.

अशा रीतीने बाळाजीपंत नातूनें आपल्या ब्राह्मणी कारस्थानाच्या तिरडीवर अप्पा-साहेब भोसल्याच्या हातून ठार केलेल्या हिंदवी स्वराज्याच्या मुडद्याची प्रेतयात्रा बना-

रसला पोंचेपर्यंत वाटेंत अनेक हत्या घडल्या बनारसला महाराजांना कैदेंत टाकलें आणि अशा रीतीनें शेवटीं ब्राह्मणी कारस्थान भरपूर फळास आलें बाळाजीपंत नातूनें कंपनी-सरकारकडून जहागिऱ्या मिळविल्या अप्पासाहेब भोसल्यानें दिवाणगिरी मिळविली, नौबतीचे अधिकार मिळविले, बाळा जोशी नांवाच्या वाईच्या एका हलकट ब्राह्मणाला त्याच्या खटपटीबद्दल जहागिरी बक्षिस दिली गेली आणि नातूचे परात्पर गुरु रेसिडेन्ट ओग्रान्ससाहेब यांना मुंबईसरकारच्या शिफारशीवरून वार्षिक चारशें पौंडाचा ऊादा मलिदा सुरू झाला

सख्ख्या थोरल्या भावाच्या सर्वस्व घाताच्या पापानें विभूषित झालेल्या अप्पा-साहेब भोसल्यानें ता १८ नोव्हेंबर १८३९ रोजीं आपणास राज्याभिषेक करवून घेतला या अप्पासाहेब भोसल्याचे राज्याभिषेकप्रसंगीं ज्या ब्राह्मणांनीं वाटेल तशी त्याची हांजी हांजी करण्यास कमी केलें नाहीं, व ज्यांनीं कांहीं कालपर्यंत अप्पासाहेबावर मोठीच माया दाखविली होती, त्याच पुणेरी चित्पावनी ब्राह्मणांनीं अप्पासाहेब भोसले सन १८५७ सालच्या बंडांत सामील होते असा आरोप त्यांच्यावर इंग्रजांतर्फे शाबीत करून साताऱ्याची मराठेशाही इ० सन १८६० सालीं नामशेष केली ही गोष्ट अमानुषपणाची ढळढळीत साक्ष देणारी आहे अशा रीतीचा मराठेशाहीच्या खुनाचा हृदयद्रावक व कपटी कारस्थानांनीं डबडबलेला इतिहास आहे



# प्रकरण चवदावें

# राक्षस आणि वानर

**प्राचीन राक्षस**—राक्षस हा शब्द पुराणात वाचताक्षणीं तो एक भयंकर मनुष्य-देहधारी पण बलाढ्य व विद्रूप असा प्राणी होता, अशी कल्पना येते रामायणांत राक्षसांच्या उत्पत्तीसंबधानें कथाभाग आहे त्यावरून इतकेंच सिद्ध होतें कीं, मूलतः राक्षस हेच लोक-रक्षक व लोक-पालक होते याविषयीं पुढीलप्रमाणें उल्लेख आहेः—

रक्षाम इतियैरुक्त राक्षसांस्ते भवतुव· ।
यक्षाम इतियैरुक्त यक्षाएव भवंतुव ॥१३॥

—वा० रामायण, उ० ४

वेदकाळी ज्याना दस्यु–असुर ही सज्ञा देण्यांत आली, त्यांनाच रामायणकाला-नतर राक्षस असें नांव देण्यांत आलें मूलत· राक्षस आणि असुर हे एकच रामायणात राक्षसांच्या उत्पत्तीसबधानें जे वर वर्णन दिले आहे, त्याचा आशय असा आहे·—

" प्राचीन काळीं प्रजापतीने प्रजा उत्पन्न केली तेव्हा प्रजाजनांनीं 'आम्ही काय करावें' ? असा प्रश्न केला प्रजापतीनें त्याना '**रक्षण करा**' असें सांगितले त्यावर कित्येकानीं '**रक्षाम**.' म्हणजे आम्ही रक्षण करतो असे उत्तर दिले, आणि कित्येकांनीं '**यक्षामः**' असें म्हटलें त्यांची गणना यक्षात–उपदेवतात–म्हणजे क्षात्रतेजहीन अशा सात्त्विक लोकात करण्यांत आली 'रक्षाम' असें ज्यानी म्हटले त्यांना राक्षस अशी सज्ञा प्रजापतीनें दिली यावरून दिसून येते कीं, जनतेचे रक्षण करण्याचें काम वीर्यशाली राक्षसांकडेच होतें, व एकाच कुळात राक्षस आणि यक्ष हे उत्पन्न झाले उदाहरणार्थ, रावणाचा सख्खा बधु कुबेर हा 'यक्ष' होता बिभीषण हाही रावणाचा भाऊ होता, पण त्याला राक्षस म्हणत नसत अमरकोशांत राक्षस म्हणजे पूर्वदेव असा उल्लेख सांपडतो

× × ×

राक्षसः कौणपः क्रव्यात्क्रव्यादोऽस्रप आशरः ॥५९॥
रात्रिंचरो रात्रिचर· कर्बुरो निकषात्मजः ।
यातुधान· पुण्यजनो नैर्ऋतो यातु रक्षसो ॥६०॥

यावरून असें दिसून येत आहे कीं, राक्षसांस पूर्वी देव म्हणत असत हे रात्रीचे वेळी पाहारा करून प्रजाजनांचें रक्षण करीत असत सबब त्यांना पुण्यजन अशीही सज्ञा देण्यांत आलेली आहे मनुस्मृतीत त्यांचीं लक्षणें दिलीं आहेत तीं देखील त्यांच्या देवत्वाची साक्ष पटवितात

अक्रोधनः शौचपराः सततं ब्रह्मचारिणः ।
न्यस्तशस्त्रा महाभागाः पितरः पूर्वदेवताः ॥

क्रोध न करणारे, स्वच्छतेने वागणारे, सतत ब्रह्मचर्य पालन करणारे, शस्त्रानें कधीं प्रतिकार न करणारे, महाभाग्यवान्, रक्षक, पितर असे जे, तेच राक्षस म्हणजे पूर्वदेव होत हेच राक्षस कालेंकरून नीतिभ्रष्ट झाले, म्हणून राक्षस हा शब्द गौण वृत्तीचा द्योतक झाला सध्या उपलब्ध असलेल्या सर्व जुन्या ग्रंथांचें बारकाईनें परीक्षण केल्यास असें स्पष्ट दिसून येतें कीं, या दक्षिणेकडे आलेल्या आर्यांच्या शाखेंत दोन पक्ष होते, ते देव आणि दानव या नावांनीं पुराणांत, रामायण महाभारतांत प्रसिद्ध आहेत त्यांच्या संबंधाचा इतिहास असा आहे कीं.—

वैवस्वत मन्वंतरातील ब्रह्मपुत्र मरीचि ऋषि यास प्रचेतस दक्षानें आपल्या तेरा कन्या, विवाह करून दिल्या होत्या त्यांचीं नावें अदिति, दिति, दनु, दनायु, सिंहक वगैरे होतीं या प्रत्येकीची संतति मातेच्या नावावरून प्रसिद्धीस आली उदाहरणार्थ, अदितीचे पुत्र अदितेय किंवा आदित्य, दितीचे पुत्र दैत्य, दनुचे पुत्र दानव वगैरे

कश्यप ऋषीच्या कुळात हिरण्यकश्यपूचा पुत्र प्रल्हाद व तसाच बळीराजा महान् विष्णुभक्त उदारधी होऊन गेले कश्यप हा मंत्रद्रष्टा ऋषि होता कश्यपाच्या वंशात जसे ऋषी जन्मास आले, तसेच दुष्ट व नीच मनोवृत्तीचे पुरुषही निर्माण झाले विष्णु व इंद्र हे अदितीचे पुत्र—भाऊ-भाऊ होते, असें रामायण, महाभारत व पुराणें यांत सांगितलें आहे कश्यपाच्या इतर स्त्रियांच्या पोटीं अत्यंत दुष्ट मनोवृत्तीचे पुरुष जन्मास आले, त्यापैकीं दितीचा पुत्र हिरण्यकश्यपु (दैत्य) हा होय दनूचा पुत्र केतु (दानव), दनायूचा पुत्र वृष, सिंहिकेचा पुत्र राहु हे दुष्टपणाबद्दल विशेष प्रसिद्ध आहेत कालेंकरून दैत्य व दानव हे शब्द समानार्थी योजण्यांत येऊं लागून त्या त्या लोकांच्या अद्वितीय पराक्रमामुळें सात्त्विक वृत्तीच्या प्रशांत लोकांना त्यांचें तेज व त्यांची धडाडी दुःसह झाल्यामुळे त्यांनीं त्यांचा निर्देश राक्षस या क्रौर्यदर्शक व निंदाव्यंजक नांवानें केला, पण यज्ञ वगैरे न करता निराकार निर्गुण परमेश्वराची उपासना करणारे ते आर्यांचे अत्यंत पराक्रमी भाऊबंदच असावे असें दिसतें

या दोन्ही संततींत दीर्घकालपर्यंत भांडणें चाललीं होतीं देव आणि दैत्य यांचा स्वभाव परस्पराच्या अगदीं विरुद्ध असल्यामुळे त्यांचें पटेना देव यज्ञयागादिक करून सोम नावाच्या सुरेनें आपल्या इष्ट देवतांचें पूजन करीत व स्वतः तेही सुरापान करीत असत यांच्या उलट दैत्य व दानव यांना यज्ञयागादिकांचा तिटकारा असून ते सुरा ग्रहण करीत नसत, म्हणून त्यांचें परस्परविरुद्ध होतें देव आणि दैत्य या दोघांनीं मिळून समुद्रमंथन केलें, अशी कथा पुराणांत आहे समुद्रमंथन करून काढलेल्या चवदा रत्नांपैकीं सुरा हें एक रत्न आहे असें देव मानीत असत तें सुरारत्न देवांनीं घेतलें, व म्हणून ते आवडीनें तिचा स्वीकार करीत असत म्हणून सुरा (दारु) ग्रहण करणारे ते सुरदेव, या नांवानें प्रसिद्ध झाले ज्यांनीं सुरा ग्रहण केली नाहीं, ते असुर या नांवानें संबोधिले गेले यासंबंधानें रामायणांत पुढील श्लोक आहे.—

सुरा प्रतिग्रहा देवा· सुरा इत्यभि विश्रुतः।
अप्रतिग्रहणात्तस्या दैतेयाश्चासुरास्तथा ॥

म्हणजे, सुरेचा प्रतिग्रह केल्यामुळे देवांस सुर हे नांव पडलें, व सुरेचा प्रतिग्रह न केल्या-बद्दल दैत्यांस असुर हें नांव पडलें पण खरोखर हे दोघेंही अदितीचे व दितीचे पुत्र—बंधु बधूच—होत

**अर्वाचीन राक्षस**—बलुचिस्थानचे बलुचि लोक, रोहिले आणि काबूल व पेशावर यांच्या मध्यभागी असलेल्या याकिस्तान नांवाच्या दुर्भेद्य व दुर्गम डोंगराळ प्रदेशांतील **जंगली याकुती** लोक राक्षसाप्रमाणेंच फार धिप्पाड बांध्याचे हल्ली देखील आहेत ते काबूल व इंग्रज या दोन्ही सरकारास जुमानीत नाहींत पेशावर प्रांतांत दिवसा दरवडे घालून एक एक मनुष्य १००–१०० माणसांना त्राहि त्राहि करून सोडतो इकडील मनुष्यांना व स्त्रियांना वाघाप्रमाणे पकडून नेऊन 'अमुक इतके हजार रुपये आणून द्याल तर सोडू, नाहींतर पाय धरून चिरून टाकू', असे निरोप देतात, व रुपये न मिळाल्यास राक्षसाप्रमाणेंच दोन पाय धरून एका झटक्यानें उभें चिरून टाकतात, किंवा त्याचे हाल हाल करून मारतात वाटेल तें कच्चें मास भक्षण करतात हे लोक आजकालचे राक्षस नव्हेत तर कोण आहेत ? असेच वज्रदेही पूर्वीचे अरण्यवासी भयंकर लोक होते पण वीतभर दात व हातभर जीभ आणि जंगली जनावराप्रमाणे वेडीवाकडीं भयंकर तोंडें अशी त्यांची अगडबंब खोटीं चित्रे पोथ्यापुराणात रेखाटली आहेत, तसे मात्र ते खास नव्हते मात्र धिप्पाड, क्रूरकर्मी व पराक्रमी होते रावणकुंभकर्णाचें वर्णन पुराणांत अति शयोक्तीने केलेले आहे रावण हा क्रूरकर्मी ब्राह्मण होता. पण त्याला दहा तोंडें नव्हता त्यानें वेदाची दहा खडे केली असे लटकेंच सिद्ध करण्याकरिता म्हणून त्याला दहा तोंडें कल्पिली आहेत

**वानर**—हनुमान, वाली, सुग्रीव, नल, नील, अंगद, यांचीं केलेली वीर्यशाली अचाट कृत्यें, त्यांचीं सामोपचाराचीं सात्त्विक व तात्त्विक भाषणे, सुनीतीचें उत्तम वर्तन यांचा विचार केला असता, वानर हे तात्त्विक वृत्तीचे, आर्यांप्रमाणे सत्पथगामी लोक होते असें दिसतें बहुधा हे हिंदुस्तानांतील मूळचे रहिवासी असावेत

ज्याप्रमाणे अमेरिकेंतील मूळचे रहिवासी (रेड इंडियन्स) हल्ली देखील पशुपक्ष्याप्रमाणे कवचे धारण करतात, त्याचप्रमाणे वानर लोकांत वानराप्रमाणे, अस्वलाप्रमाणे व पक्ष्या प्रमाणे पोषाख करण्याची चाल होती असें दिसतें जटायु हा सूर्यवंशांतील रामाचा पूर्वज होता. तो पक्ष्याप्रमाणे पिसें व पंख लावून घेत असे त्यामुळे त्याला पक्षी म्हटले असावें. अंगदानें रावणाच्या सभेंत जाऊन जी उत्तम प्रकारची शिष्टाई केली, त्यावरून त्याला वानर कोण म्हणेल ? तसेंच रामाचा जन्म ज्या पिंडातून झाला त्याच पिंडातून निर्माण झालेल्या मारुतीला देखील वानर कोण म्हणेल ? हे सर्व वानर नसून नर म्हणजे पराक्रमी पुरुष होते याचा पुरावा रामायणांतच आहे तो असा,—**नर** वा **नर**–मनुष्य अथवा ीर पुरुष (नर–मनुष्य, वा=अथवा, नर–वीर=पुरुष) जेव्हा रामाने लंकेस वेढा दिला

तेव्हां त्यानें सर्व वानर सभेस आज्ञा दिली कीं, त्यांनीं नर–मनुष्य रूपानें न लढतां वानर–मर्कट–रूपानें लढावें असें रामायणांत वर्णिलें आहे अस्तु

**वानरतुल्य मनुष्यांची जात**—मिशनरी रेव्हरंड् रूम यांनीं आफ्रिकेंतील अरण्यमय प्रदेशाचें वर्णन वर्तमानपत्रांत नुकतेंच प्रसिद्ध केले आहे, त्यांत ते म्हणतात; " आफ्रिकेंतील अरण्यांत कांहीं रानटी लोक राहातात त्यांची उंची चार फूटांहून अधिक नसते त्यांची मुखचर्या थेट माकडासारखी असून सर्वांगावर केस असतात झाडावर चढण्यात ते वानराप्रमाणें चपळ व फार कुशल असतात धनुष्यबाण व भाला हीं त्यांचीं हत्यारें आहेत ते आपली उपजीविका शिकारीवर करितात कोणी तिऱ्हाईत मनुष्य जवळ आलेला पाहातांच हे लोक वानराप्रमाणें उड्या मारीत पळतात, व दाट झाडींत जाऊन दडून बसतात लोकांशीं व्यापार करण्याची त्याची तऱ्हा फार विलक्षण आहे शिकारी-शिवाय दुसरा उपजीविकेचा मार्ग त्याना समजत नाहीं म्हणून शिकार करून आणलेलें सावज आपल्या झोंपडीच्या दाराशीं ठेवून ते दूर बसतात आणि त्याबद्दल मोबदला मिळण्याची वाट पाहात राहातात त्याच्या बदलीचा योग्य पदार्थ तेथें ठेवून तें सावज कोणीं नेल्यास त्याला ते हरकत करीत नाहींत, मात्र त्यांना त्यात फसविण्याची सोय नाहीं कारण त्यांच्याजवळ विषारी बाण आणि धनुष्य हीं नेहमी सज्ज असतात जर कोणीं त्यांना फसविले तर त्याचा ते या हत्यारानी फडशा उडवितात त्याची भाषा आपणास व आपली भाषा त्यांना समजत नाहीं ते दुसऱ्यास सहसा फसवीत नाहींत असे कृष्णवर्णी लोक हल्लीं आफ्रिका खडांतील अरण्यांत आहेत."

**तंट्या भिल्लाची गोष्ट**—आपल्या हिंदुस्तानांतील पाहाडी–दाट झाडीच्या अरण्यमय प्रदेशांत कांहीं रानटी लोक राहातात त्यांचीही राहाणी जवळ जवळ जनावरां-प्रमाणेंच असते व त्याच्यातही कांहीं शूर वीर असून ते आपल्या अद्भुत सामर्थ्यानें सुधारलेल्या लोकांना कधीं कधीं थक्क करून सोडतात उदाहरणार्थ, मेळघाटच्या सातपुडा पर्वतांतील **तंट्या** ऊर्फ **तात्या भिल्ल** हा असाच विलक्षण मनुष्य होता त्यानें सरकारी पोलीस व फौजी लोकाना अनेक प्रसगीं आपल्या अचाट सामर्थ्यानें थक्क करून सोडल्याबद्दल व कित्येकांचे बळी घेऊन, कित्येकाचीं नाकें कापल्याबद्दलच्या गोष्टी प्रसिद्ध आहेत क्षणार्धात गुप्त होऊन व भलत्याच ठिकाणीं अकस्मात् प्रगट होऊन मोठमोठया नामांकित बहाद्दराची त्यानें घाबरगुंडी उडविली होती अखेरीस त्याला विश्वासघातानें पकडण्यांत आले आणि '**हिंदुस्तानांतील एक विलक्षण जंगली मनुष्य**' म्हणून विलायतच्या लोकांना दाखविण्याकरितां त्याला इग्लंडांत नेण्यांत आलें. ही गोष्ट इ० सन १८८० च्या सुमारास घडली

हल्लींचा मनुष्यप्राणी मूळचा वानराप्रमाणें होता. त्यांत कालांतरानें सुधारणा होतां होतां आजचा सुधारलेला मनुष्य बनला आहे अशी डार्विन नामक युरोपियन तत्त्ववेत्त्याची कल्पना ग्रंथांतरीं प्रसिद्ध आहे

यावरून पाहातां, श्रीरामचंद्राच्या कालीं भयंकर दुर्गम अरण्यांत हल्लींच्या आफ्रिकेच्या अरण्यांतील वानरतुल्य मनुष्याप्रमाणेंच वानर जातीचे लोक राहात असावेत, ते वानर म्हणजे पशू नसून नर म्हणजे बहादूर, अद्वितीय पराक्रमी लोक असावेत, आणि तेही बहुधा हिंदुस्तानांतील मूळचे रहिवासी लोक म्हणजे आर्यलोकांच्या शत्रुपक्षाचे लोक असावेत. म्हणूनच त्यांचीं वर्णनें आर्योनीं पशुतुल्य करून ठेवलीं असावीत अगदीं रानटी लोकांतही शहाणे लोक असतात त्याचप्रमाणें, नल, नील, अंगद, सुग्रीव, वाली, मारुती इत्यादि वानर त्यांच्यापैकीं शहाणे व नामांकित वीर पुरुष असावेत असें वाटतें



## प्रकरण पंधरावें

# वर्णचतुष्टय आणि प्राचीन इतिहास



### १. आर्यप्रवेशकालीं चातुर्वर्ण्यव्यवस्था होती काय?—

अगदीं प्राचीन काळी म्हणजे क्षत्रिय पेशाचे तेजस्वी आर्य लोक सुमारें पांच सहा हजार वर्षांपूर्वी जेव्हा उत्तर ध्रुवापासून मध्य एशियांत उतरून नतर खैबर घाटांतून हिंदुस्तानांत उतरले, त्यांचीच एक टोळी ग्रीस वगैरे युरोप खंडातील देशांत जाऊन राहिली त्यांचे वशज युरोपियन आहेत दुसरी त्यांचीच एक टोळी इराण, टर्की, अरबस्तान वगैरे भागांकडे प्रसृत झाली त्यांचे वशज मूळचा धर्म बदलून पुढे मुसलमान झाले पारशी लोक इराणातील आर्यांचे वशज होत तिसरी एक टोळी हिमालयाचे उत्तर भागांत असलेल्या काबूल, कंदाहार, तिबेट, चीन वगैरे भागांत पसरून हिमालयाचे खैबर घाटांतून दक्षिणेंत येऊन सिंधू नदीचे आसपास पंजाबात स्थिरावली ही टोळी आर्य क्षत्रियांची होती म्हणजे क्षात्रवृत्तीच्या श्रेष्ठ लोकांची होती म्हणूनच त्यांच्या वसतिस्थानास **आर्यावर्त** असे नाव पडले यांचा वर्ण एकच होता आणि तो म्हटला म्हणजे आर्यवर्ण हाच होय नतर आणखी एक टोळी खबर घाटांतून व गगा नदीचे खोऱ्यांतून उतरली. त्यांची वसति गगा, यमुना, सरस्वती, ब्रह्मपुत्रा इत्यादि नद्यांच्या जवळपास झाली पुढें पुढें ती आणखी वाढत गेली हेही लोक क्षत्रिय पेशाचे आर्य असेंच स्वत स म्हणत व म्हणवीत श्रीरामचंद्राच्या कालापर्यंत उत्तर हिंदुस्तानचा त्यांनीं बराच भाग काबीज करून आणि मूळच्या द्रविड लोकाना आपल्या क्षात्रतेजानें पादाक्रांत करून त्यांना नामोहरम केले आणि आर्यराज्यें सर्वत्र प्रस्थापन करण्याचा सपाटा चालविला त्या वेळी आर्य आणि दस्यु असे शब्दप्रयोग प्रचलित होते आर्य म्हणजे श्रेष्ठ, वरिष्ठ म्हणजेच जे जेते होते ते, आणि दस्यु म्हणजे दास, जित असे जे होते ते हे दोनच प्रकार, हे दोनच भेद आणि हे दोनच भाग लोकव्यवस्थेंत दिसून येत होते आणि तेही जित आणि जेते यांची स्पष्ट ओळख व्हावी या उद्देशानें योग्य प्रकारें निर्माण केले होते आर्य लोकांस श्रेष्ठ मानलें जाऊन दस्यूंस त्या वेळी कनिष्ठ लेखत असत आणि तेंही ते जित म्हणूनच जित राष्ट्रांना, जित

लोकांना कनिष्ठ लेखण्याची पद्धति केव्हांही प्रचलितच आहे आणि तशी ती त्या काळींही होती ही विशेष नवलाची गोष्ट नाहीं परंतु त्या वेळीं चातुर्वर्ण्यव्यवस्थेचा उपक्रम मात्र नव्हता हल्लीं ज्याप्रमाणें युरोपियन लोकांस 'गोरा लोक' या नांवानें संबोधण्यांत येतें, तद्वतच त्या वेळीं दस्यु लोकांना **कृष्णवर्णांचे लोक** म्हणत क्षत्रियांना रक्तवर्णांचे म्हणत कारण त्यांना शौर्याचीं व पराक्रमीपणाचीं कामें करावीं लागत असल्यामुळें त्यांचें रक्त नेहमीं गरम असें राहत असे, त्यांची वृत्ति तेजस्वी असे व त्यांचा रंगही लालसर असे अर्थातच अशा गरम रक्ताच्या तेजस्वी व शूर वीर लोकांना रक्तवर्णी या सार्थ शब्दप्रयोगानें संबोधण्यात आल्यास त्यांत विशेषसें कांहींही नव्हतें परंतु वर्ण म्हणजे हल्लींचा जो भेदभावविषयक आपापल्या पायापुरताच लोकव्यवस्थेचा विचार दृष्टोत्पत्तीस येतो तो त्या काली नव्हता म्हणजेच स्पष्ट चातुर्वर्ण्याची पद्धत आर्यप्रवेशकालीं नव्हती, ती कालांतरानें मूळच्या व्यवस्थेचें स्वरूप पालटतां पालटतां निष्पन्न झाली, ही गोष्ट स्पष्ट आहे वर्ण म्हणजे अंगाचा रंग जसें गोरा वर्ण, काळा वर्ण इ० या मूळच्या अर्थावरूनच अंगाच्या रंगाप्रमाणें व अंगच्या गुणांप्रमाणे वर्ण मानण्यांत येत असत उदाहरणार्थ--शौर्य, वीर्य, औदार्य, इत्यादि उत्तम गुणांनी विभूषित असलेल्या प्रभावशाली व तेजस्वी आणि गरम स्वभावाच्या क्षत्रियाचा वर्ण, रक्तासारखा लालसर असे अशा तेजस्वी रक्तवर्णी सर्वश्रेष्ठ लोकांना वर्णश्रेष्ठ क्षत्रिय ही संज्ञा होती क्षत्रिय या शब्दाची व्युत्पत्ति याच ग्रंथाच्या पहिल्या प्रकरणात दिली आहे, ती मननपूर्वक वाचली म्हणजे 'क्षत्रिय' या यथार्थ नावाबद्दल खात्री पटते या क्षत्रियांपैकींच जे वीर्यहीन–निस्तेज होते अशा तेजहीन म्हणजे फिक्कट, पांढरवट रंगाच्या लोकांनी शौर्याभावी ईशभक्तीचें एकांतवासाचें प्रशांत काम स्वीकारलें त्यांना ब्राह्मण म्हणत संपत्तीचा उपभोग घेऊन ऐश्वर्यांत लोळणाऱ्या सुवर्णासारख्या पिंवळसर कांतीनें चमकणाऱ्या ऐश्वर्यसंपन्न लोकांना वैश्य म्हणत आणि बुद्धिहीनतेमुळें काबाडकष्ट करून उन्हांत राबणाऱ्या कृष्णवर्णी सेवकांना शूद्र अर्थात् क्षुद्र म्हणत असत यावरून अग्रगण्य रक्तवर्णी क्षत्रिय, श्वेतवर्णी ब्राह्मण, पीतवर्णी वैश्य, आणि कृष्णवर्णी शूद्र अशा अंगाच्या रंगावरून वर्ण या शब्दाचा अर्थ लावण्यांत येत असे पण पहिले क्षत्रिय, दुसरे ब्राह्मण व तिसरे वैश्य हे सर्वच श्रेष्ठ जेते असल्यामुळे त्या सर्वांना आर्य म्हणत जित म्हणजे जिंकलेल्या लोकांना दस्यु ऊर्फ दास, शूद्र, क्षुद्र असे म्हणत असत असा स्पष्ट उल्लेख वेदांत सांपडतो

**२ श्रीरामकाल आणि वर्णप्रकार**—श्रीरामचंद्राच्या कालापर्यंत उपरिनिर्दिष्ट व्यवस्था सर्रास चालू होती आणि पुढेंही या व्यवस्थेंत म्हणण्यासारखा फरक पडला नाहीं श्रीरामचंद्राच्या कालीही वर्णासंबंधीं तीव्र भेदभाव मानण्यांत येत नव्हता क्षात्रवृत्ति, सात्त्विकवृत्ति, वैश्यवृत्ति, दस्युवृत्ति, या वृत्तिप्राबल्यावरून चातुर्वर्ण्याचें स्वरूप पुढें पुढें डोकावलें परंतु तें आजच्याप्रमाणे विकृत नव्हतें म्हणजे ज्याच्या त्याच्या अंगच्या गुणांप्रमाणें त्याला त्या त्या विशिष्ट वर्णाची पदवी मिळत असे उदाहरणार्थ, क्षत्रियवृत्तीचा बाप असला तरी त्याचा मुलगा ब्राह्मण

होऊं शकत असे सात्त्विक वृत्ति त्याची असली आणि ब्रह्मकर्मपारगत वगैरे तो असला म्हणजे त्याचा बाप क्षत्रिय वृत्ति धारण करणारा जरी असला तरी मुलगा ब्रह्मवृत्ति धारण करू शकत होता म्हणजे बाप क्षत्रिय तर मुलगा ब्राह्मण असें त्या कालीं होऊं शकत होते वृत्तीवर सर्व त्या वेळीं अवलंबून असे ज्याची जशी वृत्ति असेल, ज्याचे जसे गुण असतील, ज्याचीं जशीं कर्में असतील त्यास अनुलक्षून वर्णप्रकार मानीत असत परंतु भेदभाव मानण्यात येत नव्हता या वर्णप्रकाराचा उपयोग फक्त वस्तुस्थितिनिदर्शन हाच असे तो बिलकुल विकृत स्वरूपात नव्हता बाप क्षत्रिय वृत्तीचा असतांना त्याचींच मुलें एक ब्रह्मवृत्तीचा म्हणून ब्राह्मण, एक व्यापारात वगैरेंत नैसर्गिक हुषार म्हणून वैश्य, आणि एक दस्युवृत्ति ऊर्फ दासवृत्ति स्वीकारण्यातच पटाईत म्हणून शूद्र याप्रमाणें असू शकत म्हणजे एकाच कुटुंबात विभिन्न वर्णव्यवस्था गुणकर्मयुक्त वस्तुस्थितिनिदर्शना-पुरती मानण्यांत येत होती मात्र हे सर्व मूळचे आर्यच होत, आणि त्याना या कालींही आर्यच म्हणत असत त्यांच्या वृत्तीकडे जर क्षणभर दुर्लक्ष्य केले तर त्याचा वर्ण आर्य असाच ठरवावा लागेल आणि वृत्ति जर ध्यानांत घेतली तर केवळ वृत्तीला अनुसरून तद्वाचक अशीं निरनिराळीं नावे द्यावीं लागत एवढेच दुसरें त्यांत विशेष काही नव्हतें या काली वर्णभेदाचे स्वरूपच जर इतकें कामापुरतें होतें तर जाति वगैरे विकृत भेदाभेद असणेंच शक्य नाहीं व तसे संभवतही नाहीं. ऋग्वेदांत आर्य आणि दस्यु हे दोनच शब्द लोकव्यवस्थेबाबत वापरलेले आढळून येतात त्या कालीं जर अनेक जाति आणि सध्या प्रमाणें आनुवांशीक वर्ण मानण्याचा प्रकार असता तर तसा उल्लेख ऋग्वेदांत असावयास पाहिजे होता ‡कारण, ऋग्वेद रामकालींच रचण्यात आला, परंतु तसें ज्या अर्थी दिसून येत नाहीं, त्या अर्थी तत्कालीन वर्णभेदाची घडी सध्यांप्रमाणें बिघडलेल्या स्थितींत नव्हती हीच गोष्ट खरी आहे सत्य वस्तुस्थिति अशी असतांना श्रीरामचंद्राच्या कालींही जातिभेद, वर्णभेद, वगैरे भेद तीव्र स्वरूपात नांदत होते हें सिद्ध करून दाखविण्याच्या स्वार्थी भावनेनें प्रेरित होऊन तशा तऱ्हेच्या व तशा अर्थाच्या कांहीं भाकडकथा रामा-यणांत मागाहून दडपून देण्यात आलेल्या आहेत आणि त्यावरून साधारण जनसमाजाची बरीच दिशाभूलही पण झालेली आहे असे भेदाभेद सिद्ध करण्याकरिता भलभलत्या खोट्या गोष्टी व भलभलता खोटीं विधानें एखाद्या पूज्य ग्रंथांत सर्रास घुसडून देणें हें काम वास्तविक पाहतां धार्मिक व व्यावहारिक दृष्ट्याहि अत्यंत नीचपणाचें आहे कारण, त्यायोगानें सर्वसाधारण जनसमाज विनाकारण दुबळा बनून सत्यधर्माच्या स्वरूपावर काळाकुट्ट पडदा अनायासेंच येतो परंतु जेथें स्वार्थी व अधम वृत्तीनेंच शिकस्त करून सोडली, तेथें हा विचार कोठून निष्पन्न होणार, आणि या अशा भावनेनेंच अनेक पूज्य ग्रंथांत खोटींनाटीं भलभलतीं विधानें अगदीं मागाहून दडपून देण्यांत आलेलीं आहेत रामचंद्राच्या कालीं वास्तविक वर्णभेदच नव्हता परंतु असें असतांनाही रामायणामध्यें

---

‡ क्षत्रियोत्पादित वैदिकधर्म—श्रीरामकाल, प्रकरण दुसरें पाहा

कांहीं कांहीं अशा चमत्कारिक गोष्टी वर्णिल्या आहेत कीं, त्यांचा उपयोग फक्त जन-समाजांना भुलथापी देण्याकडेच मुख्यत. झालेला आहे

जसें, रामायणांत एक कथा अशी लिहिली आहे कीं, **शंबुक** नामक एका **कोळी जातीच्या** शूद्रानें तपश्चर्या केल्यामुळे एका **ब्राह्मणाचा** अल्पवयी मुलगा मरण पावला तेव्हा श्रीरामचंद्रांनी त्या **कोळयाची** तपश्चर्या भगवून त्याला धर्मबाह्य वर्तनाबद्दल देहांत प्रायश्चित्त दिले आणि नंतर **ब्राह्मणाच्या मंत्रसामर्थ्यानें** तो ब्राह्मणपुत्र जिवत करण्यांत आला

याप्रमाणें ही कथा असून ती रामायणांत दडपून देण्याचा उद्देश फक्त ब्राह्मणांचें फाजील महत्त्व वाढून इतरांना हलके मानणे हाच स्पष्ट दिसून येतो शबुकानें तपश्चर्या केल्यामुळें एवढें पाप झाले कीं, त्या योगानें ब्राह्मणाचा मुलगा मरण पावला ! याचें कारण काय तर तिकडे शबुकाची **कोळी जात** निर्माण केली म्हणून ! अर्थातच इतराना तपश्चर्या करण्याचा, ईशभक्ति, ईश्वरसेवा करण्याचा जसा कांहीं अधिकारच नाहीं, असेंच सिद्ध करण्याचा या कथाकथनाचा उद्देश आहे इतरांना ईशभक्ति, तपश्चर्या करण्याचा अधिकार नाहीं हें या कथेतील भाकडमत साफ खोटें आहे कारण वेश्येच्या पोटीं जन्मलेला वसिष्ठ श्रीरामचंद्रास पूज्य होता तसेंच वाल्या कोळी श्रीरामचंद्राच्या काळींच तपश्चर्या करून वाल्मिक ऋषि बनला तोही श्रीरामचद्राला पूज्य होता तेव्हा शबुक नांवाच्या कोळ्याने तपश्चर्या केल्यामुळें त्या पापानें ब्राह्मणाचा मुलगा मेला व म्हणून रामचद्रानें त्या कोळयाला देहात प्रायश्चित्त दिलें ही असभवनीय गोष्ट कोणास तरी खरी वाटेल काय ? अर्थात् ही भाकडकथा मागाहून रामायणात घुसडलेली आहे हें रामायणावरूनच सिद्ध होतें भगवान् श्रीकृष्णानें गीतेंत प्रतिपादन केलेले तत्त्व—

**'स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेपि यान्ति परांगतिम्'** ।

रामायणांतील वरील भाकडकथेचा फोलपणा सिद्ध करतें अर्थातच केवळ वस्तु-स्थितीचा विपर्यास करणाऱ्या आणि सत्य तत्त्वांचा उच्छेद करणाऱ्या ह्या भाकड-कथा आहेत असें स्पष्ट होतें या कथेंत हाच माथितार्थ पुन्हा पुन्हा प्रतिपादन व ध्वनित केलेला आहे कीं, नामधारी ब्राह्मणाशिवाय इतराना कोणतेंही महत्त्वाचें कृत्य करण्यास मुळीं अधिकारच नाही जें कांहीं करावयाचें तें सर्व आनुवंशिक वर्णातील ब्राह्मणानेंच ! कोळयानें तपश्चर्या केली म्हणून एवढे पाप झाले कीं, त्या योगाने ब्राह्मणाचा मुलगा मरण पावला आणि ब्राह्मणांनीं मत्रसामर्थ्यानें त्यास पुन्हा सजीव केला म्हणजे यांत ब्राह्मणी वर्चस्व अगदीं स्पष्ट ध्वनित केलेले आहे दुसरी गोष्ट अशी की, ब्राह्मणेतराबद्दल श्रीराम-चंद्राची आकुंचित दृष्टि होती, असेंही गालबोट रामचंद्राच्या उज्ज्वल चारित्र्यास या कथेंतील स्वार्थी वृत्तीनें लाविलें आहे ज्या श्रीरामचंद्राने एका रजकाच्या आक्षेपास भिऊन (एका रजकाच्या आक्षेपास कोणत्याही कारणानें का होईना पण किंमत देऊन ) आपल्या परमपवित्र व अत्यंत प्रिय अशा पत्नीस—सीतादेवीस अंतर दिलें, म्हणजे लोकसमानत्वाच्या ज्या रामचंद्राच्या भावना एवढ्या उत्तुंग होत्या, त्या रामचंद्राच्या चारित्र्यास शंबुकाच्या कथेनें

विनाकारणच गालबोट लावलें नाहीं काय ? रामचंद्रास शूद्रांसंबधीं पूर्ण आदर होता, म्हणूनच एका रजकाच्या वरवर आक्षेपाकरितां त्यांनीं पत्नीविरहाचें एवढें दिव्य केलें आणि अशी ही कथा रामायणांतच वर्णिली आहे शंबुकाच्या कथेस ही कथा अगदींच विरोधी अशी आहे दुसऱ्याही रामायणांतील अनेक कथा लक्षांत घेतल्या असतां या शंबुकाच्या कथेशीं त्या विरोधी आहेत असें सिद्ध होते उदाहरणार्थ, वाल्मिक ऋषीचीच कथा घेऊ या वाल्मिक ऋषि हा मूळचा वाल्या **कोळी** होता त्यानें हजारों नव्हे लाखों दुष्ट ब्राह्मणाचा नाश केला त्याच्या शरसंधानापुढे कोणाचेंच कांहीं चालेना, म्हणून नारद नांवाच्या एका कपटी ब्राह्मणाने त्याला युक्तीनें बोलावून रामनामाची तपश्चर्या करण्यास बोध केला वाल्याला तो पटला त्यानें तपश्चर्या पूर्ण पार पाडली आणि त्या तपश्चर्येच्या योगाने तो **वाल्या कोळी** वाल्मिक ऋषि झाला त्यानें शतकोटि रामायण रचलें तें त्या वाल्मिकीचे करणें खरें करून दाखविण्याकरितां श्रीरामावतार झाला व रामावतारांतील सर्व गोष्टी त्या रामायणाप्रमाणे घडल्या एवढेंच नव्हे तर श्रीराम चंद्रास वाल्मिक शिरसावद्य होता

ही कथा शंबुकाच्या कथेशीं अगदींच विरोधी अशी नाहीं काय ? शंबुक कोळीच होता, त्यानेंही तपश्चर्या केली होती, आणि वाल्मिक कोळीच होता त्यानेंही तपश्चर्या केली होती, मग वाल्मिकीच्या तपश्चर्येने राम प्रसन्न का झाले ? त्यानें ब्राह्मणांचा फडशा उड-विण्याचा सपाटा चालविला होता या पुण्यकर्मामुळें काय ?

तेव्हा अर्थातच या कथात कांहींही धरबंध नाही शूद्राबद्दल जर श्रीरामचंद्रास एवढा तिटकारा वाटत होता कीं, शूद्राने तपश्चर्या केली तर त्याला देहान्त प्रायश्चित्त देण्यापर्यंत रामचंद्राची तयारी होती, तर भिल्लिणीचीं उष्टीं बोरे खाल्ल्याची रामायणांतील रामासंबधींची कथा शूद्राबद्दल रामचंद्राची अनास्थाच दाखविते काय ? वाल्मिकींना रामचंद्र शिरसावद्य मानीत होते ही कथा ब्राह्मणेतरांसंबधीं प्रभु रामचंद्राची अनास्थाच दाखविते काय ? रजकाच्या आक्षेपाची कथा शूद्रांसंबधीं रामचंद्राची अनास्थाच दाखविते काय ? अर्थातच असे होणे शक्य नाही श्रीरामचंद्राचा काल हा पेशवाईचा काल नव्हता कीं, शूद्रानें तपश्चर्या केली तर दे त्याला देहांत प्रायश्चित्त !

तेव्हा सांगण्याचें तात्पर्य एवढेंच कीं, जातिवर्चस्व प्रस्थापित करण्याकरितां रामायणा-सारख्या ग्रंथांत जरी अशा फाजील कथा घुसडून दिल्या असल्या, तरी श्रीरामचंद्राच्या कालीं आनुवंशिक वर्णभेदास स्थान नव्हतें असेंच सिद्ध होते गुणकर्मानुसार ज्याला त्याला किंमत प्राप्त होत असे ब्राह्मणाचा पुत्र तो ब्राह्मण, क्षत्रियाचा तो क्षत्रिय, शूद्राचा तो शूद्र, वैश्याचा तो वैश्य असेंच होत नसून, क्षत्रियाचा पुत्र ब्रह्मकर्मप्रविण असल्यास तो ब्राह्मणत्व पावत असे, ब्राह्मणाचा पुत्र मूर्ख, अनाचारी असल्यास तो शूद्रापेक्षांही शूद्रत्व पावत असे, शूद्राचा पुत्र ब्रह्मकर्मरत असल्यास तो सन्माननीय गणला जात असे याप्रमाणें व्यवस्था श्रीरामकालीं असून हल्लींच्या प्रमाणें बापाच्या वर्णावरून मुलाचा वर्ण ठरविण्याची घातक पद्धति त्या कालीं अंमलांत नव्हती

**३. श्रीकृष्णकालीन वर्णचतुष्टय**—श्रीरामचंद्रानंतर क्षत्रियकुलमुकुटरत्न श्रीकृष्णाचा जन्म सुमारें दोन हजार वर्षांनीं झाला त्या काळास आजपर्यंत सुमारें ३१०० वर्षांचा काळ लोटत आला त्या वेळींही सध्यांच्या प्रमाणें वर्णभेद होते कीं काय हें आपण पाहूं

त्या काळचा ऐतिहासिक ग्रंथ म्हटला म्हणजे महाभारत हा होय हा ग्रंथ लोमहर्षण राजाचा पुत्र उग्रश्रवा यानें इ० सनापूर्वी तिसऱ्या शतकांत लिहिला या ग्रंथावरून विचार करतां त्यामध्यें विशेषत्वानें क्षात्रधर्माचीच थोरवी गाइलेली दृष्टोत्पत्तीस येते त्या काळचा दुसरा सर्वमान्य ग्रंथ म्हटला म्हणजे श्रीकृष्णकृत भगवद्गीता हा होय भगवान् श्रीकृष्ण हा चंद्रवंशी यादव कुलातील क्षत्रिय होता भगवद्गीतेंत चातुर्वर्ण्यासंबधीं विचार करतांना भगवान् म्हणतात—

**'चातुर्वर्ण्यं मयासृष्टं गुणकर्मविभागशः'**

**म्हणजे प्रत्येक मनुष्याच्या अंगच्या गुणकर्मांप्रमाणें** चार वर्णभेद मीं उत्पन्न केले आहेत स्वार्थी व मतलबी लोक चातुर्वर्ण्यासंबधीं भगवानांचा पुरावा देतांना **'चातुर्वर्ण्यं मयासृष्टं** एवढाच तो देतात आणि तेवढ्यावरून खुद्द श्रीकृष्णानें चार वर्ण निर्माण केले असें इतरांस भासवितात परंतु पुढील **'गुणकर्मविभागशः'** या वचनांतच भगवान् श्रीकृष्णांनीं ही मख्खी ठेवली आहे त्यांनीं आनुवंशिक वर्णव्यवस्था मान्य केलेली नाहीं म्हणजे बाप ब्राह्मण असला तरच मुलगा ब्राह्मण, मग तो कितीही नालायक असो असें तत्त्व भगवानांनीं मान्य केलें नव्हतें, तर कोणाही माणसास स्वतःच्या गुणकर्मांप्रमाणें चातुर्वर्ण्यांतील पदव्या मिळवितां येतात असाच त्यांच्या म्हणण्याचा आशय होता सध्यां ज्याप्रमाणें कोणत्याही जातीचा विद्यार्थी युनिव्हर्सिटींतून (विश्वविद्यालयांतून) आपल्या गुणप्राधान्येंकरून पदवी प्राप्त करून घेऊं शकतो, त्याचप्रमाणे श्रीकृष्णकालींही वर्णांच्या विश्वविद्यालयातून योग्य माणसास योग्य वर्णांची पदवी प्राप्त करून घेतां येत असे **'दुःशिलोपि तु द्विजः पूज्यो न शूद्रो जितेंद्रियाः'** असा घाशिरामी न्याय त्या वेळीं धर्माच्या दरबारांत नव्हता

या कालीं गुणकर्मांवरून वर्ण ठरविण्याची पद्धत जरी होती, तरी तीव्र भेदाभेद परस्परामध्यें उद्भूत झाला नव्हता सर्व लोक आपापल्या सद्गुणवर्धनकार्यांत गुंतलेले असत. गुणकर्मांवरून वर्ण ठरविण्याची या कालीं प्रचलित पद्धति असल्यामुळें प्रत्येकजण आपणांमध्यें सद्गुणांचें व नीतीचे संवर्धन करण्याचा प्रयत्न करण्यांत सर्वस्व खर्च करीत असे त्या योगानें नीतिमत्ता व सद्गुण यांचीही बरीच वाढ होऊं लागली होती प्रत्येकास आपल्या सद्गुणांचें संवर्धन करण्यास वाव मिळूं लागला, उत्तेजन मिळूं लागले, आणि सन्मान मिळूं लागला याच्या उलट अनीति, दुर्गुण यांची वाढ ज्यांनीं ज्यांनीं केली असेल अशांना नीच लेखण्याचा प्रघात चालू असल्यानें त्यांचे कांटेही नीतीच्या मार्गावरून त्वरितच काढले जात. सांगावयाचें तात्पर्य म्हटलें म्हणजे,

परीक्षेंत पास होण्याच्या महत्त्वाकांक्षेमुळें जसा विद्यार्थी जीव लावून व कळकळीनें शक्य तितका अभ्यास करितो, तद्वत्‌च उत्तम वर्णाची व श्रेष्ठ वर्णाची प्राप्ति व्हावी या महत्त्वाकांक्षे-मुळें आपापल्या ठिकाणचे सद्‌गुण वाढविण्यांत व नीतीचें संवर्धन करण्यांत मोठी अहमहमिका त्या वेळीं चालत असे.

## ४. बुद्धकालीन आणि त्या उपरांत कालांतील वर्णव्यवस्था—

इ० सनापूर्वी ५६७ या वर्षी वैशाख शुद्ध पौर्णिमेच्या दिवशीं गोरखपूर परगण्यांतील कपिल वस्तु नावाच्या राजधानींत शाक्य ऊर्फ हल्लींचे चालुक्य (साळुंके) या क्षत्रिय कुलांत शुद्धोदन राजाचे पोटीं गौतमबुद्धाचा जन्म झाला यानें पुढें बौद्ध धर्म प्रस्थापित केला, वगैरे वर्णन मागच्या एका प्रकरणीं* विस्तारानें आलेंच आहे या कालींही वर्णभेदास असावा तितका वाव नव्हता या धर्माचीं जीं अनेक तत्त्वें होतीं त्यातच प्रामुख्याने—

**'न विशेषोस्ति वर्णानां सर्वं ब्रह्ममयं जगत्' ।**

अशाच अर्थाचें 'सर्व मानव एकाच ईश्वराची लेंकरें आहेत त्यांत उच्च नीच भाव कांहीं नाहीं' असेंही तत्त्व प्रतिपादिले होतें यावरून बौद्ध कालींही वर्णभेदास तीव्र स्वरूप आलें नव्हतें असें स्पष्ट सिद्ध होतें त्या उपरांत काळात बौद्ध धर्माचा पाडाव करण्याकरितां जैमिनीनें पूर्वमीमासा व बादरायणानें उत्तरमीमासा याप्रमाणे ग्रंथ प्रसिद्ध करून त्यांनीं नवीन मिश्र तत्त्वें प्रतिपादन करण्याचा व त्याचा प्रसार करण्याचा सपाटा चालविला पुढें कुमारील भट्ट व शंकराचार्य यांनींही हल्ला केला तेव्हा पुढें पुढें बौद्ध धर्मपर्यायांतही भेद पडून बौद्ध धर्माचा पाया किंचित डळमळीत झाला, तसतसा त्यांच्या विरुद्ध पक्षी यांत अधिक जोर उत्पन्न होऊन अखेर बौद्ध धर्म बराच खगत गेला शंकराचार्यांचा जन्म इ० सन ७८८ त झाल्यावर त्यांनीं उत्तरमीमासा नांवाचा नवीन ग्रंथ लिहिला व त्यातील तत्त्वें लोकांच्या मनावर राजाश्रयानें‡ बिंबविलीं या वेळेपासून मग मात्र धार्मिक बाबींसबधीं बहुतेक सूत्रें ब्राह्मणाकडे अनायासेंच गेलीं कारण क्षत्रियवर्ग त्या वेळीं परचक्रापासून राष्ट्राचा बचाव करण्याच्या अत्यत महत्त्वाच्या कामांत गुंतला होता पुढें पुढें मुसलमानांच्या स्वाऱ्या वगैरे होऊं लागल्या तेव्हां तर क्षत्रियांना इकडे लक्ष देण्यास फुरसतच मिळत नसे या अवधींत इकडे या ब्राह्मणांनीं स्वतःचें वर्चस्व प्रस्था-पित करणारे अनेक लटके ग्रंथ निर्माण केले, जुन्या पवित्र ग्रंथांत भलभलतीं व स्वतःचें वर्चस्व प्रस्थापित करणारीं अनेक वचनें घालघुसडीनें दडपून दिलीं, धर्मासबधीं भलभलते सिद्धान्त लोकांना सांगितले, वर्णाश्रमव्यवस्था आनुवंशिक पद्धतीवर म्हणजे बाप ज्या वर्णाचा असेल त्याच वर्णाचा मुलगाही असतो या पद्धतीवर आणून सोडली, आणि अशा रीतीनें हा घुसगुस घालण्यास त्यांना बरीच मुदत मिळाल्यानें तीं लटकींच तत्त्वें जनतेच्या गळीं उतरलीं आणि त्याबरोबरच वर्णव्यवस्थेचें स्वरूपही अगदींच पालटून गेलें उपनयनपद्धति बिघडून गेली, आणि सर्वत्र ब्राह्मणी वर्चस्वच धुमाकूळ घालू लागलें क्षत्रियांनीं त्यांच्यावर विश्वास

---

* क्षत्रिय आणि बौद्धधर्म, प्रकरण नववें पाहा

‡ क्षत्रियाश्रित हिंदुधर्म, प्रकरण पांचवें पाहा

ठेवून धर्मसूत्रें त्यांच्या हातीं दिलीं, व धर्मरूपी भांडाराचे त्यांना दिवाणजी नेमले. परंतु त्यांनीं त्या धर्माच्या भांडारांतील अस्सल मोहरा काढून घेऊन त्याऐवजीं तिजोरींत सारे फुटक्या मडक्याचे तुकडेच रगड भरून दिले

या कालीं ब्राह्मणांनीं पूज्य ग्रंथांतून जीं प्रक्षिप्त वचनें घुसडून दिलीं आहेत, त्यांपैकीं वर्णव्यवस्थेच्या रूपाशीं ज्यांचा पर्यायानें तरी संबंध येतो अशीं कांहीं वचनें पुराव्यासह येथें उद्‌धृत केल्यास तीं अस्थानीं होणार नाहींत

**"श्रवणेत्र* पुज तुभ्यां श्रोत्र परिपूरण उच्चारणे जिव्हाऽच्छेदो धारणे हृदयविदारणमित्यादि ॥"**

**भावार्थः**—शूद्रानें वेद ऐकला असतां त्याच्या कानांत शिसें व लाख तापवून ओतावी जर तो मंत्र म्हणेल तर त्याची जिव्हा कापावी आणि ध्यान करील तर त्याचें हृदय विदीर्ण करावें!

तसेंच—

**"शक्तेनापिहि§ शूद्रेण न कार्यो धनसंचयः ॥**
**शूद्रोहि धनमासाद्य ब्राह्मणानेव बाधते ॥"**

**भावार्थः**—शूद्रवर्णीय मनुष्य जरी द्रव्य संपादण्यास समर्थ असला तरी त्यानें धनसंग्रह करू नये कारण हलकट मनुष्यानें संपत्ति संग्रह केली असतां तें ब्राह्मणांना बाधक होतें!

याचप्रमाणे घाशीरामी न्यायाचा आणखी एक श्लोक नमुन्यादाखल देण्यासारखा आहे तो असा—

**"शूद्रं‡ तु कारयेद्दास्यं क्रीतमक्रीतमेव वा।**
**दास्यायैव हि सृष्टोऽसौ ब्राह्मणस्य स्वयंभुवा ॥**
**न स्वामिनानि सृष्टोऽपि शूद्रो दास्याद्विमुच्यते।**
**निसर्गजं हि तत्तस्य कस्तस्मात्तदपोहति ॥**
**विस्रब्धं ब्राह्मणः शूद्रा द्रव्योपादानमाचरेत्।**
**न हितस्यास्ति किंचित्स्वंभर्तृहार्य धनोहिसः॥"**

**भावार्थः**—शूद्र विकत घेतलेला असो किंवा नसो, तरी ब्राह्मणानें शूद्रास बलात्कारानें आपलें दास्य करावयास लावावें कारण कीं, ब्रह्मदेवानें त्यास केवळ ब्राह्मणाची सेवा करण्याकरितांच उत्पन्न केलें आहे शूद्रास जरी त्याच्या धन्यानें मुक्त केलें तरी तो कांहीं दास्यत्वापासून मुक्त होऊं शकत नाही, कारण कीं, जी स्थिति त्यास स्वभावेंकरून प्राप्त झालेली आहे तिजपासून त्यास कोण मुक्त करील! ब्राह्मण जर आपल्या निर्वाहा-

---

* वेदान्त सू., अ. १, पान ३, सू ३८

§ मनुस्मृति, अ. २०

‡ मनुस्मृति.

करितां फार अडचणींत आला तर त्यानें निर्धास्तपणें आपला दास जो शूद्र त्याचें वित्त हरण करावें कारण दासास मिळकत असू शकत नाहीं. म्हणून ती त्याच्या धन्यानें म्हणजे ब्राह्मणानें घ्यावी

अशाच ब्राह्मणविषयक फाजील महत्वाचा—

"देवाऽधीनं¶ जगत्सर्वं मंत्राधीनं च देवताः ।
ते मंत्राः ब्राह्मणाऽधीना ब्राह्मणो मम दैवतम् ॥

हा श्लोक असून त्याचा भावार्थ असा आहे कीं, देवाच्या स्वाधीन सर्व जग आहे, देव मंत्राधीन आहेत, मत्र ब्राह्मणाधीन आहेत, म्हणून ब्राह्मण हे देवापेक्षाही श्रेष्ठ होत

याप्रमाणें एक दोनच नव्हे तर हजारांनी मोजतां येतील इतके पुरावे देतां येऊन असें सिद्ध करतां येतें कीं, धर्मरूपी जामदारखान्याच्या किल्ल्या हातीं येतांच या ब्राह्मण-ब्रुवांनीं आपल्या प्राणापलीकडेही शक्तिसर्वस्व खर्च करून आपलें वर्चस्व प्रतिपादन करण्याचा सपाटा सुरू केला ब्राह्मणांचें वर्चस्व हाच त्यांचा धर्म, तीच त्यांची नीति, तेच शास्त्र आणि तोच सद्बोध, अशी स्थिति त्यांनी आणून ठेवली आणि त्याचा परिणाम आजच्या समाजभ्रष्टतेत झाला

उपरिनिर्दिष्ट कांहीं अवतरणांवरून इतर वर्णांबद्दल ब्राह्मणाच्या ठायीं केवढी अनुदारता होती हे स्पष्ट दिसून येतेंच मग येथपर्यंत ज्या लोकांची मजल गेलेली होती त्यांनीं वर्ण-व्यवस्थेचें स्वरूप विकृत करून सोडून बापाचाच वर्ण मुलास असावा असा अट्टाहास केल्यास त्यांत त्यांनीं कापट्यक्षेत्राबाहेरचें कोणते कर्म केले ?

९. **वर्णवैशिष्ट्य**— वर्णविशेषत्वासबधीं वास्तविक असा उल्लेख आहे की—

"ब्रह्मा* स्वयंभूर्भगवान् दृष्ट्वा सिद्धिन्तु कर्मजाम् ।
ततः प्रभृति चौषध्यः काष्ट पश्चोस्तु जज्ञिरे ॥
संसिद्धायांतु वार्तायां ततस्तासां स्वयंभुवः ।
मर्यादः स्थापयामास यथा रब्धाः परस्परम् ॥
यें वै परिगृहितारस्ता सामासबलिय सः ।
इतरेषां कृत त्राणान् स्थापयामास क्षत्रियान् ॥
उपतिष्ठंति ते तान्वै यावन्तो निर्भयास्तथा ।
सत्यं ब्रह्म यथा भूतं ध्रुवंतो ब्राह्मणाश्च ते ॥
येचाऽन्येल्प बलास्तेषां वैश्य संकर्म संस्थिताः ।
किनाशा नाशयंतिस्म पृथिव्यां प्रागतं हिताः ॥
निस्तेज स्वोऽल्प वीर्याश्च शूद्रास्तान ब्रवीत्तुसः ।
तेषां कर्माणि धर्मांश्च ब्रह्मानु व्यदधात् प्रभुः ॥

¶ भागवत
* ब्रह्माण्डपुराण, ७–१५१–१५८

**भावार्थ**--स्वयंभू ब्रह्मदेवानें कर्मापासून उत्पन्न होणारी सिद्धि पाहून अर्थात् अन्न, औषधी,काष्ठ,जल वगैरे सृष्ट पदार्थ प्रथम निर्माण करून नंतर सृष्टि निर्माण केली त्या सृष्टींत जेव्हां अव्यवस्था झाली, तेव्हां पुढें समाजव्यवस्थेसाठीं अगच्या गुणकर्माप्रमाणें वर्णव्यवस्था ठरली गेली ती अशी कीं, त्या मानवापैकीं जे सर्वांत उदार, थोर अंतःकरणाचे, दानशूर, बली, अशा अनेक उत्तम गुणांनीं युक्त असून इतरेजनाचें रक्षण करण्यास जे पात्र होते, त्यांना श्रेष्ठतम समजून **क्षत्रिय** ही संज्ञा दिली म्हणजे सर्वांत उच्च वर्ण तो क्षत्रियाचा ठरविला गेला त्या मानवापैकीं ज्यांनीं ब्रह्मकर्मांत सुखानें लक्ष घालविण्याची व निरनिराळ्या आचारानें निर्भयपणे आयुष्य व्यतीत करण्याची वृत्ति दाखविली, म्हणजेच जे बिचारे अगदींच निर्वीर्य असे सामवृत्तीनें क्षत्रियांच्या आश्रयास राहिले,त्यांना ब्रह्मस्वरूपीं लीन म्हणून ब्राह्मण अशी संज्ञा दिली त्या मानवापैकींच जे बलानें कमी होते व जे शेतीचा व गोरक्षणाचा धंदा करून आणि पृथ्वीपर्यटन करून व्यापारधंदा करीत असत त्यांना वैश्य अशी संज्ञा दिली आणि त्याच मानवापैकीं जे निस्तेज, निर्वीर्य आणि उपरिनिर्दिष्ट तीनही कर्मांत प्रवेश करण्यास अपात्र दिसले त्यांना शूद्र अशी संज्ञा दिली

अशी वर्णव्यवस्था पुढे पुढें करण्यात आली मानव तेच, सृष्टि तीच, सर्व तेंच, परंतु ज्याच्या ठायीं ज्या गुणाचा विकास दिसला ती वर्णपदवी त्याला देण्यांत आली यावरूनही आनुवंशिक वर्णव्यवस्थेस काहींच किंमत नाही हे उघड होतें

" ब्राह्मणोऽस्य* मुखमासीद्बाहु राजन्य कृत ।
ऊरू तदस्य यद्वैश्य पद्भ्यां शूद्रो अजायत ॥ "

अशा तऱ्हेचा मंत्र पुरुषसूक्तात असून त्याचा भलताच अर्थ प्रचलित आहे या मंत्राच्या आधारावरून वर्णवैशिष्ट्य हे आनुवंशिक आहे अशी स्वार्थी गडबड बरेच आपल पोटे लोक करीत असतात या श्लोकाचा अर्थ ते असा करितात की, ईश्वराच्या मुखापासून ब्राह्मण झाले, बाहूपासून क्षत्रिय झाले, मांड्यापासून वैश्य झाले आणि पायापासून शूद्र झाले अशा तऱ्हेचा अर्थ या श्लोकाचा लावण्यात आल्याने साधारण माणसाची सहजच दिशाभूल होऊन जाते आणि त्याला वर्णाच्या आनुवंशिकतेबद्दल विश्वास वाटावयाला लागतो परंतु या सूक्तातील मंत्राचा खरा अर्थ समजून घेतल्यावर वर्णव्यवस्था आनुवंशिक नाही अशीच पुन्हाही खात्री होते व गैरसमज अगदींच दूर होतो या श्लोकाचा वास्तवार्थ असा आहे की,—

ब्राह्मण हें समाजाचें मुख आहे क्षत्रिय हे समाजाचे बाहु आहेत वैश्य हे समाजाच्या मांड्या होत आणि शूद्र हे त्या समाजपुरुषाचे पाय होण्यासाठीं जन्मले

**मुखविषयक कर्में** म्हणजे मंत्राध्ययनादि करण्यास ज्यांना अभिमान वाटत होता; त्यांना समाजानें आपलें मुख मानणे साहजिकच आहे अजूनही तोंडानें बडबड करणारास मुखाची पदवी देण्यांत येते जे आपल्या **बाहुबलावर** समाजाचे रक्षण करीत त्यांना समाजानें आपले बाहु कल्पिले हेंही ठीकच झालें अजूनही बोलता बोलतां व्यव-

* पुरुषसूक्त पाहा.

द्वारांत असें कधीं कधीं म्हणतात की, 'अहो ! तो तर माझा उजवा हात आहे !' अशाच अर्थी त्या वेळचेही हे रूपकात्मक उद्गार आहेत **मांड्यांच्या बळावर** पृथ्वीपर्यटण करून वैश्य हे व्यापार वगैरे करीत व समाजाची संपत्ति वाढवीत म्हणून त्यांना समाज-रूपी पुरुषाच्या मांड्यांची उपमा दिली आणि शूद्रांची बुद्धि वगैरे जरा कमी प्रतीची भासली म्हणून त्यांना समाजपुरुषाचे पाय कल्पिले अजूनही व्यवहारांत 'अरे त्याच्या **पायाची** तरी सर येईल काय ?' असा वाक्यप्रयोग रूढ आहे याप्रमाणें चातुर्वर्ण्याचें वैशिष्ट्य या श्लोकांत वर्णिले आहे म्हणजेच चातुर्वर्ण्यांतील विशिष्ट गुणप्रणालीचा विचार करूनच तो या श्लोकात गोवलेला आहे चातुर्वर्ण्याकरितां हा श्लोक आहे चातुर्वर्ण्य हें त्या श्लोकाकरिता नाहीं एवढी गोष्ट विशेष लक्षांत ठेविली म्हणजे झाले कधीं काळीं सहजगत्या कविकल्पनेंतून निघालेले उद्गार आजपर्यंत भलत्याच अर्थाखालीं खपत आले हे ब्राह्मण समाजाचें सुदैव आणि इतराचे दुर्दैव होय या पुरुषसूक्तांतील श्लोकामध्यें पंचम्यन्त शब्द नसताही 'पद्भ्या' या एका शब्दावरून बाकीच्या तिन्ही ठिकाणीं पचमी-सारखाच अर्थ करण्यात येतो हें पांडित्य विचित्र आहे ! 'पद्भ्यां' चतुर्थीचें द्विवचन आहे हेंही या अर्थकाराच्या ध्यानात येऊ नये याला कारण अभिनिवेशाच्या आंधळेपणा-खेरीज दुसरे कांहींच नाहीं हेंच खरें आहे

**"शूद्रो‡ ब्राह्मणतामेति ब्राह्मणश्चैति शूद्रताम् ।**
**क्षत्रियाज्जातमेवं तु विद्याद्वैश्या तथैव च ॥"**

भावार्थ--शूद्राचा ब्राह्मण होऊ शकतो आणि ब्राह्मणाचा शूद्रही होऊ शकतो त्याचप्रमाणें इतर वर्णांतील पाहिजे त्या वर्णास वाटेल त्या वर्णांत गुणकर्मानुसार जातां येतें

यावरूनही वर्णवैशिष्ट्याबद्दल स्पष्ट समजूत झाल्याशिवाय राहात नाहीं आतां-पर्यंतच्या विवेचनावरून हेंच स्पष्ट होतें कीं, प्रारंभींच्या आर्यकालापासून श्रीकृष्ण काला-पर्यंत आर्य हा वर्ण होता पुढें समाजव्यवस्थेसाठीं त्याचेच चार भाग करून प्रत्येक भागावर निरनिराळ्या कामाचा भार टाकण्यात आला म्हणून चार वर्ण अस्तित्वांत आले आणि तेही गुणकर्मावरून, जन्मजात नव्हे इ० सनाच्या नवव्या दहाव्या शतकापासून मात्र ही वर्णविषयक घटना अजिबात बिघडून जाऊन जन्मावरूनच वर्ण मानण्याची बिनबुडाची अयोग्य पद्धति स्वार्थी लोकानीं अमलांत आणली पेशवाईच्या कालांत तर याची शिकस्त होऊन गेली त्या कालच्या वर्णविषयक नादानपणाचें चित्र डोळ्यां-समोर उभें केलें असतां अगावर शहारे येतात याप्रमाणें वर्णचतुष्ट्याचा प्राचीन इतिहास सुरू होऊन तो आतांपर्यंत निरनिराळीं स्थित्यंतरें भोगीत आज विकृतावस्थेंत येऊन पोहोंचला आहे आणि याच विकृतावस्थेमुळें हिंदूमध्यें अत्यंत फाटाफूट पडून ते सर्व दुनियेचे गुलाम बनले आहेत

---

‡ मनुस्मृति, अध्याय १०, श्लोक ६५.

# प्रकरण सोळावें

# चार वर्णांत क्षत्रियांचें श्रेष्ठत्व

१ क्षत्रियांचें श्रेष्ठत्व.

२ सुप्रसिद्ध क्षत्रियकुलरत्नें आणि त्यांचे द्वेषी ब्राह्मण.

३ क्षत्रियांपासून उत्पन्न झालेले ब्राह्मण.

**१. क्षत्रियांचें श्रेष्ठत्व**——चारही वर्णांच्या पेक्षां क्षत्रिय वर्ण हा सर्वश्रेष्ठ वर्ण होय, आणि वर्णप्रणालींतही क्षत्रिय वर्णच पहिल्यानें मानला आहे

**'तच्छ्रेयो* रूपमत्य सृजत् क्षत्र यान्येतानि देवत्रा**
**क्षत्राणींद्रो वरुण· सोमो रुद्रः पर्जन्यो यमो मृत्युरीशान्**
**इतितस्मात् क्षत्रात्परनास्ति**
**तस्मात् ब्राह्मणः क्षत्रिया दधस्तादुपादस्ते राजसूये॥'**

भावार्थ —या जगात पहिल्यानें ब्रह्म म्हणजे ईश्वरस्वरूप एकटेंच होतें त्यानें पुढें **इंद्र, वरुण, सोम, रुद्र, पर्जन्य, यम, मृत्यु आणि ईशान् या अष्ट-देवतांच्या अंशापासून उत्तम प्रकारचा क्षत्रिय निर्माण केला. यास्तव या जगांत क्षत्रियांहून श्रेष्ठ दुसरा कोणीही नाहीं.** याच कारणास्तव यज्ञाचे वेळी **ब्राह्मण हे क्षत्रियांच्या खाली बसतात**

याप्रमाणे क्षत्रिय वर्णाचे अत्यत उच्चतम असे महत्त्व असून ब्राह्मणवर्णापेक्षां अनेक पटींनें तो वर्ण श्रेष्ठपदास पोंचलेला आहे

दुसरी गोष्ट अशी कीं, आर्य लोक जेव्हां इकडे आले, तेव्हा त्यांच्यामध्ये वर्णभेद नव्हता त्यांच्यामध्यें वर्णभेदास कशी सुरवात झाली यासबधीं इतिहास देतांना बुद्धाच्या ग्रंथाधारें मन्मथ शास्त्री एम् ए , एम् आर.ए.एस. यांनी असें उद्धृत केलें आहे कीं, " जसजसे आर्य लोक सधन होत चालले, तसतशीं असमाधान उत्पन्न होणारीं कारणें त्यांच्यात उत्पन्न होऊ लागलीं लढवय्ये ऊर्फ क्षत्रिय लोक हे फार प्रबल झाले व त्यांनीं इतर सर्व लोकांवर आपली छाप बसविली ज्यांनीं देशाचे सरक्षण केले व ज्यांनीं आपलें अमूल्य रक्त खर्ची पाडून देशाचा विस्तार केला त्यांनी राजे होऊ नये हें व्हावें तरी कसें ? **त्यांच्यासंबंधानें दुसऱ्या लोकांस हेवा उत्पन्न झाला खरा;** पण त्याच्यानें होण्यासारखें काय होतें ? राजे लोकांचा प्रतिकार करण्याचें त्यांचें सामर्थ्य नव्हतें, आणि त्या शूर लोकांचीं मनें दुखविण्याची त्यांच्यात हिम्मतही नव्हती. **आर्य क्षत्रियांनीं**

* शतपथब्राह्मण, १४।४।२।२३

वेद‡ रचून आर्यावर्तात वैदिक धर्म स्थापन केला धर्मसंस्थापक व कर्मसंरक्षक क्षत्रियच होते पुढे क्षत्रियांचा निरंकुशतेबद्दल हेवा उत्पन्न झाला, त्यामुळे लढण्याचे काम जास्त वाढत चाललें तेव्हां अर्थातच धर्मसंरक्षणाच्या कामावर ब्राह्मणवर्ग उत्पन्न करून त्याची योजना करण्यात आली अशा प्रकारच्या श्रमविभागाच्या तत्त्वावर वर्ण उत्पन्न होऊ लागले त्यांचीं नांवें अनुक्रमे येणेंप्रमाणे.—

पहिला वर्ण लढाऊ लोकाचा म्हणजे बलवान् बुद्धिवान् क्षत्रियांचा, दुसरा वर्ण उपाध्यायांचा ऊर्फ ब्राह्मणाचा, तिसरा वर्ण व्यापारी ऊर्फ वैश्यांचा, आणि चवथा वर्ण शूद्रांचा म्हणजे सेवकाचा !!

याप्रमाणें वर्णप्रणालि दिली आहे असाच इतिहास वर्णप्रणालीसंबधानें बौद्ध व जैन धर्माच्या धर्मग्रंथांतूनही दिलेला आहे याबद्दलचा पुरावा मन्मथनाथ शास्त्र्यांच्या बुधग्रंथांत सांपडतो

सृष्टीच्या ईश्वरी नियमानें सुद्धा क्षत्रियानाच अग्रेसरत्वाचा सर्वश्रेष्ठ मान मिळतो पुरुषसूक्तात क्षत्रियाना विराटपुरुषाच्या बाहूची उपमा दिलेली आहे मूल जेव्हां जन्माला येतें तेव्हां मुलाचे हाताचे पजे प्रथम बाहेर येतात हाताचा जन्म झाल्यानतर त्याच हातावर म्हणजे बाहूवर आधारलेलें डोके व तोंड बाहूच्या मागून बाहेर येतें इतकेंच नाहीं तर तें बाहूवर आधारलेलें असतें यावरून अग्रेसरत्वाचा मान बाहू–क्षत्रियांचा कीं तोंड–ब्राह्मणांचा याचा स्पष्ट निकाल या ईश्वरी न्यायानेच लागतो

भारतकालातही क्षत्रियाचा वर्ण सर्वश्रेष्ठच ठरला होता डॉ० रॉय यांच्या ग्रंथात यासबधीं विस्तृत विवेचन आहे पण एवढें दूर कशाला, आजही ब्राह्मण लोक क्षत्रियाना **'यजमान'** या सर्वश्रेष्ठ नांवानें सबोधितात यजमान म्हणजे धनी, मालक, यज्=पूजा करणें, यजमान=पूजनीय, देवासारखा, श्रेष्ठ याच अर्थानें बायको नवऱ्याला 'यजमान' या उच्चतम पदवीने सबोधिते व याच नात्यानें ब्राह्मण क्षत्रियाना यजमान म्हणतात यावरून-ही आजच्या कालात जर क्षत्रियाना एवढे महत्त्व कायमच आहे तर तें पूर्वी किती असेल याचा विचार करतां येतो

कृपणांनीं क्षत्रियास जरी तुच्छ भावनेने लेखण्याचा प्रयत्न केला असला, तरी जे खरे ब्राह्मण होते त्यानीं आपली **मूळची खालची पायरी** व **क्षत्रियांची मूळची वरची पायरी** ह्या दोन्ही मोकळ्या मनानें ग्रंथातरीं नोंदून ठेविल्या आहेत गंधर्वांपासून पहिल्यानेंच तीन अग्नि कोणी आणले व यज्ञाची पद्धत आर्यांमध्यें पहिल्यानेंच कोणीं घातली ? तर **पुरुरवा या क्षत्रिय राजानें** अग्निहोत्राचा गर्भार्थ पहिल्यानेंच याज्ञवल्क्यास कोणी शिकविला ? तर **जनक या क्षत्रिय राजानें** उत्तरायणात मरणारास सद्गति मिळते वगैरे रहस्यें आपणांस पहिल्यानेंच कोणी शिकविलीं ? तर **प्रवाहित या क्षत्रिय राजानें** भक्तिकांड मूळचें कोणाचें ? तर **राजर्षींचें**, ब्रह्मर्षींचें नव्हे ज्या गायत्री मंत्रानें

‡ क्षत्रियोत्पादित वैदिक धर्म प्रकरण दुसरें पाहा.

ब्राह्मणत्व येतें तो मंत्र कोणी केला ? तर **विश्वामित्र या क्षत्रिय राजर्षीनें.** सारांश, असा सगळा ऐवज जो स्वतः गोळा केला तो शिष्यत्व स्वीकारलेल्या ब्राह्मणांच्या पदरीं मोकळ्या मनाने व निरपेक्षपणानें क्षत्रियांनीं टाकला यांत पूर्वीच्या क्षत्रियाचा थोरपणा आहे क्षत्रियासंबंधींचे असे उद्गार श्रीमंत सयाजीराव गायकवाडसरकार बडोदें, यांनीं काढलेले आहेत.

दुसऱ्या दृष्टीनें विचार करू गेलों असतांही क्षत्रियांचें श्रेष्ठत्वच ध्वनित होतें छांदोग्योपनिषदांत म्हटलें आहे कीं—

**"बलंवाव* विज्ञानाद्भूयोपिः शतं विज्ञानवतामेको बलवाना कंपयते । स यदा बलि भवत्यथोत्थाता । भवत्युत्तिष्ठन्परिचरिता भवति परिचरन्नुपसत्ता । भवत्युपसीदन्द्रष्टा । भवति श्रोता । भवति मन्ता । भवति बोद्धा । भवति कर्ता । भवति विज्ञाता । भवति बलेन वै पृथिवी तिष्ठति.... बलं उपास्व ॥**

भावार्थ—ज्याच्या योगानें चारही वेद, सहाही शास्त्रें आणि जगातील यच्चावत् वस्तूंचें ज्ञान होऊं शकतें अशा विज्ञानापेक्षांही कांहीं श्रेष्ठ असेल तर तें बल होय एकटा बलवान् मनुष्य शेकडों विज्ञानी माणसास कापून काढू शकतो मनुष्याच्या अंगात जर बल असेल तरच तो नानाप्रकारच्या हालचाली अगर चळवळी करू शकेल, परिस्थितीचें यथार्थ ज्ञान करू शकेल, नानाप्रकारच्या गोष्टी श्रवण करू शकेल, जाणू शकेल, आणि नंतर कांहीं तरी कार्य करू शकेल त्यालाच सर्व विज्ञान प्राप्त होतें बलावरच पृथ्वी व जगांतील यच्चावत पदार्थ अवलंबून आहेत, तेव्हा बलाचीच उपासना कर ! बलच संपादन कर !

अशा प्रकारची बलाची महती असून अशा तऱ्हेचे जे बल, तें क्षत्रियाच्या ठायींच वास करितें म्हणून क्षत्रिय हे अर्थातच सर्वश्रेष्ठ होत आणि असाच छांदोग्योपनिषदाचाही पण स्पष्ट स्पष्ट पुरावा आहे

**"ब्राह्मणाः† सश्रिता क्षत्रं न क्षत्रं ब्राह्मणाश्रितं ।**<br>**श्रिता ब्रह्मोपधा विप्रा खादन्ति क्षत्रियान्भुविः ॥**<br>**क्षत्रियेष्वाश्रितो धर्म प्रजानां परिपालनम् ।**<br>**क्षत्राद्वित्ति ब्राह्मणानां तै कथं ब्राह्मणो वर ॥"**

भावार्थ—ब्राह्मण क्षत्रियाचे आश्रित असून क्षत्रिय हे ब्राह्मणाचे आश्रयदाते, यजमान म्हणजे पूज्य मालक आहेत क्षत्रियावरच पूर्वीप्रमाणे आता देखील ब्राह्मणाचा उदरनिर्वाह चालतो क्षत्रिय मात्र ब्राह्मणांवर अवलंबून नाहींत म्हणून **ब्राह्मणांपेक्षां क्षत्रियच श्रेष्ठ आहेत.**

---

* छांदोग्योपनिषद्, ७।८

† छांदोग्योपनिषद्, १५३।१७।१८.

यावरूनही क्षत्रियांचें श्रेष्ठत्व प्रस्थापित झाल्यावांचून राहात नाहीं

**" न‡ प्राक् त्वत्तः पुरा विद्या ब्राह्मणान्गच्छति ।**
**तस्माद्‌ सर्वेषु लोकेषु क्षत्रस्यैव प्रशासनमभूत् ॥ "**

प्रावाहण जैबालीजवळ गौतम मुनि ब्रह्मविद्याप्राप्तीप्रीत्यर्थ गेला असतां तो म्हणाला —" गौतमा ! ब्रह्मविद्येचा संस्कार तुझ्यापूर्वी इतर कोणत्याही ब्राह्मणांस झालेला नाही तुला तरी ब्रह्मविद्या क्षत्रियांपासूनच मिळालेली आहे ती क्षत्रियामुळेच अस्तित्वांत आली अर्थात् **ब्रह्मविद्येच्या दृष्टीनेंही क्षत्रियच श्रेष्ठ आहेत.** असा या प्रावाहण जैबालीच्या म्हणण्याचा भावार्थ आहे

याप्रमाणेंच अनेक प्रमाणावरून असें स्पष्ट सिद्ध करतां येते कीं, आणि ती गोष्ट स्वत सिद्धच आहे कीं, क्षत्रिय वर्ण हा सर्व वर्णात श्रेष्ठ वर्ण होय आजपर्यंतही ही गोष्ट सत्यच व स्पष्टच होती, आणि आताही सत्य व स्पष्टच आहे, परतु सस्कृत वाङ्मयाच्या भांडाराच्या किल्ल्या मधल्या काळात म्हणजे आद्य शकराचार्यापासून अलीकडच्या काळांत, ब्राह्मणांनीं एकदाच्या दडपून टाकल्यामुळे पुष्कळ दिवसपर्यंत ह्या भाडारांत कोणता माल भरलेला आहे याचे विस्मरण त्याच्या मालकास म्हणजे क्षत्रियास झाले होते, तें आज नष्ट होऊन खरेखुरें स्वरूप उघड झालें आहे एवढेंच नाहीं तरी सत्य हें केव्हांही सत्य असतेच याउप्पर मात्र क्षत्रिय वर्ण कोहिनूरच्या अस्सलपणावर ताण करीत राहाणार, कारण तो मूळचा तसाच आहे प्रखर अग्नीवर कालपटलाची राख सांचली होती एवढेंच ती आज उडून गेली ही आनदाची गोष्ट क्षत्रियाना परमानद देणारी आहे

## २. सुप्रसिद्ध क्षत्रिय कुलरत्नें आणि कपटपटु द्वेषी ब्राह्मण—

क्षत्रिय कुलात जन्म घेऊन ज्यानी अलौकिक सामर्थ्यें प्रकट केली अशा क्षत्रियकुलावतसांची चरित्रे देणे तर येथें अवास्तव व अशक्य होईल, परतु त्याचा नुसता नामनिर्देशही आनदलहरी उत्पन्न केल्याशिवाय राहात नाही म्हणूनच अशा थोर विभूतींचीं कांहीं नांवें व त्याचा मत्सर करणाऱ्या तत्कालीन ब्राह्मणाचीं नांवें देण्याचे योजिले आहे ही नाममालिका अगदीं प्रारंभीच्या आर्यकालापासून आपण क्रमानेंच घेऊ

### सुप्रसिद्ध क्षत्रिय कुलरत्नें आणि त्यांचे द्वेषी ब्राह्मण—

[१] आर्यांच्या अगदीं प्रारंभींच्या काळीं क्षत्रिय नरकेसरी म्हणजे नृसिंह ऊर्फ **नारसिंह** हा सुप्रसिद्ध क्षत्रिय राजमुकुटमणी होऊन गेला त्याचा समकालीन ब्राह्मण **हिरण्यकश्यपु** होता यास नृसिंहाचा उत्कर्ष सहन न झाल्यामुळें तो त्याचा व त्याच्या भक्तीस लागलेल्या आपल्या प्रल्हाद नामक पुत्राचा द्वेष करू लागला त्यामुळे नृसिंहानें हिरण्यकश्यपूचें पोट फोडून त्यास मुक्ति दिली—इहलोकांतून मुक्त केलें

[२] त्यानतर पुण्यात्मा बळी राजा होऊन गेला त्याच्या संबधानें—

---

‡ छांदोग्योपनिपद्

**येन बद्धो बलीराजा दानेन्द्र महाबली**
**तेन त्वां प्रतिबध्नामि रक्ष मा चरमाचर ॥१॥**

भावार्थ—'इन्द्रासारखा श्रेष्ठ व दानशूर आणि अत्यंत बलवान् अशा बळी राजाला जें सूत्र बांधलें तेंच सूत्र मी तुला बांधतों तू माझें अक्षयी रक्षण कर' सात्विक बळी-राजाची प्रशंसा करणारा असा मंत्र ब्राह्मण लोक **अद्यापि रक्षाबंधनाच्या वेळीं** म्हणतात अशा शौर्य, वीर्य, प्रतापशाली बळी राजाच्या श्रेष्ठ दर्जाचा हेवा करणाऱ्या कपटी वामन ब्राह्मणानें बळी राजास त्रिपादभूमीचें दान मागितलें आणि दोन पावलांत पृथ्वी व आकाश माझें झाले, असें सांगून तिसरा पाय कोठें ठेवू असे कपटी वामन भट्टानें त्यास विचारले. त्यावर तिसरें पाऊल माझें मस्तकावर ठेव, असें सत्त्वशील बळी राजानें भक्ति-भावानें सांगताच वामन त्याचे डोक्यावर नाचू लागला ! वचनबद्ध सात्विक बळी राजानें त्याचा प्रतिकार केला नाहीं, म्हणून कपटी वामनानें त्याला पायांखालीं तुडवून त्याचा प्राण घेतला, व त्याला पाताळांत घातले म्हणजे मातींत मिळवून त्याला राज्योपभोगांतून मुक्त केलें ! ही पुराणांतरींची कथा सर्वांस माहीत आहे **इडापिडा जावो आणि बळीचें राज्य होवो** असे बळीराजाचे पुण्यस्मरण करून ब्राह्मणेतर लोक दिपवाळीचे दुसरे दिवशीं किंवा पोळ्याच्या करीच्या दिवशीं अरुणोदयाच्या सुमुहूर्तावर 'इडापिडा' अद्यापि काढीत असतात अशा पुण्यवान् व सात्विक **बळी राजाचा** विश्वासघात ज्या कपटी **वामनानें** केला त्या वामन भट्टाची गणना भट्टांना अवतारात केली !

[३] त्यानंतर ईश्वरावतार **प्रभुरामचंद्र** याच्या समकालीन **रावण** नावाचा ब्राह्मण होऊन गेला तो रामाचा अत्यंत द्वेष करीत असे, पण रावणाच्या दुष्टपणामुळें त्याच्या पुत्रपौत्रासह प्रभुरामचंद्राने त्याचा कसा फडशा उडविला ही रामायणातील हृदयंगम कथा सर्वांच्या परिचयाची आहे

[ ४ ] श्रीरामकालींच **परशुराम** नांवाचा एक मदोन्मत्त ब्राह्मण होऊन गेला. त्याची आई क्षत्रियकन्या होती स्वतःच्या आईचा परशुरामाने वध केला आणि इतर अबला व गर्भिणी स्त्रियांचीं पोटं फोडून जनतेस ताप देऊ लागला प्रभुरामचंद्रादि क्षत्रियां-चा द्वेष करून तो त्यांना कःपदार्थ समजत असे, पण **श्रीरामचंद्रानें** त्याला जिंकून विश्वामित्रादि पंचाच्या न्यायासनासमोर उभें केलें आणि पंचाच्या न्यायास अनुसरून सह्याद्रि पर्वतापलीकडील समुद्रकांठच्या स्मशानभूमींत एकांतवासाची काळे पाण्याची शिक्षा भोगण्यास भाग पाडले ही कथा मूळ रामायणांत वर्णिली आहे याच पापी परशुरामाचें नांव भिक्षुकांनीं अवतारांत दडपून दिले

[५] प्रभुरामचंद्राच्या कालीं विश्वामित्रादि अनेक क्षत्रिय राजर्षींनी ऋग्वेदाची रचना केली आपल्या घोर तपश्चर्येच्या पुण्याच्या बळावर प्रतिसृष्टि निर्माण करणारा जाज्वल्य क्षत्रिय राजर्षि **विश्वामित्र**, आणि त्याचा हेवा करणारा ब्राह्मण **वसिष्ठ**, ही रामकालीन जोडी प्रसिद्धच आहे विश्वामित्रानें घोर तपश्चर्येच्या जोरावर मिळविलेला

ब्रह्मर्षीचा मान त्याला मिळू देणारच नाहीं, अशी मत्सरी दुष्ट प्रतिज्ञा वसिष्ठाची होती; पण विश्वामित्रानें ती शेवटीं आपल्या सामर्थ्यानें खोटी ठरविली ही गोष्ट रामायणांत आहे.

[६] त्याचप्रमाणें मिथिला नगरीच्या क्षत्रियकुलावतंस जनक राजानें उपनिषदें रचून तीं ब्राह्मणांस शिकविली त्याचें सविस्तर व सप्रमाण वर्णन याच ग्रंथांतील सातवे प्रकरणांत दिले आहे **जनक राजा** विदेही होता एक पाय भडभड जळणाऱ्या अग्नींत व दुसरा पाय अत्यंत विलासांत तो ठेवीत असे तो ब्रह्मविद्येचा आद्यकर्ता म्हणजे **जनक** असल्यामुळेच त्याला **जनक** हें नांव पडले होतें ब्रह्मविद्या शिकण्याकरितां शेंकडों ब्राह्मण त्याचे शिष्य झाले होते, तरी तो ब्राह्मणांपेक्षां कमी दर्जाचा असल्याचे भिक्षुकी ग्रंथांत लिहून ठेवले आहे, हा मत्सर होय भिक्षुकी अहंमन्यतेचा हा स्पष्ट दाखला आहे असें कोणीही नि पक्षपाती मनुष्य म्हणेल

[७] श्रीकृष्णकाळीं **प्रतापी पांडव**, कौरवाच्या कपटजालामुळें वनवास भोगीत असतां, वनवासांतही त्यांचे सत्त्व हरण करण्याकरितां कौरवाच्या फुसलावणीवरून वनांत इच्छाभोजन मागण्याकरितां ब्राह्मण **दुर्वास ऋषी** आपल्या शिष्यमंडळीसह गेले होते. पण प्रभुगोपालकृष्णाने पांडवांस मदत करून त्यांचें सत्त्व राखिलें ही कथा पुराणांत आहे

[८] त्यानंतरच्या पुण्यकारक बौद्धकालीं सुप्रसिद्ध **पार्श्वनाथ** नांवाच्या बौद्ध गुरूच्याविरुद्ध बंड उभारून तो पवित्र बौद्धधर्म बुडविण्याकरिता हल्लीच्या भेदप्रधान भिक्षुकी हिंदु धर्माची पताका फडकविणारा आद्य**शंकराचार्य**, याने नवव्या शतकांत भिक्षुकी हिंदु धर्माच्या नावाखाली अखिल ब्राह्मणेतर जनतेला ब्राह्मणाचे धार्मिक गुलाम बनविले, आणि क्षत्रियत्वावर भिक्षुकी श्रेष्ठत्वाचा बोळा फिरवून व जातिभेद उत्पन्न करून हिंदी राष्ट्र रसातळाला नेले या भेदनीतिप्रधान श्रेष्ठकनिष्ठत्वाच्या भिक्षुकी हिंदु धर्मामुळेच हिंदूत फूट पडून ते सर्व दुनियेचे गुलाम बनले आहेत

[९] तीनशे वर्षांपूर्वीचे स्वराज्यसंस्थापक, सूर्यवंशी क्षत्रिय वीरशिरोमणी **एकादशावतार श्रीशिवाजी राजे भोसले**, याना शूद्र म्हणून राज्याभिषेकास इ० सन १६७४ सालीं संकट उत्पन्न करणारे त्यांचेच प्रधान **मोरोपंत पिंगळे** हे होत पंचकुळी व सप्तकुळीची श्रेष्ठकनिष्ठत्वाची घातकी टूम क्षत्रियमराठा लोकाच्या शहाण्णव कुळांत यानेंच प्रथम निर्माण केली व त्याच्या बळावर क्षत्रियमराठा जातीत आपसांत फूट पाडून यादवी माजविली शिवाजीमहाराजानंतर त्यांचे पुत्र अद्वितीय शूरवीर, व स्वधर्माकरितां प्राणाची आहुती देणारे **संभाजीमहाराज**, व त्यांच्या राज्यव्यवस्थेंत भिक्षुकी धिंगाणा घालून त्यांना धुळीस मिळविणारा **कलुशा** नावाचा ब्राह्मण होऊन गेला

[१०] पहिले **शाहूमहाराजां**कडून कपटानें मरणसमयीं पेशवाईच्या सनदेवर सही करून घेणारे, व नंतर स्वतंत्रपणे नंगा नाच घालणारे विश्वासघातकी भट्टवंशी **बाजीराव बल्लाळ** पेशवे होत

[११] सातारचे **छत्रपति प्रतापसिंहमहाराज** भोसले यांना बायकांमुलांसुद्धां इ० सन १८०८ पासून इ० सन १८१८ पर्यंत कैदेंत ठेवून, स्वत पेशवाई स्वतंत्रपणें करणारे



छत्रपती शिवाजी



व्यंकोजी राजे



राजे शहाजी



महादजी शिंदे



मल्हारराव होळकर

**पळपुटे बाजीराव पेशवे**; पेशव्यांच्या कैदेंतून इंग्रजांनीं त्यांना मुक्त करून गादीवर बसविल्यावर इ० सन १८३९ सालीं पुन्हा भिक्षुकी कारस्थान रचून इंग्रजांकडून त्यांना कैद करवून पदच्युत करविणारे, **नातु, पटवर्धन, शंकराचार्य**, इत्यादि कोंकणस्थ भट्ट ब्राह्मणांची टोळी इतिहासज्ञांस माहित आहेच.

[१२] सातान्याचे शेवटचे **छत्रपति अप्पासाहेब भोसले** हे इ० सन १८५७ सालच्या बंडांत सामील होते, असें खोटें भिक्षुकी कारस्थान रचून साताऱ्याची गादी इंग्रजाचे हाती इ० सन १८६० सालीं देणारी, पुण्याचे पेशव्यांचे वंशज **'पापस्मरण' नातु, पटवर्धन** आणि **शंकराचार्य**, इत्यादि चित्पावनी कोंकणस्थ **ब्राह्मणांची सोनेरी टोळीच होय**

[१३] नागपूरचे **अप्पासाहेब पहिले रघुराजे भोसले**, यांचा विश्वास संपादण्याकरिता **गोमातेचें शेपूट** हातीं धरून इमान करणारा, आणि विश्वासघातानें रघुजी राजे भोसल्यांना इ० सन १८६५ मध्यें कैद करवून नागपूरचें राज्य इंग्रजांच्या हाती देणारा अप्पासाहेब भोसल्याचा फितुरी प्रधान **मनभट** नावाचा ब्राह्मणच होय

[१४] कोल्हापूरचे **शाहूमहाराज शूद्र आहेत** असें म्हणून, इ० सन १९०५ सालीं त्यांच्या राजवाड्यांत वैदिक पूजा करण्यास नाकारणारे त्यांचेच आश्रित **निमकहराम राजोपाध्याय** होत या अपराधाबद्दल शाहूछत्रपतींनीं इ० सन १९०५ सालीं राजोपाध्यायांची जहागिरी जप्त केली ती त्यांना पुन: परत दिलीच नाही

[१५] त्यानंतर कोल्हापूरचे **शंकराचार्य**, डॉ० कूर्तकोटी, यांनी **श्रीशाहूछत्रपतीचा** धार्मिक भिक्षुकी द्वेष सुरू केला त्यामुळे डॉ० कूर्तकोटी शंकराचार्य यांचे गादीचा राजीनामा घेऊन महाराजांनीं त्यांना कोल्हापुरांतून काढून दिले ते कांहीं वर्षे महाराष्ट्रांत भटकत फिरत होते शेवटी त्यांनी नाशिक येथे इ सन १९२६ साली नवीन मठ स्थापन केला.

[१६] ब्राह्मणांचे हस्ते धार्मिक विधि करून घेण्याचें याच कारणामुळे शाहूमहाराजांनीं बंद करून इ सन १९२० सालीं **'श्रीशिवाजी वैदिक विद्यालय'** या नांवाची वेदशाळा काढून त्यांत कोल्हापूर संस्थानातील सर्व ब्राह्मणेतरांना वैदिक विद्या शिकविण्याची व्यवस्था त्यांनीं केली भिक्षुकी शंकराचार्याचें वर्चस्व पार झुगारून देऊन १९२१ साली क्षात्रजगद्गुरूची शाहूछत्रपतींनीं कोल्हापुर संस्थानांत पाटगांव येथें स्थापना केली ही क्षात्रजगद्गुरुची गादी हल्ली चालू आहे

[१७] **श्रीशाहूछत्रपति** इ सन १९२१ सालीं स्वर्गवासी झाले तेव्हा सर्व **भट्ट भिक्षुक ब्राह्मणांनीं आनंदानें सत्यनारायण करून साखर शिरण्या वांटल्या !** कोल्हापूरचे राजोपाध्याय व इतर भट्ट भिक्षुक आपल्या फाजील भिक्षुकी श्रेष्ठत्वाची व्यर्थ प्रौढी शाहूमहाराजानंतर पुन्हा मिरवूं लागले, म्हणून इ. सन १९२१ साली **राजाराममहाराजांनीं** 'श्रीशाहू' वैदिक विद्यालय नांवाची दुसरी वैदिक शाळा स्थापन केली व त्यांत महाराष्ट्रातील सर्व ब्राह्मणेतर विद्यार्थ्यांना वैदिक धर्मविधि फुकट शिकविण्याची व्यवस्था करून दिली

श्रीछत्रपति राजाराममहाराज यांनीं आपला राज्याभिषेक इ० सन १९२१ सालीं क्षात्रजगद्गुरु व क्षत्रिय पुरोहितांच्या हस्तें करून घेतला.

ता. १०।६।१९२५ रोजी श्रीमंत राजाराममहाराजांचा दुसरा लग्नसमारंभ क्षात्र जगद्गुरु व मराठा पुरोहित याचेकडून करविण्यांत आला

हल्लींचे भिक्षुक स्वराज्याच्या चळवळींत **दिवसांतून तीन रंग** बदलून स्वार्थाकरितां, देशाच्या स्वातंत्र्यावर कसा घाला घालतात, आणि भिक्षुकशाहीचें नकली वर्चस्व स्थापून क्षत्रियादि ब्राह्मणेतराना खालीं दाबण्यासाठी कसे फासे मांडतात, याचे मूर्तिमत चित्र प्रत्येक तज्ज्ञाच्या व सुज्ञाच्या डोळ्यांपुढे उभे आहे याप्रमाणे अगदी प्रारंभींच्या आर्यकाळापासून तो तहत आजतागायतपर्यंत भिक्षुकशाहीनें स्वतःच्या फाजील वर्चस्वाकरता, व स्वार्थाकरतां क्षत्रियांशी व देशाशी कसकशी निमकहरामी व द्वेषबुद्धीची विषारी कारस्थानें केली, यांचीं ही ठळक ठळक उदाहरणे थोडीं वर दिली आहेत आतां क्षत्रियकुलांत कोणकोणतीं नररत्नें होऊन गेलीं ती पाहू

ज्याच्या प्रतापी नावामुळें या आर्यभूमीस **भरतभूमि, भरतखंड, भारतवर्ष** अशीं नांवें पडली, तो दिग्विजयी प्रतापशाली **भरत राजा** क्षत्रिय कुलातच अवतीर्ण झाला आपले स्वप्नांतील वचन खरे करून दाखविण्याकरितां, ज्या **हरिश्चन्द्र** राजाने स्वतःचे राज्यदान करून दक्षणेकरितां स्वतःस, आपल्या प्रिय रोहिदास पुत्रास आणि राणी तारामतीस काशी क्षेत्रात विकून घेतलें, तो सत्त्वशाली, उदार **हरिश्चन्द्र राजा** क्षत्रियच होता आपल्या **चिलया बाळ** नांवाच्या एकुलत्या एक प्रिय पुत्राचें मांसाचे इच्छाभोजन एका अतितास देणारें, **श्रियाळ राजा** व **चांगुणा** हें जोडपें क्षत्रियच होतें कैलासातून भागीरथी नदी ऊर्फ गंगा, मृत्यु लोकात आणणारा, आणि मृत्यु लोकातील जनतेला पावन करणारा दीर्घोद्योगी आणि अतुल पराक्रमी **भगीरथ राजा** क्षत्रिय कुलातच अवतीर्ण झाला प्रत्यक्ष ब्रह्मदेवाशीं सामना करून व प्रतिसृष्टि निर्माण करून ब्रह्मदेवास शरण येण्यास भाग पाडणारा तपोनिधि चंद्रवंशावतंस राजर्षि **विश्वामित्र** क्षत्रियच होता विश्ववंद्य **प्रभुरामचंद्र** क्षत्रिय कुलातच अवतीर्ण झाले होते चंद्रवंशी यादव कुलभूषण **प्रभुगोपालकृष्ण** अतुल प्रतापी **भीष्म**, अचुक शरसंधानी पांडववीर **अर्जुन**, अतुलप्रतापी **भीम**, धर्मावतार **धर्मराजा**, बौद्धधर्मसंस्थापक, प्रातःस्मरणीय **गौतम बुद्ध**, जैन धर्मसंस्थापक पुण्यात्मा **महावीर**, हिंदु धर्मसंस्थापक, संवर्धक, व संरक्षक प्रमार ऊर्फ **पवार, प्रतिहार, चालुक्य, चव्हाण**, त्याचप्रमाणें राजपुताचे राज्यसंस्थापक **बाप्पा रावळ**, मौर्यवंशी मुकुटमणी राजा **चंद्रगुप्त**, बौद्ध धर्मप्रसारक सम्राट **अशोक**, शब्दवेधी रणधुरधर **पृथ्वीराज चव्हाण**, यवनांवर सिंहासारखा तुटून पडणारा व मायभूमीकरितां पंचप्राण वेंचून वनवास भोगणारा प्रतापशाली राणा **प्रतापसिंह**, गो ब्रह्म-प्रतिपालक म्हणजे हिंदभूमि व हिंदु धर्म याचे प्रतिपालनकर्ते एकादशावतार श्रीमच्छत्रपति **श्रीशिवाजी महाराज**, भिक्षुकशाहीचा धुव्वा उडवून व ब्राह्मणेतर जनता जनार्दनास अंधश्रद्धेच्या निद्रेतून जागृत करून सत्यधर्माच्या



महाराणा उदेसिंग



महाराणा प्रतापसिंह



पृथ्वीराज चव्हाण



राजा मानसिंह



सुरजमल जाठ

ज्ञानरवीचा प्रकाश पाडणारे कोल्हापूरचे राजर्षि **शाहूछत्रपतिमहाराज**, सत्यधर्म-संस्थापक **महात्मा जोतिराव फुले**, अजिंक्य धर्मवीरशिरोमणी जगद्विख्यात **स्वामी विवेकानंद**, प्रख्यात सेनापति **धनाजी जाधव**, सुप्रसिद्ध रणधुरंधर **योद्धे तानाजी मालुसरे**, **येसाजी कंक**, **बाजी फसलकर**, पावन खिंड पावन करणारे **बाजीप्रभु** देशपांडे इत्यादि नररत्नांची नावें त्यांच्या अगच्या अलौकिक शौर्य, वीर्य, औदार्यादि, गुणसमुच्चयामुळें या जगतीतलावर अजरामर होऊन राहिलीं आहेत असे असख्य महात्मे ज्या पवित्र क्षत्रिय कुलातच अवतीर्ण झाले, आणि मत्स्य, कच्छ, वराह, नारसिंह, श्रीराम, श्रीकृष्ण, बौद्ध, कलंकी वगैरे ईश्वरावतार व धर्मावतार ज्या क्षत्रिय कुलांतच होऊन गेले, तो परमेश्वरावतारमडित क्षत्रिय वर्ण सर्व वर्णांत श्रेष्ठ वर्ण नाहीं, असें एखाद्या माथेफिरू शिवाय दुसरा कोण म्हणू शकेल ? साराश, अशा प्रकारें सर्व दृष्टीने श्रेष्ठ असा हा क्षत्रिय वर्ण, हा क्षात्रवेश, ही क्षात्रवृत्ति, हें क्षात्रतेज व हा क्षात्रधर्मच सर्वात श्रेष्ठ आहे

**३. क्षत्रियांपासून उत्पन्न झालेले ब्राह्मणः**—क्षत्रिय हा वर्ण एवढा सर्वव्यापि आहे की, त्याची व्याप्ति लक्षात घेता ब्राह्मणाची उत्पत्तीही क्षत्रिया-पासूनच झाली असा स्पष्ट आधार मिळतो या विचारास पहिला पुष्टिकारक आधार हाच आहे कीं, ब्रह्मा-विष्णु-महेश याना हिंदु धर्मशास्त्रात सृष्टीचे उत्पादक, सरक्षक व सहारक मानतात विष्णु हा वैकुठचा, आर्यांचा पहिला राजा होय या विष्णूला क्षत्रियत्वाचाच मान आहे ब्रह्मा सृष्टीचा उत्पन्नकर्ता आहे असें मानतात, परतु त्याची उत्पत्ति विष्णु या क्षत्रियाच्या नाभीकमलापासून झालेली आहे, असा पुरावा मिळतो, अर्थातच या प्रमाणावरूनही ब्रह्मदेवापासून उत्पन्न झालेल्या अखिल ब्राह्मणाची उत्पत्ति क्षत्रियांपासूनच झाल्याचे स्पष्ट सिद्ध होते यच्चावत् ब्राह्मण अत्यत आदरपूर्वक ज्याच्या पायांवर लोटागण घालतात ते प्रभुरामचद्र, प्रभुश्रीकृष्ण, गौतमबुद्ध, स्वामी विवेकानदजी, विष्णु, शकर, श्रीशिवाजीमहाराज इ यादि थोर विभूति क्षत्रियच होत्या, ही गोष्ट लक्षात ठेवण्या-सारखी आहे मोठमोठ्या देवादिकात क्षत्रियाचीच गणना प्रामुख्याने आहे

> " परित्राणाय साधूनाम् विनाशायच दुष्कृताम ।
> धर्मसस्थापनार्थाय सभवामि युगे युगे । "

हा धार्मिक, बाबतींतील शास्तेपणाचा, श्रेष्ठत्वाचा आणि धर्माधिकारीपणाचा मान क्षत्रियासच आहे एकाही ब्राह्मणाने युगायुगाचे ठायीं जन्मून सद्धर्मसंस्थापना केली नाहीं व त्याना ते शक्यही नाहीं कारण हे महत्कार्य त्याच्या शक्तीबाहेर आहे. क्षत्रियांचेच तें कर्तव्य आहे असे खुद्द श्रीकृष्णाने आपल्या मुखाने प्रतिपादिले आहे

ब्राह्मणांचीं दहा गोत्रेही क्षत्रिय ऋषींपासूनच झालेली आहेत त्याबद्दलचा उल्लेख असा कीं,—

'विप्रामाजि ¶ गोत्र साकृत । साकृत होता क्षत्रिय पवित्र । मांधाता विप्राचें गोत्र ।

---

¶ क्षत्रियमाहात्म्य पुराण, अध्याय ६। १२४–१२८.

मांधाताही क्षत्रिय ॥१॥ अंगिरसादिगदर्भ क्षत्रिय । ब्राह्मण तयाचे गोत्रिय । हारित कौत्सादि बहु क्षत्रिय । गोत्रप्रवर्तक विप्राचे ॥२॥ ययातिराज क्षत्रिय असुनी । त्याची भार्या देवयानी । ती तो ब्राह्मण नंदिनी । विप्रजामात क्षत्रिय ॥३॥ ययातीची भार्या दुजी । शर्मिष्ठा नामें सुप्रसिद्ध जी । तिजपासोनी पुरुषवंशामाजि । दुष्यत राजा क्षत्रिय॥४॥ दुष्यतास दिधली शकुंतला । ती ब्राह्मण कन्या सुशिला । भरतभारद्वाज मन्दुशाला । गार्ग्यकुल तिजपासुनी॥५॥ गर्गापासुनि शनी झाले । शनीपासोनि गार्ग्यकुल झालें । ऐसे क्षत्रियापासोन जन्मले । ब्राह्मण गार्ग्य कुलीचे ॥६॥ कृपाचार्य मुद्गल गौतम । यांचें मूळ क्षत्रियोत्तम । नामें सुप्रसिद्ध चवन । क्षत्रियोत्पन्न विप्र हे ॥७॥ हा प्रसिद्धांचीं नावें असती । अप्रसिद्धांस कोण पुसती । असतील ऐसे लाखों गणती । कोण वर्णील नयांना ॥८॥ आणिक ऐसे शोधितां फार । होईल प्रचंड विस्तार । तथापि कळोनि आला सार । विप्रोत्पत्ति क्षत्रियांतुनी ॥९॥

यावरून ब्राह्मणाची उत्पत्ति क्षत्रियापासून कशी झाली तें स्पष्ट होतें सर्वात उच्च वर्ण क्षत्रिय वर्ण हाच आहे ब्राह्मण वर्ण क्षत्रिय वर्णाइतका श्रेष्ठ वर्ण नाहीं. कारण त्याची उत्पत्ति क्षत्रियवर्णातूनच झाला असल्याबद्दल अनेक ठिकाणीं स्पष्ट पुरावे आहेत

# प्रकरण सतरावें

# जातिभेद

१ जातिभेदाचें कथन.
२ जातिभेदाचा काल
३ जाति कशा झाल्या ?
४ पोकळ जातिबंधनें आणि अमानुष जुलूम.

**१. जातिभेदाचें कथन** —सुमारें सहा हजार वर्षांपूर्वी भरतखंडांत आलेल्या आर्य क्षत्रियांचा मूळचा आर्यधर्म, त्यानतर सुमारे पाच हजार वर्षांपूर्वी म्हणजे प्रभुरामचद्राच्या काळीं अस्तित्वांत असलेला क्षत्रियप्रणित वैदिक धर्म, त्यानंतर भारत काळी म्हणजे आज सुमारें ३१०० वर्षांपूर्वी क्षत्रिय कुलावतंस भगवान् श्रीकृष्ण परमात्म्यानें वेद व उपनिषदें यांचा सारांश काढून रचलेल्या भगवद्गीतेच्या रूपाने स्थापिलेला गीता धर्म, तदनतर इ० सनापूर्वी ५६७ या वर्षी जन्मलेल्या गौतम बुद्ध या क्षत्रिय राजपुत्रानें प्रस्थापित केलेला बौद्ध धर्म, बौद्ध धर्माच्या समकालीन महावीर क्षत्रियनिर्मित जैन धर्म आणि इ० सनाच्या नवव्या शतकांत पवार, प्रतिहार, चालुक्य आणि चव्हाण या क्षत्रियांच्या परिपूर्ण आश्रयाने शकराचार्यानें स्थापन केलेला हिंदु धर्म ऊर्फ भिक्षुकी गुलाम धर्म या सर्वांचा विचार करून वर्णभेद व जातिभेद हे कोणत्या धर्मवैशिष्ट्याखालीं मोडले गेले आहेत, यांचा विचार करणे क्रमप्राप्त आहे

आर्य धर्म आणि वैदिक धर्म या कालीं तर जातिभेदाचें अस्तित्व मुळीं नव्हतेंच गीताधर्माच्या कालींही गुणकर्मानुसार वर्णप्राप्ति निरनिराळ्या प्रकारची व्हावी असें न्यायदानाचें तत्त्व श्रीकृष्णानें प्रतिपादिले आहे, परंतु त्या कालींही जातिभेदाचें बंड माजले नव्हते

बौद्ध धर्माच्या कालींही जातिभेदास वाव नव्हता. कारण **'सर्व ब्रह्ममयं जगत्'** म्हणजे सर्व प्राणिमात्र एकाच परमेश्वराचीं लेकरें असल्यामुळें त्यांच्यांत भेदभाव नसून ती समान दर्जाचीं भावंडें आहेत, असें अत्यत उच्चतम बौद्ध धर्माचें मुख्य तत्त्व होतें. पुढें जो शकराचार्यांनीं हिंदु धर्म नवव्या शतकांत प्रतिपादन केला, त्यांत मात्र जातिभेदाच्या अग्नीची ठिणगी चमकूं लागली होती, आणि तीच ठिणगी वाढत वाढत जाऊन आज या जातिभेदाच्या अग्निप्रलयास कारणीभूत झाली

इ० सनाच्या दुसऱ्या शतकांत मनुस्मृति करणारा मनु राजा होऊन गेला मनुस्मृतींत चार वर्ण आणि कांहीं जातींचाही उल्लेख आहे मनूनें उल्लेखिलेल्या एकंदर पन्नेचा-

तीस जातींपैकीं अठरा व्रात्य जाति म्हणजे आर्य म्हणविणाऱ्यांपैकीं उपनयन न करणाऱ्या जाति आहेत. शंकराचार्यानंतर कांहीं वर्षांनी म्हणजे दहावे शतकांत क्षत्रिय, ब्राह्मण, वैश्य आणि शूद्र या जन्मावरून मानलेल्या चार वर्णांची वाढ पुढें पुढें तर अतिशयच होऊं लागली आणि पुढे त्यामध्येंच निरनिराळे संघ बनत गेले क्रमाक्रमानें असे धंदेवार अनेक संघ निर्माण झाले आचारसाधनानें त्यांच्यांत शरीरसंबंध घडून येत असत कालांतरानें तसें होणेंही अगदींच अशक्य झालें व हजारों पोटजाति पुन्हाही बनत गेल्या मुख्य मूळ तर एकच क्षत्रिय लोकांचे होतें परंतु ज्याच्या त्याच्या अंगच्या गुणाप्रमाणें ज्यास त्यास क्षत्रिय, ब्राह्मण, वैश्य, शूद्र इत्यादि पदव्या अर्पण करण्यांत आल्यावर पुढें त्या पदव्यांसच वर्णवैशिष्ट्याचें स्वरूप प्राप्त झालें. पुढें धंद्याप्रमाणें त्या चार भागांचेच अनेक भाग झाले आणि त्यांचेच दृश्य स्वरूप म्हणजे आजचा हिंदुसमाजांतील जातीचा भडका हे होय.

गुणकर्मेकरून वर्णपरंपरा चालत असतां चतुर्वर्णियाचीं कर्मे अबाधित चाललीं होतीं त्यांच्यात तामस बुद्धिप्रेरित मत्सर, द्वेष अगर हेवा परस्परांविषयीं मुळींच नव्हता गुणकर्मांविषयीं चढाओढ होती, परंतु ती सात्त्विक चढाओढ होय ब्राह्मणांची संतति जरी ती ब्राह्मण जातींत निर्माण झाली असली तरी गुणकर्मानें निरनिराळ्या वर्णांची गणली जाऊं लागली शूद्र ब्रह्मकर्मांत निष्णात असेल तर त्याला ब्राह्मण म्हटलें जात असे कित्येक क्षत्रिय ब्रह्म व क्षात्र ही दोन्ही कर्मे आचरण्यास समर्थ असत त्यांना ब्राह्मण क्षत्रिय म्हणत असत विश्वामित्र जनकादि क्षत्रिय राजे ब्रह्मर्षि म्हणूनही गणले गेले होते ही व्यवस्था उपनिषत्कालीही चालू होती तोंपर्यंत जातींस वाव मिळाला नव्हता चतुर्वर्ण ज्ञानाचे भोक्ते होते तत्त्वज्ञानामध्यें तर क्षत्रिय वर्ण सर्वांच्या पुढें गेलेला होता ते तत्त्वज्ञान क्षत्रियांकडूनच ब्राह्मणांना प्राप्त झालें होतें शतपथ ब्राह्मण, छांदोग्योपनिषद् यांत स्पष्ट उल्लेख आहे कीं, जनक राजानें याज्ञवल्क्यास अग्निहोत्र समजावून दिले आहे तसेंच उद्दालक, प्रवाहण, जैबाली, अजातशत्रू या क्षत्रिय राजांनी ब्राह्मणांस उपनिषदांतील ब्रह्मविद्या शिकविली आहे. हे क्षत्रियांचें वर्चस्व ब्राह्मणांना सहन न होऊन आपल्या गुरूशींच बेइमानी करण्यास त्यांनी मागे पुढें पाहिलें नाहीं अनेक भानगडी निर्माण करून आणि खोटींनाटीं तत्त्वे सामान्य जनतेच्या गळीं उतरवून समतेच्या अमृत जलामध्ये त्यानी जातिभेदाचें कालकूट कालविण्यास मागेपुढे पाहिले नाही त्या वेळीं क्षत्रिय वर्ण हा कमरेस तलवार बांधून शत्रूशीं टक्करा देण्यांत गढून गेला असल्यानें त्याला ही कारवाई कळण्यास वाव मिळाला नाही आणि अशा रीतीनें जातिभेदाच्या जहराने कांठोकांठ भरलेला प्याला सहजासहजीं जनतेच्या गळी उतरविला गेला आणि हें कर्म करणारे लोक अठरा वर्णांचे गुरु स्वतःस म्हणवून घेऊं लागले क्षत्रिय वर्ण हा दहाव्या शतकांत युद्धकार्यांत मग्न झाल्यावरच ब्राह्मणांना असें कपट करतां आलें परंतु हा दोष क्षत्रियांचा नसून तो स्वार्थी लोकांच्या भावनेचा प्रश्न आहे स्वतःचें वर्चस्व समाजा-वर प्रस्थापित करण्याकरिता पुढें राष्ट्रावर वाटेल तशी आपत्ति आली तरी पुरवली अशा आपमतलबी लोकांनींच जातिभेदाचा गाडा पुढें ढकलण्याची स्वार्थी हिंमत केली सहृदय लोकांचें हें काम नव्हे


महासाध्वी अहिल्याबाई होळकर


श्रीराम


संत तुकाराममहाराज


राणा रणजितसिंह

**२. जातिभेदाचा काल**—भारतकालापर्यंत जातींचे बंड माजलें नव्हतें असें सरासरीने प्रमाण काढतां येते भारतकालानंतर मात्र जातिभेदास सुरवात होऊन ज्या वर्णामध्ये जन्म घ्यावा तीच त्याची जात असा नियम अंमलांत आला तरीही त्या नियमास व्हावें तसें स्थैर्य प्राप्त झाले नव्हतें शेवटच्या नंदराजानंतर पाटलीपुत्र येथें मौर्य वशाचा चंद्रगुप्तराजा इ० सनापूर्वी ३२२ व्या वर्षी म्हणजे आज सरासरी २२०० वर्षांपूर्वी राज्य करीत असतां त्याच्या दरबारांत मेगॅस्थनिस नांवाचा सीरिया देशाच्या राजाचा वकील राहत असे त्याने त्या कालाचा हिंदुस्तानचा इतिहास लिहिलेला आहे त्याचप्रमाणे ग्रीस देशाचा अलेक्झांडर बादशहा इ० सनापूर्वी ३००या वर्षी हिंदुस्तानांत आला त्याच्याबरोबर त्याचे जे सोबती होते त्याच्या मार्फत ॲरियन यांस जी माहिती मिळाली तिच्या आधारानें त्याने एक इतिहास लिहिला आहे त्यावरून पाहतां अलेक्झांडर व मेगॅस्थनीस यांचे वेळीं हिंदुस्तानात हिंदु लोकाचे फक्त सात वर्ग उपस्थित होते असे आढळून येतें ते वर्ग म्हटले म्हणजे, १ लढाऊ लोक म्हणजे क्षत्रिय, २ तत्त्व ज्ञानी, ३ शेतकरी, ४ धनगर व पारधी, ५ कारागीर व श्रमांची कामें करणारे लोक, ६ धर्माधिकारी अगर तपासणी करणारे आणि ७ राजाचे मत्री अगर सल्लागार या सात वर्णांचा उल्लेख त्यांनीं केलेला आहे अगदीं अलीकडील काळात म्हणजे दोन अडीचशें वर्षांपूर्वी जातिभास्कर, धर्मसिंधु आणि गागाभट्टाचा भाऊ कमलाकर भटजीनें लिहिलेला शूद्र कमलाकर वगैरे नवीन ग्रथ स्वार्थी भावनेने लिहिले जाऊन त्यामधून जातिभेदाचा डमरू फारच जोराने वाजविला गेला शिवाजीमहाराजास क्षत्रिय ठरवून गागाभट्टी या नांवाचा ग्रथ लिहिल्यामुळे कमलाकर भटजीनें बधुद्वेषानें शूद्रकमलाकर ग्रथ लिहिला असे विद्वेषी ग्रथ निर्माण होण्याचे विशिष्ट कारण म्हणजे ऐन पेशव्याच्या अमदानींतील फाजील ब्राह्मणी वर्चस्वाचा काळ हे होय इतर काळात असे ग्रथ निर्माण झाले असते तर त्यांचीं नांवेही कोणास आठवली नसतीं या चोपड्यांतून मतलबी भावनेने जे जें काही घुसडलें गेले तें सर्व 'बाबा वाक्य प्रमाणम्' या न्यायानें अक्षरशः खरें मानण्याची अर्वाचीन शास्त्रकारांची हट्टी प्रवृत्ति झाल्यामुळे हे अनत जातीचे लोढणे हिंदु लोकाच्या गळ्यात कायमचें लटकलें गेले

> " जयासि जैसें भासले । तैसें त्याने कवित्व केले ॥
> शास्त्रामाजि घुसडूनि दिलें । उदरभराया कारणें ॥

ही उक्ति प्रत्यक्ष रामदासाची असून ती वस्तुस्थितीचा भरपूर बोध करून देणारी आहे. उपरिनिर्दिष्ट जातींचे जे सात प्रकार मेगॅस्थनिस आणि अलेक्झांडर यांच्या कथनावरून चवथ्या शतकात उल्लेखिलेले आहेत त्यातच पुढें नवव्या शतकात जास्त भर पडून ह्या सात प्रकारांचे अनेक प्रकार निर्माण झाले नवीन जाती व पोटजाती निर्माण होण्याचें दुसरें एक कारण असें आहे की, नवव्या व दहाव्या शतकांत बौद्ध धर्मातून लोक भराभर हिंदु धर्मांत येऊ लागले आणि निरनिराळ्या देवतांची उपासना करू लागले स्थलपरत्वें या पौराणिक देवतांत आणि त्यांच्या उपासनेंत साहजिकच फरक

असे त्या पोटभेदांमुळें कुलदेवतांच्या कुलाचाराप्रमाणें मुख्य जातींत पोटभेद निर्माण होऊं लागले याप्रमाणें जातिभेदाची साधारण रूपरेषा असून त्याची कालमर्यादाही वर दिग्दर्शित केलेलीच आहे

**३. जाति कशा झाल्या**—उपरिनिर्दिष्ट कारणांमुळें व परिस्थितीमुळें आर्य लोकांची मूळची व्यवस्था बदलून त्यांच्यांत जेव्हां निरनिराळे भाग पडूं लागले तेव्हां अर्थातच त्या काळीं परस्पर संघटनाचीं व प्रवासाचीं साधनें उपलब्ध नसल्यामुळें पंधरा वीस कोसांच्या अंतरावरील लोकांचें दळणवळण बंद पडून प्रांतपरत्वें, स्थानपरत्वें, आणि देशपरत्वें एकाच जातीचे निरनिराळे संघ, निरनिराळे रीतिरिवाज, पडून ते दळणवळणाच्या अभावीं परस्परांपासून भिन्नत्व पावूं लागले कालांतरानें हेच संघ मोठे होऊन त्यांना जाति हें नाव पडलें. ज्याचा जो धंदा त्याला त्या धंद्याच्या वाचक नांवानेंच ओळखूं लागले व तशाच अर्थाची त्याची जातही मानण्यात येऊं लागली तरी आचारसाधर्म्यानें त्यांच्यात रोटीबेटीव्यवहार बरेच दिवस चालूच होते त्यानंतरच्या दोन तीनशे वर्षांनीं म्हणजे तेराव्या व चवदाव्या शतकात धंद्यावरून पडलेल्या स्वतंत्र जाती रूढीप्रमाणें कायम होऊन त्यांच्यांतील रोटीबेटीव्यवहार हळूहळू बंद होत गेले जातींस कोणतेंही महत्त्व नसून त्यासंबंधी स्वार्थी व भिक्षुक लोकांनी पेशवाईच्या म्हणजे भिक्षुकशाहीच्या चालत्या काळात जातिबंधनाचा गळफास जनतेच्या गळ्याभोंवती जास्त बळकट करून स्वतःचें भिक्षुकी वर्चस्व प्रस्थापित केलें, व आपापसांत या जातिभेदाच्या अगदींच क्षुल्लक कारणासाठी भयंकर लाथाळी माजवून दिली जाती ह्या केवळ धंद्यावरूनच पडलेल्या आहेत असें स्पष्ट निदर्शनास आल्यावर तरी जातिभेदविषयक गैरसमज दूर झाल्याशिवाय राहाणार नाही, म्हणूनच जाती ह्या कशा सहजासहजी निर्माण झाल्या आणि धंद्याशींच केवळ त्यांचा कसा निकट संबंध आहे हे पाहाणें आता क्रमप्राप्त आहे उदाहरणार्थ—यजमानाच्या घरची **भिक्षा** घेऊन निर्वाह करणारे ते **भिक्षुक** ऊर्फ भट्ट भिक्षा हा धंदा आणि त्यावरून भिक्षुक ही जात पडली **रंगाचा** धंदा करणारे ते **रंगारी** रंगाचा धंदा आणि त्यावरून रंगारी ही जात **न्हाऊं** घालणारे ते **न्हावी** न्हाऊ घालण्याचा धंदा आणि त्यावरून न्हावी ही जात **तांबूल** विकणारे, **तांबुलांची** पानें म्हणजे विड्याचीं पानें विकणारे ते **तांबोळी** तांबूलविक्री हा धंदा आणि तांबोळी ही जात **माळाचा** म्हणजे बगीचा अगर वाडीचा धंदा करणारे ते **माळी** माळाचा धंदा आणि त्यावरून माळी ही जात **कुंभाचा** म्हणजे मातीचीं मडकीं वगैरे घडविण्याचा धंदा करणारे ते **कुंभार** कुंभाचा धंदा आणि कुंभार ही जात **चर्मांचा** धंदा करणारे ते **चर्मकार** ऊर्फ चांभार चर्मांचा धंदा आणि म्हणून चर्मकार ही जात **जिन** करणारे ते **जिनगर** जिन करण्याचा धंदा आणि म्हणून जिनगर ही जात **चित्र** काढण्याचा धंदा करणारे ते **चितारी** चित्राचा धंदा आणि म्हणून चितारी जात **तेलाचा** धंदा करणारे ते **तेली** तेलाचा धंदा आणि म्हणून तेली जात **कोष** म्हणजे कपडा विणण्याचा धंदा करणारे ते **कोष्टी.** कोष म्हणजे

कपडे विणणें हा धंदा आणि कोष्टी ही त्यावरून संबोधिली गेलेली जात **पारध** करण्याचा म्हणजे शिकारीचा धंदा करणारे ते **पारधी** पारध म्हणजे शिकार हा धंदा आणि त्यावरून संबोधिली गेलेली पारधी ही जात **लोहाचा** धंदा करणारे ते **लोहार.** लोहाचा धंदा आणि त्यावरून संबोधिली गेलेली लोहार ही जात **सोन्याचा धंदा** करणारे ते **सोनार तांब्याचें** काम करणारे ते **तांबटकर मरेपर्यंत लढाईत मागें न हटणारे** ते रणबहादूर **मरहट्टे** ऊर्फ मराठे आकाशांतून अकालीं पडणाऱ्या **गारांचें** शाबरी मंत्रविद्येच्या सामर्थ्यानें निवारण करणारे व त्याबद्दल सहकारी पद्धतीवर **पगार**-रूपानें योगक्षेमाकरिता मोबदला घेणारे ते **गार पगारी** (नाथपंथ) गारा हटविण्याचा धंदा करून पगार घेणारे यावरून संबोधिली जाणारी गारपगारी ही जात. **वाणांचा** म्हणजे निरनिराळ्या वस्तूंचा धंदा करणारे ते **वाणी** याप्रमाणे केवळ धंद्यावरून जातींस नांवें प्राप्त झालेलीं आहेत जाती ह्या कांही विशिष्ट धर्मप्रभावदर्शक नाहींत, जन्मजात-महत्त्व वास्तवदृष्ट्या जातीस नाहीं व्यवहारांत जातींवरून उच्चनीच भेदभाव मानण्याची गरज नाही आणि जातिमत्सराच्या भावनेनें परस्पराच्या उरावर नाचण्याचेंही कांहीं कारण नाहीं थोडक्यात सांगावयाचें म्हणजे जाती ह्या धंद्याच्या वाचक संज्ञा आहेत आणि जन्मावरून जातिव्यवस्था पुढे अमलांत आल्यानें तीच व्यवस्था रूढ झाली या पलीकडे जातिभेदास बिलकुल किंमत नाहीं सामाजिक व धार्मिक दृष्ट्या विचार केला तरी जातिभेदाचे हे भूत समाजघटनेस विघातक असेंच झाल्याबद्दलचा इतिहास आपणांस उघड्या डोळ्यांनीं साक्ष देतो

याप्रमाणे धंद्यावरून जातींची नावे पडल्यावर पुन्हा त्यांचेच निरनिराळे पोटभेद उत्पन्न झाले आणि अशा तऱ्हेने जातिभेदाचें हें भूत धार्मिक स्वरूपाचे एक मजबूत बाडगूळच होऊन बसले

**४. पोकळ जातिबंधनें आणि अमानुष जुलूम**—जातिभेदाची उपरिनिर्दिष्ट कारणपरंपरा सहजासहजी झाली असूनही केवळ या जातिभेदामुळे निर-निराळ्या जातींचा कसा अमानुष छळ होत गेला, याचें ऐतिहासिक भयंकर चित्र अंगावर शहारे उत्पन्न करून धिक्काराच्या लाटा सहृदय माणसांत उत्पन्न करितें

इ० सन ६६४ मध्यें महलब नामक मुसलमान सरदार मुलतानपर्यंत येऊन गेला पुढे इ० सन ७११ मध्यें महमद कासीम नावाच्या सरदाराने सिंध प्रांतावर स्वारी केली इ० सनाच्या १० वे शतकापूर्वी सिंधू नदीच्या अलीकडे मुसलमानाचे पाय टेकले नव्हते. दहाव्या शतकापासून परधर्मीयांच्या स्वाऱ्या हिंदुस्तानावर होऊं लागल्या होत्या आणि त्यामुळे सर्वांना समानतेने वागविणारा व सर्व बंधूंच्या हिताकरितां, सर्वांच्या संरक्षणा-करितां आपले प्राण तळहातावर घेणारा क्षत्रिय वर्ण परचक्रनिवारणकार्यांत गुंतला होता या वेळी अनायासेच त्यांनी धर्मसूत्रें विश्वास जाणून भट्टाच्या हातीं दिली त्यांनीं धर्मसूत्रें आपल्या हातांत येतांच कहरच कहर करून सोडला व आपल्या काळ्याकुट्ट अंतःकरणाची साक्ष साऱ्या समाजाला पटवून दिली त्यांनी क्षत्रियांचीच वृथा नालस्ती

करण्याचें सत्र उघडले. आपलें वर्चस्व, लंगड्या भावना शास्त्रांत घुसडून देऊन प्रस्थापित केलें आणि त्याचा पुरेपूर वचपा पेशवाईचे काळांत काढला गेला केवळ जातिभेदाच्या आणि जातिवर्चस्वाच्या लटक्या भावनांस बळी पडून ब्राह्मणांनीं असे जुलूम इतर जातींच्या लोकांवर केले की, त्यांचे वर्णनही करवत नाही पेशवाईचे काळात ब्राह्मणांनीं ब्राह्मणेतरांचीं यज्ञोपवीते काढून घेतलीं जानवें घालणाऱ्या क्षत्रियवैश्यादि लोकांच्या अंगावर लोखंडी सळई लाल लाल तापवून तिचे चरचरा चरके या ब्राह्मणांनीं जानव्या-बद्दल ओढले ब्राह्मणेतराने वेदवाक्य श्रवण केल्यास शिसे गरम तापवून तो कढत शिलारस त्याच्या कानात ओतण्यांत येऊं लागला वेदवाक्याचें उच्चारण मुखावाटे ब्राह्मणेतरांनी केल्यास तसें करणाराच्या जिभा कटाकट कापून टाकल्या ब्राह्मणाच्या अंगावर ब्राह्मणेतराची सावली सहजासहजी पडल्यास त्या बिचाऱ्या ब्राह्मणेतराच्या अंगावर कडकडा तेल तापवून तें ओतले जाई अस्पृश्य म्हणून जो समाज मानला गेला होता त्यानें सरळ व धोपट मार्गानें गेल्यास तो रस्ता विटाळतो म्हणून त्यांनीं गल्ल्या कुचल्यांतून जावें, रस्त्यानें जाऊं नये असा हुकूम दिला गेला हमरस्त्यानें अस्पृश्य कदाचित् गेलाच तरी त्याने आपल्या कमरेस एक झाडू बांधून चलावे तें अशाकरितां कीं, ब्राह्मणेतराच्या पायानी विटाळलेला रस्ता ब्राह्मणांस ओलांडतां येत नाहीं, त्यांना विटाळ होतो, त्याचे सोवळें विटाळते म्हणून! रस्त्याने थुकण्यास अस्पृश्यांना सक्त मनाई केली ज्याला थुकण्याचे प्रसगच येत असतील त्यानें आपल्या गळ्यास अगोदरच एक मडकें बांधून रस्त्याने चालावे म्हणजे त्याला त्यातच थुकतां येण्याची त्यानें व्यवस्था करावी! याप्रमाणे इतके अमानुष छळ ब्राह्मणेतराचे करण्यांत आले कीं, त्यांना अमानुष ही सज्ञाही योग्य होत नाहीं! आणि ते काय म्हणून तर केवळ पोकळ जातिबधनामुळे, ते हलके ब्राह्मणेतर आणि पेशवे श्रेष्ठ ब्राह्मण या नीचपणाच्या दुष्ट भावनेमुळें हे अनन्वित जुलूम लक्षात घेतां त्याची शक्या शक्यता एवढी तीव्र प्रमाणांत भासू लागते कीं, हा ब्राह्मणाचा द्वेष तर नसेलना? अशीही कल्पना कित्येकांच्या मनात उद्भवल्यावाचून राहत नाहीं कारण मनुष्याकडून असा सैतानीपणा कधींही होत नसतो याची जाणीव प्रत्येकास आहे परतु हा सैतानीपणा—पाहिजे तर याला राक्षसीपणा म्हणा—ब्राह्मणांनीं केला एवढें मात्र खास या आमच्या म्हणण्याची सत्यता पटवून देण्याकरितां व नि.पक्षपातीपणाचा निवाडा देण्याकरितां खालील वचनें देत आहोंत

" धर्मोपदेशं* दर्पेण विप्राणामस्य कुर्वतः।
तप्तमासेचयेत्तैलं वक्त्रे श्रोत्रे च पार्थिवः॥

भावार्थः—जर ब्राह्मणेतरानें ब्राह्मणास अभिमानानें उपदेश केला तर तापलेलें तेल त्याच्या तोंडांत—कानांत ओतावें.

" चण्डालश्वपचानां¶ तु बहिर्ग्रामात्प्रतिश्रयः।
अपपात्राश्च कर्तव्या धनमेषां श्वगर्दभम्॥

---

* मनुस्मृति, अ० ८. ¶ मनुस्मृति, अ० १०.

**वासांसि मृत चेलानि भिन्नभाण्डेषु भोजनम् ।**
**कार्ष्णाय समलंकारः परिव्रज्या च नित्यशः ॥**
**न तैः समयमन्विच्छेत्पुरुषो धर्ममाचरन् ।**
**व्यवहारो मिथस्तेषां विवाहः सदृशैःसह ॥ "**

भावार्थ.--चांडाल श्वपचादिकांनीं नीच म्हणून गांवाबाहेर आपलें वसतिस्थान करावें आणि कुत्रीं व गाढवें यांचा संग्रह धन म्हणून करावा दुसऱ्या प्रकारें कोणताही धनसंग्रह करण्यास ते अपात्र आहेत प्रेतांचीं वस्त्रें त्यांनीं परिधान करावींत तांब्या-पितळेच्या भांड्यांत त्यांनीं भोजन करू नये निराळ्या भांड्यांत करावें दागिने घालाव-याचेच असले तर ते लोखंडाचे करून घालावेत आणि भटकत फिरावें इतर धार्मिक आचरण करण्यास ह्यांना वाव नसून त्याचे विवाहादि व्यवहारही तशाच लोकांशीं व्हावे.

**" पाणि‡ मुद्यम्य दंडं वा पाणिच्छेदनमर्हति ।**
**पादेन प्रहरन्कोपात्पादच्छेदनमर्हति ॥**
**सहासनमभिप्रेप्सुरुत्कृष्टस्यापकृष्टजः ।**
**कट्या कृतांको निर्वास्यः स्फिच वास्यावकर्तयेत् ॥**
**" अवनीष्ठीवतो दर्पाद्द्वावोष्ठौ छेदयेन्नृपाः ।**
**अवमूत्रयतो मेढ्रमवशर्धयतो गुदम् ॥**
**केशेषु गृण्हतो हस्तौ छेदयेदविचारयन् ।**
**पादयोर्दाढिकायां च ग्रीवायां वृषणेषुच ॥ "**

भावार्थ—ब्राह्मणेतरानें जर ब्राह्मणावर हात टाकला तर त्याचा हात खुशाल तोडून टाकावा पाय ब्राह्मणास लागल्यास पाय तोडून टाकावा ब्राह्मणाशेजारीं जर ब्राह्मणेतर बसेल तर त्याच्या कमरेस डाग द्यावेत ब्राह्मणासमोर जर ब्राह्मणेतर लघवी करील तर त्याचें लिंग कापावें अपानवायु जर ब्राह्मणासमोर ब्राह्मणेतराचा सरेल तर त्याच्या गुद-द्वाराचें छेदन करावे. ब्राह्मणाचे केश जर ब्राह्मणेतर धरील तर त्याचे हस्तच्छेदन करावें याचप्रमाणे निरनिराळ्या अवयवासंबधी कोणताही विचार न करितां अघोर शिक्षा द्यावी.

**" मौण्ड्यं* प्राणान्तिको दण्डो ब्राह्मणस्य विधीयते**
**इतरेषां तु वर्णानां दण्डः प्राणान्तिको भवेत् "**

भावार्थ—ब्राह्मणानें व्यभिचार केला असतां त्यास मुंडणाची शिक्षा द्यावी आणि तोच गुन्हा ब्राह्मणेतरानें केल्यास त्याला देहान्तशासन द्यावें

---

‡ मनुस्मृति, अ० ८

* मनुस्मृति, अ० ८

" शूद्रो गुप्तमगुप्तं वा द्विजातं वर्णमावसन् ।
अगुप्तमंग सर्वस्वैर्गुप्तं सर्वेण हीयते ॥
अगुप्ते क्षत्रियावैश्ये शूद्रां वा ब्राह्मणोव्रजन् ।
शतानि पंचादण्डयः स्यात्सहस्रंत्वन्त्यजस्त्रियम् ॥ "

भावार्थ—ब्राह्मणेतरानें ब्राह्मणाच्या बायकोशीं व्यभिचारकर्म केलें असतां त्याचें लिंग कापून घेत. द्रव्यसर्वस्व हरण करीत अगर प्राणही घेत. तोच गुन्हा जर ब्राह्मणानें केला तर त्याला फक्त हजार रुपये दंड ही शिक्षा देत.

" अमृतं ब्राह्मणस्यान्नं क्षत्रियान्नं पयं स्मृतं ।
वैश्यस्य चान्नमेवान्नं शूद्रान्नं रुधिरं स्मृतम् ॥ "

भावार्थ.—ब्राह्मणाचें अन्न अमृत, क्षत्रियांचें दुग्ध, वैश्यांचें मेवान्न, आणि शूद्रांचें अन्न रक्तवत् होय

" दुःशिलोऽपितु§ द्विजः पूज्यो न शूद्रो जितेंद्रियः । "

भावार्थ·—ब्राह्मण अगदीं वाईट आचरण करीत असला तरी तो पूज्य, शूद्र जितेंद्रिय असला तरी तो पूज्य नाहीं

याप्रमाणे अनेक आपमतलबी वचनें ब्राह्मणांनीं आपल्या हातांत धर्मभांडाराच्या किल्ल्या येतांच घुसडून दिलीं आणि त्यांच्या नांवावर यथेच्छ ऐशआराम उपभोगण्यास सुरवात केली स्मृतिग्रथात ही घुसडाघुसड पेशवाई कालांत झाली असावी कारण मूळचे स्मृतिकार असे **पक्षपाती व दुष्ट नव्हते** याची साक्ष त्याच्या इतर उदात्त तत्त्वांवरून पटते उपरिनिर्दिष्ट सैतानी न्यायाचा जुलूम जो ब्राह्मणेतरावर चालू झाला, तो केवळ जातिबंधनाच्या पोकळ व्यवस्थेवरून ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे जातिभेद पाळण्यात ब्राह्मणांची स्वार्थी भावना व ब्राह्मणेतराविषयीं द्वेष हीं त्याच्या मनांत कशी उद्‌भूत झालीं होतीं हें स्पष्ट कळून येतें या जातिभेदामुळेंच ब्राह्मणेतरांचा असा यथेच्छ छळ करण्यास त्या ब्राह्मणब्रुवाना फावले हा जातिभेदांतील एक सैतानी विशेष होय याप्रमाणें हे जातिभेदाचे रहस्य आहे



¶ मनुस्मृति, अ० ८
† लघु अत्रिस्मृति, अ० ५
§ पराशरस्मृति, अ० ८

# प्रकरण अठरावें

## क्षत्रियांचे धार्मिक व सामाजिक अधिकार

१ साताराच्या छत्रपतीस पेशव्यांनीं कैद केलें.
२ इ० सन १८३२ सालची जाहीर सभा.
३ या सभेंत मान्य झालेले मुख्य ठराव.
४ उदेपूरच्या राणाजीचें मान्यतापत्र.
५ इ० सन १८३५ सालची धार्मिक सभा.
६ या सभेंत मंजूर झालेले ठराव.
७ इ० सन १९०५ सालची धार्मिक चळवळ.
८ इ० सन १९०६ चें राणाजीचें दुसरें पत्र
९ श्रीशिवाजी क्षत्रिय वैदिक विद्यालय.
१० श्रीशाहू क्षत्रिय वैदिक विद्यालय
११ क्षात्र जगद्‌गुरूची नवीन योजना
१२ छत्रपतींचा राज्याभिषेक आणि विवाह.

पहिले शाहू छत्रपति आसन्नमरण आजारी असतांना रावबाजी पेशव्यांनीं अत्यंत निमकहरामीची एक फारच मोठी दगाबाजी केली "यापुढें मराठेशाहीचा कारभार पेशव्यांनीं स्वतंत्रपणे करावा" अशी सनद लिहून शाहूमहाराजाच्या आसन्नमरणसमयीं इतर कागदपत्रावर त्याच्या सह्या घेताना हा सनदेचा कागद त्यात घुसडून देऊन त्यावरही महाराजांची सही न कळत घेतली आणि पुढें या सैतानी कारस्थानाच्या बिंदूचा सिंधू करून नवीन नाटक सुरू केले

पहिले शाहू छत्रपतिमहाराजाचे जेष्ठ पुत्र छत्रपति श्रीमंत प्रतापसिंहमहाराज हे इ० सन १८०८ सालीं साताऱ्याच्या गादीवर बसले ही वेळ रावबाजीच्या अगदीं भरभराटीची असून नाना फडणिसाची जागा त्रिंबकजी डेंगळे यांनी पटकाविली होती या पेशव्याच्या कारकीर्दीत साताऱ्याच्या राजघराण्याची इतकी दुर्दशा झाली की, ती ऐकून ज्याच्या डोळ्यांस पाणी येणार नाही असा पुरुष विरळाच! वासोटा किल्यांत साताऱ्चे प्रतापसिंह महाराज यांस त्यांच्या सर्व मुलाबायकांसह पेशव्यानें कैदेत ठेविले होतें वासोट्याच्या किल्लेदारास बाजीराव पेशव्याचा असा हुकूम होता कीं, 'वाटू धामधुमींत किल्ला इंग्रजांचे हातीं जाण्याची वेळ आल्यास प्रतापसिंह महाराज व राजघराण्यांतील इतर माणसे यास

ठार मारावें, पण इंग्रजाच्या हातीं लागू देऊ नये' (ग्रँडडफचा इतिहास, बुक ३, पृष्ठ ३४४ पाहा) पण इंग्रजांनीं किल्ला घेतला, व प्रतापसिंह महाराजांस पुनः गादीवर बसविलें इ० सन १८३० सालीं त्यांना राज्याची पूर्ण मुखत्यारी मिळाली त्यानंतर लवकरच महाराजांनीं एक जाहिरनामा प्रसिद्ध केला त्यांत पेशव्यांनीं त्यांना कैदेंत टाकून त्यांचे व त्यांच्या बायकामुलांचे कसे कसायासारखे हाल हाल केले याचें अंगावर कांटे येण्यासारखें वर्णन प्रसिद्ध झाले होतें असो अधिकारसूत्रें हातीं आल्यावर प्रतापसिंह महाराजांनीं क्षत्रियाच्या अस्तित्वाबद्दल व त्यांच्या धार्मिक हक्काबद्दल ७–८वर्षें अत्यंत परिश्रम करून सर्व वादग्रस्त मुद्याचा निकाल पंडितांकडून लावून घेऊन त्यांत मराठा जातीचें व कायस्थ प्रभु जातीचें क्षत्रियत्व सर्वमान्य करून घेतले ही गोष्ट इ० सन १८३२ सालीं झाली वे० शा० सपन्न विठ्ठल सखाराम ऊर्फ आबासाहेब पारसनीस चां का प्रभु या विद्वान् गृहस्थास क्षत्रियांतर्फे मुखत्यारपत्र दिलें होते ब्राह्मणातर्फे वे० शा० सपन्न राघवाचार्य गजेंद्रगडकर या अत्यंत विद्वान् पंडितास मुखत्यारपत्र दिले होते. याशिवाय प्रत्येक पक्षास दहादहा दुसरे विद्वान् पंच नेमले होते सातारच्या राजवाड्यात कित्येक दिवसपर्यंत लेखी व तोंडी वाद चालू होता ज्या दिवशीं पंचाचा ठराव व्हावयाचा होता त्या दिवशीं सर्व महाराष्ट्रातील हजारो विद्वान् ब्राह्मण मंडळी जमली होती निकालाच्या वेळी कदाचित् क्षत्रिय पक्षाभिमानी पंडितांचा अपमान होईल तो होऊ नये म्हणून महाराज स्वतः नागव्या तलवारीने राजवाड्यापुढे बंदोबस्त करीत होते महाराजाच्या या आत्मोन्नतीच्या कृत्याबद्दल पुण्याच्या भिक्षुकशाहीनें त्यांचा सैतानी द्वेष सुरू करून मराठेशाही बुडविण्याचीं उलटया काळजाची पाताळयंत्री कारस्थानें रचली आणि सत्ताधारी इंग्रजाच्या आश्रयानें सातारची मराठेशाही बुडविली मराठेशाहीचा खून या प्रकरणात ही साग्र हकीकत दिली आहे ती वाचली म्हणजे भिक्षुकशाहीबद्दल अंगावर शहारे येतात! अखेरीस पंडितांच्या सभेत वाद होऊन खालीं दिलेले सिद्धांत दोन्ही पक्षाच्या सर्व पंचास मान्य झाले —

## मान्य§ झालेले सिद्धान्त

[१] परशुरामाने २१ वेळ नि:क्षत्रिय पृथ्वी केल्याबद्दलची कथा साफ खोटी आहे.

[२] आचाराप्रमाणें कलींत जाती ठरत नाहीत

[३] मांस भक्षण करणे हा क्षत्रियाचा धर्मच आहे त्यामुळे त्यांस वैदिक कर्म करण्यास कांहींच हरकत येत नाही

[४] सोवळे–ओवळे पाळणे हा क्षात्रधर्म नव्हे, कारण संकटाशीं सामना देण्याकरिता क्षत्रियांनीं सदा सशस्त्र आणि पोषाखाने सज्ज राहाणे हाच त्यांचा खरा धर्म आहे

[५] क्षत्रियांनी शूद्रान्न भक्षण केले तरी त्यांच्या वैदिक कर्मांस बाध येत नाही

[६] ज्या क्षत्रियांच्या घरीं कांहीं कर्मांचा लोप झाला असेल त्यांच्या वैदिक कर्मांच्या अधिकारास त्यामुळे मुळींच बाध येत नाहीं

§ प्रो० महादेव गणेश डोंगरे, बी एस्सी, एल् सी. ई, शास्त्रविषयाचे अध्यापक, राजाराम कॉलेज–कोल्हापूर यांचा 'सिद्धान्तविजय' ग्रंथ उपोद्घात, पृष्ठ ११।१२

[७] कोणत्याही क्षत्रियास वेदोक्त श्रावणीचा व दुसरे वैदिक कर्मांचा अधिकार आहे.

[८] कलींत आतां क्षत्रिय नाहींत असें म्हणणारे लोक अधर्मी यवन समजावे.

[९] सातारा, चंद्री, तंजावर, कानपूर, करवीर येथील राजघराण्याचें मूळ एकच असून तेथें ऋग्वेदावरून कर्म चालतें

[१०] नर्मदे पलीकडे क्षत्रियांकडे यजुर्वेदावरून कर्म चालतें उदेपुरास अशीच वहिवाट आहे सातान्यास यजुर्वेदीय कर्म महाराजांनीं सुरू करावें

[११] क्षत्रियास मातुलकन्या विवाहवर्ज नाहीं (मामाची मुलगी करावी)

[१२] क्षत्रियांत एकपात्री भोजन करण्याची चाल आहे ती वैदिक धर्मास धरूनच आहे

[१३] क्षत्रियांची शहाण्णव कुळी योग्य आहे पण पचकुळी व सप्तकुळी हे भेद द्वेष्टया लोकांनीं आपसांत फूट पाडण्याकरिता निर्माण केले आहेत

[१४] दक्षिणेंतील महाराष्ट्र क्षत्रियाचीं उपनावें, त्यांची माहिती आणि भोसले, शिर्के, महाडिक, मोहिते, गुजर, अहिरराव, पालकर, खानविलकर, माने, घाटगे, जाधव इत्यादि क्षत्रियाच्या ९६ कुळांचीं गोत्रें व प्रवर यांचा निर्णय आणि उत्तर हिंदुस्तानातील नांवें व दक्षिणी नावें पडण्याची कारणें याचा निर्णय लावण्यात आला

[१५] क्षत्रियाची व शूद्राची उपनांवें सारखीं असलीं तरी ओळख पटण्याचीं साधनें व मार्ग अनेक आहेत ब्राह्मणांचीं व शूद्राचींही उपनावें एक आहेत, पण ओळख पटण्याचे त्यांच्यांतही स्वतत्र मार्ग आहेत

[१६] वैदिक धर्मतत्त्वाविरुद्ध चालू असलेल्या रूढी मान्य नाहींत. सबब रूढि मोडल्यामुळें क्षात्रधर्मास बाध येत नाही

[१७] उत्तर हिंदुस्तानांत क्षत्रियात काही श्रीमान् लोक मुलाची मौंज बालपणीं करतात पण बहुतेक लोक लग्नाचे वेळीं जानवे धारण करण्याचा विधि करून जानवें धारण करतात. व कोणी मुळींच करीत नाहीत, पण त्यामुळें क्षत्रियत्वास बाध येत नाही, किंवा त्याच्या जातींत उच्चनीचपणाचा फरक मुळींच मानला जात नाही. हाच नियम दक्षिणेंतही लागू आहे

[१८] उत्तर हिंदुस्तानच्या ब्राह्मणांत देखील मौंजीसबधानें वरीलप्रमाणेच हल्ली वहिवाट सुरू आहे

[१९] मराठा, रजपूत, प्रभु, इत्यादि जातींचे लोक व त्यांच्याशी रोटीबेटी-व्यवहार परंपरेनें चालू असलेले लोक, हे आर्य क्षत्रियांचेच वशज आहेत

[२०] धर्मसस्थापक, धर्मसरक्षक, व धर्मसवर्धक, हे सर्व अधिकार क्षत्रियांचें आहेत हे धार्मिक अधिकार ब्राह्मणांचे मुळींच नाहींत याशिवाय आणखी कांहीं किरकोळ बाबींसबधाने उभय पक्षांच्या एकमतानें ठराव मंजूर झाले.

याप्रमाणें क्षत्रिय व ब्राह्मण या दोहोंच्या शेंकडों पंडितांच्या मान्यतेनें वरील ठराव मजूर झाल्यानंतर श्रीमंत प्रतापसिंह महाराजांनीं महाराष्ट्रांतील सर्व पंडितांचीं,

शंकराचार्यांची व थोर पुरुषांची मान्यतापत्रें आणविलीं व शेवटी या पंडितमान्य सभेची हकीकत लिहून व त्यावर उभय पक्षांच्या सर्व शास्त्री–पंडितांच्या सह्या घेऊन ते सर्व कागदपत्र आणि सातारच्या घराण्याची वंशावळ बरोबर देऊन शिवानंद शास्त्री व ठाकूरदास यांस तत्कालीन इंग्रज सरकारचे रेसिडेंट साहेब यांचे मार्फत उदेपूरच्या राणाजींस माहिती देण्याकरितां व तिकडील सर्व माहिती आणण्याकरितां उदेपूरास पाठविले होते. तेथे उदेपूरच्या महाराणाजींची व त्या दरबारच्या पंडितांची या गोष्टीस मान्यता मिळाली. सातारच्या राजवंशाची वंशावळ राणाजींच्या वंशावळींत दाखल करविली गेली, इतकेच नाहींतर त्याचा दाखला सातान्यासही राहावा म्हणून सदरहू वंशावळीची नक्कल* राणाजींचे आज्ञेवरून घेऊन तीवर कंपनी सरकारचा शिक्काही घेतला.

त्या वेळी उदेपूरच्या महाराणाजींनीं सातारच्या प्रतापसिंह महाराजांस पत्र लिहून पाठविलें त्या पत्रांत ते म्हणतात:—

"आम्हीं† व आपण एकाच वंशांतील असून व्यवहारांत कांहीं एक भेद नाहीं. परंपरेनें एकच आहों. यास्तव आम्ही आपलें शुभचिंतन करीत असतों. इतके वैदिक कर्माधिकारी क्षत्रिय पुष्कळ असून फक्त दक्षिणी ब्राह्मण मात्र क्षत्रियांचा अभाव आहे म्हणतात, यावरून त्यांचे ठिकाणीं मत्सरबुद्धि वास करीत आहे असें म्हटले पाहिजे"

याप्रमाणें उदेपुरास ग्रंथ आणि वंशावळ मान्य होऊन राणाजींचें वर लिहिल्याप्रमाणे पत्र आल्यावर महाराजांनीं इ० सन १८३२ सालीं महाराष्ट्रांतील सूर्यवंशी व चंद्रवंशी मराठा क्षत्रियांची मोठी जंगी जाहीर सभा सातान्यास भरविली आणि क्षत्रियांचे धार्मिक हक्क कोणते व कसे हें खुलासेवार रीतीनें त्या सभेंत जाहीर केलें.

याप्रमाणें शास्त्रग्रंथांचे आधारें सातारा येथील पंडितमान्य राजसभेंत मंजूर झालेले ठराव दक्षिणेंत सर्व ठिकाणीं मान्य झाल्यानंतर इ० सन १८३५ सालीं क्षत्रिय मराठा मंडळींची सभा होऊन सर्वानुमतें असें ठरले कीं:—

"दक्षिणी‡ ब्राह्मण, क्षत्रिय मराठ्यांचे घरीं वेदोक्त कर्में करण्यास कधीं कधीं नाकारतात, तर त्यांची गरज मुळीच ठेवू नये. उत्तर हिंदुस्तानातून आपल्या खात्रीचे ब्राह्मण आणून त्यांचेकडून धर्मकर्म चालू करावे, किंवा क्षत्रियांस पूर्ण वेदाधिकार असल्यामुळे स्वतःचीं धर्मकार्यें स्वतः क्षत्रियानींच करावीं, अगर इतर क्षत्रियांकडून करून घ्यावीत. दक्षिणी ब्राह्मणास मुळींच बोलावू नये. तसेंच उदेपूरवाले व आपण एकच असल्यामुळें त्यांचा आपला रोटीव्यवहार, बेटीव्यवहार सुरू करावा. परंतु हा व्यवहार तुटल्यास बरींच वर्षे झाल्यामुळें राणाजी व त्यांचे आप्तस्वकीय जर आपणाशी एकपात्र करतील तरच वरीलप्रमाणें रोटीबेटीव्यवहार करावा. पण एकपात्र जर करीत नसतील तर शरीरसंबंध करू नये" ही प्रतापसिंह महाराजांची कामगिरी झाली.

---

* 'सिद्धान्तविजय', परिशिष्ट ४, पान ७९ व परिशिष्ट ९, पान १३१ पाहा.

† 'सिद्धान्तविजय', परिशिष्ट ४, पान ७७ पाहा.

‡ 'सिद्धान्तविजय', उपोद्घात पृष्ठ १४.

इतकें झालें तरी कोल्हापूरचे छत्रपति श्रीमंत शाहू महाराज (दुसरे) यांचे कार-कीर्दीत पुणेरी भिक्षुकशाहीनें पुन्हा कट करून राजोपाध्याय यांनीं राजवाड्यांत वेदोक्तकर्म करण्याचें नाकारलें. तेव्हां शाहू महाराजांनीं राजोपाध्यायास कामावरून [illegible] त्यांची राजोपाध्यायपणाची जहागीर जप्त केली. ही गोष्ट इ० सन १९०५ सालीं झाली. इतकें झाल्यावर करवीरपीठस्थ शंकराचार्यांनीं श्रीमंत शाहू महाराजांचें व त्यांच्या आप्त-स्वकीयांचें क्षत्रियत्व मान्य करून तसें जाहीर केलें. पण राजोपाध्यायाची पुरी खोड मोडण्याकरितां महाराजांनीं जहागीर जातींतच कायम ठेवली. ती पुन्हा सोडलीच नाहीं. या वेळीं श्री० छत्रपति शाहू महाराजांनीं क्षत्रियत्वासंबंधानें उदेपूरच्या राणाजीशीं पत्र-व्यवहार केला त्यावर उदेपूरच्या राणाजीचें हिंदींत उत्तर आले तें 'सिद्धान्तविजय' परिशिष्ट ११, पृष्ठ १५२, पत्र नं ५ यांत छापलें आहे. तें असें—

"राजपुतानाके क्षत्रियोंका आचार विचार नीचे लिखे अनुसार है:—राजपुतानाके क्षत्रिय लोकोमेसे कोई कोई श्रीमत लोक समयपर यज्ञोपवित [उपनयन] संस्कार करते है, कोई कोई विवाहमे करते है, और कोई कोई गरीब आदि करतेभी नही है, लेकिन उससे जाती संबधमें फर्क नहीं आता ये लोक ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, और सत्शुद्र अर्थात् भोई आदीके हातका जल तथा भोजन करेलेते है, और मासका सेवन करते है, और इनके सब संस्कार वेदोक्त होते है, और स्त्रियाकोभी वेदोक्त संस्कार होता है. संवत् १९६२ कार्तिक सुदि २" [ता २०।१०।१९०६] गौरीशकर हीराचंद ओझा.

सातारा येथें छत्रपति प्रतापसिंह महाराजांचे वेळीं इ० सन १८३२ सालीं भरलेल्या पडितांच्या सर्वमान्य सभेंत जे ठराव उभय पक्षांस मान्य झाले, त्यांतील ठराव नंबर १७ (मौंजीसंबंधींचा) आणि श्रीमत छत्रपति शाहू महाराजांच्या वेळीं इ० सन १९०६ साली उदेपूरच्या राणाजींनीं पाठविलेले वरील हिंदी पत्र, या दोहोंचा मेळ आणि दक्षिण व उत्तरच्या क्षत्रियांच्या मौंजो वगैरेसबधी रीतीभातींचा मेळ बरोबर पडतो ही गोष्ट विशेष ध्यानांत ठेवण्यासारखी आहे

यानतर शाहू छत्रपति महाराजांनीं उपाध्यायाच्या कामाकरितां पगारी नोकर नेमले पगारी नोकरांची वहिवाट काहीं वर्षे चालू ठेवल्यानंतर मराठा क्षत्रिय जातींच्या नवीन होतकरू विद्यार्थ्यांना वैदिक कर्म शिकविण्याकरितां महाराजानीं कोल्हापुरास इ० सन १९२० सालीं—

## श्रीशिवाजी क्षत्रिय वैदिक विद्यालय

या नांवाची नवीन संस्कृत पाठशाळा चालू करून त्यांत वैदिक मत्रतंत्रांचें मोफत शिक्षण सुरू केले त्यांतून शेंकडों मराठा पुरोहित तयार होऊन बाहेर पडू लागले. हल्लीं बहुतेक जातीचे ब्राह्मणेतर लोक ब्राह्मणांकडून आपलीं धर्मकार्यें करून न घेतां तीं स्वतःच करितात किंवा ब्राह्मणेतर पुरोहितांकडून करवून घेत आहेत

क्षत्रियादि ब्राह्मणेतरांवर ब्राह्मणांचें धार्मिक वर्चस्व मुळींच राहूं नये, तें साफ उडवून द्यावें या हेतूनें कोल्हापूर संस्थानांत पाटगांव येथें 'क्षात्र जगद्गुरू'ची गादी शाहू

महाराजांनीं इ० सन १९२१ सालीं स्थापन करून श्री० सदाशिवराव लक्ष्मणराव बेनोडी-कर बी ए यांस पहिले जगद्गुरूचे जागीं नेमलें आहे ते विद्वान् असून मराठा जातीचे होतकरू व बुद्धिमान् तरुण आहेत

कोल्हापूरचे कै० शाहू छत्रपतींचे गादीवर बसलेले त्यांचे ज्येष्ठ पुत्र श्रीमत राजाराम महाराज छत्रपति यांनीं आपले वडिलांचे नावानें इ० सन १९२३ सालीं

## श्रीशाहू क्षत्रिय वैदिक विद्यालय

या नावाची दुसरी वेदशाळा स्थापन केली आहे त्या शाळेंत महाराष्ट्रांतील सर्व भागांतील ब्राह्मणेतर जातीच्या विद्यार्थ्यांना पुरोहिताच्या वैदिक मन्त्रतन्त्रांचें शिक्षण फुकट दिलें जातें जेवण, कपडा, पुस्तकें, दिवाबत्ती वगैरे सर्व फुकट देतात वरील दोन्ही वैदिक शाळांमध्ये हल्लीं शेंकडों ब्राह्मणेतर विद्यार्थी वैदिक शिक्षणाचा लाभ घेत आहेत श्रीमत पुण्यस्मरणीय राजर्षि शाहूमहाराज कैलास-वासी झाल्यावर त्यांचे ज्येष्ठ पुत्र हल्लींचे श्रीमत राजाराममहाराज यांस इ० सन १९२७ सालीं राज्याभिषेक झाला हा राज्याभिषेक ब्राह्मणाच्या हस्तें करविला नसून वैदिक शाळेतील क्षत्रिय मराठा जातीच्या विद्यार्थ्यांकडून वेदोक्त पद्धतीनें करविण्यांत आला त्यांत क्षात्र जगद्गुरु अग्रस्थानीं होते त्याचप्रमाणे छत्रपति श्रीमत राजाराममहाराज यांचा द्वितीय विवाह तंजावरचे सुप्रसिद्ध ऐतिहासिक राजघराण्यातील श्रीमत आत्मारामराव मोहिते याच्या कन्या श्रीमती राजसबाई यांचेशी कोल्हापूर येथे ता १० माहे जून, सन १९२५ रोजीं गोरज मुहूर्तावर झाला, याही मगलप्रसगीं सर्व विधि क्षात्रधर्मानुसार यथोचित व्हावेत म्हणून श्रीमत् क्षात्र जगद्गुरु स्वत तेथे हजर असत त्याच्या देख-रेखीखालीं वरील वैदिक शाळेतील विद्यार्थ्यांनीं छत्रपति श्रीमत राजाराममहाराजाचा लग्न-समारभ वैदिक पद्धतीनें यथासांग पूर्ण केला

जे हाडाचे खरे क्षत्रिय असतील, ज्याच्या अगात खऱ्या क्षत्रियाचें रक्त खेळत असेल त्यांनीं क्षत्रियाचे वर दर्शविलेले धार्मिक व सामाजिक अधिकार बरोबर बजावण्यास मुळींच डगमगूं नये जो कचरेल तो खरा क्षात्रियच नव्हे, हीच त्याची साक्ष आहे



# प्रकरण एकोणिसावें

# क्षत्रिय घराण्यांतील शरीरसंबंध



## १. पौराणिक काळचे शरीरसंबंध

[१] अयोध्येचा इक्ष्वाकु वंशी राजा इक्ष्वाकु (सूर्यवंशी) याची बहीण ईला नांवाची होती ती चंद्रवंशचालक बुध राजा याचा पणतु पुरू यास दिली होती तिच्या ४९ वे पिढींत परमारवंशी पांडवांचा पूर्वज धृतराष्ट्र झाला

[२] मौर्य घराण्याचा संस्थापक चक्रवर्ती महान् पराक्रमी राजा चंद्रगुप्त मौर्य यानें ग्रीसचा राजा सेल्युकस (शिकंदर बादशहाचे मागून गादीवर बसलेला) याचे मुलीशीं लग्न केलें होतें. कारण ग्रीस देशचें राजघराणें मूळचें आर्यवंशी आहे, ही जाणीव त्या वेळीं जिवत होती. (इ० सनापूर्वी ३२०).

# २. विदर्भांतील प्राचीन शरीरसंबंध

[३] अगस्ती* ऋषीची पत्नी लोपामुद्रा ही विदर्भ म्हणजे वऱ्हाडच्या राजाची मुलगी होती

[४] रघुकुळाचा§मूळ पुरुष सगर राजा याची राणी केशिनी ही विदर्भ राजकन्या होती

[५] निषध† देशाचा राजा नल याची राणी दमयंती ही वऱ्हाडांतील भीमक राजाची कन्या होती

[६] अयोध्येच्या दशरथ राजाचा बाप अज याची राणी इंदुमती ही वऱ्हाडांतील कुंडिनपूरच्या भोज राजाची बहीण होती ही स्वर्गातून फुलाचा हार अंगावर पडून मरण पावली.‡

[७] श्रीकृष्णाची¶ राणी रुक्मिणी ही वऱ्हाडांतील भीष्मक राजाची कन्या होती

[८] श्रीकृष्णाचा पुत्र प्रद्युम्न याने विदर्भाच्या रुक्मि राजाची कन्या शुभांगी इच्याशीं लग्न केलें होते मामाची मुलगी करण्याची चाल वऱ्हाडांत अद्याप आहे

[९] प्रद्युम्नाचा पुत्र अनिरुद्ध याने विदर्भाचा राजा रुक्मि याच्या मुलाची मुलगी रुक्मावती इच्याशी लग्न केलें होते

[१०] दुसरा भिल्लम यादव यानें ठाण्याच्या झंझ नांवाच्या शीलाहार राजकुलांतील कन्येशीं लग्न केलें होतें या राजकन्येचें नांव लस्थियव्वा असें होतें

[११] वरील लस्थियव्वा राणी इची आई राष्ट्रकूट ऊर्फ महारठ्ठ घराण्यापैकीं होती ती ठाण्याच्या शीलाहारवंशी राजास दिली होती (इ० सन १०००)

[१२] भिल्लमानंतर वेसुगी ( यादव ) गादीवर आला त्यानें चालुक्य राजा गोगी याची मुलगी नायलदेवी इच्याशीं लग्न केलें (इ० सन १०२५)

[१३] विदर्भांतील वाकाटक ऊर्फ सेनवंशी राजा दुसरा रुद्रसेन याने उत्तर हिंदुस्तानांतील दुसरा चंद्रगुप्त मौर्य याच्या प्रभावती नामक राजकन्येशीं लग्न केलें होतें (इ० सन ३९५)

[१४] विदर्भांतील सेनवंशी नरेंद्रसेन राजा याचे लग्न वनवासीच्या कदंब राजकन्येशीं झालें होतें

[१५] इराण+ देशाच्या इतिहासांत प्रसिद्ध असलेला आर्यवंशी राजा भीमसेन ब्रह्मवंशी यानें काबूलच्या शहा नांवाच्या आर्यवंशी घराण्यांतील राजकन्येशीं लग्न केलें होतें

---

* आपटेकृत कोश, पृष्ठ ९७४.

§ रामायण—बालकांड, सर्ग ३८

† नलचंपू

‡ रघुवंश

¶ हरिवंश, विष्णुपर्व अ० ५०

\+ राबर्टीकृत, अफगाणिस्थान, पान ६२

[१६] एका पारसीक चक्रवर्ती राजानें काबुलच्या आर्यवंशी यवन ऊर्फ यवनाश्व घराण्याच्या राजकन्येशीं विवाह केला होता. पारसिक राज्यामध्यें काबुल आणि झाबूल म्हणजे हल्लींचा गिझनीचा भाग व सिंधू नदीपर्यंतचा मुलुख समाविष्ट झाला होता. शहा वें यवन ऊर्फ यवनाश्व या वंशाचा उल्लेख आरबी ग्रंथकार आणि राजतरंगिणीकार कल्हण यांनींही आपल्या ग्रंथांत केला आहे शहा ही पदवी धारण करणारें क्षत्रिय राजघराणें गुजरार्थेत हल्लीही आहे. तें आपणांस ब्रह्मवशी ऊर्फ ब्रह्मक्षत्रिय म्हणवितें. चिनी यात्रेकरू मि ह्यूएनसंग हा इ० सन ६३० मध्यें काबुलांत गेला होता. तो आपले प्रवासवर्णनात्मक इतिहासांत लिहितो कीं, त्या वेळीं काबुलांत बौद्ध धर्मी क्षत्रिय राजे राज्य करीत होते ते आपणांस शहा घराण्याचे म्हणवीत असत

[१७] बाप्पारावळनेंही इ० सन ७३० च्या सुमारास काबूल, कंदाहार, गिझनी येथील यवन ऊर्फ यवनाश्व आर्य राजकन्या वरल्या होत्या. त्यांपासून त्याला ३२ पुत्र झाले होते ते यवन—मुसलमान नसून आर्य होते असें वरील आधारावरून दिसतें

[१८] दक्षिणच्या* राष्ट्रकूट मराठा क्षत्रियांच्या सोयरिकी उत्तरेचे राजपूत, बंगालचे पाल, चेदीचे हैहय यांच्याशीं होत होत्या

## ३. वऱ्हाडांतील देशमुख, पाटील कुळंबी, यांचे महाराष्ट्रांतील मराठ्यांशीं चालू विसावे शतकांतील नवीन शरीरसंबंध

[१९] रा० ब० केशवराव भाऊसाहेब देशमुख खामगांवकर यांचा व दिग्रज जिल्हा नागपूर येथील खळतकराचा सोयरेसंबध आहे खळतकर हे साताऱ्याकडील मराठे आहेत

[२०] राजा देऊळगांवकर श्रीमत दत्ताजीराव जाधव हे म्हैसांगकर प वा. नारायणराव रावसाहेब यांचे साडू आहेत चांडोलकरांची मुलगी म्हणजे आर्वीकर केशवराव देशमुखांच्या पत्नीची बहीण त्याना दिलेली होती चांडोलकरांची एक मुलगी दत्ताजीराव जाधव देऊळगांव राजा, दुसरी नारायणराव देशमुख म्हैसांगकर आणि तिसरी आर्वीकर केशवराव देशमुख यांस दिली होती. देऊळगांवकर हें सिंदखेडकर जाधवांचेंच घराणे आहे.

[२१] चांडोलकराचे मुलीची मुलगी बडोद्याचे श्रीमत पिलाजीराव गायकवाड यांना दिलेली आहे

[२२] अमळनेरकराचे सोईरसंबध जुन्या काळापासून वऱ्हाडकर देशमुखांशीं आहेत. व अमळनेरकरांचे संबंध देवास, धार, ग्वाल्हेर वगैरेंकडे आहेत नगरदेवळेकरांचे शरीरसंबंध तोरखेडकर कदम बांडे यांच्येशीं आहेत

[२३] नाशिकजवळील देवळालीचे प वा बाळासाहेब देशमुख यांचा चांडोलकर देशमुखांशीं सोयरेसंबंध आहे.

---

* मध्ययुगीन भारत, भाग २, पृष्ठ २५२ पाहा

[२४] खानदेशातील चाळिसगांवकर व वरणगांवकर (जिजाबराव वगैरे) जाधव देशमुखांचे संबंध वऱ्हाडच्या देशमुखांशीं, तसेंच महाराष्ट्रांतील व खानदेशांतील मराठे मंडळीशीं आहेत.

[२५] श्रीमंत व्यकटराव तात्यासाहेब गुजर नागपूर यांच्या पत्नी वर्धा जिल्ह्यांतील आर्वीकर केशवराव देशमुख याच्या धाकट्या पत्नीच्या नातलग आहेत

[२६] खानदेशांतील चाळिसगांवकर कृष्णराव देशमुख यांची बहीण वर्धा जिल्ह्यांतील सोलोडकर देवराव बळवतराव देशमुख यांना दिली होती

[२७] खानदेशातील चाळिसगांवकर व्यकटराव देशमुख, मॅनेजर चाळिसगांव मिल्स, याच्या दोन मुली अनुक्रमें नागपूर जिल्ह्यांतील मोहोपेकर गणपतराव ऊर्फ टिपू बापू शिंदे देशमुख यांचे चिरजीव आणि पुतणे यांना दिल्या आहेत.

[२८] वर्धा जिल्ह्यांतील मोहोप्याचे गणपतराव सदाशिवराव उर्फ बाबासाहेब देशमुख शिंदे यांना त्रिपुर येथील मराठ्याची मुलगी दिली आहे.

[२९] वर्धा जिल्ह्यातील सालोड (हिरापूर) येथील देवराव बळवतराव देशमुख याना देवळालीचे प वा बाळासाहेब देशमुख यांची मुलगी दिली आहे

[३०] वर्धा जिल्ह्यातील सालोडकर बळवतराव अन्याजी देशमुख याचे चिरजीव पुरुषोत्तमराव यांस चाळिसगावकर प वा फकीरराव देशमुख यांची मुलगी सौ शातीबाई ही दिली आहे

[३१] वरील सालोडकर बळवंतराव अन्याजी देशमुख यांचे मेहुणे जामठीचे प वा खुशालराव देशमुख याना धारचे पवार याची मुलगी दिली होती

[३२] सालोडचे प वा गोपाळराव देशमुख यांचे धाकटे चिरजीव बाबासाहेब याना अमळनेरचे श्री० केशवराव देशमुख यांची मुलगी दिलेली आहे

[३३] वर्धा जिल्ह्यातील सालोडचे गोपाळराव देशमुख याचे वडील चिरजीव विठ्ठलराव ऊर्फ रावसाहेब याना अमळनेर येथील राष्ट्रीय विद्यालयाचे व्यायामशिक्षक रा० दौलतराव यांची बहीण दिलेली आहे

[३४] तोरखेडचे (खानदेश) कदमबाडे यांचे मुलाला अमरावती जिल्ह्यांतील जरूडचे रावराजे वानखडे श्री० शकरराव ऊर्फ नानासाहेब देशमुख यांची मुलगी दिली आहे (इ० सन १९२५)

[३५] सदरहू श्री० शकरराव ऊर्फ नानासाहेब जरूडकर याना बडोदें येथील डॉयरेक्टर ऑफ ॲग्रिकल्चर माधवरावसाहेब शितोळे ब्यारिस्टर याची मुलगी दिली आहे तसेंच रावराजे वानखडे जरूडकर विनयेंद्रसिंह देशमुख यांना बडोद्याचे श्रीमत गणपतराव साहेब गायकवाड दिवाण याची कन्या दिली आहे

[३६] बडोद्याचे दिवाण श्रीमंत गणपतराव गायकवाड यांची कन्या जरूडकर श्री० रामराव तात्यासाहेब राजे वानखडे यांना दिली आहे

[३७] माणिकराव देशमुख थाटरवाडा ता० काटोल यांची मुलगी देवास सीनियरचे पवार यांस दिली आहे

[३८] उमरावती जिल्ह्यांतील दर्यापूरकर ब्यारिस्टर श्री० रामराव देशमुख याना ग्वाल्हेरचे सरदार शिंदे यांची मुलगी दिली आहे ही अप्पासाहेब गजेन्द्रगडकर यांचे कुटुंबाचे बहिणीची मुलगी आहे.

[३९] जिल्हा अकोला तालुका मूर्तिजापूर येथील कुरुमकर खुशालराव बाबासाहेब देशमुख यांच्या पत्नी चाळिसगांवकर कृष्णराव देशमुख यांची बहीण होय.

[४०] खानापूरचे ( जिल्हा सातारा ) धोंडजी पाटील यांचे सबंध वऱ्हाडांत दिग्रज येथील खळतकर यांचेशीं आहेत

[४१] नागपूरचे श्री० तात्यासाहेब गुजर यांच्या पत्नीची बहीण प. वा. श्री० महाराज अप्पासाहेब भोसले सातारकर याना दिली होती

[४२] आर्वी तालुक्यांतील ( जि वर्धा ) विरूळचे नीलकठराव बाबासाहेब देशमुख साळुके यानीं साताऱ्याचे भोसले राजघराण्याशीं सबध असलेले रा० विनायकराव भोसले या २२ वर्षांच्या सुशिक्षित तरुणास दत्तक घेतले आणि या दत्तकाचा विवाह आर्वीकर परलोकवासी रामराव देशमुख मालगुजार यांची ज्येष्ठ कन्या सौ० शांताबाई यांच्याशीं केला दत्तविधान आणि विवाहसमारभ फाल्गुन महिन्यात मार्च १९२५ मध्यें वर्धा मुक्कामी झाले. या दत्तक आणि विवाह सबधामुळें वऱ्हाड व सी पी मधील कुळंबी ( आर्य ऊर्फ मराठा ) क्षत्रिय आणि महाराष्ट्रातील मराठा क्षत्रिय हे अगदीं एकाच हाडामांसाचे आहेत असें सिद्ध झालें

## ४. सुप्रसिद्ध मेघे घराण्याचे शरीरसंबंध

(बोरगाव मेघे तालुका व जिल्हा वर्धा येथील मेघे घराण्याचे शरीरसबंध )

[४३] समाजभूषण आनदरावजी मेघे याचे वडील दौलतराव यांची पत्नी पार्वती बाई ही टाकरखेड ता० आर्वी येथील देशमुखाची कन्या होती

[४४] समाजभूषण आनदरावजी मेघे यांची पत्नी राधिकाबाई ही यावली ता० उमरावती येथील देशमुखांची कन्या होती.

[४५] समाजभूषण आनदरावजी मेघे यांची बहीण पिलाबाई ही काटोलकर गुलाबराव देशमुख याची पत्नी होती

[४६] समाजभूषण आनदराव मेघे याची दुसरी पत्नी लक्ष्मीबाई ही रीद्धपुर (बेलोरा) येथील राजारामजी देशमुख यांची कन्या होती

[४७] समाजभूषण आनदरावजी मेघे यांची भावजय सरस्वतीबाई ही गजाननराव देशमुख सालोडकर यांची आत्या होती.

[४८] आनदराव मेघे यांचे वडील पुत्र शंकरराव ऊर्फ बाबासाहेब मेघे पिंपरीकर ता० वर्धा यांची पत्नी सत्यभामाबाई ही अंजी अंदोरीकर बाबासाहेब देशमुख यांची कन्या आहे.

[४९] आनंदराव मेघे यांचे द्वितीय पुत्र कृष्णराव ऊर्फ दादासाहेब मेघे यांची पहिली पत्नी रुक्मिणीबाई ही सिरखेड ता० मोर्शी येथील तुकारामजी बापू देशमुख यांची कन्या होती (वारली)

[५०] कै० रुक्मिणीबाई मेघे यांची धाकटी बहीण रंगूबाई ही नांदपूर ता० आर्वी जि० वर्धा येथील बाजीराव बापू देशमुख यांना दिली होती

[५१] ब्राह्मणवाडाथडी ता० एलीचपुर येथील अवधूतराव देशमुख हे रुक्मिणीबाई मेघे यांचे मामा आहेत

[५२] श्री० कृष्णराव ऊर्फ दादासाहेब मेघे यांचें दुसरें लग्न राजणगांव ता० चाळीसगांव येथील श्री० शिवराव रामराव चव्हाण देशमुख पोलीस पाटील यांची कन्या सुंदराबाई यांच्याशीं झाले आहे त्यांचें नांव सौ० इंदिराबाई मेघे हा विवाह ता १४–२–१९२८ रोजीं झाला

[५३] शिवरावजी देशमुख राजणगांव यांची दुसरी कन्या राजुबाई ही चाळीस गांव येथील बाजीराव देशमुख जाधव यांना दिली आहे.

[५४] शिवरावजी देशमुख याची बहीण आवडाबाई ही चाळीसगाव येथील श्री० फकीरराव देशमुख याना दिली आहे

[५५] कै० फकीरराव देशमुख चाळीसगांव याची मुलगी घोळाबाई ही सालोड हिरापूर ता० वर्धा येथील सुप्रसिद्ध देशमुख पुरुषोत्तमराव बाबासाहेब यांची पत्नी आहे

## ४. छत्रपति भोसले आणि जाधव घराणें यांचे इतर घराण्यांशीं शरीरसंबंध

[५६] श्री० मालोजी राणे भोसले याची राणी म्हणजे श्री० शहाजी राणे यांची आई दीपाबाई–ही निंबाळकरांची कन्या होती

[५७] श्री० शहाजी राजे भोसले यांची पहिली राणी जिजाबाईसाहेब–श्री० शिवाजीमहाराजांची आई—ही राजे लखुजी जाधव यांची कन्या होती हे लखुजी जाधव वऱ्हाडातील बुलढाणा जिल्ह्यांतील शिंदखेडचे देशमुख होते

[५८] श्री० शहाजी राजे याची दुसरी राणी तुकाबाई ही—बाजी मोहिते पागुरवाडीकर यांची कन्या–व्यकोजीची आई–होती

[५९] शिवाजीराजे भोसले यांची पहिली राणी सईबाई–सभाजीची आई–ही निंबाळकरांची कन्या होती

[६०] शिवाजी राजे यांची दुसरी राणी सोयराबाई–राजारामाची आई–शिर्क्यांची कन्या होती

[६१] शिवाजी राजे यांची तिसरी राणी पुतळाबाई ही घोरपड्यांची मुलगी होती

[६२] शिवाजीमहाराजांची मुलगी सखुबाई ही बजाजी निंबाळकर ( जिजाबाईनें मुसलमानाचा हिंदु करून घेतलेला ) याचा मुलगा महादजी यास दिली होती

[६३] शिवाजीमहाराजांची दुसरी मुलगी राजकुंवरबाई ही गणोजी राजे शिर्के यांस दिली होती.

[६४] शिवाजी महाराजांची तिसरी मुलगी अंबिकाबाई ही हरजी राजे महाडिक यांस दिली होती.

[६५] शिवाजी राजे भोसले यांचे वडील बंधु संभाजी राजे यांचा वंश हल्लीं भीमातीरीं जिंजी येथें आहे

[६६] शिवाजी महाराजांचे पुत्र संभाजी महाराज यांची राणी येसुबाई ही मळेकर पिलाजी राजे शिर्के यांची कन्या होती.

[६७] राजाराम महाराज यांस राण्या तीन; पहिली जानकीबाई ही प्रतापराव गुजर यांची कन्या.

[६८] दुसरी राणी ताराबाई ही हबीरराव मोहिते यांची कन्या

[६९] तिसरी राणी राजसबाई ही मलवडीकर घाटग्यांची कन्या

[७०] थोरले शाहू महाराज यास राण्या चार; सावित्रीबाई ही कण्हेरकर शिर्यांची कन्या

[७१] दुसरी राणी राजसबाई ही शिंदखेडच्या रुस्तुमराव जाधवांची कन्या.

[७२] तिसरी राणी सकवारबाई ही राणोजी शिर्क्यांची कन्या.

[७३] चवथी राणी सगुणाबाई ही नेवासकर मोहित्याची कन्या

[७४] तजावरचे व्यकोजी राजे भोसले याची राणी दीपाबाई ही इगळे यांची कन्या.

[७५] कोल्हापूरचे सभाजी महाराज यांची पत्नी जिजाबाई ही तोरगलकर शिर्यांची कन्या

[७६] कोल्हापुरचे दुसरे संभाजी महाराज याची राणी दिवाणबाई ही शिवाजी शिर्के तरसळकर यांची कन्या.

[७७] कोल्हापूरचे दुसरे शिवाजी महाराज याची राणी काशीबाई ही बडोद्याचे दिवाण गणपतराव गायकवाड यांची कन्या

[७८] सावतवाडीचे भोसले रघुनाथराव सावत (१८९९) यांची पत्नी खंडेराव गायकवाड याची मुलगी.

[७९] बाबाजी नाईक निंबाळकर (फलटणचे) यांची पत्नी सावित्रीबाई ही राजाराम महाराज यांची कन्या

[८०] करवड ता० चिखली वऱ्हाड येथील देशमुख इगळे यांची मुलगी दीपाबाई तंजावरकर व्यकोजी राजे भोसले यास दिली होती (इ० सन १७२०)

[८१] शिंदखेडचे लखुजी जाधव म्हणजे जिजाबाईचे वडील यांना चार पुत्र (१ राघोजी, २ दत्ताजी, ३ अचलोजी, बहादूरजी) होते व सर्वांत वडील कन्या जिजाबाई अशीं पांच अपत्यें होतीं (यांच्या शाखा पुढें पहा)

[८२] राघोजीची शाखा हल्लीं औरंगाबादेस आहे ( राजे आनंदराव )

[८३] राघोजीची दुसरी शाखा हल्लीं देऊळगांव राजा येथे आहे (राजे दत्ताजीराव)

[८४] अचलोजीची शाखा हल्ली वऱ्हाडांत अडगांव व मेदुणे येथें आहे ही शाखा सुप्रसिद्ध सेनापति धनाजीराव जाधव यांची आहे

[८५] लखूजीची नात म्हणजे मानसिंगराव जाधव यांची कन्या अंबिकाबाई ही दिल्लीस शाहूस दिली होती

[८६] कागलचे जहागिरदार सखाराम घाटगे यांची कन्या बायजाबाई शिंदे यांचा विवाह ग्वाल्हेरचे दौलतराव शिंद्यांशीं झाला होता यांचें देऊळ त्यांच्या मूर्तीसह व अन्नसत्राच्या जहागिरीसह पंढरपुरास हल्ली भट्टांच्या ताब्यात आहे

[८७] अप्पासाहेब शितोळे यांची बहीण होशा आकासाहेब यांचें लग्न जयसिंगराव घोरपडे चीफ ऑफ कापशी यांच्याशीं झालें होतें (इ० सन १८७१)

[८८] जयाजीराव महाराज शिंदे यांची कन्या मनुराजा साहेब यांचें लग्न अप्पा साहेब शितोळे यांच्याशी झालें (ता १–५–१८९०)

[८९] हेमसिंह राजे भोसले बनसेंद्रेकर यांचे कुटुंब भागीरथीबाई आणि तंजावरचे राजे शेवटचे शिवाजी महाराज भोसले ( तंजावरचा वंश ) यांची राणी—सुराईबाई साहेब ह्या सख्ख्या मावसबहिणी होत्या

[९०] या सुराईबाई साहेब नानीसाहेब घाटगे यांच्या कन्या होय

[९१] सुराईबाई साहेब (तंजावरची राणी) यांची बहीण ही सखाराम साहेब मोहिते तंजावर यांचे बंधु दाजीसाहेब मोहिते यांना दिली होती

[९२] तंजावरचे शेवटचे शिवाजी महाराज भोसले यांची मुलगी सखाराम साहेब मोहिते यांना दिली होती

[९३] दाजीसाहेब मोहिते तंजावरकर यांना तीन मुली होत्या एक श्रीमंत सयाजी-राव महाराज गायकवाड यांना दिली होती तीच थोरली राणी चिमणाबाईसाहेब होय

[९४] दुसरी कमलाबाई बडोद्यास सरदार धायबर किल्लेदार यांस दिली

[९५] तिसरी नेपाळचे सिसोदिया भोसले महाराजाचे दिवाण जगबहादुर (चव्हाण किंवा पवार) यांच्या मुलास दिली होती

[९६] तंजावरचे शेवटले भोसले शिवाजी महाराजांचे राणीचे दत्तक हा बुलढाणा जिल्ह्यांतील चिखली तालुक्यांतील करवंड (बावनबुरजी) येथील इंगळेरावचा मुलगा होता त्याचा मुलगा हल्लीं तंजावरचे गादीवर आहे

[९७] तंजावरचे शिवाजी भोसल्याची मुलगी करवंड तालुका चिखली येथील इंगळेराव यांचे घरीं दिली होती

[९८] नानीसाहेब घाटगे (तंजावरचे राणीची आई) यांची बहीण करवंडकर इंगळे-रावांस दिली होती

[९९] नानीसाहेबांची दुसरी बहीण तामीईबाई शिंदखेड।जि० बुलढाणा,येथील जाधवां-

चे वंशज आनंदराव लक्ष्मणराव राजे जाधवराव जवळखेडकर (शिंदखेडचे जवळच आहे) यांना दिली होती

[१००] आनदराव लक्ष्मणराव राजे जाधवराव जवळखेडकर यांचा मुलगा गणपत राव ऊर्फ बुवासाहेब यांची मुलगी खानवली जि० रत्नागिरी येथे खानवलकर यांस दिली आहे.

[१०१] वरील खानवलकर घराण्यांतील बाई लक्ष्मीबाई–ह्या कोल्हापूरचे हल्लींचे छत्रपति श्री० शाहू महाराज यांच्या राणीसाहेब आहेत

[१०२] आनदराव राजे जाधवराव जवळखेडकर यांची मुलगी भागीरथीबाई ही बनसेन्द्रेकर राजे हेमसिंह भोसले यांना दिली होती

[१०३] सातारचे श्री० छत्रपति प्रतापसिंह महाराज यांचे सख्खे चुलत बंधु बळवतराव राजे भोसले सेनापति (बावीकर) यांचे पुत्र शहाजी ऊर्फ जगली महाराज हे श्री० प्रतापसिंह महाराजांस दत्तक दिले होते

[१०४] बळवतराव राजे भोसले यांनीं शेडगांवकर भोसल्यांचा मुलगा दुर्गसिंह दत्तक घेतला होता

[१०५] वरील दुर्गसिंह भोसले याना तात्यासाहेब तरसळकर शिर्के यांची मुलगी सकवारबाई दिली होती

[१०६] वरील दुर्गसिंह राजे भोसले बावीकर यांना नागपूरचे मोहिते यांची कन्या बन्याबाई ही ( दुसरे कुटुब ) दिली आहे

[१०७] नगरदेवळ्याचे पवार बाळासाहेब जहागिरदार यांचे सोयरे मोरोजी निंबाळ कर व भवानजी काटकर हे आहेत

[१०८] वरील मोरोजी निंबाळकर यांची बहीण हिराबाई बनसेंद्रेकर गणपतराव राजे भोसले यांस दिली आहे

[१०९] भवानजी काटकर याची बहीण गोपिकाबाई ही बनसेंद्रेकर गणपतराव राजे भोसले याना दिली आहे

[११०] गणपतराव राजे भोसले बनसेद्रेकर याचे बधु आबाजी राजे भोसले याची मुलगी कोंडयाबाई ही मु सुराणें, जि नाशिक येथील नानासाहेब कच्छवे ऊर्फ ठोके यांस दिली. हे कच्छवे स्वतःस रजपूत म्हणवितात

[१११] पिंपळगाव, ता० जालनापूर जि. अवरगाबाद येथील दाजीसाहेब चव्हाण पाटील याची मुलगी भुल्याबाई सुराणे येथील नानासाहेब कच्छवे यांचा मुलगा अण्णा साहेब यास दिली

[११२] मुंगी जि नगर येथील बुवासाहेब राजे भोसले यांची बायको भागली जि० औरंगाबाद येथील पुजाराची मुलगी आहे

[११३] तारलक महाडीक याची मुलगी ही सातारचे प्रतापसिंह महाराजांचे दत्तक शहाजी ऊर्फ जगली महाराज यांची राणी होय

[११४] थोरले छत्रपति शाहू महाराज यांची राणी कण्हेरखेडचे शिंद्यांची मुलगी होती

[११५] थोरले शाहू महाराज यांची बहीण भवानीबाई ही संभाजी राजे महाडीक यांस दिली होती. ती सती गेली.

## ६. बडोद्याचे गायकवाडांचे सोयरे

[११६] जगताप ( पिंपळे व सासवड, जि० पुणें येथील ) याना गणपतराव महाराज गायकवाड बडोदे यांची मुलगी तानीबाई ही दिली

[११७] कदम ( गिरवी, जि० सातारा ) बाळासाहेब यांची कन्या बडोद्याचे राजपुत्र शिवाजीराव गायकवाड यांस दिली

[११८] हांडे ( ओतूर, जुन्नर, जि० पुणे ) येथील हांडे देशमुख याची कन्या बडो द्याचे राजपुत्र जयसिंगराव गायकवाड यांस दिली

[११९] कडू (पुणे जिल्ह्यातील) बापूसाहेब कडू यांची कन्या बडोद्याचे श्री० अव न्तिराव गायकवाड ( श्री० सयाजीराव गायकवाड याचे चुलत बधु ) यास दिली

[१२०] श्री० उखाजी ऊर्फ काकासाहेब गायकवाड याची मुलगी अप्पासाहेब सावत ( खानदेशात राहातात ) याना दिली

[१२१] घोरपडे ( सोंडूर सस्थानचे घोरपडे ) नरसिगराव बाबासाहेब घोरपडे अमीर उमराव याची बायको ही अप्पासाहेब काळे बडोदे याची मुलगी आहे

बडोदे येथील श्री० सयाजीराव महाराज याची ज्येष्ठ कन्या इदिरा राजे याचा विवाह उत्तर हिंदुस्तानांतील कुचबिहारचे क्षत्रिय राजाशीं ( अदाज इ० सन १९१५ साली ) झाला

[१२३] घाटगे ( इनामगाव, जि नगर ) येथील बाजीराव घाटगे यांची कन्या राणी चिमणाबाई साहेब ही हल्लीचे श्रीमत सयाजीराव महाराजाची राणी आहे

## ७ माधवराव ऊर्फ महादजी शिंदे याच्या ९ राण्या

[१२४] १ जयसिंगराव घोरपडे यांची मुलगी अन्नपूर्णाबाई

[१२५] २ शिदोजी घाटगे याची मुलगी भवानीबाई

[१२६] ३ नरसिंगराव घाटगे याची बहीण पार्वतीबाई

[१२७] ४ संगमकर देशमुखाची मुलगी भवानीबाई

[१२८] ५ परचेकर जाधव याची कन्या बगाबाई

[१२९] ६ परमसिंह राऊळ याची बहीण राधाबाई

[१३०] ७ तुळजापूरचे कदम ( भोपे ) याची कन्या लक्ष्मीबाई

[१३१] ८ कर्डेकरांची मुलगी भागीरथीबाई

[१३२] ९ रामसिंग राऊळ दवडाईकर याची बहीण यमुनाबाई

[१३३] थोरले शाहू महाराज यांची बहीण भवानीबाई ही संक्राजी राजे महाडिक यांस दिली होती ती सती गेली

[१३४] सांवतवाडीच्या थोरल्या खेम सांवतास ग्वाल्हेरचे जयाजीराव शिंदे ( श्रीमत राणोजी शिंदे याचे तृतीय पुत्र ) यांची मुलगी लक्ष्मीबाई दिली होती

[१३५] सर्जेराव घाटगे यांची मुलगी रूपाबाई, शिंद्यास दिली होती

## ८. श्रीमंत करवीरकर संभाजी महाराज छत्रपति राजे यांच्या ७ राण्या

**राजाराम महाराज** छत्रपति यांचे पुत्र ( ताराबाईचे पुत्र ) शिवाजी महाराज, आणि राजाराम महाराज यास राजसबाईपासून झालेले पुत्र सभाजी महाराज यांच्या जनानखान्याची यादी

[१३६] १ सौ० आनदीबाईसाहेब, घाटगे याची कन्या

[१३७] २ सौ० उमाबाईसाहेब, खानवेलकर याची कन्या

[१३८] ३ सौ० जिजाबाईसाहेब, शिंदे यांची कन्या.

[१३९] ४ सौ० सुंदराबाईसाहेब, घाटगे यांची कन्या

[१४०] ५ सौ० सकवारबाईसाहेब, सूर्यवशी राजे याची कन्या

[१४१] ६ सौ० दुर्गाबाईसाहेब, मोहित्यांची कन्या

[१४२] ७ सौ० कुसाबाईसाहेब, वाडीकर सावत यांची कन्या

## ९. श्रीमंत करवीरकर शिवछत्रपति यांचे जनानखान्याची यादी

[१४३] १ सौ० सईबाईसाहेब, तुळजोजीराव घाटगे सर्जेराव कागलकराची कन्या.

[१४४] २ सौ० चिमाबाईसाहेब, राणोजीराव शिदे चावरेकर याची कन्या

[१४५] ३ सौ० सकवारबाईसाहेब, लक्ष्मणराव शिंदे तोरणगडकर यांची कन्या

[१४६] ४ सौ० उमाबाईसाहेब, मुकुदराव देसाई जाबुटेकर याची कन्या.

[१४७] ५ सौ० सुदराबाईसाहेब, रत्नाजीराव खानविलकर याची कन्या

[१४८] ६ सौ० अहिल्याबाईसाहेब, राणोजीराव घाटगे कागलकर याची कन्या.

[१४९] ७ सौ० आनदीबाईसाहेब, जानराव पाटणकर याची कन्या

[१५०] ८ सौ० मैनाबाईसाहेब, लक्ष्मणराव शिंदे तोरगलकर यांची कन्या

[१५१] ९ सौ० गगाबाईसाहेब, अथणीकर देसाई पवार याची कन्या

[१५२] १० सौ० दर्याबाईसाहेब, सयाजीराव घाटगे मुरूडकर याची कन्या

[१५३] ११ सौ० सकवारबाईसाहेब, खडेराव शिंदे कऊलकर यांची कन्या.

[१५४] १२ सौ० आनंदीबाईसाहेब धोंडजी पाटणकर यांची कन्या

[१५५] १३ सौ० कमळाबाईसाहेब, लिंबाजी निंबाळकर नाईक, यांची कन्या.

## १०. श्री० करवीरकर संभाजीराजे यांचे जनानखान्याची यादी

[१५६] १ सौ० सईबाईसाहेब, त्रिंबकराव खानविलकर यांची कन्या
[१५७] २ सौ० जिजाबाईसाहेब, धारराव निंबाळकर गजेंद्रगडकराची कन्या
[१५८] ३ सौ० सईबाईसाहेब, नारायणराव शिर्के यांची कन्या

## ११. करवीरकरशिवछत्रपति यांच्या कन्या

[१५९] सौ० चिमणाबाईसाहेब, नागोजीराव पाटणकर यास दिली होती
[१६०] सौ० बजाबाईसाहेब, नारायणराव घाटगे नागपूरकर यास दिली होती
[१६१] सौ० येसूबाईसाहेब, शिदोजीराव निंबाळकर नाईक निपाणीकर यांस दिली होती
[१६२] सौ० अलीबाईसाहेब, यशवतराव घाटगे कागलकर यांस दिली होती

## १२. उत्तर हिंदुस्तानचे शरीरसंबंध

[१६३] दिल्लीचा अनगपाळ तुवर चंद्रवशी याची एक कन्या कमलादेवी ही अजमेर ऊर्फ द्रोणागिरी येथील राजा सोमेश्वर चव्हाण सूर्यवशी यांस दिली होती (इ०सन११४७)

[१६४] अनगपाळाची दुसरी मुलगी कनोजचा राजा विजयपाळ राठोड (सूर्यवशी) यास दिली होती

[१६५] बाप्पा रावळ यानें इराण, तुराण, इस्पहान, काश्मिर, काबूल वगैरे ठिकाणच्या सूर्य व चद्रवशी यवन आर्यवशी क्षत्रिय राजकन्यांशीं लग्न केलें होतें त्याला हिंदी स्त्रियापासून ९८ आणि यवन क्षत्रिय स्त्रियांपासून ३२ पुत्र होते (इ०सन ७०८)

[१६६] चितोडचा भीमसिंग याने सिंहलद्वीपचा चव्हाण राजा हमीरसिंग याची कन्या पद्मिनी हिच्याशीं लग्न केले होतें अल्लाउद्दिनाच्या पापी दृष्टीमुळे हिने अग्निकाष्ठ भक्षण केलें (इ० सन १२९०)

[१६७] चितोडचा लाखा राणा याने मारवाडच्या रणमल्ल राणा ठाकूर याचे कन्येशीं लग्न केले होते (इ० सन १३९७)

[१६८] चितोडचा कुंभोराणा याची बायको मेरठच्या ठाकुराची कन्या मिराबाई ही होती ही फार भगवद्भक्त होती इचीच अभगाची गाथा प्रसिद्ध आहे (इ० सन १४५० चे सुमारास)

[१६९] कुंभ राण्याची दुसरी बायको झालवाडा येथील ठाकुराची कन्या शालिनी ही होती

[१७०] मेवाडचा राजा रायमल्ल याची मुलगी गिरनारचा ठाकूर सुरजी यादव यास दिली होती

[१७१] मेवाडचा राजा रायमल्ल याची मुलगी (दुसरी) सिरोहीचा ठाकूर जयमल्ल देवरा यास दिली होती

[१७२] श्रीनगरचा राजा परमारवशी रामकर्मचंद यानें आपली मुलगी मेवाडचे संग राण्यास दिली होती.

[१७३] थोदाचा राय सूरतान (शूरस्थान) याची मुलगी तारा ही पृथ्वीराज चव्हाण यास दिली होती

[१७४] मेवाडचा महाराणा रत्नसिंह सिसोदिया यानें बुदीचे हाडिया राजे यांची मुलगी वरली होती (इ० सन १५३०)

[१७५] चितोडचा सग राणा याची राणी जवाहीरबाई ही राठोडकन्या होती. तिचा मुलगा विक्रमाजित याचे बरोबर तिनें दिल्लीचा सुलतान बहादुर वलाब्रीखान फिरणी याचेशीं चितोडच्या रक्षणार्थ लढाई मारली त्यांत ती पडली. (इ० सन १५२३)

[१७६] चितोडचा राणा उदयसिंग यानें कोठारी याचा चव्हाण, सोमीगडचा ठाकूर आणि झालवाडाचा राव याच्या कन्यांशी विवाह केले होते

[१७७] मेवाड (उदेपूर) सिसोदिया कुळांतली महाराणा जगतसिंग याची मुलगी लहान मोठे दर्जाचा भेदाभेद न ठेवता मारवाडचा राजपुत्र कुमार विजयसिंग यास दिली होती (इ० सन १७३६)

[१७८] उदेपूरचा राणा भीमसिंग (कृष्णाकुमारीचा बाप) याची एक कन्या जेसलमीर, आणि दुसरी बिकानीरच्या राजपुत्रास दिली होती

[१७९] उदेपूरचा राणा जवानसिंह (कृष्णाकुमारीचा भाऊ) याने रेव्याच्या भगेले वंशाच्या राजकन्येशीं लग्न केले होते तिजपासून त्याला मुलगा झाला (इ० सन १७९९)

[१८०] दमाजी गायकवाड याने (इ० सन १७२० साली) काठेवाडांतील गोहील (गेहलोद) राजपुत राजकन्येशीं लग्न केले होते सासऱ्याकडून त्याला काहीं गांवें आंदण मिळालीं होतीं

## १३. पृथ्वीराजाच्या ५ राण्या

[१८१] १ चितोडचा राणा समरसिंह रावळ याची बहीण पृथ्वीराजास दिली होती

[१८२] २ आबूचा राजा जैतप्रमार (धारचें हल्लींचे पवार घराणे) याची मुलगी इच्छिणी

[१८३] ३ समुद्रशिखर येथील यादवकुळी नीलराजा विजयशूर याची कन्या पद्मावती.

[१८४] ४ कनोजचा राजा जयचंद राठोड याची सुदर कन्या सयोगिता. ही पृथ्वीराजानें हरण करून आणिली याबद्दल मोठें तुबळ युद्ध झालें त्यांत पृथ्वीराजा यशस्वी झाला पण तिच्याशीं तो अगदींच लंपट झाल्यामुळें त्याच्या राज्यात अदा-धुदी होऊन शेवटीं त्याचें राज्य मुसलमानांनीं घेतले व त्याला कैद करून गिझनीला नेलें. तेथें त्याचे डोळे काढून कैदेंत ठेवलें. तेथेंच तो मरण पावला. दिल्लीची गादी पांडवांपासून आर्यांची (हिंदूंची) होती. ती या वेळेपासून म्हणजे इ० सन ११९३ पासून मुसलमानांचे ताब्यांत गेली. पृथ्वीराज चव्हाण हा शेवटचा हिंदुपदपादशाह होय.

## १४. इंदूरच्या राजघराण्याचे शरीरसंबंध

[१८५] इंदूरचे माजी महाराज (हल्लीं गादीचा राजीनामा दिलेले) श्री० तुकोजीराव होळकर यांची दुसरी राणी सौ० चंद्राबाईसाहेब ही ताल्चेरकर प्रभु घराण्याची आहे

[१८६] तुकोजीरावांची तिसरी बायको मिस मिलर, हल्लींची शर्मिष्ठादेवी ही ख्रिश्चन लेडी होती तिला नाशिकचे डॉ० कूर्तकोटी यांनीं हिंदुधर्माची दीक्षा देऊन व शर्मिष्ठादेवी असें तिचें नांव ठेवून श्री० तुकोजीराव होळकरांशीं लग्न लावलें

[१८७] इंदूरचे हल्लींचे राजे श्री० यशवंतराव महाराज होळकर यांचें लग्न कोल्हापुरान्तर्गत कागल संस्थानचे संस्थानिक घाटगे यांच्या मुलीशीं झालें



## प्रकरण विसावें

# क्षत्रियांचे मुख्य दोन वंश

१ वंशविचार.

२ सूर्यवंश.

३ चंद्रवंश.

१. **वंशविचार***—क्षत्रियांचे मुख्य दोन वश आहेत एक सूर्यवश आणि दुसरा चंद्रवंश. हीं त्या वंशांचीं नांवे होत हे दोन्ही वश एकाच आदिनारायणापासून उत्पन्न झालेले आहेत कित्येकांनी चार वश मानिले आहेत ते क्रमशः—सूर्यवश, चंद्रवंश शेषवश, ऊर्फ नागवश, आणि ब्रह्मवश हे होत कित्येक ग्रंथकार वरील चार वशांशिवाय अग्निवश नामक एक निराळाच पांचवा वशही मानतात पण अग्निवश नामक या पांचव्या वशास मिळावा तेवढा आधार मुळींच मिळत नाहीं. यासंबधीं जास्त खुलासेवार माहिती अग्निवशाच्या माहितीप्रकरणांत दिलेली आहे नागवश ऊर्फ शेषवंश आणि ब्रह्मवश हे सूर्यवशाचे पोटभेद आहेत. चंद्रवशांत यदुवंश नांवाचा पोट भेद आहे यदुवशास हरिवश असेंही म्हणतात याशिवाय चद्रवशांत हैहय वश, कलिंजर, केरल, पांड्य, चोल, कौशिक, श्येन, शुभा, कान्व इत्यादि अनेक पोटवश होऊन गेले. तसेंच सूर्यवशांतही इक्ष्वाकुवश, रघुवश, लववश, कुशवश इत्यादि अनेक पोटवश निर्माण झाले. मोठा बलाढ्य चक्रवर्ति राजा होऊन गेला म्हणजे त्याच्या नांवावरून किंवा त्याच्या राजधानीच्या मुख्य गांवाच्या नांवावरून पुढें त्याचा वश चालावा अशी प्रवृत्ति होती. मराठा क्षत्रियांचीं ९६ कुळे, रजपुतांचीं ३६ कुळें आणि कायस्थांचीं ४२ कुळें हीं परस्परांशीं बहुतांशीं मिळती असून वरील विधानाची सत्यता पटवितात तीं अशाच वरील कारणानें पडलेलीं आहेत

* महाभारत, अध्याय ४, पृष्ठ २२ श्रीव्यासकृत भविष्योत्तर पुराण, स्कंद-पुराण, सह्याद्रिखड, सिद्धान्तविजय, आणि पडित बलदेव प्रसाद मिश्र यांचा हिंदी भाषेतील राजस्थानचा इतिहास यात क्षत्रियांचे वश आणि वंशावळ्या दिल्या आहेत त्या सर्वांचा मेळ मिळवून या पांच मुख्य ग्रंथांच्या आधारानें ही वशगोत्र व कुळांची माहिती तयार केली आहे रेणुकापुराण, हिंगुलादेविपुराण वगैरे आधुनिक ग्रंथांतही कांहीं माहिती आहे. पण हे ग्रंथ अगदी अर्वाचीन काळचे असून यांची गणना खऱ्या पुराणांत नाहीं शिवाय त्यांतील माहिती इतर ग्रंथांशीं मिळत नसून असबद्ध, व अंध-श्रद्धेने लिहिलेली अशी दिसते. म्हणून ती विश्वसनीय मानतां येत नाहीं पण वरील पांच ग्रंथांत साधारणतः चांगला मेळ परस्परांशीं मिळविलेला आहे

पण या सर्व पोटवंशाचा अंतर्भाव सूर्यवंश व चंद्रवंश या दोन मुख्य वंशांतच होतो. सूर्यवंशाचें प्रारंभींचें राज्यस्थान शरयूतीराचे अयोध्या व त्याच्या आसमंतातील भाग असून चंद्रवंशाच्या विशाल शाखा ययातीच्या काळापासून गंगा-यमुनेच्या कांठच्या प्रयाग, अलाहाबाद वगैरे लांबलांबच्या प्रदेशांत पसरलेल्या होत्या ह्या दोन वंशांच्या दोन निरनिराळ्या टोळ्या उत्तरेकडून खैबर घाटांतून सुमारें ६००० वर्षांच्या पूर्वी हिंदुस्तानांत आल्या याबद्दल वेदांत आधार आहे

**२. सूर्यवंश**— मूळपुरुष आदिनारायण ऊर्फ विष्णु विष्णु म्हणजे इंद्राचा भाऊ हा देवादिकांच्या—वैकुंठाचा पहिला राजा होता हिमालयांत कैलास पर्वताचे बाजूनें वैकुंठ पर्वताचे शिखर आहे विष्णूस म्हणजे आदिनारायणास क्षत्रियच मानलें आहे. विष्णूचा पुत्र ब्रह्मदेव ऊर्फ ब्रह्मा, ब्रह्मदेवाचा पुत्र मरीचि, मरीचीचा पुत्र कश्यप, कश्यपाचा पुत्र विवस्वान ऊर्फ सूर्य याच सूर्यापासून म्हणजे आदिनारायणानंतर पांचव्या पिढीपासून सूर्यवंश प्रसृत झाला सूर्याचा पुत्र वैवस्वतमनु, या मनूला **ईला** नावाची एक मुलगी होती तिचा विवाह चंद्रपौत्र बुधाशी झालेला होता या **ईलेला** पृथ्वी मानतात कारण इच्यापासून पुढें जो विस्तीर्ण वंशविस्तार झाला त्या वंशाला चंद्रवंश हें नांव पडलें मनूला नऊ पुत्र होते त्या नऊ पुत्रापासून सूर्यवंशात निरनिराळ्या नऊ अशा शाखा उत्पन्न झाल्या त्या सर्वांत वडील पुत्र इक्ष्वाकु नावाचा होता या इक्ष्वाकूपासून सूर्यवंशांत अयोध्येचे इक्ष्वाकुकुल म्हणजे श्रीरामचंद्रप्रभूचे कुल निर्माण झालें इक्ष्वाकूला शंभर पुत्र होते त्याच्यापासून निरनिराळे पोटवंश निर्माण झाले या इक्ष्वाकुकुलांतच प्रभु रामचंद्राचा अवतार झाला सूर्यापासून चवतिसावे पिढींत सुप्रसिद्ध श्रियाळ राजा झाला त्याची राणी चांगुणा नावाची असून ती मोठी सत्वशील होती अजूनही व्यवहारांत तिचें जाज्वल्य सत्त्व लोकविश्रुत आहे, याचें प्रमाण **'सत्वाची चांगुणा'** हा लोकभाषेतील रूढ शब्द होय या सत्त्वशील, उदार आणि धैर्यवान दांपत्याने आपला एकुलता एक पुत्र **चिलयाबाळ** यास कापून व राणी चांगुणानें त्याचें मस्तक उखळांत काढून अतिथिरूपानें इच्छाभोजन मागण्यास आलेल्या श्रीशंकरास पुत्रमांसाचे इच्छा भोजन देऊन तृप्त केले होतें अशा रीतीनें त्यांनीं आपला सत्त्वशीलपणा प्रगट केला होता सत्त्वाची कसोटी लागल्यामुळे श्रीशंकर त्यांच्यावर प्रसन्न होऊन पुढें शंकराने त्यांचा पुत्र जिवंत केला अशी कथा आहे

याचवंशात राजा हरिश्चंद्र व तारामती राणी व त्यांचा पुत्र रोहिदास हे लोकविश्रुत आहेत विश्वामित्र ऋषीनें हरिश्चंद्रापासून स्वप्नात राज्यदान घेतले आणि जागा झाल्यावर हरिश्चंद्राजवळ राज्यदानाची दक्षिणा मागितली वचन पाळण्यासाठीं राजा हरिश्चंद्रानें स्वतःस व राणीस आणि पुत्रासही विकून घेतलें आणि विश्वामित्रास सुवर्णदक्षिणा दिली त्यामुळें विश्वामित्रानें प्रसन्न होऊन स्वतःचे साठ हजार वर्षांच्या तपश्चर्येचें पुण्य आणि अगणित राज्यवैभव त्यांना परत दिलें. अशी ही हृदयस्पर्शी कथा फार सुंदर रीतीनें पुराणांत वर्णिली आहे

सूर्यवशाचे ४३ वे पिढींत सगर राजा झाला त्यानें सागरास जिंकलें होतें ४७ वे पिढींत भगीरथ राजा झाला त्यानें कैलासातून भागीरथी ऊर्फ काशीची गंगा नदी मृत्युलोकांत आणिली. बद्रिनारायणाचे उत्तरेस हिमालयांत कैलास पर्वत नांवाचें शिखर आहे. तें हिमाच्छादित असल्यामुळें दुर्गम आहे. त्या भागांतून भागीरथी नदी निघाली. ती बद्रिनारायण, हरिद्वार, वगैरे शकराच्या तीर्थस्थानांवरून काशीस भगीरथानें आणल्यावरून तिला भागीरथी म्हणतात सूर्यवशाचे ६२ वे पिढींत रघू राजा नांवाचा सुप्रसिद्ध राजा झाला. त्याचें वशजास रघुवंश हें नाव पडलें हल्ली हिंदुस्तानात रघुवशी रजपूत व इतर क्षत्रिय पुष्कळ आहेत

६४ वे पिढींत नळ राजा झाला. तोही मोठा उदार होता नलदमयती आख्याना मध्यें तत्संबधीं विस्तृत माहिती मिळू शकते पुढें सूर्यवशाचे ६५ वे पिढींत श्रीरामचंद्रप्रभूचा अवतार झाला श्रीरामचरित्राचा सुप्रसिद्ध ग्रथ रामायण नांवाचा आहे श्रीरामचंद्राचे पुत्र लव आणि कुश हे होत या दोन पुत्रांना श्रीरामचंद्रानें आपले राज्य वाटून दिलें या दोन पुत्रांपासून पुढे दोन कुळें निर्माण झाली लववशियाना रेवे, लेवे ऊर्फ लववशी म्हणतात कुशवशियाना कच्छवे, कच्छवाह, कूरम, कूर्म, कुर्मा, कुळबी असें म्हणतात. कूर्म म्हणजे कच्छ कांसव ऊर्फ कछवा

विदेह देशचा राजा जनक आणि विश्वामित्र ऋषि हे सूर्यवशातच झाले विश्वामित्र हें सूर्यवशांतील मुख्य गोत्रापर्की एक गोत्र आहे विश्वामित्र ऋषि श्रीरामचद्राचे समकालीन होता विश्वामित्र नावाचा राजा चद्रवंशांतही ४५ वे पिढींत झाला म्हणून विश्वामित्र हें गोत्र चंद्रवशांतही चालू आहे

अदाज ४५००–५००० वर्षांपूर्वी श्रीरामचद्राचा अवतार झाला श्रीरामचद्राचे वशांत ११९ वा राजा बाप्पा रावळ इ० सन ७१४ चे सुमारास होऊन गेला श्रीरामचंद्रापासून बाप्पा रावळपर्यंतच्या साडेतीन किंवा चार हजार वर्षात फक्त ११९ पिढ्या मानणें असभवनीय आहे अशी येथे शका येते. पण येथे एक गोष्ट लक्षात ठेविली पाहिजे ती ही कीं, इक्ष्वाकूला १०० पुत्र होते त्याच्यापासून पुढे निरनिराळे वश झाले प्रत्येक वशाचे शाखेंत अनेक राजे झाले सूर्यवशी व चंद्रवशी याच्या अनेक वेळां लढाया झाल्या असा आर्यांचा इतिहास आहे. त्यात फक्त सुप्रसिद्ध राज्यकर्त्या राजांचींच नांवें इतिहासात व पुराणांत आलेली आहेत मधल्या पुष्कळ शाखाच्या पुष्कळ पिढ्या राज्याच्या अभावामुळें लोपल्या जाण्याचा सभव आहे, त्यामुळें ह्या पिढ्या कमी दिसतात हीच गोष्ट इतर वशजांच्या पिढ्या मोजतांना देखील लागू पडते म्हणजे सुप्रसिद्ध राजांचीं नांवें हिशेबांत धरलीं गेली, व अप्रसिद्धांची सुटली गेलीं. शभर वर्षांत सरासरी तीन पिढ्या पडतात याच हिशेबाने पिढ्या मोजण्याची विद्वानाची सर्वसमत रीत आहे तीच सरासरी येथेही लागू पडते सबब ती कालगणना सभवनीय दिसते म्हणूनच ही कालगणना घोंटाळ्याची कशी झाली हें वर दर्शविलें आहे.

सूर्यापासून गेहलोद, ऊर्फ सिसोदिया वशाच्या उत्पत्तीपर्यंतची वंशावळ पुराणांत-

भागवतांत आठव्या स्कंदांत दिली आहे व बाप्पा रावळपासून पुढील वंशावळ राजस्थान नांवाच्या ऐतिहासिक ग्रंथांत दिली आहे

सूर्यवंशांत रामचंद्रापासून ११९ वा राजा बाप्पा रावळ † झाला हा रावळ कुळाचा मूळपुरुष होय बाप्पा रावळ हा अत्यंत पराक्रमी असा सार्वभौम राजा होऊन गेला त्याचे नावानें रावळ कुळ क्षत्रियांत चालू झालें बाप्पा रावळाचा जन्म मूळच्या गुहिलोद कुळांत झाला व बाप्पा रावळपासून गुहिलोद वंशात रावळ ही पोटशाखा निघाली रावळकुळाचें वर्णन उत्तर हिंदुस्तानच्या क्षत्रियांच्या कुळांत, कुळगोत्राच्या तक्त्यांत नंबर ३० वर केलेलें आहे. बाप्पा रावळनें काबूल, कंदाहार, तार्तार व सौराष्ट्र इत्यादि देशांवर राज्य करून तिकडील यवन राजवंशाच्या अनेक राजकन्यांशीं स्वत लग्ने केलीं त्यापासून त्याला १३० पुत्र झाले त्यांपैकीं ९८ हिंदुस्तानांतील राजकन्यांपासून व ३२ काबूल कंदाहारच्या राजकन्यांपासून झाले होते त्या १३० पुत्रांपासून राजपुत्रांच्या एकदर ३५ कुळांचा विस्तार झाला त्या सर्व राण्या आर्यवंशीच होत्या चंद्रवंशांत ३६ वा राजा यवन नांवाचा झाला त्याच्या वंशजांस यवन वंश हे नाव पडले या यवन राजाचा नातू यवनीर नांवाचा होऊन गेला तसेंच सूर्यवंशांत सातवे पिढीत यवनाश्व राजा झाला त्याचेही वंशजांस यवन हें नांव पडलें यावरून यवन म्हणजे म्लेंच्छ किंवा मुसलमान असा त्याचा अर्थ नसून यवन म्हणजे चंद्रवंशी व सूर्यवंशी यवन शाखेचे आर्य क्षत्रिय असा त्याचा अर्थ आहे.

मुसलमानी धर्माचा संस्थापक महमद हा अरबस्तानांत सातवे शतकांत होऊन गेला. तो इ० सन ६३२ मध्ये अरबस्तानांत मरण पावला दहावे शतकापर्यंत हिंदुस्तानांत व त्याच्या उत्तर भागांत मुसलमानाचें राज्य मुळींच नव्हतें यावरून बाप्पा रावळचे वेळीं म्हणजे जन्म इ० सन ७०८ ते राज्यसंन्यास इ० सन ७६३–या ५०–६० वर्षांत हिंदुस्तानच्या आसपास मुसलमानांचें राज्य मुळींच नव्हतें

त्याच्या स्वाऱ्या झाल्या होत्या, पण त्याचा इकडे जम बसला नव्हता त्या काळीं आर्य क्षत्रियाचीं निरनिराळ्या वंशाची राज्यें मध्य एशियांत भरभराटात होतीं आणि यावरूनही बाप्पा रावळने यवन राजवंशांत केलेलीं लग्नें आर्य क्षत्रियांचे वंशांतच केलीं असें सिद्ध होतें यवन या शब्दामुळे बाप्पा रावळचे वंशज म्हणजे राजपूत हे मुसलमानांचे वंशज आहेत असा त्यांचेवर कित्येक लोक आरोप करतात, पण तो वृथा व निराधार असून ऐतिहासिक सत्य वरीलप्रमाणे आहे

मेवाडचे राणाजींचे पूर्वजांपैकीं महारथि, अतिरथि, अचलसेन, कवळसेन, कनकसेन इत्यादि दिग्विजयी राजे याच सूर्यवंशात झाले उदेपूरचे भोसाजी राणा व त्यांचे पुत्र देवराजजी राणा हे सूर्यवंशातच होऊन गेले. भोसाजी राणा यांचे पुत्र देवराजजी राणा हे प्रथम दक्षिणेंत आले व वसाहत करून राहू लागले. भोसाजी राणा यांच्या नांवावरून उदेपूर-

† श्रीमद्भागवत, अध्याय ९ आणि राजस्थान, कर्नल टॉड्कृत ऐतिहासिक ग्रंथ

च्या या सिसोदिया वंशास भोसले हें नांव दक्षिणेंत पडलें कंपनीसरकारच्या शिक्का-मोर्तबाची सिसोदिया ऊर्फ भोसले घराण्याची वंशावळ सातारच्या शेवटच्या राजे श्रीमंत प्रतापसिंह राणा महाराज यांना इंग्रज सरकारनें इ० सन १८३९ सालीं कोंकणी भट्टांच्या अत्यंत निमकहरामपणाच्या, अंगावर शहारे येण्यालायक अगदींच नीचपणाच्या खोट्या कारस्थानामुळे पदच्युत केल्यावर त्यांनीं आपल्या विलायतच्या अपिलांत दाखल केली होती त्या वंशावळींत सर्व नांवें वर दर्शविल्याप्रमाणें लिहिलेलीं आहेत त्या वंशावळींत* उदेपूरच्या राणाजींचे वंशज आणि सातारच्ये भोसले व कोल्हापूरचे भोसले राजघराण्याचे पूर्वज एकच असल्याचें स्पष्ट सिद्ध झालें आहे त्यावरून पहातां भोसाजी राणा यांचेपासून उत्पन्न झालेले दक्षिणेंतील भोसले घराणें आणि उत्तरेचें ( उदेपूरचें ) सिसोदिया ( अगदीं मूळचें गेहलोद घराणें ) हीं एकच आहेत हें सप्रमाण सिद्ध होतें

३ **चंद्रवंश**—आदिनारायणाचा म्हणजे विष्णूचा पुत्र ब्रह्मदेव ऊर्फ ब्रह्मा नांवाचा होता त्या ब्रह्मदेवाचा एक पुत्र मरीचि याचेपासून सूर्यवंशाची शाखा फुटली त्याचें वर्णन सूर्यवंश प्रकरणीं वर दिलेलेंच आहे ब्रह्मदेवाचा दुसरा पुत्र अत्रि, अत्रीचा पुत्र समुद्र, समुद्राचा पुत्र चंद्र, चंद्राचा पौत्र बुध, या बुध राजास सूर्यवंशापैकीं मनूची कन्या **ईला** ही दिली होती **ईला** ही पृथ्वी मानली गेली व तिच्यापासून झालेल्या संततीस चंद्रवंश हें नांव चालू झाले बुधाचा पुत्र पुरूरवा याला सहा पुत्र होते त्यांपैकीं आयु आणि यावो या दोन पुत्रांना अनुक्रमें तार्तार व चीनमधील लोक आपापले मूळ पुरुष मानतात यावरून तार्तार, तिबेट आणि हिंदुस्तान येथील लोकांचे पूर्वज हे मूळचे एकच आहेत असें दिसून येते

चंद्रवंशांतील सुप्रसिद्ध व पराक्रमी राजांच्या नांवांवरून अनेक वंश-शाखा निर्माण झाल्या त्यांपैकीं एका शाखेंत चंद्रापासून ३२ वे पिढींत हस्ति नामक राजा झाला त्यानें दिल्लीजवळ हस्तिनापूर नामक नगर वसवून तेथें मोठा किल्ला बांधला बुधापासून ४४ वे पिढींत यदु नामक एक सुप्रसिद्ध राजा झाला हा ययाति राजाच्या देवयानी नामक राणीचा वडिल पुत्र होता. त्याचे वंशजास यादव म्हणतात याच चंद्रवंशाचे ५५ वे पिढींत यादव वंशांत धर्म, भीम, अर्जुन, नकुल व सहदेव वगैरे पांच पांडव ( पंडूपासून झाले ते पांडव ) आणि दुर्योधन वगैरे कौरव १०१ ( कुरूपासून झालेले कौरव ) होऊन गेले चंद्रवंशाच्या यादव कुळाच्या दुसऱ्या एका शाखेच्या ५७ वे पिढींत सुप्रसिद्ध प्रभु गोपाल श्रीकृष्णाचा अवतार झाला चंद्रवंशाच्या एका शाखेच्या ५८ वे पिढींत कंस नामक राजा झाला द्रुपद राजाची मुलगी द्रौपदी ही चंद्रवंशाच्या एका शाखेंत चंद्रापासून ४९वे पिढींत झाली तिचें लग्न पांडवांशीं झालें होतें श्रीकृष्ण, पांडव आणि कौरव हे यादव कुळांतीलच होत. यादवांचीं एकंदर निरनिराळीं ५६ कुळें होतीं. म्हणूनच **छप्पन कोटी यादव** असें म्हणण्याचा प्रघात आहे. या ठिकाणीं 'कोटि' हा शब्द सख्यादर्शक नसून तो

* सिद्धान्त-विजय ग्रंथांतील परिशिष्ट ९, पृष्ठ १३१ पाहा

-दर्जाचा दर्शक आहे जसें, अमुक एक मनुष्य देव कोटींतील आहे, अगर राक्षस कोटीं-तील आहे यापमाणेंच येथें 'कोटि' या शब्दाचा अर्थ घ्यावयास पाहिजे छप्पन कोटी या शब्दानें येथें निरनिराळ्या दर्जाच्या ५६ कुळांचा बोध होतो

प्रमार ऊर्फ पवार ही यादव कुळाचीच एक शाखा आहे पांडव प्रमार ऊर्फ पवार शाखेचे यादव होते. प्रमार वशाला सूर्यवशीही मानतात चद्रवशाचे दुसऱ्या एका शाखेंत हैहय नामक राजा झाला त्याचे वशजास हैहय म्हणतात या हैहय वंशांतच पुढें कलचुरी वश निर्माण झाला चांद्रसेनीय कायस्थ प्रभु आपणांस हैहय वशी कलचुरी म्हणवितात या हैहय वशांतच सुप्रसिद्ध राजा कार्तवीर्य आणि त्याचा पुत्र सहस्रार्जुन हे अनुक्रमे २७ व २८ वे पिढींत झाले मातृहत्या करणाऱ्या दुष्ट परशुरामाचा पराभव याच सहस्रार्जुनाचे पुत्रानें केला सहस्रार्जुनाला १०० पुत्र होते त्यांचे नावांनीं निरनिराळे १०० वंश चालू झाले २८ वे पिढींत जन्मलेला राजा शकुतल याला ४ पुत्र होते एक कालिंजर, २ केरल ३ पांड्य व ४ चोल या चौघांनीं आपापल्या नावानी ४ नवीन देश वसवून प्रत्येकानें आपापल्या नांवाचा वश चालविला ४५ वे पिढींत राजा कुशिक झाला कुशिकचा पुत्र गाधि व गाधीचा पुत्र सुप्रसिद्ध विश्वामित्र होय विश्वामित्र हा गाधीचा पुत्र असल्यामुळें आणि कुशिकाचा नातु असल्यामुळें त्याला गाधिज अथवा कौशिक असेंही म्हणतात विश्वामित्र नावाचा राजर्षि सूर्यवशांतही होऊन गेला ५६ वे पिढींत राजा परिक्षिति झाला या परिक्षितीला तक्षक उर्फ नाग नांवाच्या नागवशी राजानें पादाक्रांत करून नामशेष केलें अशी कथा पुराणांत आहे

याप्रमाणें क्षत्रियांचे मुख्य वश जे सूर्यवश व चद्रवश तत्संबधी उपलब्ध असलेली माहिती वर दिलेली आहे चद्रवश व सूर्यवश हीं नांवे क्षत्रियाच्या वशांस कां पडलीं याचें हे विवरण दुसऱ्या बाजूनें झालें असून अगदीं पहिल्या प्रकरणीं चद्र-सूर्य वशां-विषयी जे विचार प्रकट केले आहेत तेही अवश्य लक्षात ठेवण्यासारखे आहेत.



श्रीमंत सरकार

सयाजीरावमहाराज गायकवाड



बडोदा संस्थानाधिपति

## प्रकरण एकविसावें

# नागवंश, यदुवंश ऊर्फ हरिवंश आणि ब्रह्मवंश

१ नागवंश ऊर्फ शेषवंश.
२ यदुवंश ऊर्फ हरिवंश.
३ ब्रह्मवंश

**१. नागवंश ऊर्फ शेषवंश**—सूर्यवंशापैकींच दुसऱ्या एका शाखेंत नंदिवर्धन ऊर्फ तक्षक नांवाचा राजा झाला या राजानें परिक्षितीला मारून त्याच्या राज्याचा विध्वंस केला हा तक्षक ऊर्फ नागवंशाचा पहिला राजा होता. यानें आपलें राज्य तक्षक ऊर्फ शेषनाग किंवा शिशुनाग नामक आपल्या वंशजास अर्पण केलें हे राजे आपल्या नांवापुढें **नाग** हें उपपद लावीत असत. जसें, शिशुनाग, अजयनाग इ० म्हणूनच यांना नागवंशी म्हणतात त्यांच्या ध्वजावर नागाचें चिन्ह असे हे नाग वंशी राजे इ० सनापूर्वी ४०० ते ५०० वर्षांचे सुमारास होऊन गेले नागवंश ऊर्फ शेष-वंश हें सूर्यवंशापैकीं एका पोटवंशाचें नांव आहे नाग म्हणजे सर्प असा त्याचा अर्थ नाहीं हे आर्य क्षत्रिय होते इ० सनापूर्वी झालेला विक्रमादित्य हा चंद्रवंशी होता सेन, शुंग, कान्व इत्यादि वंशाचें राजे चंद्रवंशीच होते हल्लींचे ग्वाल्हेरचें सुप्रसिद्ध शिंदे घराणे सूर्य-वंशाच्या पोटभेदापैकीं नागवंशाचें आहे त्यांचे नाण्यांवर आणि राजचिन्हांवर व निशाणावर सूर्याचें व नागाचें चित्र असतें सूर्यवंशापेक्षां चंद्रवंशाचा विस्तार फारच मोठा होऊन गेला इंद्रप्रस्थ, दिल्ली, मगध देश, मथुरा, द्वारका, हिमालय, काबूल, कंदाहार चीन वगैरे भागांत चंद्रवंशाचें प्राबल्य जास्त होतें नागवंशी क्षत्रिय राजे आपल्या राज चिन्हांवर नागोबाचें व सूर्याचें वंशदर्शक चित्र काढतात, ही त्यांची मोठी भूल आहे नागवंशी राजे नाग म्हणजे सर्प योनींतील नव्हते ते हत्तीप्रमाणें बलाढ्य असे मानवच होते नाग हें नांव हत्तीचें आहे अमरकोश पाहिला म्हणजे हत्तीस नाग म्हणतात याची सत्यता पटेल हत्तीप्रमाणें बलाढ्य म्हणून नागवंश असें त्यांचें सार्थ अभिधान होतें

पांडवप्रतापामध्यें पट्टणकुड (पाटणा) मगध देशाचे राजे जरासंध, कलिंग देशचा राजा शिशुपाल, मद्र देशचा राजा शैल, (माद्रीचा बंधु) हे सर्व नागवंशी होते, असा उल्लेख असून त्या वेळच्या ब्राह्मणांस या प्रखरतर शौर्यशाली राजे लोकांचें वैभव अप्रिय अस-ल्यामुळें या सम्राटांच्या कथा रसभरित रीतीनें कोणीं लिहिल्या नाहींत. भिक्षुकी पुराणांत यांच्या विरुद्धच गोष्टी लिहिल्या आहेत. पोथ्या लिहिणाऱ्यांना चांगल्या गोष्टी दिसल्याच नाहींत !

अर्जुन एक वर्षभर अज्ञातवासांत असतां मद्र देशांत गेला होता तेथील नागवंशी राजाची कन्या त्यानें वरून आणली होती पांडवांचे वेळीं नागवंशीय राज्यें भरभराटीस आलेलीं होतीं मद्रासचे बाजूस अजूनही हे क्षत्रिय नागभूषण वागवितात व नागाची पूजा वगैरे करितात तिकडील भागांत नसेंदी, तुरुमक वगैरे लहान लहान सस्थानें नागवंशीय सेंद्रिक ( शिंदे ) या नांवानें प्रसिद्ध आहेत हे शिवशक्तीचे भक्त आहेत. तिकडील राजे लोक व नागरिक अजूनही पार्वतीची भक्ति मोठ्या भावानें व उल्हासानें करीत असतात दुसरी गोष्ट अशी आहे की, देवि आदि शक्ति पुराणांत अशी कथा आहे की, शिवाचा शेवटचा मुलगा शेष या नांवाचा होता तो पातालांत आपल्या मातोश्री जगदबा ( भवानि, पार्वती ) चा शोध करीत करीत अहकावति नगरांत प्रवेश करिता झाला, आणि त्याच ठिकाणीं राहून त्याने राज्य स्थापिले व आदिशक्ति अबा, कालिका या देवतांचा उपासक झाला तोच शेषवश आज चोंहोकडे पसरलेला आहे यावरून नागवशी लोक हे सर्प योनींतील नसून ज्यांच्या नांवापुढें **नाग** ही पदवी लावीत असत त्यानाच नाग-वंशी म्हणतात

शिवाची खूण म्हणून कोणी एकमुखी तर कोणी पचमुखी नागाचीं चिन्हे निशाणावर गैरसमजुतीच्या अधश्रद्धेने लावीत असतात सेंद्रिक या शब्दांपासून पुढे शिंदे या नांवांत त्याचें रूपातर झालें बदामीचा राजा दुसरा पुलकेशी ह्याचा मामा नागनदराज ह्याने दगडी स्तभावर कोरलेला लेख अजूनही मुबई म्युझियम् मध्यें आहे त्यांत चालुक्यांचे पूर्ण भरभराटीचे वेळेस सेंद्रिक ऊर्फ शिंदे तीन राजकुळांचे होते असें म्हटले आहे तीं तीन राजकुळें म्हटलीं म्हणजे विजयसिंदा बादामी ऊर्फ भोगावति पुरवराधीश्वर महाराव, कुर्वासेंद्रिक ऊर्फ सिंदा पट्टणकुड, पुरवराधीश्वर महाराव आणि कोनाड पुरवराधीश्वर महा-राव हीं होत या तीन राजघराण्याचा शरीरसबध-कदब ऊर्फ कदम, शिलाहार ऊर्फ शेलार आणि चालुक्य ऊर्फ साळुके ह्या राज्यघराण्यांशीं होता. त्या वेळीं करवीरास शेलारवशीय राजे राज्य करीत होते बगालकडील सेन हे उपपद नावापुढें लावण्याची चाल सेंद्रिक या शब्दापासूनच पडली

त्यानतरचा काळ यादव ऊर्फ जाधव घराण्याचा राजा रामदेवराव ह्याचा बारावे शतकाचे अखेरचा झाला त्या वेळीं मुसलमानी अमदानींत हीं राज्ये बहुतेक तुरळक तुरळक अशीं राहिलेलीं होतीं त्यानतर शिवकालापासून या घराण्यांतील लोक हळू हळू पुढें येऊ लागले श्रीशिव छत्रपतींच्या सरदारांपैकीं कऱ्हाडकडील भागावरील सरदार नेमाजीराव शिंदे हा होता नतर हळु हळ या घराण्यास पुढे होण्यास जसजशी सवड मिळाली तसतसे विजापुरकराच्या आश्रयानें अहमदनगरकराचे बाजूने बरींच घराणीं देशमुखी, पाटीलकी वगैरे वतनें करून राहिला पुरदर किल्ल्याची किल्लेदारी काहीं दिवस करून त्या आश्रयाखालीं कण्हेरखेड, पणदरा, लोणन्द, बीरवाडी वगैरे भागांत शिंद्याचीं घराणीं नामांकित झालीं त्यातील पुरुषानींच ग्वाल्हेरचे राज्य स्थापन केले



कै० लेफ्टनंट जनरल श्रीमंत **माधवरावसाहेब शिंदे**, अलिजाबहादर.

ग्वाल्हेरच्या शिंदे घराण्याचा मूळ पुरुष राणोजी कण्हेरखेडचा देशमुख पाटील वतनदार होता याप्रमाणें नागवंश ऊर्फ शेषवंशाची ऐतिहासिक माहिती आहे

२. **हरिवंश ऊर्फ यदुवंश**—चंद्रवशी ययाति राजाचा वडील पुत्र यदु याचे-पासून पुढें यदु ( यादव–जाधव ) वंश चालू झाला असें चंद्रवंशासंबंधीं माहिती देतांना मागील प्रकरणीं सांगितलेलेंच आहे या यदूच्या वंशजांना यादव ऊर्फ जाधव असें नांव पडलें.यादव याबद्दल जाधव अगर जाधव याबद्दल यादव असा शब्दप्रयोग भाषेचे दृष्टीनेंही विसंगत होत नाहीं 'य' बद्दल 'ज' हें अक्षर पुष्कळ ठिकाणीं वापरण्यांत येतें जसें, यजमान बद्दल जजमान, युयुत्सुबद्दल जुजुत्सु इत्यादि 'यकारो जकारो भेद नास्ति' असा नियमही आहे यदुवंशांतच प्रभु श्रीकृष्णाचा अवतार झाला श्रीकृष्णाला हरि असेंही म्हणतात. म्हणूनच यदुवंशास हरिवंश असें नांव पडले हरिवंशपुराण याच कारणामुळें जन्मास आलें

३. **ब्रह्मवंश**—सूर्यवंशात ब्रह्मदत्त नावाचा एक चक्रवर्ति राजा झाला तेव्हांपासून त्याच्या वंशजांस ब्रह्मवंश असे नांव प्राप्त झालें गुजरार्थेत ब्रह्मवंशी क्षत्रियांची लोकसंख्या पुष्कळ आहे ब्रह्मभाट नांवाने प्रसिद्ध असलेले भाट ऊर्फ ठाकुर लोक हे ब्रह्म क्षत्रियच आहेत भट म्हणजे योद्धा–वीर पुरुष वीर्यशाली–शौर्यशाली गुण ज्याच्या अंगात आणि वाणींत आहेत तेच वीर्यशाली भाट-भट म्हणजे वीर–भटाचे गुण ज्याच्या अंगांत पूर्णपणें वास करितात तेच भाट–अर्थात् परावलंबी भट्ट नव्हे असा भाट या शब्दाचा क्षात्रगुणदर्शक अर्थ आहे

इतिहासात प्रसिद्ध असलेल्या प्रति भीमसेन नावाच्या ब्रह्मवंशी आर्य राजाने काबूल-च्या राजकन्येचे पाणिग्रहण केले होते तदनंतरच्या एका पारसिक चक्रवर्तीनें काबूलच्या आर्यवंशी राजकन्येशीं विवाह केल्याचा दाखला इतिहासांत आहे पारसिक साम्राज्यात काबूल आणि झाबूल म्हणजे हल्लींचा गिजनी प्रांत व सिंधुनदीच्यापर्यंतचा मुलुख देखील समाविष्ट झालेला होता अर्थात त्या मुलखातील लोक व काबूलचे तत्कालीन राजे देखील निःसंशय आर्यवंशी असून त्यांचा एकीकडून पारसिक आर्योंशी व दुसरीकडून भारतीय आर्योंशीं विवाहसंबंध* घडत असे इ० सन १०२० चे सुमारास तुर्क लोकांनी काबूल जिंकले त्यापूर्वी तेथें आर्यक्षत्रियाचे राज्य चालू होते म्हणूनच हिंदुस्तानातील आर्य राजवंशाशीं त्याचे बेटीव्यवहार राजरोसपणे चालू होते

ह्यूएनत्संग हा चिनी प्रवासी इ० सन ६२० या वर्षीं काबुलांत गेला होता त्याने आपल्या प्रवास-वर्णनांत असें स्पष्ट लिहून ठेवलें आहे की, इ० सनाच्या सातव्या शतकात काबूल प्रांतांत बौद्ध धर्मीय क्षत्रिय घराणे राज्य करीत होते तें आपणास शहा म्हणवीत असे त्यांनीं चिनी, हिंदी व इराणी ह्या तीनही परंपराचा व सुधारणाचा एकत्र मिलाफ केला होता शहा पदवीचा उल्लेख अरब ग्रंथकार आणि राजतरंगिणीकार कल्हण यानेही

---

* कनिंगहॅमकृत हिंदुस्तानचे प्राचीन भूवर्णन, प्रवासवृत्तात्मक परिशिष्ट, पान ५३३.

आपापल्या प्रथांत केलेला आहे गुजराथेंत ब्रह्मवशी क्षत्रिय ( गुजराथी ) पुष्कळ आहेत त्यांच्यांत शहा ही पदवी अजूनही उपनांवाप्रमाणें नांवापुढें वापरतात काबूलची प्रजा सामान्यतः बौद्ध धर्माची‡ होती, परतु लंपाळ आणि गांधार येथील लोक बहुतांशीं हिंदु धर्मांचे होते

रजपुतांचा मूळ पुरुष बाप्पा रावळ यानें काबूल, कंदाहार, गिझनी येथील राजकन्यांशीं विवाह केले होते व त्यापासून पुढें त्यांचा वंश वाढला, असें सूर्यवशासंबंधीं माहिती देतांना मागील प्रकरणीं सांगितलेंच आहे. काबूल-कंदाहार येथील तत्कालीन राजे यवन किंवा शहा असें वशनाम धारण करणारे आर्य होते ते यवन म्हणजे मुसलमान नव्हते ही गोष्ट प्रामुख्यानें लक्षांत ठेवली पाहिजे



‡ राबर्टीकृत अफगाणिस्तान, पान ६२.



जनरल **नानासाहेब सिंदे**, बडोदा आर्मीचे मुख्य सेनापति.

# प्रकरण बाविसावें

# अग्निवंश

इ० सनाच्या नवव्या शतकाच्या प्रारंभीं आद्य शंकराचार्य हा होऊन गेला त्यानें भगवद्गीतेच्या आधारानें उत्तरमीमांसा नामक ग्रथाचें प्रतिपादन करून तीं तत्त्वें जनतेंत प्रसृत केलीं त्या वेळीं हिंदुस्तानांत बौद्धधर्माचा जोर होता शंकराचार्यानें बौद्ध धर्माचीं कांहीं तत्त्वें उत्तरमीमांसेंत घेऊन बौद्ध धर्म व आर्य धर्म यांच्या मिश्रणाचा सध्याचा हिंदु-धर्म स्थापित केला हा हिंदु धर्म प्रस्थापित करतांना शंकराचार्यांचे कार्यास पूर्ण आश्रय पवार ऊर्फ प्रमार, प्रतिहार, चव्हाण आणि साळुंके या कुळांतील क्षत्रिय राजांनींच दिला बौद्ध धर्माचा प्रवाह या राजांनी आपल्या सत्तेच्या जोरावर चांगल्या रीतीनें हटविला होमहवनांतील अग्निनारायणाच्या कृपेनें या चार कुळांतील राजांनीं अग्नीप्रमाणे बौद्ध धर्माची राखरांगोळी केली, म्हणून तेव्हांपासून त्या चार कुळांना अग्निवंशी म्हणू लागले वसिष्ठ ऋषीच्या अग्निकुंडांतून या चार वंशांचे मूळ पुरुष निर्माण झाले अशी एक दंतकथा आहे, पण ती निराधार आहे कारण वसिष्ठ ऋषि श्रीरामाचे काळीं होऊन गेले, आणि अग्निवंशाची उत्पत्ति आबू पर्वतावरील यज्ञाचे वेळे-पासून म्हणजे इ० सनाच्या नवव्या शतकापासून झाली, असा सप्रमाण इतिहास आहे. अग्निकुंडांतून मनुष्यजन्म होणें ही गोष्ट असंभवनीय आहे अग्निवंशी म्हणजे यज्ञांतील अग्निनारायणाच्या कृपेनें धर्मसंस्थापनार्थ पुढे आलेले जे वंश ते, असा त्याचा खरा अर्थ आहे

खरोखर पाहिले असतां या अग्निवंशाच्या उत्पत्तीला दुसरे आधार मुळींच नाहींत म्हणून अग्निवंश हा वंश आधारभूत वंश नसून प्रक्षिप्त वंश आहे वरील चार कुळांतील प्रमार ऊर्फ पवार हे चंद्रवंशी क्षत्रिय असून दक्षिणेंचे पवार सूर्यवंशी वसिष्ठ गोत्री आहेत प्रतिहार, चव्हाण व साळुंके हे सूर्यवंशी क्षत्रिय आहेत अर्थातच अग्निवंश हा खरा वंश नाहीं वरील चारही कुळे क्षत्रिय मराठा जातीच्या ९६ कुळांपैकीं आहेत

अग्निकुलाची कल्पना निराधार आहे ही गोष्ट शिलालेखावरून व व इतर ऐति-हासिक पुराव्यानेही सिद्ध होते सूर्यवंश व चंद्रवंश ह्यांचा जसा वेदांतही उल्लेख आहे तसा या अग्निवंशाचा नाहीं वसिष्ठ ऋषीनें अग्निकुंडातून चार क्षत्रिय कुळे निर्माण केलीं, ही गोष्ट पृथ्वीराजरासा नामक ग्रंथांत चंदभाटानें अगदीं प्रथमतः लिहिली आहे. नवव्या शतकापासून तों बाराव्या शतकांतील पृथ्वीराज व चंदभाट यांच्या कालापर्यंतचे शिलालेखावरून असें सिद्ध होतें कीं, चौहान, प्रतिहार हे सूर्यवंशी क्षत्रिय आहेत आणि लोकही तसेच मानीत होते उदाहरणार्थ, ज्या प्रतिहारांनीं* कनोज येथें साम्राज्य

---

* ग्वाल्हेर येथील दहाव्या शतकांतील भोजाचा शिलालेख पाहा

स्थापिलें ते रामचद्राचा बंधु लक्ष्मण याच्या वशांतील आहेत, असें ग्वाल्हेर येथील दहाव्या शतकातल्या भोजाच्या शिलालेखांत नमूद करून ठेवले आहे लक्ष्मण हा रामचंद्राचा प्रतिहारी म्हणजे द्वार रक्षक होता यावरून प्रतिहार हें नांव पडलें असें असतां बाराव्या शतकांत चंदभाट या कुळाला अग्निवशी म्हणूं पाहील तर ऐतिहासिक दृष्ट्या तरी निदान त्या म्हणण्याला किंमत देता येणार नाहीं

पृथ्वीराजरासा व त्यानतरच्या अनेक लेखांत चाहुमान चव्हाण-चाहमान हे सूर्य वशी क्षत्रिय आहेत असें म्हटलें आहे हर्षशिलालेखांत ( ऐ इ २, पान ११९ ) चव्हाणांची वशावळ दिलेली आहे पृथ्वीराजविजय या नावाचें एक काव्य पृथ्वीराजाच्या दरबारांतील एका कवीनें केलेले डेक्कन कॉलेज लायब्ररींत आहे त्या काव्यांत चाहुमानास सूर्यवशी असें स्पष्ट म्हटलेलें आहे अजमेर येथील शिलालेखांतही तसेंच आहे

उत्तरेकडील चालुक्य हे चद्रवशी आहेत, असे उल्लेख शिलालेखांत आहेत दक्षिणचे बदामीचे चालुक्य हेही चद्रवशीच घराणे आहे असें वेंगीच्या शिलालेखांतही म्हटलेलें आहे दक्षिणेच्या चालुक्याचे गोत्र मानव्य आहे उत्तरेचे चालुक्य भारद्वाज गोत्री आहेत चदभाटाने हीच गोत्रे नमूद केलीं आहेत बिलहारि येथील शिलालेखांत असें म्हटले आहे कीं, कैयूर† वर्ष हैहयानें भारद्वाज गोत्रींचा चालुक्य अवनिवर्मा याची कन्या नोहब देवी हिला वरले हा शिलालेख इ० सनाच्या ११ वे शतकाच्या आरभींचा ठरला आहे दक्षिणेकडील परमार हेही वसिष्ठगोत्री सूर्यवशी क्षत्रिय म्हणून प्रसिद्ध आहेत ९६ कुळीच्या पोथींत तर ते सूर्यवशी आहेतच एकूण सारांश हा की,—परमार ऊर्फ पवार, प्रतिहार, चालुक्य आणि चव्हाण हीं चारही कुळे इ० सन १००० चे पूर्वी व तदनतरही बाराव्या-तेराव्या शतकापर्यंत अग्निवशी नसून सूर्यवशी व चंद्रवशी म्हणजे आर्यांच्या मूळच्या वशाचींच म्हणून प्रसिद्ध होतीं अग्निवशाचे नांव तेराव्या शतकापर्यंत कोणत्याही शिलालेखांत सांपडत नाहीं चदभाटाच्या काव्यांत अगदीं पहिल्याने तें नमूद झालेलें दिसते वेदकालीन आर्यांच्या वशात देखील अग्निवशाचे नाव नाहीं अशा रीतीचा हा प्रक्षिप्त अग्निवश आहे त्याचा अनुवाद अधश्रद्धेनें इतरांनीं केला म्हणून कालांतरानें खऱ्या इतिहासाच्या अभावीं तीच समजूत कर्णोपकर्णीं अधश्रद्धेनें रूढ होत गेली असेंच वरील शिलालेखाच्या व इतर ऐतिहासिक पुराव्यानेंही सिद्ध होते याप्रमाणे अग्निवश हा एक कपोलकल्पित व कविकल्पनेवर उभारला गेलेला व अगदीं अलिकडचा वश आहे हा चंद्रवश व सूर्यवशातूनच जन्म पावलेला असून त्याचें जनकत्व चंद्र सूर्यवशा-कडेच आहे



† बिलहारी येथील शिलालेख, ए. इ १, पान २५३.

# प्रकरण तेविसावें

# कालगणना आणि परंपरा

१ राजवंशांची कालगणना

२ दिल्लीची परंपरा.

**१. राजवंशाची कालगणना**—आदिनारायणापासून सातवे पिढींत चद्रवशाचा मूळ पुरुष बुध राजा झाला बुध हा चंद्राचा नातू होता या बुध राजास सूर्य-वशापैकीं सूर्यपुत्र मनूची कन्या **इला** ही दिली होती तिच्यापासून चद्रवश चालू झाला. मनूस एकंदर नऊ पुत्र होते त्यांपैकीं सर्वांत वडील मुलाचें नाव इक्ष्वाकु होतें सूर्यवशात इक्ष्वाकु नांवाचा पहिला राजा अयोध्येंत होऊन गेला त्याचे सहावे पिढीत क्षत्रिय-कुलावर्तंस प्रभु रामचद्राचा अवतार झाला रामचंद्रानंतर ५६ राजपुरुष झाले जयपूर, जोधपूर, उदेपूर, कोल्हापूर येथील राजवश त्या वशापैकींच आहेत जयपूरचे राजे कच्छवाह कुशवशी, असून त्यांची गादी तरवरास होती उदेपूरचे सिसोदेवशी राजे यांची मूळ गादी वल्लभीपुरास होती जोधपूरचे राठोडवशी राजे प्रधान कनोज येथें होते

**२. दिल्लीची परंपरा**—चद्रवशी बुधाचे २७ वे पिढींत हस्ति नांवाचा राजा झाला या हस्ति राजाने प्रथम हस्तिनापूर वसविले. त्याचे २२ वे पिढीत चंद्रवशी परमार ऊर्फ पवार वशांत युधिष्ठिर राजा झाला. तो हस्तिनापूरच्या सुप्रसिद्ध भारतीय युद्धांत विजयी झाल्यानतर त्याने हस्तिनापुरास किल्ला बाधला, आणि त्याला इद्रप्रस्थ हे नाव दिले युधिष्ठिराच्या परमार (तुवर) वशांत ३० पिढ्यापर्यंत इद्रप्रस्थाची गादी राहिली परमार वशाचा तिसावा राजा क्षेमराज याला त्याचा प्रधान विसर्प याने मारून इद्रप्रस्थाची गादी बळकाविली विसर्पाचे घराण्यात ही गादी ३८ पिढ्या चालली अडतिसावा राजा राजपाळ यास कुमायूचा राजा सुखवत याने मारून इद्रप्रस्थाचे राज्य बळकाविले तुवर-वशी विक्रमादित्य यानें ते राज्य त्याचेपासून पुन्हा परत मिळविले तेव्हापासून १९ पिढ्यांपर्यंत ही राजधानी तुवरवशाकडे होती या तुवरवशांतील शेवटचा राजा अनगपाळ तुवर·हा निर्वंश असल्यामुळे त्यानें आपलें राज्य आपल्या मुलीचा मुलगा सूर्यवंशी पृथ्वीराज चव्हाण यास दिलें पृथ्वीराजास कैद करून व त्याचे डोळे काढून आणि त्याचे भयंकर हालहाल करून महमद घोरी यानें इद्रप्रस्थाचें राज्य इ० सन ११९३ मध्यें घेतलें आणि मुसलमान बादशहानें इद्रप्रस्थास दिल्ली हे नांव दिले दिल्ली हे नाव सुमारे ७३३ वर्षांपासून प्रचलित आहे

यावरून स्थूलमानाने फक्त राजकर्त्या पुरुषाच्या पिढ्या पाहतां चद्रवशाच्या उत्पत्तीपासून पृथ्वीराजापर्यंत १३८ राजांच्या पिढ्या व पृथ्वीराजापासून आजपर्यंतच्या

७३२ वर्षांत सुमारें २२ पिढ्या मिळून एकंदर १६० पिढ्या लोटल्या असाव्यात असें वाटतें

चंद्रवंश आणि सूर्यवंश या दोन्ही वंशांची सुरुवात थोड्या फरकानें जवळ जवळच आहे यात राज्यक्रांतीमुळें राजकर्त्यांशिवाय इतर पिढ्या सुटण्याचा विशेष संभव आहे शंभर वर्षांत सरासरी तीन पिढ्या अशा प्रमाणें मानवी पिढ्यांची गणना करण्याची एक विद्वन्मान्य रीत आहे या हिशेबाप्रमाणें पाहतां सूर्य चंद्रवंशाच्या म्हणजे आर्यांच्या भरत-खंडांतील राज्योपभोगाच्या अस्तित्वास आज सुमारें ५३०० वर्षें किंवा राजक्रांतीमुळें सुटलेल्या पिढ्यांसह ६००० वर्षें झालीं असावींत, असें वाटतें

आर्य आणि वेद यांच्या भारतीय प्राचीनत्वासंबधानें निरनिराळ्या विद्वानांनीं अनेक महत्त्वाच्या पुराव्यांवरून* जी कालगणना ठरविली आहे, तिच्याशीं वरील काल-गणनेचा व परंपरेचा मेळ जुळतो

आफ्रिकेंतील साहारा नावाच्या अफाट व दुर्गम अशा वालुकामय शुष्क प्रदेशांत व उत्तर ध्रुवाच्या भागात अलिकडे अगदीं प्राचीन कालच्या मनुष्याचीं हाडे सांपडलीं आहेत त्याच्या आकारावरून व मोजमापावरून आजच्या मानवी आकृतीशीं तुलना केली असतां, सृष्टि उत्पन्न होण्यास आज सरासरी अडीच लाख वर्षें झालीं असावीत, असा अंदाज तज्ज्ञांनीं बसविलेला आहे, पण तो अंदाजच आहे याप्रमाणे कालाच्या भयंकर प्राचीनत्वाचा सूक्ष्म रीत्या मेळ जुळवून त्यासंबधीं ऐतिहासिक विधाने करावयाचीं असल्यामुळें अर्थातच प्राचीन कालगणनेंत थोडाबहुत फरक पडतोच. पण कांहीच माहिती उपलब्ध नसण्यापेक्षा थोडाबहुत फरक पडला अगर परिस्थितीचे सामान्य ज्ञान झाले तरी तीही काहीं लहानसहान गोष्ट नाहीं याच दृष्टीने वर कालगणना व परंपरा दिली आहे व कालाचा शक्य तितक्या रीतीनें मेळ मिळविण्याचा प्रयत्न केला आहे. त्यामध्ये थोडाबहुत फरक असल्यास आम्ही 'कालाय तस्मै नम' म्हणतों !



---

* प्रकरण ६ वे, सदर ग्रंथ पहा.

# प्रकरण चोविसावें

# गोत्रें आणि प्रवरें



**१. गोत्र-प्रवर विचार**—सूर्यवंश, चंद्रवंश, शेषवंश ऊर्फ नागवंश आणि ब्रह्मवंश ऊर्फ यदुवंश ऊर्फ हरिवंश या चार क्षत्रिय वंशात जे सुप्रसिद्ध ऋषि आणि मंत्रद्रष्टे म्हणजे वेदमंत्र रचणारे ऋषि होऊन गेले, त्यांच्या नावावरून त्या वंशाचीं गोत्रे चालू झालीं गोत्रऋषि म्हणजे कुळाचा मूळ ऋषि होय

प्रवरऋषि म्हणजे ज्यानी ऋग्वेदांतील सूक्ते रचिली व त्या सूक्तानी अग्नीची स्तुति केली असे पूर्वज

> " आर्षेय मृषेरपत्यमग्निम् यजमानस्य ऋषि
> संतारवात् तं वृणिते प्रार्थयते होत्रादिभिः "

भावार्थः—यज्ञ करणारा यजमान अग्नीची प्रार्थना करितो की, 'हे अग्ने ! ऋग्वेदा तील सूक्तांनीं ज्यांनीं तुझी सेवा केली आहे अशा ऋषींचा मी वंशज आहें

यावरून हे स्पष्ट दिसून येतें की, यजमान हा मुख्य प्रवरऋषीचा वंशज आहे गोत्रऋषी हा प्रवरऋषीचा वंशज आहे म्हणून तो मंत्ररचना करणाराच असला पाहिजे असें नाहीं गोत्रऋषी हा प्रवरऋषीचा एखादा विख्यात वंशज असल्यामुळें त्याच्यापासून उत्पन्न झालेली शाखा किंवा नवीन घराणे त्याचे नांव त्या घराण्यास लागू होतें. म्हणून गोत्रऋषी म्हणजे त्या कुळाचा मूळ ऋषि असा त्याचा अर्थ आहे या वरून एका प्रवरापासून म्हणजे मूळच्या मंत्रऋषीपासून अनेक गोत्रऋषी उत्पन्न होऊ

शकतात, म्हणून गोत्रें अनेक आहेत, पण प्रवर थोडे व ठराविक आहेत प्रवरऋषी हे प्रत्येक गोत्रास बहुधा तीन अथवा पांच राहतात गोत्रऋषी हा प्रवरऋषींपैकींच असतो. मांधाता, अंबरीष, युवनाश्व इत्यादि प्रवरऋषींच्या यादीत दिलेलीं नांवे सूर्यवंशांतील प्रसिद्ध राजांचीं नांवे आहेत शुनहोत्र, अजमीढ वगैरे चंद्रवंशांतील राजांचीं नांवें आहेत भृगु व अंगिरस गण प्रवरांतील ऋषि यांतील बहुधा क्षत्रिय राजे आहेत असें दिसून येते

२. **गोत्र-प्रवराचें महत्त्व**—वैदिकधर्मीय हिंदूना लग्न, श्राद्ध, पक्ष, उत्तरक्रिया, वगैरे धर्मकृत्यास आरंभ करण्यापूर्वी आपल्या गोत्राचा व प्रवराचा उच्चार करावा लागतो त्यावरून आपण कोणत्या पूर्वजाचे वंशांत उत्पन्न झालों आहों त्या पूर्व जाचे स्मरण होते बहुधा वेद रचण्यात आले तेव्हांपासून आज सुमारे ५००० वर्षांवर म्हणजे भारतकाळाच्या पूर्वीपासून आर्यांनीं आपल्या वंशोत्पत्तीची आठवण कायम ठेविली आहे पूर्वकालीन शिलालेखात व ताम्रपटांत नमूद केलीं असलेलीं गोत्रें आजही क्षत्रिय घराण्यात दिसून येतात यावरून गोत्र धारण करणारे क्षत्रिय हे वैदिककालापासून अस्सल कुलवंशात नांदत आल्याचे स्पष्ट होते क्षत्रियांचीं व ब्राह्मणांचीं गोत्रें कोठें कोठे एकच मिळतात याचे कारण पूर्वी गुणकर्माप्रमाणें कोणासही ब्राह्मण होतां येत असें हें होय. बहुतेक सर्व गोत्रऋषि क्षत्रियच आहेत

३ **शिलालेखाचे आधार**—पूर्वकालीन लेखात आपणांस गोत्राचे आधार दिसतात आपली आडनावेंही गोत्रावरून कधीं कधीं जुळत असतात बाराहूत येथील तोरणावरील लेखात म्हटलें आहे कीं —

"**गार्गी पुत्तस वीसदेव पुत्तेन गोतिपुत्तस अगराजस पुत्तेन वाच्छिपुत्तेन धन भूतिना कारितां तोरण**"

कनिंगहॅमनें याचे भाषांतर केले आहे तें असें की, राजा धनभूतीनें उभारलेले तोरण जो धनभूति राजा वच्छ गोत्रातील राणीच्या उदरी स्वत:चें गोत्र (कौत्स) गोत्रीय राणीचा पुत्र अगराज याचा मुलगा, आणि गर्गगोत्रोत्पन्न राणीचा पुत्र विसदेव त्याचा नातु होता. येथें राजाची आई, आजी व पणजी यांच्या कुलाच्या गोत्राचा जो सन्मानानें उल्लेख केला आहे तो त्या सर्व राण्या आर्यकुलांतच उत्पन्न झाल्या आहेत हे दाखविण्यासाठीच केलेला आहे

४. **क्षत्रियांचीं गोत्रें**— क्षत्रिय, वैश्य व शूद्र याना मूळचीं स्वतंत्र गोत्रें नाहीत व प्रवरेंही नाहींत म्हणून ते आपल्या ब्राह्मण उपाध्यायांचीं गोत्रें मानतात असें कित्येक ब्राह्मण म्हणत असतात, परंतु सत्य वस्तुस्थिति अगदीच उलट असून ती हीच गोष्ट सिद्ध करते कीं, क्षत्रियादिकांना तर मूळचीं स्वतंत्र गोत्रें आहेतच, परंतु ब्राह्मणांसच

क्षत्रियांचीं उसनी गोत्रे घेऊन त्यांतच समाधान मानून घेण्याची वहिवाट पाडावी लागली तें कसें तें पुढे दर्शविलेलेंच आहे.

ब्राह्मण म्हणविणारीं माणसें स्वतःस सात मुख्य ऋषींच्या वशांपैकीं समजतात ते सात ऋषि अगिरि, भृगु, विश्वामित्र, कश्यप, वशिष्ठ, अत्रि व अगस्ति हे होत. या सात ऋषींपैकीं विश्वामित्र हा क्षत्रिय ऋषि होता कौशिक गोत्र क्षत्रियांचे आहे विश्वामित्रासच कौशिक म्हटल्याचे दाखले ग्रथांतरी आहेत, या गोत्रांतील मुलगी मिळाली तर भृगूचें गोत्र आपलें भाग्य विशेष समजतें. जमदग्नीची आई सत्यवती ही विश्वामित्राची बहिण होती. बायको रेणुका हीही क्षत्रियच होती अगिरी, भृगु, कश्यप, व अत्रि हे क्षत्रिय असल्याबद्दल वादच नाही वसिष्ठ हा कलावतिणीचे, पोटी जन्मलेला होता अगस्ति याची बायको क्षत्रियकुलोत्पन्नच होती तिचे नाव लोपामुद्रा याप्रमाणे ब्राह्मणाची गोत्रें म्हणून जीं जीं त्यांनी मानलेली आहेत त्यांपैकीं बहुतेक सर्वांशी क्षत्रियच आहेत क्षत्रियांनाच ब्राह्मणानीं आपले मूळपुरुष मानून घेतले आहे कारण ऋषि, दैदीप्यमान विभुति क्षत्रियकुळांतूनच निर्माण होत होत्या म्हणून त्याचा नाइलाज होता व आहे याबद्दल ब्राह्मणाना दोष देण्याचे कारण नाही त्याच्यामधून जर अशा थोर विभूति निपजल्या असत्या तर त्यानीं तीच गोत्रें धारण केली असती, परतु आता नाइलाजाने त्याना क्षत्रियगोत्री व्हावें लागले क्षत्रियाचीं गोत्रें हीं वर दिलेल्यांपैकीच असून ती स्वतत्र आहेत ती उसनी घेतलेलीं नाहीत म्हणून गोत्रप्रवराचा मूळ शुद्ध पाया क्षत्रियाचाच विशेष मजबूत आहे

सूर्यवशियांशीं सूर्यवशियाचे विवाहप्रसग होऊ शकतात उदेपूरचे गुहिलोद आणि जयपूरचे कच्छवाह ही दोन्हीं सूर्यवशी घराणी आहेत याच्यात परस्पर विवाह होतो राम आणि सीता या दोघांचीही घराणीं सूर्यवशीच होतीं अर्जुन व द्रौपदी चद्रवशीच होतीं याप्रमाणे क्षत्रियात एका वशांत विवाह होऊ शकतात एका गोत्रात अगर एका कुळात मात्र ते होऊ शकत नाहींत

**९. गोत्रांचा विसर**—इ० सनापूर्वी ५६७, वैशाख शुद्ध १५ या दिवशी गौतमबुद्धाचा जन्म झाला त्यानें बौद्धधर्म स्थापन केला इ० सनापूर्वी ५०० पासून बौद्ध-धर्माचा प्रसार भरतखडात झाला सम्राट अशोक हा बुद्धाचा पुरस्कर्ता होता त्यामुळें त्याचे सर्व माडलिक राजे आणि इतर बहुतेक राजे बौद्धधर्मीय झाले होते बौद्धधर्म हा वर्णभेद अगर जातिभेद मानीत नसल्यामुळें गोत्रप्रवराच्या पद्धतीवरही विरजण पडू लागलें होतें या बौद्धधर्माचा जोर सुमारे इ० सन आठवे शतकाचे अखेरपर्यंत चागलाच चालू होता म्हणून आर्य लोकांना आपल्या गोत्र प्रवराचा विसर साहजिकच पडला पुढें इ० सनाच्या नवव्या शतकांत आद्य शकराचार्यांने उत्तरमीमांसा नांवाचा धर्मग्रथ म्हणून एक ग्रथ लिहिला राजाश्रयाने त्या धर्माच्या प्रसारासही चांगलीच बळती मिळाली त्याकारणानें पुन्हा १००–१५० वर्षांत म्हणजे दहावे शतकांत पूर्व धर्म-परिस्थिति जाणवू लागली आणि विसरून गेलेले गोत्रप्रवरादिकांची आवश्यकता भासूं

लागली क्षत्रिय, ब्राह्मण आणि वैश्य या सर्वांचे गोत्रांत जे घोटाळे दिसतात, त्याचें मुख्य कारण धर्मातील हे मधील घोटाळेच होय सारांश बौद्धधर्माचा पाडाव झाल्यानतर दहा व्या शतकांत गोत्र, प्रवर, कुळ, जाति वगैरेंची जाणीव पुन. होऊ लागली

**६. तेजःपुंज प्राचीन राजे**—ज्या तेजःपुज राजांच्या नांवांवरून नऊ ग्रहांना नांवे देण्यांत आलीं, ते राजे क्रमशः खालीलप्रमाणें होत [१] सूर्यराजा हा कलिंग देशांत झाला त्याचें गोत्र काश्यप [२] चद्रराजा ऊर्फ सोमराजा यमुनातीरीं झाला त्याचें गोत्र आत्रेय [३] मगलराजा अवति देशात झाला त्याचे गोत्र भारद्वाज [४] बुधराजा मागध देशात झाला त्याचें गोत्र अत्रि [५] गुरू राजा सिंधु देशांत झाला त्याचें गोत्र अंगिरस [६] शुक्रराजा भोजकट देशात झाला त्याचे गोत्र भार्गव [७] शनि राजा सौराष्ट्रदेशीं झाला त्याचे गोत्र काश्यप [८] राहुराजा बर्बर देशात झाला त्याचें गोत्र मैत्रिनीस, आणि [९] केतुराजा मध्यदेशात झाला त्याचें गोत्र जैमिनी होय. याप्रमाणें * नऊ राजे महान् दैदीप्यमान असे प्राचीनकालीं होऊन गेले आर्यांच्या भर भराटीनतर खगोलविद्या व ज्योतिषशास्त्र हीं शोधलीं गेल्याने या राजाचीं नावे सहजच तशा गुणाच्या व तेजाच्या ग्रहाना दिली गेलीं सप्तऋर्षींचीं नावेही आकाशांतील सात ताऱ्याना सबोधून आहेत अश्वलायन गृह्यसूत्रात ही माहिती दिलेली आहे

**७. ऋषींचे प्रकार**—ऋषींचे पांच प्रकार मानले आहेत, ते असे कीं, छदऋषि, ब्रह्मऋषि, महर्षि, राजऋषि आणि देवऋषि वसिष्ठ, कण्व, कवषएलूष, इत्यादि ऋषि हे छदऋषि होत कारण त्यानी धर्मग्रथातील छदोबद्ध रचना केली अत्रि वगैरे ब्रह्मऋषि होत कारण ब्रह्मसबधीं-ईश्वरसंबधीं—विचारांत ते सदा तल्लीन असत भृगु इत्यादि ऋषि हे महर्षि होत विश्वामित्र, प्रियव्रत, जनक, ऋतुपर्ण, अत्रि, कश्यप, अंगिरस, जैमिनि, शांडिल्य कौंडिण्य, भारद्वाज, इत्यादि राजर्षि होत पण या राजर्षींपैकीं बरेच छंदऋषि म्हणजे मत्रद्रष्टे ऋषि होते नारद हा देवऋषि होय अशा तऱ्हेचे हे ऋर्षींचे पाच प्रकार आहेत

या ऋर्षींमध्ये क्षत्रिय, वैश्य, शूद्र, अप्सरापुत्र इत्यादि वर्णांचे लोक आहेत म्हणूनच 'ऋषीचें कूळ आणि गगेचें मूळ शोधू नये' अशी म्हण पडली आहे

**८. सप्त गोत्रऋषि**—अगदीं अलीकडच्या मताप्रमाणें सात मुख्य गोत्र ऋषि आणि आठवा अगस्ति हे आठ गोत्रऋषि मानतात विश्वामित्र, जमदग्नि, भारद्वाज, गौतम, अत्रि, वसिष्ठ, कश्यप आणि अगस्त्य हीं त्याचीं नावें होत. हे आठही ऋषि मूळचे आर्य क्षत्रिय होत आणि या आठही ऋषींची नांवे क्षत्रिय मराठा जातीच्या गोत्रात आहेत

---

* अश्वलायन गृह्यसूत्राचें परिशिष्ट आणि ऐतिहासिक कथा भाग दोन, पान १३६-१३७ पाहा

ऋग्वेदाचीं सूक्तें रचणाऱ्या ऋषींच्या वंशजांनीं मूळ पुरुषांचीं (मूळ ऋषींचीं) नांवें उपनांवाप्रमाणें वापरण्याची चाल अमलांत आणलेली असावी असें दिसतें, कारण वेद-काळचे ऋषि रामायणकालीं व तेच भारतकालीं त्याच नांवानें प्रसिद्ध आहेत. एकच ऋषि निरनिराळ्या युगांत असूं शकत नाहीं यावरून ऋषींची नांवें हीं त्या त्या कुलांचीं नांवें या अर्थानें वापरण्यात आलीं असावीत असें वाटतें



*

# प्रकरण पंचविसावें

# गोत्राबद्दल कुळाचा उपयोग

वरानें आपल्या स्वत:च्या गोत्राच्या किंवा प्रवराच्या वधूशी लग्न करूं नये, हा नियम क्षत्रिय आणि ब्राह्मण या दोघांनाही लागतो कोणाकोणांत विवाहसंबंध घडून येऊं नयेत हें ठरविण्याकरिता क्षत्रियानीं अर्वाचीन कालात म्हणजे दहाव्या शतकापासून कुलपद्धतीचा स्वीकार केला आणि अशा पद्धतीने पूर्वीच्या गोत्र पाहण्याच्या पद्धतीची अडचण त्यांनीं जरा दूर केली आहे कारण दहावे शतकापासून कुलपरंपरा पुन्हा अमलात येऊं लागली क्षत्रिय, ब्राह्मण, वैश्य व शूद्र असे चार वर्ण हिंदु लोक मानतात हे चारही वर्ण व त्यानंतर उत्पन्न झालेल्या इतर जाति आणि त्याशिवाय इतर सर्व धर्मांचे लोक देखील एकाच परमेश्वरापासून उत्पन्न झालेले आहेत त्यामुळे सर्व धर्मांच्या, सर्व जातीच्या आणि सर्व मानव जातींच्या उत्पत्तीचे मूळ एकच आहे एकाच परमेश्वरापासून उत्पन्न झालेल्या आर्य ऊर्फ हिंदु लोकात कालांतराने दोन मुख्य वंश म्हणजे सूर्यवंश व चंद्रवंश निर्माण झाले सूर्य व चंद्र वंशातील निरनिराळ्या पराक्रमी पुरुषानी स्वतंत्र होऊन निरनिराळी स्वतंत्र राज्यें स्थापन केली त्याच्यातील सुप्रसिद्ध पुरुषाच्या नावावरून व अद्वितीय पराक्रमावरून यदुवंश उर्फ ब्रह्मवंश, नागवंश ऊर्फ शेषवंश, इत्यादि पोटवंश निर्माण झाले या पोट-वंशांतील ऋषानीं आद्य ऋग्वेदाची निरनिराळी सूक्तें रचिलीं त्यामुळें धार्मिकदृष्ट्या त्या ऋषींना प्रवरऋषि म्हणजे वेदमंत्र रचणारे प्रवर ऋषि–मूळ पुरुष–मानूं लागले त्या प्रवर ऋषींच्या वंशात पुढे सुप्रसिद्ध ऋषी निर्माण झाले व त्यांच्यापासून निरनिराळे नवीन वंश पुन्हा त्यांच्या नावाने सुरू झाले व त्याना त्या नवीन कुलाचे गोत्र ऋषि मानण्यात आले गोत्र ऋषीपासून सुरू झालेल्या वंशांत उत्पन्न झालेल्या अनेक प्रसिद्ध पुरुषापासून पुनः नवीन कुळें मानण्याची प्रवृत्ति सुरू झाली त्यामुळे रजपुतांचीं मुख्य ३५ कुळें, मराठा क्षत्रियांचीं मुख्य ९६ कुळे, कायस्थ क्षत्रियाची ४२ कुळे, आणि ब्राह्मणांचीं व वैश्यांची शेंकडों कुळें निर्माण झाली आता शेकडो कुळाचा विस्तार पुनः अमर्याद झाल्यामुळे त्या प्रत्येक कुळांतील अनेक प्रसिद्ध पुरुषाच्या पराक्रमावरून किंवा कांही विशेष गुणावरून, गांवांच्या नांवावरून व बऱ्या वाईट कृत्यावरून प्रत्येक कुळात शेंकडो उपनांवाच्या उपशाखा निर्माण झाल्या, त्याला उपनांवे किंवा आडनावे म्हणतात क्षत्रियात आणि ब्राह्मणेतर सर्व जातीं-तील एक उपनावाच्या म्हणजे आडनांवाच्या कुळात परस्पर शरीरसंबंध होत नाहीत कारण शेंकडा ९९ लोकाना स्वत:च्या गोत्रप्रवराचा विसर पडल्यामुळे गोत्रप्रवराऐवजीं उपनांवेंच पाहतात. याप्रमाणें गोत्राबद्दल अलीकडे कुळाचाच उपयोग सर्व कार्यांत होऊं लागला आहे तरी पण केवळ आडनावावर विसंबून राहणे बरें नसून आपापल्या कुलगोत्राची माहिती प्रत्येकाला अगदीं अवश्य पाहिजे त्या शिवाय मनुष्याचें जगणेंही व्यर्थ आहे. म्हटलेलें आहे कीं:—

**स्वजातिपूर्वजानां यो न विजानाति संभवम् ॥**
**स भवेत् पुंश्चलीपुत्रसदृशः पितृवेदकः ॥१॥**

भावार्थः—जे आपल्या जातीची, पूर्वजांची थोरवी व मर्यादा जाणत नाहींत ते पुरुष वेश्यांच्या पुत्राप्रमाणें होत कारण, वेश्यापुत्रास आपला पिता कोण आहे हें माहित नसतें मग त्यास आपल्या पूर्वजाचा अभिमान कोठून राहाणार ? यासाठीं आपल्या पूर्वजांविषयींचें, आपल्या जातिधर्माविषयीचे व आपल्या कुलगोत्रांविषयाचें ज्ञान प्रत्यक्षपणे प्रत्येकास असणें अगदीं अत्यावश्यक आहे



---

टीपः—बुचकलालेख, ए इ ९।१९९ यात प्रतिहारी गोत्राचा उल्लेख आहे. प्रतिहार हे क्षत्रियांच्या ९६ कुलांपैकी एक मुख्य कुल आहे यावरून दहाव्या शतकांत बौद्ध धर्माचा पाडाव होऊन वैदिक धर्म ऊर्जितावस्थेंत आला, तेव्हां क्षत्रियांनीं गोत्राचे जागीं कुलाचाच अंगिकार केला असें वरील शिलालेखावरून दिसतें. हा शिलालेख ९-१० शतकांतील आहे

## प्रकरण सत्विसावें

# आजचा मनु काय म्हणतो ?

### स्वाभिमानसंरक्षक परिषद्

मद्रासपासून ३५ मैलांवर असलेल्या चिंगलपट्टला ही परिषद ता १७-१८ फेब्रुअरी १९२९ रोजीं झाली त्यावेळीं ३५ मैलाची जगी मिरवणूक काढण्यात आली त्या परिषदेंत झालेली भाषणे व ठराव पुढीलप्रमाणे—

### मि० एम् के. रेड्डी यांचें भाषण

प्रारभीं स्वागताध्यक्ष या नात्यानें राव० ब० एम् के रेड्डी याचे भाषण झाले त्यांच्या भाषणाचा सारांश—

राजकारणाशी सबध न ठेवतां स्वाभिमानसरक्षकांनीं घालून दिलेल्या मार्गानेंच समाजाची उन्नति करण्याचे या परिषदेचे मुख्य काम आहे ह्या नव्या धोरणाची व्याप्ति कोठवर आहे तें प्रथम ठरविणे आवश्यक दिसते स्वाभिमान हा शब्द वरवर पाहता अगदीं साधा व सरळ अर्थाचा आहे असे वाटतें, पण त्याची व्याख्या करू लागताच त्या शब्दाचा अर्थ किती खोल व व्यापक आहे हे दिसून येतें मानवी समाजाच्या व जीवात्म्याच्या अखड व स्वाभाविक उत्क्रांतीस जरुर असणारी अशी परिस्थिति निर्माण झाली पाहिजे व त्याचप्रमाणे त्यास मनुष्याची आत्मोन्नति खुटविणारी अशी कोणतीही कृत्रिम कारणे नसावींत असा स्वाभिमान शब्दाचा भावार्थ आहे.

मनुष्यानें आपल्या कटुकर्तव्यक्षेत्रात नीट रहावें व नैसर्गिक नियमाबरहुकूम आपलें जीवन घालवावे, ही गोष्ट मी नाकारीत नाहीं, पण मला हें कबूल केलें पाहिजे कीं, **पुरोहितशाहीच्या मिराशी हक्काविरुद्धच माझें बंड आहे.** जगाच्या प्रारभापासून पुरोहितशाहीने, मग ती कोणत्याहि धर्माची किंवा पथाची असो, स्वर्गाचे द्वाररक्षक म्हणून **उन्मत्त दर्जा** कायम राखण्यासाठीं, व लौकिक सत्तेवरही आपलें वर्चस्व राखण्यासाठीं, समाजाला अधश्रद्धेत, अज्ञानात खिचपत ठेवले ह्या पुरोहित शाहीनें अस्वस्थतेच्या काळातही तगून राहण्याची धडपड केली आहे, शाततेच्या काळीं राजेलोक विजयोन्मादानें बेहोष झाले असता, तिने आपले वर्चस्व प्रस्थापित केले, व **मोठमोठी साम्राज्येंही भिक्षुकशाहीनें सधी मिळतांच जमीनदोस्त केली आहेत.** ह्या विधानास जगाच्या प्रगतीचा इतिहास भरपूर साक्ष देत आहे इजिप्तचा इतिहास हेंच सांगतो, व रोमनचा इतिहासही ह्याच विधानास पुष्टि देतो आपल्या देशांतही आतां इतिहासाची पुनरावृत्ति होत आहे परमात्म्याशीं तदाकार होण्यास

जीवात्म्याचें साधन असलेलीं देवळें; पुरोहितशाहीच्या अमलाखालीं आपलें पावित्र्य गमावून बसलीं आहेत. म्हणून **अगदीं राजरोसपणें अवाच्य पापें करण्यास पुरोहितशाहीला तीं देवळें भक्कम किल्ल्यासारखीं उपयोगी पडत आहेत.** समाजही अज्ञानामुळें **मूळ तत्त्व विसरून गेला व खोट्या रुढीचाच दास बनला आहे** इच्छित हेतु साधण्यासाठीं सुधारणा फार अपुरी पडणार आहे. त्यासाठीं क्रांतीच पाहिजे. धर्माचे नांवाखालीं समाजात ज्या अनिष्ट रूढी शिरल्या आहेत त्यांना हुसकून लावण्यासाठीं या देशांतही एखादा लुथर, लेनिन, मुसोलिनी, केमलपाशा किंवा अमानुल्लाच निपजला पाहिजे.

आपल्या राष्ट्राचा सामाजिक अधःपात किती झाला आहे, याचें मोजमाप करणें कठीण ! आजपर्यंत किती तरी सुधारक आले व गेले, पण ही परिस्थिति मात्र बदलली नाही गौतमबुद्ध हा मनुष्य जातींतच काय पण पशुपक्षी व निर्जीव वस्तूतही समता पाहणारा समाजसुधारक होता पक्के निष्ठावत व सुविचारी लोक त्याचे अनुयायी बनले व त्यांनी त्याचें तत्त्वज्ञान देशभर उपदेशिले **उदात्त विचारांच्या लोकांनी केलेलें सुधारणेचें कार्य, स्वार्थी शंकराचार्य व त्याच्या अनुयायी पुरोहितांनी नामशेष करून टाकलें समतेचा पुरस्कार करणारें बुद्धाचें तत्त्वज्ञान चीननें व जपाननें जाणलें म्हणून तीं राष्ट्रें स्वतंत्र झाली आहेत.** भिकार शकराचार्या-नतर उदात्त विचाराने प्रेरित होऊन रामानुजाचार्यांनीं समतेची चळवळ केली, व अगदी अलीकडे दयानदसरस्वति, राजा राममोहनराय वगैरेनीही समाजाची सुधारणा करण्यासाठीं बरेच प्रयत्न केले मी त्यांना कमी लेखीत नाहीं, पण त्यांचा शुद्ध हेतु लक्षात घेऊनही मला असे म्हटल्याशिवाय राहवत नाही कीं, **दयानंदसरस्वति, राजाराममोहनराय यांनीं विद्यमान अशा असंख्य जातींत आणखी कांही जातींची भर घातली** प्राचीन अर्वाचीन काळांतील असा अनुभव आपल्या डोळ्यापुढें असता, युगानुयुगे चालत आलेल्या दोषाचे निवारण करण्यास नुसती सुधारणेची ओरड अपुरी पडेल, त्या करितां सामाजिक बडच केले पाहिजे हल्लीं नुसती बाष्फळ बडबड चालू आहे शब्दांचा कीस काढीत बसणे हाच विद्वानांचा आवडीचा व्यासग होऊन बसला आहे. कर्तृत्वशाली लोक दिवसेंदिवस कमी होत आहेत हा हां म्हणतां आपल्या शक्तीची जाणीव सर्व जगाला करून देतील असे पानगलचे राजे व लजपतराय होते, पण निष्ठुर कालानें त्यांना ओढून नेले आहे, पण शोक करण्याची ही वेळ नव्हे. आळस टाकून आम्हीं उठले पाहिजे आपला पुढारी निवडला पाहिजे व त्याच्या आज्ञेप्रमाणे वागून आपल्या हक्कांचें रक्षण केले पाहिजे

## मि० पी. टी. राजन् यांचें भाषण

स्वाभिमानाचें निशाण फडकविण्याचा समारभ मि० पी टी. राजन् याच्या हस्तें मोठ्या थाटानें साजरा करण्यांत आला. त्या वेळीं त्यांनीं केलेल्या भाषणाचा सारांश—

एक मनुष्य दुसऱ्या मनुष्यापासून किंवा एका समाजास दुसऱ्या समाजापासून अलिप्त ठेवणाऱ्या, जन्मामुळें श्रेष्ठत्व पावणाऱ्या, स्त्रीजातीस पारतन्त्र्यांत खिचपत ठेवणाऱ्या, बहुजन समाजास पशुपेक्षांही हीन लेखून त्यांचा देवळामध्यें प्रवेश न करूं देणाऱ्या पद्धतीचा व रूढीचा नाश करण्याकरिता स्वाभिमान सरक्षक चळवळीचा जन्म झाला स्वाभिमान संरक्षक चळवळीचा उद्देश समता प्रस्थापित करण्याचा आहे, कायद्याचे दृष्टीनें मनुष्य व स्त्री हीं एक करण्याचा आहे, कोणत्याही जातींत जन्मलेल्या प्रत्येक मनुष्याला आपली व सर्वांची सर्वतोपरी उन्नति करण्याकरिता पूर्ण स्वातंत्र्य देण्याचा आहे, प्रत्येक नगरवासियास आपल्या राष्ट्रासबधीं असणाऱ्या हक्काची व जबाबदारीची जाणीव करून देऊन एकी प्रस्थापित करण्याचा आहे अशा रीतीनें एकीची व समतेची भावना प्रत्येकाच्या अतःकरणात जागृत झाली, म्हणजे ते एकमेकांच्या सुखदुःखांत वाटेकरी होतील, आणि राष्ट्राविषयींची आकांक्षा व उच्च ध्येय फलद्रूप करण्याची त्यांना स्फूर्ति होईल आपण उभारलेले निशाण हे स्वाभिमान सरक्षक चळवळीचें व आपल्या उच्च आकांक्षा व ध्येय दर्शविण्याचे चिन्ह आहे हल्लींच्या उदासीन वातावरणांत एवढाच हा आशेचा किरण आहे. त्यामुळेंच स्वार्थ, अस्वस्थता, औदासिन्य, भीति व निराशा याची जागा स्वार्थत्याग स्वस्थता, उत्साह, धैर्य व आशा यांनी भरून निघेल

स्वाभिमानाचें निशाण फडकविल्यानतर खालील ठराव सर्वानुमतें मजूर करण्यांत आले

## ठराव

दुसरे दिवशी ता १८ फेब्रुआरी १९२९ रोजीं सकाळीं ८॥ वाजता परिषदेस सुरुवात होऊन पुढील ठराव पास झाले ( यात सरळ अनुक्रम नबर व त्याचे पुढे कसांत परिषदेच्या ठरावाचा अनुक्रम नबर असे दोन्ही नबर दिले आहेत )

[१] (४अ) जन्मावरून कोणासही श्रेष्ठ किंवा हीन न समजणे वेद, शास्त्र, पुराण व इतर धर्मग्रंथ यात जन्मावरून उच्चनीचत्व प्रतिपादन केलें असल्यामुळे, या धर्म ग्रथाचा अधिकार न मानणे

[२] (४ब) वर्णाश्रमधर्मानें हिंदु समाजांत ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र असे भेद पडले आहेत म्हणून वर्णाश्रमाच्या घातुक तत्त्वाचा तीव्र निषेध, व **आपली जात किंवा समाज दर्शविणारे शब्द आपले नांवामागें अथवा पुढें जोडू नये**, तसेंच आपली जात किंवा वर्ण दर्शविणारीं चिन्हे घालू नयेत व वापरू नयेत

[३] (४क) राष्ट्राच्या प्रगतीकरिता व समता प्रस्थापित करण्याकरितां अस्पृश्यतेची रूढि ताबडतोब नष्ट करणे आवश्यक आहे म्हणून मनुष्यास स्पर्श करणे, त्यास समोर येऊ देणें, अगर त्याचें मुख पाहणें हें कोणी पाप समजू नये. समाजाच्या अगर कायद्याच्या दृष्टीनें कोणतीही जात उच्च अगर नीच समजली जाऊ नये तसेंच प्रत्येक रहिवाशास सार्वजनिक रस्ते, तळीं, विहिरी, नळ, देवळें, धर्मशाळा यांत समान हक्क असून तो हक्क प्रत्येकानें बजावला पाहिजे.

[४] (४ड) वर्णाश्रमधर्मामुळे ज्या एका विवक्षित जातीचा स्वार्थ साधतो, त्या जातीकडून सामाजिक सुधारणेस व समतेस वारवार अडथळा होतो. म्हणून समाजाच्या प्रगतीकरितां कायद्यानें वर्णाश्रमाचीं तीव्र बंधनें शिथिल करण्यात यावींत

[५] (४ई) सरकारच्या धार्मिक बाबतीतील तटस्थ वृत्तीमुळें असख्य अशा बहुजनसमाजास अपाय सहन करावा लागत आहे, त्यांच्या सामाजिक हक्कांचा अपहार झालेला आहे. आणि त्यांची प्रगति खुटलेली आहे, म्हणून यापुढें सरकारनें धार्मिक बाबतींतील तटस्थपणाचें धोरण सोडून द्यावें, आणि बहुजन समाजाचें सामाजिक स्वातन्त्र्य रक्षण करण्याचे प्रयत्न करावेत तसेंच या बाबतींत समाजसुधारकांच्या वतीनें प्रचलित कायद्यांत फरक करावे

[६] (५अ) सरकारने सर्व दरखास्त जमिनी इतःपर ज्या समाजातील लोकांची सांपत्तिक स्थिति फारच हलाखीची असेल अशा लोकाना द्याव्या, आणि अशा जमिनी देताना त्या प्रथम 'अस्पृश्य' लोकांना देण्यात याव्या या परिषदेचे आणखी असें मत आहे कीं, सरकारने त्यांना उदारपणे जादा रकमा ग्रॅंट म्हणून देऊन अशा जमिनीची मशागत करण्यास उत्तेजन द्यावे

[७] (५ब) सरकारी नोकऱ्यांत 'अस्पृश्य' वर्गीय उमेदवाराचा भरणा करण्याची सरकारने उदारपणाने तरतूद करावी

[८] (५क) 'अस्पृश्य' वर्गातील साक्षरतेचे प्रमाण इतर समाजांतील साक्षरतेच्या प्रमाणाबरोबर येईपर्यंत 'अस्पृश्य' वर्गातील विद्यार्थ्यांना अन्न, वस्त्र, व पुस्तकें इत्यादि सरकारी खर्चानें पुरवून त्यांचे शिक्षणास चालना द्यावी

[९] (६अ) स्त्रियांना वारस हक्कांत व मालमत्तेंत पुरुषाइतकाच वाटा मिळावा

[१०] (६ब) स्त्रियांना कोणताहि व्यवसाय पत्करावयास पुरुषाइतकाच हक्क मिळावा.

[११] (६क) स्त्रियाना अध्यापिकाच्या जागा ( विशेषतः प्राथमिक शिक्षणाच्या शाळांमधून ) शक्य तितक्या अधिक ठेवाव्यात

[१२] (७अ) देवालयात किंवा देवाच्या नावावर इतर ठिकाणीं पूजा करण्याकरितां कोणीहि एक पैहि खर्च करू नये अथवा एक पै किंमतीचा पदार्थद्दा वापरू नये, तसेंच भक्त व देव यांमध्यें कोणीहि भिक्षुक अगर दलाल ठेवूं नये

[१३] (७ब) यापुढें नवीन देवालये, कोणीही उभारू नयेत, तसेच हल्लीं असलेल्या देवालयांचें व मठांचें उत्पन्न औद्योगिक संशोधन व अभ्यास यासाठीं खर्च करावें.

[१४] (७क) यापुढें देवालयांत होणारे सर्व उत्सव बंद करावेत व त्याऐवजीं जनतेंत आरोग्यशिक्षणज्ञानाचा प्रसार करण्यासाठीं प्रदर्शनें उभारावींत

[१५] (८अ) स्त्रियांची लग्न-वयोमर्यादा १६ असावी; अल्पवयी मुलींचीं लग्नें करू नयेत

[१६] (८ब) लग्न, वधू व वर या उभयतांच्या समति शिवाय होऊ नये, व पुनर्विवाहास आठकाठी करू नये

[१७] (८क) **कोणत्याही जातींतील, वर्णांतील किंवा समाजांतील वधू अथवा वर याबरोबर लग्न करण्यास पूर्ण मोकळीक असावी. व** त्याप्रमाणें हल्लींच्या कायद्यांत फरक करण्यांत यावा

[१८] (८ड) लग्न किंवा इतर उत्सव यांत शक्य तितका कमींतकमी पैसा व वेळ खर्च करावा. तसेंच सर्व लग्नविधींत एक जेवणाशिवाय ज्यास्त जेवण देऊं नये व अधिक पैसा खर्च करू नये

[१९] (९अ) हिंदुस्थानातील प्रत्येक मुलास व मुलीस सक्तीचें प्राथमिक शिक्षण देण्यात यावें

[२०] (९ब) सार्वजनिक फड प्राथमिक शिक्षणाकरिताच खर्च करण्यांत यावा, आणि तदनतर उच्च व औद्योगिक शिक्षणाकरिता पैसा खर्च करण्यात आलाच तर अशा संस्थातून जातींच्या लोकसख्येच्या प्रमाणांतच विद्यार्थी घेण्यांत यावेत

[२१] (९क) शिक्षण सस्थेमध्यें सस्कृत, हिंदी, विद्येचा प्रसार करण्यासाठीं सार्वजनिक फंडाचा विनियोग करू नये

[२२] (९ड) धर्मभोळ्या कल्पना मनावर बिबविणारी पुस्तकें जप्त करावीत व वरील उद्देश असणाऱ्या नाटकाना प्रयोग करण्यास परवानगी देऊं नये.

[२३] (९इ) **तरुणांमध्यें शारीरिक शिक्षणाचा प्रसार होण्यासाठीं देशभर सोय करण्यांत यावी, प्रत्येक तरुणास लष्करी शिक्षणाचा अभ्यासक्रम आवश्यक करावा**

[२४] (९फ) स्वाभिमान व आत्मविश्वास खची करणारीं आणि बुद्धिवादास व तर्कास वाव न देणारी किवा खोट्या व विचित्र धार्मिक कल्पनाचा प्रसार करणारीं नाटकें व कादबऱ्या लिहू नयेत

[२५] (१०अ) ज्या हॉटेलमध्ये व खाणावळींमध्ये निरनिराळ्या जातींना भेद भावानें वागविण्यात येतें अशी हॉटेले व खाणावळी सरकारनें सुरू करण्यास परवानगी देऊं नये

[२६] (१०ब) रेल्वेच्या ताब्यात असणारी हॉटेले व खाणावळी यामध्यें सर्व जातींना समतेने वागविण्याचा रेल्वे अधिकाऱ्यानीं प्रयत्न करावा

[२७] (११) ब्राह्मणेतर विद्यार्थ्यांच्या अडीअडचणी व गैरसोयी नाहींशा करण्या-करितां शिक्षणखात्यातर्फे एक कमिटी नेमण्यांत यावी

[२८] (१२) मजुरांच्या कामाप्रमाणे व गरजेप्रमाणे अवश्यक ठरणारी अशी कमींतकमी मजुरी त्यांना देण्यांत यावी, व त्याशिवाय त्या त्या धंद्यांत होणाऱ्या नफ्याचा योग्य वांटाहि देण्यांत यावा



## परिशिष्ट नं० १

# मांडलिक क्षत्रिय राजे व त्यांची माहिती

## परिशिष्ट नं. १ विषयीं खुलासा.

या तक्त्यांतील जाडेजा आणि जम्मवाल ही दोन कुळे रजपुताच्या मुख्य ३६ कुळांच्या यादींत सापडत नाहींत रजपुतांचीं १२ गोत्रें, वंश आणि परिशिष्ट न १ च्या याच तक्त्यांत न ३० पासून न ५३ पर्यंत दर्शविलेल्या उत्तर हिंदुस्तानच्या क्षत्रिय राजकुळापैकी बरींच कुळे मराठा क्षत्रिय जातींच्या वंशकुळगोत्रांशी बरोबर मिळतात भाग २ मधील मराठ्यांचा वंशकुळगोत्रांचा तक्ता पाहा. याशिवाय सातान्याचे छत्रपति प्रतापसिंह महाराज यानीं इ० सन १८३५ साली उदेपूरच्या महाराणाजींस पत्र लिहून त्यांचा व आपल्या कुळगोत्राचा आणि वंशावळीचा मेळ मिळवून दाखविला, आणि राणाजींनीं तो मेळ लेखी मान्य केला त्यांचीं पत्रें 'मराठा क्षत्रिय' या प्रकरणात दुसऱ्या भागांत दिलीं आहेत यावरून आठव्या शतकांत उदयास आलेले रजपुत आणि इ० सनाच्यापूर्वी पांचसहा शतकापासून इतिहासदृष्ट्या सुप्रसिद्ध असलेले क्षत्रिय मराठे हे एकच आहेत व प्राचीन मराठा शब्दातूनच रजपूत म्हणजे राजपुत्र हे अर्वाचीन नांव निर्माण झाले, ही गोष्ट सिद्ध होते या तक्त्यावरून असेंही दिसतें कीं, क्षत्रियाच्या ब्राह्मण उपाध्यायाचीं गोत्रें क्षत्रियांनीं उसनी घेतलीं नाहींत क्षत्रियांची गोत्रें स्वतंत्र आहेतच तीं क्षत्रिय राजर्षींपासून सुरू झालेलीं आहेत मात्र क्षत्रिय राजर्षींचीं गोत्रें ब्राह्मणांनीं उसनीं घेतलीं आहेत, याबद्दल गोत्र प्रकरणांत अनेक उतारे आहेत याच मुख्य पुराव्यावरून निर्वीर्य ब्राह्मण जात क्षत्रियांतूनच पुढें निर्माण झाली असें दिसून येतें

धार आणि देवास येथे पवार ऊर्फ प्रमार घराण्याच्या गाद्या असल्याबद्दल मागे वर्णन केलेच आहे त्याशिवाय उत्तर हिंदुस्तानांत, बुंदेलखंडात अजयगड, मध्यभारतांत राजगड व नरसिंगगड, बिहार प्रांतांत भोजपुरिया व बक्सरिया, संयुक्तप्रांतात टिहरी व गढवाल याप्रमाणे एकंदर सात लहान लहान संस्थानें पवारांची आहेत त्यांची तपशीलवार इतर माहिती मिळाली नाहीं, म्हणून ही संस्थानें या तक्त्यात दाखल केली नाहींत. पण दक्षिण आणि उत्तरचे पवार राजघराणें एकच आहे ही गोष्ट त्यांच्या वंशकुलगोत्र व कुलाचारावरून सिद्ध होते.

**दक्षिण हैद्राबाद–निजामचे संस्थानांत–फ्युडेटरी चीफ म्हणजे पोट संस्थानिकांच्या मराठा क्षत्रियांच्या गाद्या दहा आहेत. त्या येणेंप्रमाणेः—**

[१] महाराजा रावरंभा जीवत बहादुर, संस्थान बलद, [२] राजा सोमेश्वरराव महाबलवंत बहादुर होमकुंडा संस्थान, [३] राजा उमापतिराव महाबलवंत बहादुर, नामपल्ली, [४] राजा राजेश्वरराव महायशवंत बहादुर, नामपल्ली स्टेशन, [५] सवाई राजा रामेश्वरराव व हरीबलवंत महाभूपाल बहादुर बनपरती संस्थान, [६] राजा सितारामसिंह भपाल बहादुर, अमरचिंता संस्थान, [७] राजा सीताराम भूपाल बहादुर, गदवाल, [८] राजाराम भूपाल बहादुर, गदवाल, [९] राजा रघुनाथराव महारणधीरवंत बहादुर, हैद्राबाद, [१०] राजा कुंडराई बहादुर चिंचवड, संस्थान

| न | संस्थानचे नांव | संस्थानिकाच्या घराण्याचें नांव | पदवी | जात | वंश | गोत्र | वार्षिक उत्पन्न | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| १ | कोल्हापूर | भोसले | G C I E | क्षत्रिय मराठे | सूर्य | वैजवाप कौशिक | ८७,६६,२९० | H H महाराजा श्री० राजाराम महाराज छत्रपति |
| २ | ग्वाल्हेर | शिंदे | G C S I G C V O G B E I L L D D C I | ,, | चंद्र [शेष] | शांडिल्य | २,१९,३१,६१७ | H H महाराजा मुख्तारुल्मुल्क अजीमुल इकतेदार रफायुिष्मान बालार्षिंको, मोथतशाम दौरान, उमदेतुल उमरा, महाराजाधिराज, माधवराव महाराज. |
| ३ | बडोदे | गायकवाड | G C S I G C I E | ,, | चंद्र | वसिष्ठ | २१०,००,००० | फर्जंदेखास दौलत इंग्लिशिया महाराजा सर सयाजीराव गायकवाड सेनाखासखेल समशेर बहादुर H H |
| ४ | इंदूर | होळकर | G C I E | क्षत्रिय मराठा धनगर | ,, | ,, | १,२५,००,००० | H H महाराजाधिराज राज. श्री० स तुकोजीराव होळकर |
| ५ | धार | पवार | K C S I K B E | क्षत्रिय मराठे | ,, | ,, | १३२६,००० | H H महाराजा लेफ्टनट कर्नल सर उदाजीराव पवार |
| ६ | देवास (सी) | ,, | K C S I | ,, | ,, | ,, | ३,५०,००० | H H. महाराजा सर तुकोजीराम पवार, सेनापति सहस्र |
| ७ | देवास (जू) | ,, | ,, | ,, | ,, | ,, | ६,१०,००० | H H महाराजा मल्हारराव बाबासाहेब पवार. |
| ८ | अक्कलकोट | राजेभोसले | राजेसाहेब | ,, | सूर्य | कौशिक, वै | ६,५९,०९२ | H H महाराजा भोसलेसाहेब |

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ९ | सावतवाडी | सावत भोसले | सरदेसाई | क्षत्रिय मराठे | सूर्य | कौशिक, वै | ६,८१,०३० | H. H राजेबहादुर खेमसावत भोसले, बापूसाहेब सरदेसाई |
| १० | फलटण | नाईक निंबाळकर | C S I | ,, | चद्र | शांडिल्य | २,२८,४५९ | म लेफ्टनंट श्रीमत मालोजीराव ऊर्फ नानासाहेब नाईक. |
| ११ | मुधोळ | राजे घोरपडे | K C I E. | ,, | सूर्य | वसिष्ठ | ३९,८०० | सर मालोजीराव व्यकटेशराव राजे घोरपडे |
| १२ | जत | डफळे(चव्हाण) | चीफ राजेसाहेब | ,, | ,, | ,, | १,६०,००० | रामराव अमृतराव ऊर्फ आबासाहेब ऊर्फ डफळे नानासाहेब |
| १३ | सोंडूर | घोरपडे | ,, | ,, | ,, | ,, | १,५०,००० | राजासाहेब चीफ ऑफ सोंडूर |
| १४ | कापशी (कोल्हापूर) | चव्हाण | राजा | ,, | ,, | ,, | १,०६,६२० | मे० जयसिंहराव घोरपडे सेनापति, कोल्हापूर सं० जहागिरदार |
| १५ | मालेगाव(पुणे) | जाधव | राजे | ,, | चद्र | अत्रि | १,०५,००० | राजे शंभुसिंह अमरसिंह जाधव |
| १६ | कागल (सी) | घाटगे | सर्जेराव बजारतमाआम सरलष्कर | ,, | सूर्य | वसिष्ठ | ३,०८,६३१ | कोल्हापूर सस्थानांतील जहागीरदार. |
| १६ | कागल (जू) | ,, | ,, | ,, | ,, | ,, | १,०३,४४६ | ,, ,, ,, |
| अ | | | | | | | | ,, ,, ,, |
| १७ | दानोळी | निबाळकर | सरलष्कर | ,, | चद्र | शांडिल्य | ६,००,००० | ,, ,, ,, |
| १८ | किणी | चव्हाण | हिंमत बहादर | ,, | सूर्य | भारद्वाज | ७५,००० | |
| १९ | नादणी | पाटणकर | फ्युडेटरी चीफ | ,, | ,, | ,, | ५०,००० | ,, ,, ,, |
| २० | तोरगळ (कोल्हापूर) | शिंदे | ,, | ,, | चद्र (शेष) | कौंडिण्य | १,०२,२६० | कोल्हापूर स० ज० ठाकूर निर्भयसिंह सेना खासखेल |
| २१ | दत्तवाड | घोरपडे | अ उल उमराव | ,, | सूर्य | वसिष्ठ | ५०,००० | कोल्हापूर सस्थानांतील जहागीदार. |
| २२ | तळेगाव | दाभाडे | सेनापति | ,, | चद्र | शांडिल्य | ५०,००० | यशवतराव खडेराव दाभाडे. |
| २३ | सातारा | भोसले | छत्रपति | ,, | सूर्य | कौशिक वै | ७५,००० | भाऊसाहेब महाराज. |

| न | सस्थानचे नांव | सस्थानिकांचे घराण्याचें नांव | पदवी | जात | वश | गोत्र | वार्षिक उत्पन्न | शेरा. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| २४ | गजेंद्रगड | घोरपडे | छत्रपति | क्षत्रिय मराठे | सूर्य | कौशिक वै | ४०,००० | |
| २५ | तजावर | भोसले | राजे | ,, | ,, | ,, | ५,००,००० | |
| २६ | नागपूर | ,, | राजेबहादुर | ,, | ,, | ,, | ३,००,००० | राजे बहादुर रघूजी भोसले |
| २७ | पाटगांव स० ( कोल्हापुरातर्गत ) | सकपाळ | क्षात्र जगद्गुरु | क्षात्रय मराठा | चंद्र | गग | १०,००० | सदाशिवराव लक्ष्मणराव बेनोडीकर बी ए यांस श्री० शाहू छत्रपतींनीं १९२१ सालीं क्षात्रजगद्गुरूंच्या गादीवर बसविलें हे अगदीं पहिलेच क्षात्रजगद्गुरु आहेत |
| २८ | त्रावणकोर | ,, | G C S I | ,, | ,, | वसिष्ट | २,१०,६६,८३० | H H महाराजा शमशेरजग |
| २९ | म्हैसूर | ,, | G C I. E | ,, | ,, | चद्रत्रेय | ३,२८,०२,००० | H H महाराजा सर श्रीकृष्णराज वाडियार बहादुर |
| ३० | उदेपूर ( डोंगरपूर ) | ( सिसो ) | G C. S I G | राजपूत्र क्षत्रिय | सूर्य | वैजवाप | ५१,००,००० | चंद्रशेखर प्रसाद सिंहदेव बहादुर यांचे पुरोहितांचे गो सा |
| ३१ | जोधपूर ( रतलाम ) | राठोड | C I E K C V O | ,, | ,, | गौतम | १,२०,००,००० | मेजर H H राजराजेश्वर मदत राजाधिराज सरमदी रा० नहायसिंग महाराजा श्री सर उमेदसिंहजी ब पू गो भा |
| ३२ | जयपूर (अल ) | कछवाहू | G, C S I G | ,, | ,, | मानव्य | ९६,००,००० | H H सरमदी राजाराय हिंदुस्तान |

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | C. I. E G C V O C B E | | | | | राजराजेंद्र म श्री श्री म सवाई मानसिंहजी ब पु गोत्र वत्स. |
| ३३ | वृदा (शिरोही) | हाडाचौहान | G C S I G S I. E G O V O | राजपूत क्षत्रिय | ,, | वत्स | १०,००,००० | महाराव राजा सर रघुवीरसिंह बहादुर H. H |
| ३४ | कोट (झालवाला) | ,, | महाराव G C S I G C I E C B E | ,, | ,, | ,, | ५३,००,००० | H H लेप्टनट कर्नल सर उदेसिंहजी बहादुर. |
| ३५ | बिजलिया | परमार | | ,, | सूर्य | वसिष्ठ | ३,००,००० | |
| ३६ | भावनगर | गुहिल | .. | ,, | ,, | गौतम | ७०,७४,६२९ | H H महाराजा श्रीकृष्ण कुमारसिंहजी पु गो काश्यप |
| ३७ | धोलेरा | चुडासम | | ,, | ,, | आत्रि | ३०,००,००० | |
| ३८ | कच्छ | जाडेजा | G C S I G. C I. E | ,, | चंद्र | ,, | २३,००,००० | H H महाराजाधिराज मिर्जा महाराव श्रीखेमराजी बहादुर |
| ३९ | नवानगर | ,, | G C S I G B E | ,, | ,, | ,, | ६४,००,००० | H H महाराजा जाम ले क श्री सर रणजितसिंहजी बहादुर |
| ४० | गोंडळ | ,, | H. C I E L L D D G L M D. F R. L | ,, | ,, | ,, | ५,००,००,००० | H H भगवतसिंहजी ठाकोरसाहेब |
| ४१ | मोरवी | ,, | ठाकोर साहेब | ,, | ,, | ,, | ८,९६,१७९ | H H The ठाकोरसाहेब श्री लुखधीरजीबहादुर |
| ४२ | राजकोट | ,, | K C I E | ,, | ,, | ,, | ९,९१,२३५ | H H ठोकार साहेब सर श्री लखजीराज साहेब |
| ४३ | धांगध्रा | झाला | G C I E K C S S. | ,, | ,, | मार्कंडेय | २५,००,००० | H H महाराणा सर श्री घनश्यामसिंहजी बहादुर |

| नं | संस्थानचें नांव | सस्थानिकांचें घराण्याचें नांव | पदवी. | जात | वश | गोत्र | वार्षिक उत्पन्न. | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| ४४ | लिमडी | झाला | M K C I E | राजपूत क्षत्रिय | चद्र | मार्कंडेय | १०,००,००० | H H महाराणा सर दौलतसिंहजी |
| ४५ | बांकानेर | ,, | ,, | ,, | सूर्य | ,, | ७,४७,३३३ | H H राजासाहेब अमरसिंहजी बोनसिंहजी |
| ४६ | पाटण | ,, | ,, | ,, | ,, | ,, | ३५,००० | ,, ,, |
| ४७ | लुनावाडा (काठि) | सोळंकी | ,, | ,, | ,, | ,, | ४,१९,०२१ | H H महाराणा बखतसिंहजी दोलसिंहजी |
| ४८ | रेवाकाठा | ,, | ,, | ,, | ,, | ,, | ३,००,००० | ,, ,, |
| ४९ | पेठपूर (मही) | ,, | ,, | ,, | ,, | भारद्वाज | ३,००,००० | ,, ,, |
| ५० | रीवा (बुं खं) | चावडा सोळकी | ,, | ,, | ,, | ,, | ३,००,००० | H H महाराजा गुलाबसिंहजी बहादुर |
| ५१ | काश्मीर | जम्मूवाल | G C S I | ,, | सूर्यवश | ,, | ३,५४,००,००० | H H सर प्रतापसिंहजी इद्रफणिंदर ब पु गो वसिष्ठ |
| ५२ | गिधौर | चदेल | ,, | ,, | चद्रवंश | चद्रात्रेय | ३,००,००० | H H चंद्रमौलीश्वर प्रसादसिंहजी पु गो काश्यप |
| ५३ | दिल्ली-पाटण | तुवर | ,, | ,, | ,, | वैयाध्रपद | ३,००,००० | |
| ५४ | कोल्हापूर | शिर्के | राजे | क्षत्रिय मराठा | चद्र | ,, | | |
| ५५ | बडोदें | मोहिते | हबीरराव | ,, | सूर्य | वसिष्ठ | | |
| ५६ | नागपूर | गुजर | सरदार | ,, | ,, | अत्रि | | |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ५७ | महाड | महाडिक | राजे | क्षत्रिय मराठा | सूर्य | हरित वत्स | |
| ५८ | बडोदा | अहिरराव | ,, | ,, | ,, | भारद्वाज | |
| ५९ | बडोदा | पालकर | ,, | ,, | चंद्र | गौतम | पालकर गायकवाडचा पोटभेद आहे |
| ६० | कोल्हापूर | सुर्वे | ,, | ,, | सूर्य | भारद्वाज | |
| ६१ | कोल्हापूर | खानविलकर | ,, | ,, | ,, | जाबाली | खानविलकर हल्लींचे राजाराम |
| ६२ | नागपूर | दळवी | सेनापति | ,, | ,, | वसिष्ठ | छत्रपति महाराज याचें मामा |
| ६३ | नागपूर | साळुंके पाटणकर | सरदार | ,, | ,, | मानव्य | |
| ६४ | नागपूर | दाभाडे | सेनापति | ,, | चंद्र | शाडिल्य | |
| ६५ | नागपूर | आंग्रे | सरखेल | ,, | सूर्य | कौशिक | |
| ६६ | बडोदा | शितोळे | | ,, | ,, | ,, | |

हिंदुस्तानांत हिंदु, मुसलमान, गोंड, कोरकू, भिल्ल, वगैरे संस्थानिक व पोट संस्थानिक मिळून एकंदर ७५० लहान-मोठे संस्थानिक आहेत त्यांपैकीं फक्त क्षत्रिय जातीच्या ठळक सस्थानिकांची माहिती वर दिली आहे.

परिशिष्ट नं० २

## हिंदुस्तानची लोकसंख्या व क्षेत्रफळ

ब्रिटिश हिंदुस्तानचा वसूल एक अब्ज पचेचाळीस कोटी रुपये आहे. आणि एकदर रेल्वे चाळीस हजार मैल आहे

हिंदुस्तानच्या लोकसख्येत १६ कोटी २२ लक्ष ४२ हजार पुरुष आणि १५ कोटी ६७ लक्ष बायका आहेत मिळून एकदर लोकसख्या ३१८९४२००० आहे. त्यांपैकीं शहरात राहाणाऱ्या लोकांची वस्ती ४ कोटी ३८ लक्ष ४२ हजार असून, खेडेगांवांत राहाणाराची २७ कोटी ५१ लक्ष आहे हिंदुस्तान देशांत एकदर शहरें २१४८ असून ७२८६०५ खेडीं आहेत एकदर लोकसंख्येपैकीं इग्रजी येणाऱ्याची सख्या ३६ लक्ष ४२ हजार, लिहिता वाचता येणारे २ कोटी ७६ लक्ष, आणि लिहितां वाचतां न येणारे २८ कोटी ७७ लक्ष

---

पारीशिष्ट नं० ३

## हिंदुस्तानांतील हिंदूंची वर्णवार लोकसंख्या

| | |
|---|---|
| हिंदुस्तानांतील सर्व शाखांच्या एकदर ब्राह्मणाची संख्या | १४८३४००० |
| एकदर सर्व शाखांच्या क्षत्रिय लोकांची सख्या | १०५९००००० |
| यांत मराठा व कुणबी १४९०००००, उत्तर हिंदुस्तानचा कुर्मी ३००००००० , राजपूत आणि इतर क्षत्रिय ६१०००००० | |
| एकदर वैश्य लोकांची सख्या | ८५१६०००० |
| शूद्र वर्णांत गणलेले अस्पृश्य यांची सख्या | ५०८४०००० |
| एकूण हिंदु | २१६७३४००० |

शूद्र वर्णांतील अस्पृश्य मानलेल्या गोंड, कोरकू, भिल्ल वगैरे जगली जातींची एकदर लोकसंख्या— .... ९७७५०००

स्पृश्य व अस्पृश्य मिळून एकदर सर्व हिंदूची लोकसख्या २१६७३४००० आहे.

'Hindoo castes and seets' by Prof. Jogendranath Bhattacharya, in 1896 page 254 to 269.

हिंदू लोकांच्या जाती आणि पंथ या नांवाच्या आपल्या पुस्तकाचें पृष्ठ २५४ ते २६९ यांत इ० सन १८९६ सालीं प्रोफेसर जोगेंद्रनाथ भट्टाचार्य लिहितात कीं:—

अत्यज जातीचे तीन वर्ग आहेत:—१ अस्पृश्य, २ प्राचीन डोंगरी जाती, आणि ३ गुन्हेगार जाती.

[ १ ] यापैकीं नं० १ च्या अस्पृश्य जातींत ९ जाती येतात त्या:—

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १ महार, २ होलिया व ३ धेंड, याची सरासरी लोकसंख्या:— | | | | १०८१७१६ |
| २ मांग व मार्डिंग | २२७६९७ | ३ चांभार व मोची | | २११८५३ |
| ४ भगी ... | ९१८५६ | ५ डोंहोर ऊर्फ ढोर | | १०९१६ |
| ६ खळपे | ६५०७ | ७ शिदवे | | ४२६५ |
| ८ तुरी | ७११ | ९ कोलघे | | ३७५ |
| हे लोक आपसांत हलके व अस्पृश्य मानतात | | | | १६३५८९६ |

[ २ ] प्राचीन डोंगरी जाती १० आहेत:—

| | | | |
|---|---|---|---|
| १ भिल्ल ... | ५१४९०१ | २ वारली . | १२३८९० |
| ३ दुबळे | १२३४१८ | ४ ठाकुर | १२१०६५ |
| ५ कातकरी | ८१२७० | ६ घोडिया ... | ७२२३६ |
| ७ वाघरी | ४१३६७ | ८ चोदरा . | ३७६८२ |
| ९ नाइकडे ... | २६८७५ | १० कोंकणी | १६९०० |
| | ७८७८३१ | | ३७१७७३ |

हे डोंगरी लोक अस्पृश्य नाहीत तरी दांभिक व सोवळे लोक त्याना दूर दूर करतात त्या दहा जाती मिळून एकदर लोकसंख्या.—११५९६०४

[ ३ ] गुन्हेगार जाती २० आहेत त्यापैकीं ७ जातींच्या संख्या विशेष आहेत. त्या:—(१) बेरड १५८९२९, (२) कोळी ५१७१७१, (३) लभाणी २८४४१, (४) पारधी १०२२०, (५) रामोशी ४९५६८, (६) वडर ८७२११, (७) वनजारी १०७२२६, बाकीच्या १३ जाती अल्प आहेत त्या.—भामटे, छपरबंद, फुटगुडे, घाटीचोर, हरण शिकारी, जोशी, कैकाडी, कामी, कजर, कुटबू, महादेव, कोळी, मांग, गमरोडी व हूर या तेरा जातींची लोकसंख्या माहीत नाहीं

हिंदुस्तान सरकारनें वरील तीनही वर्गांच्या जातींस डिप्रेस्डक्लासिस असें म्हटलें आहे अस्पृश्यांचे धंदे निरनिराळे लोक करू लागले आहेत उदाहरणार्थ, महाराचें काम पोस्टमन किंवा पट्टेवाला करू लागला आहे, व जागल्याचें काम कोणत्याही जातीचा पोलीस शिपाई करूं लागला आहे लेदर फॅक्टरींत ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य या तीनही जातीचे लोक चांभाराचा धंदा करू लागले आहेत तसेंच जोडे विकणाराचा चांभाराचा धंदा बोहरी, मारवाडी, व ब्राह्मण राजरोसपणें करू लागले आहेत सरकारच्या अपकारी

खाल्यामुळें मूळचे कलाल मागे पडले असून दुसरेच उच्च वर्णाचे म्हणविणारे लोक कलालीचा धंदा करू लागले आहेत ढोरांचा ऊर्फ डोहोरांचा, मेलेलीं जनावरें चिरफाड करण्याचा धदा आणि हजारों जिवत गाई कसाबखान्यांत कापण्याचा, व कापविण्याचा कसायाचा धदा ब्राह्मण लोक राजरोसपणें करू लागले आहेत सारांश, अस्पृश्य जातीचें वैशिष्ट्य आतां कमी होत चालले आहे कारण उच्च वर्णाच्या जातींनीं त्यांचे धंदे उचलले आहेत असे जर आहे तर मग महार, मांग, चांभार, डोहोर या अस्पृश्य जातींवर, अस्पृश्यता आतां कां असावी ? याशिवाय आगगाड्या, जहाजें, बोटी, फॅक्टरी, ट्रामवे, चहाचीं व फराळाचीं दुकानें, नाटकगृहें, कचेऱ्या, यज्ञ, उत्सव, यात्रा, सार्वजनिक विहिरी, तलाव, व्याख्यानें, दुकानदारी, व्यापार, दळणवळण व संघकार्यें इत्यादि मोठमोठ्या धार्मिक व सामाजिक कार्यांत अस्पृश्यता पाळणेंच अशक्य झालें आहे वरील प्रकारच्या हजारों प्रसगीं अस्पृश्यांच्या स्पर्शाचे व त्याच्या हाताचें अन्नपाणी, फराळ, व इतर खाद्य पेय पदार्थ राजरोसपणे सोवळ्या ब्राह्मणांस, कडव्या क्षत्रियास व भोळ्या वैश्यास जर चालतात, त्याचा विटाळ किंवा विधिनिषेध जर मुळींच मानला जात नाही, तर तर मग इतर क्षुल्लकप्रसगीं अस्पृश्यता पाहिजे तरी कशाला ?

---

## परिशिष्ट नं० ४

# अस्पृश्य मानलेल्या लोकांची प्रांतवार लोकसंख्या

| | | | |
|---|---|---|---|
| मुबई इलाखा | २८०००००० | यु० पी० सयुक्तप्रात | ९०००००० |
| मद्रास ,, | ६३७२००० | हैद्राबादचें राज्य | २३३९००० |
| बंगाल ,, | ९०००००० | राजपुताना | २२६७००० |
| पंजाब ,, | २८९३००० | त्रावणकोर | १२६०००० |
| बिहार—ओरिसा | ८०००००० | म्हैसूर | ९३२००० |
| आसाम | २०००००० | बडोदा राज्य | १७७००० |
| बेरार व सी पी | ३३००००० | ग्वाल्हेर राज्य | ५००००० |
| | | | ५०८४००००० |

## परिशिष्ट नं० ५

# ब्रिटिश साम्राज्याशीं हिंदुस्तानची तुलना

| देशांतील भाग | क्षेत्रफळ चौरस मैल | लोकसंख्या |
|---|---|---|
| एकूण ब्रिटिश साम्राज्य | १ कोटी १३ लक्ष | ३९ कोटी ४२ लक्ष* |
| एकूण हिंदुस्तान | १७ लक्ष ६६ हजार | ३१ कोटी ८९ लक्ष ४२ हजार |

## परिशिष्ट नं० ६

# हिंदुस्तानची धर्मवार लोकसंख्या

| धर्म | ब्रिटिश हिंदुस्तान | संस्थाने | सन १९११ चे खाने-सुमारीप्रमाणें एकूण | सन१९२१चे खाने-सुमारीप्रमाणें लोकसंख्या |
|---|---|---|---|---|
| हिंदु | १५ को ८६ ल | ४ को ८५ ल | २० को ७१ ल | २१६७३४००० |
| मुसलमान | ५ को ३८ ल | ८६ ल ५३ ह | ६ को २४ ल. | ६८७३५००० |
| बौद्ध | ९४ ल ११ ह | ६५ ह | ९४ ल ७६ ह | ११५७१००० |
| जंगली | ५८ ल. ९९ ह. | ६ ल ८५ ह. | ८५ ल ८४ ह. | ९७७५००० |
| ख्रिस्ती | १९ ल. ४ ह | १० ल १९ ह | २९ ल २३ ह | ४७५४००० |
| शीख | १८ ल ७४ ह. | ६ ल २१ ह | २४ ल ९५ ह | ३२३९००० |
| जैन | ४ ल ७८ ह | ८ ल ५६ ह | १३ ल ३४ ह | ११७९००० |
| पारशी | ८० ह. | १४ ह. | ९६ ह | १०२००० |
| ज्यू | १५ ह. | ३ ह | १८ ह | २२००० |
| आणि इतर | १ ल. २९ ह. | १ ल ७४ ह. | १ ल. २९ ह. | २८३१००० |
| एकूण | २३ को १८ ल. | ६ को २४ल. | २९ को ४३ ल | ३१८९४२००० |

* सर्व पृथ्वीवरील जमिनीचा एक पंचमांश व लोकसंख्येचा एक चतुर्थांश ब्रिटिश सत्तेखालीं आहे.

परिशिष्ट नं० ७

# हिंदुस्तानची भाषावार लोकसंख्या

| भाषा | संख्या | भाषा | संख्या |
|---|---|---|---|
| १ हिंदी | ८ को ६० ल | ८ कानडी | १ को. |
| २ बंगाली | ४ को २० ल | ९ उरिया | ९० ल |
| ३ तेलगू | २ को | १० मल्याळी | ५५ ल |
| ४ मराठी | १ को ९० ल | ११ सिंधी | २५ ल |
| ५ पंजाबी | १ को. ८० ल | १२ आसामी | १५ ल. |
| ६ तामील | १ को ६० ल | १३ खोंड | १५ ल |
| ७ गुजराथी | १ को १० ल | १४ इतर | ५ को २३ ल |

परिशिष्ट नं० ८

# हिंदुस्तानची प्रांतवार व मुख्य भागवार लोकसंख्या

| | |
|---|---|
| बंगाल इलाखा . | ७ कोटी ४७ लक्ष |
| संयुक्त प्रांत . | ४ कोटी ७६ लक्ष |
| मद्रास इलाखा | ३ कोटी ८२ लक्ष |
| वऱ्हाड व मध्यप्रांत .. | २ कोटी ७५ लक्ष |
| पंजाब इलाखा . | २ कोटी ३ लक्ष |
| मुंबई इलाखा . | १ कोटी ८५ लक्ष |
| कलकत्ता शहर ... | ११ लक्ष |
| मुंबई शहर .... ... .. | ८ लक्ष |
| मद्रास शहर .... .. ... | ५ लक्ष |
| दक्षिण हैद्राबाद ... ... | ४॥ लक्ष |
| लखनौ शहर .. . ... | ३ लक्ष |
| रंगून शहर ... ... | २ लक्ष ३४ हजार |

बनारस, दिल्ली, लाहोर, प्रत्येक २ लक्षावर, १ लक्ष पासून २ लक्षपर्यंतचीं शहरें १९, पांच हजार ते १ लक्ष वस्तीचीं शहरें १५७४

## परिशिष्ट नं० ९

# पृथ्वीवरील लोकसंख्येचा खंडवार व धर्मवार तपशील

| वर्णवार | संख्या | खंडवार | संख्या | धर्मवार | संख्या |
|---|---|---|---|---|---|
| १ गौरवर्ण ( कॉकेशन ) | ७७ कोटी | युरोप | ३८ कोटी | ख्रिस्ती | ४७ कोटी |
| २ पीतवर्ण (मंगोलियन) | ५४ कोटी | आशिया | ८० कोटी | बौद्ध | ४२॥ कोटी |
| ३ कृष्णवर्ण (इथिओपियन) | १७॥ कोटी | आफ्रिका | २० कोटी | हिंदु | २१॥ कोटी |
| ४ ताम्रवर्ण ( अमेरिकन ) | २कोटी२०लक्ष | अमेरिका | १२ कोटी | मुसलमान | २०॥ कोटी |
| एकदर पृथ्वीची लोकसंख्या | १५० कोटी ७० लक्ष | एकूण | १५० कोटी | ज्यू | ८० लक्ष |
| | | | | इतर सुमारें | १८ कोटी ४० लक्ष |
| | | | | एकूण | १५०को ७७लक्ष ‡ |

## परिशिष्ट नं० १०

# पृथ्वीचें क्षेत्रफळ

| खंडवार | चौरस मैल | खंडवार | चौरस मैल | खंडवार | चौरस मैल |
|---|---|---|---|---|---|
| १ युरोप | ३७ लक्ष | ३ आफ्रिका | १२० लक्ष | ५ आस्ट्रेलिया | ३० लक्ष |
| २ आशिया | १६८ लक्ष | ४ अमेरिका | १६५ लक्ष | ६ एकूण सर्व पृथ्वी | ५२० लक्ष |

* पृथ्वीवरील एकंदर लोकसंख्येपैकीं सरासरी ५ कोटी लोक दरसाल मरतात व ५ कोटी नवीन जन्मतात.

‡ पैकीं आशिया खंडांत १३॥ कोटी व फक्त हिंदुस्तानांत७कोटी मुसलमान आहेत.

परिशिष्ट नं० ११

# हिंदुस्तानची घरसंख्या व लोकसंख्या

| भागाचें नांव | क्षेत्र चौ० मैल | ५००० लोकापेक्षां जास्त वस्तीचीं शहरें | इतर गांवें व खेडी | आबाद घर सख्या | एकदर लोकसख्या | पुरुष | स्त्रिया |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ए० हिंदुस्तान | १८०५३३२ | २३१५ | ६८५६६७ | ६५११८३८९ | ३१८९४२४८० | १६३९९५५५४ | १५४९४६९२६ |
| ब्रि० ,, | १०९४३०० | १५६१ | ४९८५२७ | ५०४४१६३६ | २४००३२९३ | १२६८७२११६ | १२०१३११७७ |
| सस्थानें | ७११०३२ | ७५५ | १८७१३८ | १४७५६७५३ | ९१९३९१८७ | ३७१२३४३८ | ३४८१५७४९ |

परिशिष्ट नं० १२

# हिंदुस्तानची धर्मवार लोकसंख्या

| प्रांत किंवा संस्थान | एकदर हिंदी आर्य ऊर्फ हिंदु आर्य | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | एकदर हिंदु | नामदारी वैदिक ऊर्फ भिक्षुकी धर्माचे हिंदु | आर्य हिंदु | ब्रह्मसमाजी हिंदु | शीख हिंदु | जैन हिंदु | बौद्ध हिंदु |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| एकदर | २१६७३४५८६ | २१६२६०६२० | ४६७५७८ | ६३८८ | ३२३८८०३ | ११७८५९६ | ११५७१२६८ |
| ब्रिटिश हिंदुस्तान | १६३१४४७०० | १६२७१२१८८ | ४२६६८२ | ५८३० | २३६७०२१ | ४५५८५५ | ११४९०८१५ |
| सस्थानें | ५३५८९८८६ | ५३५४८४३२ | ४०८९६ | ५५८ | ८७१७८२ | ७२२७४१ | ८०४५३ |

## परिशिष्ट नं० १२ [ पुढें चालू ]

| इराणी | सेमिटिक ( प्रधान धर्म ) | | | अव्युत्पन्न | इतर |
|---|---|---|---|---|---|
| पार्शी | मुसलमान | ख्रिस्ती | ज्यू | रानटी धर्म | इतर धर्म |
| ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ |
| १०१०७८ | ६८७३५२३३ | ४७५४०६४ | २१७७८ | ९७७४६११ | १८००४ |
| ८९४६४ | ५९४४४३३१ | ३०२७८८१ | १९२२१ | ६९०४१६७ | १७७४५ |
| १३३१४ | ९२९०९०२ | १७२६१८३ | २५५७ | २८७०४४४ | २५९ |

परिशिष्ट नं० १३

# शिक्षणाबद्दल जातवार माहिती

| जात | एकदर लोकसंख्या | पुरुष | स्त्रिया | शिकलेले स्त्रिया-पुरुष | शिकलेले फक्त पुरुष | शिकलेल्या फक्त स्त्रिया | इ शिकलेले स्त्री पुरुष | इ शिकलेले फक्त पुरुष | इ शिक फ स्त्रिया | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ |
| ए कायस्थ | २१७८५९६ | ११४४२८६ | १२३४३१० | ७७१६१३ | ६३६०२४ | १३५५८९ | २२८१३९ | २१८१४४ | ९९९५ | |
| ए राजवशी | १७४६१३७ | ९०७१५९ | ८३८९७८ | १०२०३३ | ९९६२८ | २४०५ | ५५२३ | ५४७१ | ८२ | |
| ए ब्रा बा | १४४९६३६९ | ७५६५६८६ | ६९३०६८३ | २७१५६४८ | २३५४०६९ | ३६१५७९ | ५२६९२५ | ५०६९२३ | २०००२ | यांत शीख २६ हजार व २३० मुसलमान आहेत |
| ए क्षत्रिय | ७०१८०५ | ३९५२७३ | ३०६५३२ | ६५६७४ | ५८८-४८ | ७५२६ | ७८७७ | ७५३८ | ३३९ | |
| ए खत्री | ५३२२९१ | २९३७३६ | २३४५५५ | १२४३४० | १०९६४४ | १४६९६ | २८१९९ | २७६९१ | ५०८ | यांत७०ह मुसलमान आहेत. |
| ए राज०ठा | ९७९११६८ | ५२१७२३६ | ४५७३९३२ | ५१३५४३ | ४७६७५७ | ३६७८९ | ३७३८१ | ३५६६६ | १७१५ | यात१७२००मुसल आहेत |
| ए म० क्ष | ६५४९७३९ | ३२७७८४४ | ३२७१९३५ | ५६०६० | ५२५३० | ३५३० | २६२४ | २५२७ | ९७ | |
| ए कूर्मी | ४८११५५७ | २४१०४१६ | २३७११८१ | ८९३५६ | ८६७०० | २६५६ | २४७५ | २४३७ | ३८ | |
| ए कुळबी | ३२८८७४१ | १६४३३६६ | १६४१३७५ | १२७७३४ | ११७९९३ | ९७४१ | ३९७० | ३९२२ | ४८ | |
| ए माळी सैनी „ | ३१५६३२४ | १५९७८८६ | १५५८४३८ | ४०७६२ | ३८४९८ | २२६४ | २१५८ | २११० | ४८ | १३०००० मुसलमान आहेत |
| ए कोळी कैवर्तक | ६३९४२२१ | ३१७०९७७ | ३२२३२४४ | ३२३१६६ | ३०७४८८ | १५६७८ | ३०१८९ | २७९३९ | ४५० | याशिवाय मुसल कोळी आहे |
| एकूण तेली | ४३२५३८७ | २१९९८५० | २१३१५३७ | १७८९४३ | १६९२६६ | ९६७७ | १५४१८ | १५१२८ | २९० | यांत ६४७००० मुसल „ |
| ए न्हावी | २९७०००० | १५०८०३३ | १४६१९६७ | ८७४०६ | ८४३५५ | ३०७१ | ८५५७ | ८३४६ | २११ | यात ५६०००० „ „ |
| ए, गौ आ | ९५१२२५४ | ४९२१९७१ | ४५९०२८३ | १५८७०२ | १५००४५ | ८२५७ | १२२५९ | ११९३९ | ३२० | यांत६७००मुसल फिरस्ते „ |

परिशिष्ट नं० १३ [ पुढें चालू ]

# शिक्षणाबद्दल जातवार माहिती

| जात | एकदर लोकसंख्या | पुरुष | स्त्रिया | शिकलेले स्त्रिया-पुरुष | शिकलेले फक्त पुरुष | शिकलेल्या फक्त स्त्रिया | इ शिकलेले स्त्री पुरुष | इ शिक फ पुरुष | इ शिक फ स्त्रि | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ |
| ए० कुंभार क्ष | ३३७७३९६ | ११२७२०९ | १७५०१८७ | ६२३३८ | ५८७०१ | ३६३७ | ६४१० | ६२८४ | १२६ | यात ५ लाख मुसल आहेत |
| एकूण जाट | ७२६५१०५ | ४०७७४१० | ३१८७६९५ | १३८५९० | १३०८१५ | ७७७५ | १३७२ | १३०९२ | १८० | याशिवाय ६७ इ जाट आहेत |
| एकूण भाटे | २३६२८ | १३६६४ | ९४६४ | ७३८४ | ५३९५ | १९८९ | २७१० | २४३२ | २७८ | |
| एकूण गुजर | २४४३८२७ | १२८०२८३ | ११६३५४४ | ८९२० | ८५१८ | ४०२ | २२७ | २२१ | ६ | यांत १० लाख मुसल आहेत. |
| एकूण शीख | ३२४६५६३६ | १७२१४३९३ | १५२५१२४३ | १८८०५८ | १६४१२३ | २३९३५ | २३४५५ | २२६०४ | ८५१ | यांत २८०००००० ,, ,, |
| ए क्षत्रिय मराठा गुजर कुर्मी कुळंबी | १६७९५६६९ | ९०४०१४२ | ७७५५४२७ | २४७७४४ | ३२३८८९ | २३५५७ | १७१७३ | १६६४५ | ५२८ | बडोदा स्टेटमधील मराठा लोकानीं आपली जात क्षत्रिय मराठा या नावानें नोंदली आहे हैद्राबाद स्टेटमध्यें मराठा क्षत्रिय, मुंबई इलाख्यांत मराठा, सी पी वऱ्हाडमध्यें कुणबी व गुजराथेंत गुजर |
| एकूण भंडारी | २९०३६० | १४०७१५ | १४९६४५ | | . | | . | | . | यात१॥लाख मुसलमान आहेत |
| ए. दर्जी (हिं) | ५९८८०९ | ३१०९४० | २८७८६९ | | ... | | . | | . | |
| ए लिंगायत | २७३८२१४ | १३९२००६ | १३४६२०८ | | .. | | | . | ... | यात ४ हजार मुसलमान, २ |
| ए बंजारी | ६५१९२७ | ३३८९६५ | ३१२९६५ | | .. | | | | | लाख ७०हजार फिरस्ते आहेत. |

# वर्णवार सूचि

### आ

अभिप्राय

# क्षत्रियांचा इतिहास

## या ग्रंथाच्या पहिल्या आवृत्तीसंबंधानें व्यक्त करण्यांत आलेल्या अनेक अभिप्रायांपैकीं कांहीं अभिप्रायांतील संक्षिप्त अवतरणें खालीं दिलेलीं आहेत.

**विजयी मराठा, पुणें** [ ता ४ जुलै, सन १९२७ ]—या इतिहासांत वैदिक काळापासून तों आतापर्यंतच्या क्षत्रियांची सपूर्ण माहिती दिली आहे. पुस्तक अत्यंत उपयुक्त झालें असून सग्रहणीय आहे परिश्रमाच्या मानानें तीन रुपये किंमत विशेष नाहीं

**किर्लोस्कर खबर, किर्लोस्करवाडी** [ जुलै, सन १९२७ ]—सदर पुस्तकांतील विपर्यस्त भाग वगळल्यास इतर ऐतिहासिक माहितीच्या दृष्टीनें पुस्तक उत्तम व संग्राह्य आहे इतक्या वृद्ध अवस्थेंत श्री० देशमुख यांनी असा ग्रंथ लिहिला हा त्यांचा उत्साह अभिनंदनीय आहे

**नवयुग, मुंबई** [ ता १९ जून, सन १९२७ ]—हें पुस्तक पुष्कळ माहिती गोळा करून परिश्रमपूर्वक लिहिलेले आहे. याच्या वाचनापासून क्षत्रियांस आपली पूर्व पीठिका कळून येऊन त्यांच्यांत स्वाभिमान जागृत होईल, व अंधश्रद्धेनें ब्राह्मणांच्या कच्छपीं लागण्याच्या कित्येकांच्या वृत्तींत खास फरक पडेल, आणि आपल्या खऱ्या धर्माची जाणीव होईल हल्लींच्या काळीं असल्या पुस्तकांची फार उणीव होती, ती भरून काढल्याबद्दल आम्ही श्री० देशमुख यांचें मनःपूर्वक अभिनदन करितों.

**इंटर, कोल्हापूर** [ता २५ मार्च, सन १९२७]—'क्षत्रियांचा इतिहास', हा ग्रंथ फार महत्त्वाचा आहे श्री०काशीराव देशमुख यांचें पंचवीस वर्षांचें वाचन, विचार व अनुभव यांचें हें एक उत्तम फळ आहे.... एकंदरींत हा ग्रंथ इतका मौल्यवान् झाला आहे कीं, प्रत्येक ब्राह्मणेतराचे घरीं तो आधारभूत म्हणून बाळगण्यास इष्ट आहे या ग्रंथानें देशमुखसाहेबांनीं वाङ्मयांत फारच उत्तम भर घातली आहे याबद्दल आम्ही त्यांचें मनःपूर्वक अभिनदन करितों ग्रंथाचे मानानें तीन रुपये किंमत जास्त नाहीं.

**राष्ट्रवीर, बेळगाव** [ता १४ जून, सन १९२७]—हा 'क्षत्रियांचा इतिहास' सर्व ब्राह्मणेतरांना स्वाभिमानोत्तेजक असून अत्यंत परिश्रमपूर्वक व उपपत्तीसह

लिहिण्यांत आला आहे. हा एकच ग्रंथ संग्रहीं ठेवल्यापासून अनेक गोष्टींची ओळख होणार आहे. थोडक्यांत सांगावयाचें झाल्यास हा क्षत्रियांचा 'सर्वसंग्रह' होय मोठया आयासानें लिहिलेल्या या ग्रंथाचीं सुमारे ७०० पृष्ठे असतांही केवळ तीन रुपये किंमत ठेवण्यांत आलेली आहे यास्तव श्री० देशमुख यांचें आम्ही मनःपूर्वक अभिनंदन करितों, आणि त्यांच्या 'क्षत्रियांच्या इतिहासा'चें सुस्वागत करितों.

**परीक्षक, बेळगांव** [ ता १५ सप्टेंबर, सन १९२७ ]—**'क्षत्रियांचा इतिहास'** हा ग्रंथ उमरावतीचे वयोवृद्ध नागरिक महाशय काशीराव बापूजी देशमुख या गृहस्थानी अत्यत परिश्रमाने लिहिलेला आहे. त्यांत ग्रंथकाराचाही एक फोटो आहे. त्यांची भव्य मुद्रा पाहूनच त्यांजबद्दल आमच्या मनांत आदरभाव जागृत झाला या ग्रंथाची एक प्रत सामर्थ्य असणाऱ्या प्रत्येक गृहस्थानें आपल्या संग्रहीं ठेवावी

**ज्ञानसिंह, पुणें** [सप्टेंबर, सन १९२७]—सदर पुस्तक अत्यत परिश्रमपूर्वक तयार केलेलें आहे. पुस्तकांतील भाषा प्रौढ आहे मांडणी व ब्राह्मणी मतांचें खडण उत्तम तऱ्हेनें करून क्षत्रियांचें अस्तित्व साधार सिद्ध केलें आहे श्रमांच्या मानानें पुस्तकाची किंमत तीन रुपये योग्य आहे. ग्रंथकर्त्यांच्या वयमानाकडे पाहिले म्हणजे या परिश्रमांचे फारच कौतुक वाटतें. इतका मोठा व माहितीनें परिपूर्ण असा क्षत्रियांविषयीं ग्रंथ आजपर्यंत उपलब्ध नव्हता, ही उणीव त्यांनीं भरून काढली आहे एकूण, पुस्तक संग्रहणीय आहे. ब्राह्मणेतरांनीं व ब्राह्मणांनींही सदर पुस्तक वाचावें, अशी आमची शिफारस आहे

**जागृति, बडोदें** [ता. ५ नोव्हेंबर, सन १९२७ ]—**'क्षत्रियांचा इतिहास'** हें पुस्तक वाचून तर श्री० देशमुखांच्या अगाध विद्वत्तेबद्दल आम्ही अगदीं विस्मयचकितच झालों. या पुस्तकास **'क्षत्रियांचा इतिहास'** असें लहानसेंच नांव जरी दिलेले असलें, तरी हा एकंदर ग्रंथ म्हणजे एक ज्ञानकोशच आहे असें म्हणावें लागतें श्री० देशमुखांच्या मुखकमलावर झळकणारें क्षात्रतेज त्यांच्या लेखांत पदोपदीं स्पष्ट दृग्गोचर होतें अगदी बारीक टाईपांत छापलेला सुमारें ७०० पृष्ठांचा ग्रंथ श्री० देशमुखांच्या दीर्घोद्योगाची साक्ष पटवितो. वेदकालीन क्षत्रियांपासून आजपर्यंतच्या क्षत्रियांची इत्थंभूत माहिती या पुस्तकांत आढळते शेंकडों ग्रंथ वाचून, त्यांचीं टिपणें टांचणें करून त्यांचा पुस्तकांत यथायोग्य रीतीनें पुरस्कार करण्याचें अत्यंत बिकट कार्य प्रसिद्ध इतिहासकार गीबन यानें जितक्या कुशलतेनें केलेले आहे, तितक्याच कुशलतेनें हें कार्य या महाराष्ट्र गीबननें–श्री० देशमुख यांनीं–केलेलें आहे हें सर्वंच महाराष्ट्रीयांस भूषणास्पद आहे...तरी प्रत्येक इतिहासज्ञानें या पुस्तकाचा अवश्य संग्रह करावा, अशी आमची शिफारस आहे.

**भगवा झेण्डा, कोल्हापूर** [ ता. १३ आक्टोबर सन १९२७ ]—श्री० काशीराव बापूजीराव देशमुख, उमरावती, यांनीं धार्मिक, सामाजिक व राजकीय माहितीनें

परिपूर्ण असा, ऐतिहासिक सत्याधारें '**क्षत्रियांचा इतिहास**' हा ग्रंथ लिहून महाराष्ट्रीय बहुजनसमाजाची अत्यंत अमोल अशी कामगिरी बजाविली आहे, याबद्दल अखिल बहुजनसमाजानें या त्यांच्या अमूल्य कृतीकडे सहृदयतेन पाहणे अत्यत जरूर आहे त्यांनीं हा ६२७ पानांचा प्रचंड ग्रंथ लिहून महाराष्ट्र साहित्य सम्रहांत एक नवीन प्रकारचें तेज उत्पन्न केलें आहे क्षत्रिय परपरेचा साग्र इतिहास लिहिण्याचें कार्य करणे अत्यंत जरूर होतें तें कार्य श्री० काशीरावजी यांनीं आपल्या शिरावर घेऊन यथासागपणे पार पाडलेलें आहे सर्व दृष्टीनीं जर विचार केला तर ऐतिहासिक सत्य माहितीने परिश्रमपूर्वक लिहिलेल्या या ग्रंथाइतका दुसरा ग्रंथ आजतागायत झाला नाहीं, हें सर्वांना कबूल केलेंच पाहिजे हा ग्रंथ प्रसिद्ध करून श्री० काशीराव देशमुख यांनीं अमूल्य कामगिरी बजाविली असून तिचें चीज करणे हें प्रत्येक महाराष्ट्रीयाचे आद्यकर्तव्य आहे

**महाराष्ट्र**—'**क्षत्रियांचा इतिहास**', **भाग १-२**-लेखक—श्री० के.बी देशमुख, उमरावती-किं ३ रु ब्राह्मणेतर सर्व जातींनी आपापल्या हल्लीच्या विविक्षित जातींचें नाव सोडून सर्वांनीं क्षत्रिय ही एकच जात सांगावी व मानवी, आणि एक-जातीयत्वाची भावना अंतःकरणांत बिंबवून मर्दपणाची क्षात्रवृत्ति अगीं बाणवावी असे विस्तृत धोरण ग्रंथकर्त्यांनीं स्वीकारिलें आहे एकराष्ट्रीयत्वास आणि देशोद्धारास यातील पुष्कळ तत्वें चांगलीं उपयुक्त ठरण्यासारखीं आहेत

**महाराष्ट्र केसरी**—श्री० के बी देशमुख, उमरावती, यांचा '**क्षत्रियांचा इतिहास**' हा ग्रंथ आम्हीं वाचून पाहिला पाचसहा हजार वर्षापूर्वीपासूनची क्षत्रियांची उत्पत्ति, स्थिति आणि क्रान्ति यांसंबधानें अत्यंत उपयुक्त अशी जनरल माहिती पहिल्या भागांत दिलेली असून, दुसऱ्या भागांत क्षत्रियांत मोडणाऱ्या १५ जातींची सप्रमाण माहिती दिलेली आहे **क्षत्रियांचा एनसायक्लोपीडिया** म्हणजे क्षत्रियाचा सर्वसारसग्रह हें नांव या ग्रंथाला जास्त शोभले असत तीन रुपये किंमत माफक आहे

**केसरी**—'**क्षत्रियांचा इतिहास**'-**भाग १-२**-लेखक-श्री० के बी देशमुख, उमरावती, किं रु ३. या ग्रंथाच्या नावाप्रमाणेंच त्यांत वैदिककाळापासून आज पर्यंतची क्षत्रियांचीं धार्मिक, सामाजिक व राजकीय स्थित्यतरें व स्थानांतरे यांसंबधींची माहिती, शिलालेख, ताम्रपट, कोरींव लेणी आणि प्राचीन ग्रंथ यांच्या आधारें चांगलीं सुसगतावर दिलेली आहे क्षत्रियाच्या एकत्रित व सुसगत माहितीचा यासारखा दुसरा ग्रंथ अद्याप पाहाण्यात आला नाहीं ग्रंथ सग्राह्य आहे लेखकाचा भव्य फोटोही त्यांत आहे



११ ग्रामकंटकलीला (नाटक)—पाटील, पटवारी, भट्टभिक्षुक, मारवाडी, वकील यांच्या हृदयाची पारख करण्यास शिकविणारें व जलशास उपयुक्त असें सुंदर पुस्तक, किंमत १ रु

१२ स्वराज्यसाधन (नाटक)—सद्यःपरिस्थितींत अत्युपयुक्त पुस्तक, किंमत १ रु

१३ सुधर्मविजय (नाटक)—जलशास उपयोगी असें नाटक सद्धर्म वाढविण्यास फारच उपयुक्त किंमत १२ आणे

१४ स्वयपुरोहित (घरचा शास्त्री)—आवृत्त्यांवर आवृत्त्या निघत आहेत सर्व विधि घरच्याघरीं करविण्यास शिकविणारें असें लोकमान्य पुस्तक, नवीन आवृत्ति, किंमत २ रु

१५ कोदंडाचा टणत्कार (ठाकरेकृत)—गुलामी मनोवृत्ति व भिक्षुक शाहीचें अतरग यांचें खोंचदार रीतीनें विवेचन करणारा मार्मिक ग्रथ किंमत १॥ रु

१६ हिंदुजनांचा ऱ्हास व अधःपात—अत्यत हृदयगम विवेचन, नवीन माहिती, किंमत १ रु

१७ आर्यसमाजाचा संदेश—प्राचीन आर्यधर्म व भिक्षुकशाहीनें दूषित केलेला हिंदुधर्म यांची मार्मिक तुलना, किंमत १८४ रु

१८ स्वामि दयानंदाचीं बोधपर व्याख्यानें—सद्यःस्थितीस अनुसरून अशीं तेजस्वी व्याख्यानें, किंमत १२ आणे

१९ स्वामि दयानद सरस्वतीचा परिचय—प्रत्येकानें हे पुस्तक खिशात ठेवावें किं ८ आणे

२० वेद ईश्वरप्रणित आहेत काय ?—वैदिक धर्माचें सरस व सुरस विवेचन, किंमत ६ आणे

---

## सुबोध-ग्रंथ-मालेचा जाहीर सन्मान.



आमच्या सुबोध ग्रथमालेच्या ग्रथांना कोल्हापूरच्या राजदरबारांत सन्मानपूर्वक रोख एक हजार रुपयांचें बक्षिस आणि श्रीमत् क्षात्र जगद्गुरूच्या हस्तें सुवर्णपदक अर्पण करण्यात आलें आहे त्याचप्रमाणे क्षत्रिय वैश्यधर्म सरक्षक परिषद् नागपूर याज कडून आणि मराठा शिक्षण परिषदेच्या मुबईच्या ग्रथपरिक्षक मंडळाकडून सन्मानपूर्वक बक्षिसें मिळालीं आहेत

**तसेंच**

नेक नामदार गव्हर्नरसाहेब बहादुर इन् कौन्सिल, प्रांत नागपूर, यांचें पत्र नबर १७।१७२ P O तारीख २३ ३१ १९२८ वरून लडनच्या सरकारी लायब्ररीकरितां कांहीं ग्रथ पसत करण्यांत आले आहेत